कादंबरीमय पेशवाई

# पेशवाईचा पुनर्जन्म

५



विठ्ठल वामन हडप

प्रकाशक— परचुरे, पुराणिक आणि मंडळी, मुंबई.



कादंबरीमय पेशवाई

५





# पेशवाईचा पुनर्जन्म

लेखक

विठ्ठल वामन हडप





१९२८

किंमत १॥ रुपया





परचुरे, पुराणिक आणि मं.
मुंबई नं. ४

# भूमिका



'**पेशवाईचा पुनर्जन्म**' ही 'कादंबरीमय पेशवाई'मधील पांचवी व बाळाजी विश्वनाथांच्या अंतानंतर त्यांचे ज्येष्ठ पुत्र बाजीराव—ज्यांना इतिहासांत 'पहिले बाजीराव' व 'थोरले बाजीराव' अशा संज्ञा आहेत ते—पेशवे झाले, त्यांच्या कारकीर्दीवरील पहिली कादंबरी होय. बाळाजी विश्वनाथांच्या निधनानंतर बाजिरावांना पेशवाईचीं वस्त्रें मिळण्याच्या कामीं तेव्हां अधिकारारूढ श्रीपतराव प्रतिनिधीकडून जो विरोध झाला, त्या विरोधाच्या पायावर प्रस्तुत कादंबरीच्या कथानकाची उभारणी करण्यांत आली आहे. पेशवे-प्रतिनिधि यांमधील ह्या विरोधाबद्दल इतिहासकारांत मुळींच दुमत नाहीं. पण त्या विरोधाचें निश्चित व निर्णयात्मक स्वरूप कोणत्याही इतिहासांत यथावत् स्वरूपांत पहावयाला सांपडत नाहीं. असें असतां उपरोक्त विरोधाच्या ऐतिहासिक सत्याला तत्कालीन इतिहासाच्या सूक्ष्मावलोकनानें ज्ञात झालेल्या परिस्थितीचीं द्योतकें शोभणाऱ्या स्थल—काल—व्यक्ति—वैशिष्ट्यांची जोड देऊन त्यांतून प्रस्तुतचें कथानक निर्माण करण्यांत आलें आहे. असें कां, असें कितीएकांना वाटण्याचा संभव आहे. अशा शंकांचें निरसन करण्याचें हेंच स्थळ होय. त्यासाठीं ह्या प्रतिनिधि व पेशवे यांमधील वाद मुळांत कोठें व कां उत्पन्न झाला, याचा शोध लावण्यासाठीं आपणांला पूर्वेतिहास पाहिला पाहिजे.

ह्या वादांत प्राधान्य पावलेल्या प्रतिनिधिपदाचा पूर्वेतिहास थोडक्यांत असा कीं, शिवाजीमहाराज व संभाजीमहाराज यांच्या कारकीर्दींत हें पद अस्तित्वांत नव्हतें. संभाजीमहाराजांच्या पश्चात् राजाराममहाराजांनीं इ. सन १६९० मध्यें आपले ऋणानुबंधी साह्यकर्ते प्रल्हाद निराजी यांच्याविषयीं सक्रिय सहानुभूति दाखविण्यासाठीं त्यांना आपल्या प्रधानमंडळांत घेण्याचें ठरविलें. पण प्रधानमंडळांत त्यांना देण्याजोगें एकही पद शिल्लक नव्हतें, म्हणून राजाराममहाराजांनीं 'प्रतिनिधि' हें नवें पद निर्माण करून त्या पदावर प्रल्हादपंताची नेमणूक केली. राजाराममहाराज चंदी मुकामीं असतां प्रल्हादपंत इ. सन १६९७ मध्यें परलोकवासी झाले. त्यांच्या पश्चात् तिमाजी रघुनाथ हणमंते यांना राजाराममहाराजांनीं तें पद दिलें. पण तिमाजी रघुनाथांकडे तें पद फार दिवस टिकलें नाहीं. दरम्यान् परशराम त्रिंबक हे रामचंद्रपंत अमात्य यांच्या कृपेनें राजवटीला सेवा करीत होते, त्यांच्यावर महाराजांची मर्जी बसून महा-

राजांनीं त्यांनाच इ. सन १६९८ मध्यें प्रतिनिधि केलें. राजाराममहाराजांच्या पश्चात् त्यांची पत्नी ताराबाई शिवाजी नांवाच्या आपल्या वेडगळ मुलाला गादीवर बसवून अधिकारारूढ झाली तेव्हां, व त्यानंतर इ. सन १७०८ मध्यें शाहूमहाराजांची सुटका होऊन ते दक्षिणेंत आले तेव्हांही, परशरामपंतच प्रतिनिधि होते. ताराबाईच्या अमदानींत परशरामपंतांचें पारडें बरेंच जड होतें. पण शाहूमहाराज व ताराबाई यांच्यामधील दुफळींत परशरामपंतांनीं ताराबाईच्या वतीनें शाहूमहाराजांना विरोध केला; त्यामुळें शाहूमहाराजांचें मत त्यांच्याविषयीं स्वाभाविकपणेंच कलुषित झालें. पुढें महाराजांनीं परशरामपंतांचा पाडाव करून त्यांना पकडून कैदेंत ठेविलें व गदाधर प्रल्हाद नांवाच्या आपल्या एका ऋणानुबंधी माणसाला प्रतिनिधि केलें. त्यानंतर कांहीं दिवसांनीं महाराजांचा परशरामपंतांशीं सलोखा झाला व महाराजांनीं प्रल्हादपंतांकडून प्रतिनिधिपद काढून तें पुन्हा परशरामपंतांना दिलें. पण पुन्हा परशरामपंतांनीं महाराजांच्या पदरीं प्रतिनिधिपदावर असतांनाच महाराजांची प्रतिस्पर्धी ताराबाई कोल्हापुरीं सवता सुभा स्थापन करून बसली होती तिच्याशीं चोरून सलोखा ठेवल्याचा सबळ व साधार संशय महाराजांना आला, तेव्हां महाराजांनीं त्यांना पुन्हा प्रतिनिधिपदावरून दूर करून कैदेंत टाकलें व त्यांच्या पूर्वींच्या प्रतिनिधींचे बंधु नारायण प्रल्हाद यांना प्रतिनिधि केलें. त्यानंतर परशरामपंतांनीं पुन्हा तडजोडीची भाषा महाराजांपाशीं सुरू केली; व परशरामपंतांचे कनिष्ठ चिरंजीव श्रीपतराव यांनींही (त्यांचे ज्येष्ठ चिरंजीव कृष्णराव हे ताराबाईशीं फितूर होऊन तिचे प्रतिनिधि बनले होते.) बाळाजी विश्वनाथांबरोबर, कृष्णराव खटावकर शंभु महादेवाच्या डोंगरांत पुंडगिरी करीत होता त्याच्यावर चाल करून त्याचा पाडाव केला. त्यामुळें महाराजांनीं प्रसन्न होऊन परशरामपंतांना पुन्हा बंधमुक्त करून पूर्ववत् प्रतिनिधिपद व सरंजाम त्यांना दिला. एथपासून मरेतों परशरामपंतांनीं प्रतिनिधिपदाचा उपभोग घेतला, व त्यांच्या पश्चात् इ. सन १७१८ मध्यें श्रीपतरावाला तें पद मिळालें.

अशी प्रतिनिधिपदाची नाचवानाचव होतांना महत्त्वाच्या दृष्टीनें तें पद पदोपदीं खालावत गेलें. आधीं मुळांतच त्या पदाची थोरवी पेशवेपदाहून थोर होती कीं काय, हा-सुद्धां एक विचारार्ह प्रश्न आहे. संभाजीमहाराजांनीं अष्टप्रधानांच्या डोक्यावर 'छंदोगामात्य' कविकलश पंडितराव निर्माण केला, तसाच कांहींसा हा 'प्रतिनिधि' निर्माण करण्याचा प्रकार राजाराममहाराजांकडून झाला. मात्र संभाजीमहाराजांच्या छंदोगामात्यासारखे राजाराममहाराजांचे प्रतिनिधि कलिपुरुष नव्हते हें खरें; पण

ते अष्टप्रधानांवरदेखील राजप्रतिनिधि या नात्यानें हुकमत गाजविण्याच्या पात्रतेचे लोकोत्तर पुरुष नव्हते हेंही तितकेंच खरें. राजाराममहाराजांनीं प्रधानमंडळांतील परमश्रेष्ठ पुरुष म्हणून निर्माण केलेल्या प्रतिनिधीला महत्त्व देण्यांत संभाजी महाराजां-पेक्षां निराळें व पूर्वपरंपरेला सोडून वर्तन केलें तें हें कीं, त्यांनीं शिवाजीमहाराजां-पासून चालत आलेल्या अष्टप्रधान संस्थेच्या डोक्यावर हा प्रतिनिधि सनद-शीरपणानें कायमचा लादला व प्रधानमंडळांत प्रतिनिधिपद अपरिहार्य करून ठेविलें. 'प्रतिनिधीचें मुख्य काम म्हणजे त्यानें राजाचे हुजूरचे दरकदार घेऊन मुलुखाचा बंदोबस्त ठेवणें व राज्यकारभार पहाणें हें होय. हा प्रतिनिधीचा अधिकार सर्व प्रधानांवर चालावयाचा असून त्याची नेमणूक मुख्य प्रधाना(पेशव्या)प्रमाणेंच होती. राजपत्रावर प्रधाना(पेशव्या)चे उजवे बाजूस प्रतिनिधीची मुद्रा व्हावी असें ठरलें.' [प्रतिनिधि घराण्याचा इतिहास.] शिवाय प्रतिनिधीला पगारही पेशव्यांहून जास्त–पेशव्याला सालीना १३०० होन व प्रतिनिधीला सालीना १५०० होन–होता. इतकें सारें जरी खरें, तरी मूळ राजाराममहाराजांनीं जें प्रतिनिधिपद निर्माण केलें, तें अष्टप्रधानांकडून राज्यकारभार व्यवस्थितपणें पार पडेना व त्यांना मुख्य प्रधानाहूनही थोर अशा नवीन अधिकाऱ्याची आवश्यकता भासली म्हणून निर्माण केलें नसून आपल्या पदरच्या एका अत्यंत उपयुक्त माणसाचा योग्य बहुमान करण्यासाठीं निर्माण केलें, हा महत्त्वाचा मुद्दा प्रतिनिधिपदाविषयीं सारासार विचार करतांना ध्यानीं ठेविला पाहिजे. सुदैवानें पुढें परशुरामपंत व त्यानंतर त्यांचे पुत्रपौत्र जे प्रतिनिधि झाले ते किंवा राजाराममहाराजांचे पहिले दोन प्रतिनिधिही कमी अधिक मानानें कर्ते पुरुष होते ही गोष्ट निराळी. पण त्यांचें कर्तेपण देखील अष्टप्रधान-मंडळांतील इतर कर्त्या प्रधानांच्याच तोडीचें–सामान्य कोटींतील होतें; अष्टप्रधानांवर वचक ठेवून राज्यकारभार हांकण्याला पुरण्याइतकें अथवा पुरून उरण्याइतकें तें असामान्य नव्हतें. ही बाब बाजूला ठेवली तर प्रतिनिधिपदाला व्यावहारिक महत्त्व विशेष होतें यांत शंका नाहीं. शंकर व शिवभक्त यांच्यामध्यें जसा नंदी, तसा छत्रपति व त्यांचें अष्टप्रधानमंडळ यांच्यामध्यें प्रतिनिधि होता. कोणत्याही प्रधानाला किंवा सरदार–दरकदाराला हुजुरांतून वस्त्रें, पदव्या किंवा सरंजाम मिळावयाचे ते प्रतिनिधीच्या मार्फत मिळत व प्रत्येक महत्त्वाच्या राजपत्रावर प्रतिनिधीची मुद्रा अवश्य असे. राजाराममहाराजांच्या वेळेपासून तों मराठशाही (पेशवाई) ठार बुडेपर्यंत महा-राष्ट्राच्या राजकारणांत प्रतिनिधीचें जें महत्त्व राहिलें, तें उपरोक्त कारणामुळेंच होय.

पण परशरामपंतांनीं शाहूमहाराजांशीं प्रारंभापासून अखेरपर्यंत जें घरसोडीचें व दुटप्पी वर्तन केलें, त्यामुळें तत्कालीन राज्यकारभारांत त्यांचें वजन बरेंच कमी झालें, व त्याच सुमारास बाळाजी विश्वनाथ हा चतुरस्र पराक्रमी पुरुष उदयाला येऊन पेशवा झाल्यामुळें पेशवेपदाचें महत्त्व वाढलें. कदाचित् परशरामपंत प्रतिनिधि जर प्रथमपासून शाहूमहाराजांशीं नेकजातपणानें वागले असते, तर त्यांना आपल्या श्रेष्ठ पदाला साजेशी हुकमत पेशव्यावरदेखील गाजवितां आली असती, व मराठ-शाहीची सर्व सत्ता तेव्हां ( शाहूमहाराज हे केवळ युक्तीच्या चार गोष्टी सांगून राज्यकारभाराचीं कामें करून घेणारे चतुर पुरुष असल्यानें ) त्यांच्या हातीं केंद्रीभूत झाली असती. त्यांनीं आपली बुद्धिमत्ता व राजकारणपटुता शाहूमहाराज व त्यांचें राज्य यांचें निष्ठापूर्वक सुयश चिंतिण्याच्या कामीं लावली असती, तर ते बाळाजी विश्वनाथांनाही भारी होऊन बसले असते. पण तसें झालें नाहीं. त्यांनीं आपल्या दुटप्पी व स्वामिनिष्ठा शून्य आचरणानें शाहूमहाराजांचा विश्वास गमावला व बाळाजी विश्वनाथांनीं आपल्या अतुल पराक्रमानें, चातुर्यानें व स्वामिनिष्ठेनें तो कमावला; म्हणूनच बाळाजी विश्वनाथ पेशवे झाले व प्रतिनिधींना भारी होऊन बसले. प्रति-निधींच्या मनांत पेशव्यांविषयीं जी स्पर्धा मूळपासून उत्पन्न झाली, त्या स्पर्धेचीं बीजें इतकीं खोल होतीं; व परशरामपंतांच्या नंतर त्यांचे पुत्र-पौत्र प्रपौत्र वंश-परंपरेनें प्रतिनिधि झाले, त्यांच्याही अंतःकरणांत ही स्पर्धा सदैव जागृत राहिली. प्रधान-मंडळांतील प्रधान होतां होईतों वंशपरंपरेचे वारसदार असतील तेच नेमा-वयाचे, ही पद्धत जर तेव्हां कळून किंवा नकळून अंमलांत आली नसती, तर अशा स्पर्धेला तेव्हांच्या राजकारणांत स्थान मिळालें नसतें, किंवा मिळालें असतें तरी ती स्पर्धा स्वराज्याला वस्तुतः जितकी घातुक झाली तितकी खास झाली नसती.

ह्या उपरोक्त विवेचनावरून प्रस्तुत कादंबरींत पेशवे व प्रतिनिधि यांच्यामधील स्पर्धेला इतकें महत्त्व कां देण्यांत आलें आहे, याची वाचकांना यथावत् कल्पना होईल.

आतां, बाळाजी विश्वनाथांच्या निधनानंतर बाजिरावाला पेशवाईचीं वस्त्रें मिळण्यांत प्रतिनिधि व त्यांचे इतर कैवारी यांच्याकडून अडथळा झाला, याविषयीं जरी इति-हासकारांत दुमत नसलें, तरी हा अडथळा किती काळपर्यंत झाला, याविषयीं मात्र दुमत आहे. कोणी म्हणतात कीं, हा अडथळा चांगला सहा-सात महिने झाला, तर कोणी म्हणतात कीं, तो तात्पुरताच होता व त्याचा तेव्हांच निरास ( अर्थात बाजिरावाला पेशवाईचीं वस्त्रें मिळावीं कीं न मिळावीं यापुरता ) होऊन बाळाजी

विश्वनाथांच्या निधनानंतर लगेच पंधरा दिवसांनीं बाजिरावाला पेशवाईचीं वस्त्रें मिळालीं. ऐतिहासिक कादंबरींत अशा गोष्टींचा स्थूलमानानें विचार करावयाचा असतो, सत्यापलाप न करतां स्थल-काल-व्यक्तींच्या बाबतींत कथानकाच्या सोयी-नुसार ऐसपैस वावरण्याला कादंबरीकाराला मुभा असते, ह्या संधीचा फायदा घेऊन मीं प्रस्तुत उपरोक्त दुसरें विधानच जमेला धरलें आहे. त्याप्रमाणेंच कथानकांतील स्थळें, पात्रें, त्यांचे स्वभाव व परस्परसंबंध यांची योजना करतांनाही मीं सत्यापलाप न करतांही तर्कशुद्ध कल्पनाशक्तीवर बराचसा भर दिला आहे. वाचकाला कादंबरी-च्या वाचनानें बोध व मनोरंजन यांबरोबरच तत्कालिन इतिहासाचें—कथावाङ्मयांतून शक्य असतें तितकें—सूक्ष्मज्ञान व्हावें म्हणून कादंबरींत होतांहोईतों ऐतिहासिक पात्रें व ऐतिहासिक प्रसंगच गोंवण्याचा सहेतुक उपक्रम ह्या कादंबरीपासून करण्यांत आला आहे. मात्र ज्या प्रसंगांचे कालनिर्बंध निश्चित नाहींत किंवा जे प्रसंग अंमळ पुढेंमागें केल्यानें इतिहासाला बाध येण्याचा संभव नसून ज्यांचें महत्त्व केवळ त्या त्या व्यक्तींच्या स्वभाव-परिपोषापुरतेंच आहे, अशा प्रसंगांना कथानकाच्या सांच्यांत बसवितांना कथानकाला जास्त बांधेसूदपणा आणण्यासाठीं क्वचित् प्रसंगीं काल-निर्बंधांकडे क्षम्य तेवढेंच दुर्लक्ष्य करण्यांत आलें आहे. क्षम्य तेवढेंच मुद्दाम म्हणण्या-चें कारण त्यामुळें इतिहासाच्या वास्तविक स्वरूपांत विकृतपणा उत्पन्न होण्याचा मुळींच संभव नाहीं. शिवाय कादंबरींतील पात्रें, प्रसंग व परिस्थिति यांचा इति-हासाशीं अथवा वस्तुस्थितीशीं पडताळा पहाण्याला इतिहासाशीं अपरिचित असले-ल्या वाचकालाही सुलभ जावें म्हणून जागोजागीं स्पष्टीकरणाप्रीत्यर्थ टिप्पणीही **'पेशवाईचा ध्रुव ढळला ?'** ह्या कादंबरींतल्याप्रमाणेंच दिल्या आहेत.

प्रस्तुतची कादंबरी ही परमप्रतापी पेशवे श्रीमंत बाजीराव यांच्या यशःसंकीर्तना-ची नांदी होय. त्यांचें खरें यशःसंकीर्तन तें पुढेंच आहे, व यापुढें प्रसिद्ध होणाऱ्या

## पेशवाईचें पुनर्वैभव

ह्या 'कादंबरीमय पेशवाई'मधील सहाव्या कादंबरींत वाचकांना त्या यशःसंकीर्तना-चा पहिला आस्वाद घ्यावयाला मिळेल.

पुणें,
ता. १।१।२८

**विठ्ठल वामन हडप**

'कादंबरीमय पेशवाई'मधील

# पहिल्या सहा कादंबऱ्या



[ पहिले पेशवे—बाळाजी विश्वनाथ ]

१ पेशवाईचें पुण्याहवाचन

२ पेशवाईची प्राणप्रतिष्ठा

३ पेशवाईचें ध्रुवदर्शन

४ पेशवाईचा ध्रुव ढळला !

[ दुसरे पेशवे—थोरले बाजीराव ]

५ पेशवाईचा पुनर्जन्म

६ पेशवाईचें पुनर्वैभव



बाजीराव पेशव्यांची कारकीर्द पुढें चालू

# सिंहावलोकन

शाके १६४२ शार्वरीनाम संवत्सरे चैत्र वद्य पंचमी ह्या दिवशीं सूर्यास्ताच्या समयाला छत्रपति शाहूमहाराज यांच्या सातारा राजधानींत अजिमतारा किल्ल्यांत पोवाडेगायन चाललें होतें. प्रथम शिवाजीचा पोवाडा, नंतर सिंहगडाचा पोवाडा व त्यानंतर पावनखिंडीचा पोवाडा असे तीन पोवाडे गाऊन झाल्यावर शाहिरानें पेशव्यांचा पोवाडा गाण्याला सुरवात केली:—

धन्य धन्य महाराज शिवाजी धन्य शाहुराजे,
धन्य पेशवे भट बाळाजी नमन तुम्हां माझें!
प्रांत जंजिरा जखडुन टाकी सिद्दीची सत्ता,
सिद्दी मोठा नष्ट मुसंडा हिंदूंचा द्वेष्टा!
गोमातेच्या माना चरचर अविंध ते चिरिती,
हिंदु-देव-देवळें अहह! किति भ्रष्ट-नष्ट करिती!
हिंदुजनांच्या कन्या, भगिनी, भार्या वा माता—
प्राणांहुनिही प्यार मानिती निज-पातिव्रत्या!
अशा सतींच्या अब्रूवर तो घालि यवन घाला,
बहुत गांजिला सकल हिंदुजन कठिण काळ आला!
परललना हो मानवमात्रा निज-मातेवाणी,
त्या मातांची अब्रू घ्यावी पशुसम यवनांनीं!
हा जुलमाचा वणवा पेटे उभ्या कोंकणांत,
हिंदु तेवढा अहा! अहर्निश होरपळे त्यांत!
श्रीवर्धनकर देशमुखांचा एक थोर वंश,
श्रीवर्धनचे भट या नांवें ठावा सकलांस!
बाळाजी विश्वनाथ नामें त्यांत एक थोर,
त्या वीराच्या गांजणुकीला नुरे मुळीं पार!

वृथा संशयें सिद्दी कोपे बाळाजीवरती,
बाळाजीच्या सर्वस्वाची करूं झटे माती !
बाळाजीचा बंधु जानबा बांधुन पोत्यांत,
त्या चांडाळें हाय ! बुडविला खोल समुद्रांत !
बाळाजीची परिवारासह तीच गती व्हावी,
देवाजीला करुणा त्याची तोच मार्ग दावी !
घरदारावर वतनवाडिवर सोडुनियां पाणी,
बाळाजी ये परिवारासह देशावर निघुनी !
त्रिवर्ग भानु[1] ऋणानुबंधी येती समवेत,
संकटसमयीं तेच जाहले साह्यकारि बहुत !
दुर्दैवाच्या त्या काळोखीं दोनच नक्षत्रें,
आपत्पंकीं फुललीं होतीं दोन देवकमळें !
बाजी आणिक बाळ चिमाजी दोन वीरतनय—
बाळाजिस ईश्वरें दिलेले, त्यास उणें काय !
भार्गवस्वामी[2] आशीर्वचनीं भविष्य शुभ पदाला,
**पेशवाइ-पुण्याहवाचना** आज शकुन झाला !'

* * *

आपत्तींशीं झगडत झगडत भट कंठी पंथा,
भाग्यवंत तो त्याची होती भगवंता चिंता !
धनाजि जाधव धनी भेटला भटास बहु नामी,
बाळाजीला पुढें आणिलें त्यानें हरकामीं.

---

१ बाळाजी, रामाजी व हरी महादेव भानु; हे नाना फडणिसांचे पूर्वज.
२ ब्रह्मेंद्रस्वामि.

रामाचा हनुमान तसा हा दास धनाजीचा,
सेवातत्पर जणुं उजवा कर बहु विश्वासाचा.
शिवराया मागुती अविंधें[1] वधिला संभाजी,
नृपमाता[2], नृपतनय[3] कोंडिले निज-कैदेमाजी !
नृपसंहारें[4] महाराष्ट्र हा हीन दीन झाला,
राजारामें प्रतिभरतानें राज्यभार वरिला.
निर्घृण काळें राजारामा अवचित जैं गिळिलें,
राणी ताराबाईच्या करिं राज्य सकल आलें.
पोटिं पुत्र शिव[5] खुळा बावळा-देवाची करणी !
त्यासचि करुनी राजा राणी राज्यशकट हाणी.
अलमगीर[6] तों मेला माजे दिल्लीला दुफळी,
मराठमंडळ हरुषे त्याची जणुं पिकली पोळी !
बादशहातिंत मर्द मराठे करिती बंडाळी.
दिल्लीच्या मुत्सद्द्यांनीं मग युक्ति योजियेली.
'मराठशाही—राजकारणीं फूट पाडण्याला—
शाहूला बंधमुक्त करणें' बेत ठीक ठरला !
मोंगलशाही-मगरमिठींतुन सुटे शाहुराजा,
आशा त्याला 'मानिल मजला महाराष्ट्र माझा.'
ताराबाई परी विरोधा पुढें उभी ठाके,
म्हणे, 'शाहुला सामिल त्यांचीं कापिन मी नाकें.

---

१ अवरंगजेब बादशहानें. २ संभाजीची राणी येसूबाई. ३ शाहू. ४ संभाजीच्या वधानें. ५ शिवाजी—ताराबाई व राजाराम यांचा पुत्र हा जन्मतः-च वेडा होता. ६ अवरंगजेब बादशहा.

'शाहु तोतया शाहु हेर हा मोंगल-शत्रूचा,
'शिवशाही बुडवावी म्हणुनी हा कावा त्यांचा.
'शिवशाहीचा मालक माझा शिवबा[1] छत्रपति,
'राज्य शकट मी किमपि न देई त्या[2] उचल्या हातीं.'
राजा बोले दळ हाले हा बोल खरा ठरला,
कारभारिजन सारा शाहुस शासण्यास सजला !
परी धनाजिस धरून हातीं कुशल मसलतीनें.
बाळाजी शाहूस समर्पी राज्याचें लेणें.
ताराबाई दूर पळाली शाहू नृप झाला,
गौरविले बहु सेवक जे जे आले कामाला.
कुणा जहागिर कुणा महत्पद अणिक कांहिं कोणा,
'काय मागणें ? ' बाळाजीला पुसे शाहुराणा.
प्रसंग साधुन बाळाजी मग वदला, 'महाराज !
'सेवा घ्यावी अन्य कांहिंही नलगे मज आज.
'माझी सेवा जरी प्रभुपदीं सार्थकता पावे,
'तरि मग मजला प्रधानमंडळिं उत्तम पद द्यावें.'
'बरें' बोलिले शाहूराजे चित्तीं बहु धाले,
भरदरबारीं बहुसंतोषें भटांस गौरविलें.
विधिविण कोणा कळे !—पेशवे होणें भट भाळीं,
**पेशवाइची प्रतिष्ठापना** त्याच घडीं झाली !

* * *

---

१ ताराबाईचा मुलगा शिवाजी. २ शाहूच्या.

सूर्यापोटीं जसा शनैश्चर तसा चंद्रसेन-
धनाजिचा संतान; त्यापरिस बरें निसंतान !
कुठें धनाजी सेनानायक अव्वल रणगाजी;
कुठें करंटा पुत्र तयाचा मुलुखाचा पाजी !
राजनिष्ठ बहु खरा धनाजी पराक्रमी मोठा,
त्याच्या पोटीं कसा कारटा निपजे हा खोटा !
पित्यामागुती झाला बेटा सेनासारंग,
फितुर होऊनी अरिस पोखरी राज्य-अंतरंग !
कारण एकच–बहु दुष्टावा भट बाळाजीचा,
कारण, होता भट दिल्प्यारा शाहु-धनाजीचा !
तो दुष्टावा बहुत भोंवला शाहुराजांना,
त्या दुष्टें सरदार फितविले शाहूचे नाना.
जाधवजी,[१] घाटगे,[२] पिंगळे,[३] प्रतिनिधि,[४] रिपु सारे–
शाहुशासना सामिल झाले यवनां परभारें !
जिकडे तिकडे फंदफितुरी बद्नेकी झाली,
अशा संकटीं बाळाजीनें बाजु राखियेली.
प्रसन्नला नृप शाहु स्मरुनि मग पूर्वदत्तवचना,
पेशवाइपद अर्पण केलें भट बाळाजींना.
शाहू-राज्यारोहणसमयीं विधिमत जें ठरलें–
**पेशवाइ-ध्रुवदर्शन** होउनि आज फळा आलें !

* * *

---

१ चंद्रसेन जाधव. २ सर्जेराव घाटगे. ३ बहिरोपंत पिंगळे पेशवे.
४ श्रीपतराव.

बहुतर कष्टें स्वराज्य उभवी नरवर शिवराणा,
भक्षुन टाकी दुष्ट अलमगिर मोंगालि बेदाणा !
माता येसूबाई तैशा दोन महाराण्या,
बादशहाच्या बंदिंत खितपत बहु बापुडवाण्या !
परदास्याचें पदलांछन हें पेशव्यास न सहे,
पुन्हा पेशवा विगत वैभवा मेळविण्या पाहे !
कर्णार्जुनसा प्रतापशाली पुत्र बाजिराव,
छत्रपतींच्या चरणीं ज्याचा असे पूज्य भाव !
तोही सजला पित्यासंगतीं स्वराज्य मिळवाया,
दिल्लीच्या तक्ताचीं शकलें चरणीं तुडवाया !
शाहू मिंधा बादशहाचा बाल्ल्यापासुनचा,
त्यासि रुचेना स्वातंत्र्याचा बेत पेशव्याचा.
बादशहाचा दास म्हणविण्या वीट न त्या वाटे,
म्हणे, 'शहाचे अंकित आम्ही जाउं न त्या वाटे !'
परी विभूचीं अघटित करणी ! कटु वार्ता येई—
'शाहुसतीला[१] भ्रष्ट कराया बादशहा[२] पाही !
'त्या छळणेला विटुन सतीनें आत्मघात केला'
ह्या वार्तेनें शाहु नृपाला त्वेष बहुत आला.
म्हणे, 'पेशवे ! उठा न बघणें मुळीं काळ वेळ
'मात्रागमनी बादशहा हा होई बेताल !

---

१ दिल्लीला बादशाच्या कैदेंत असणाऱ्या राण्यांपैकीं एक सावित्रीबाई.
२ फेरुकशियर.

'त्यासि लोळवा विजय मेळवा सत्वर या काळा,
अब्रू राखा राजसतींची कठिण काळ आला.'
शाहूचे ते बोल पेशवा वरच्यावर झेली,
निमिषामध्यें प्रभुचरणांशीं आणभाक केली.–
'राजसतींना[1] सुखरुप गेहीं आणूं याच घडी,
चरणीं त्यांच्या निजदेहांची पसरुन पायघडी,
स्वराज्य आणूं आणिक आणूं विगत विभव संगें,
रिक्त करें ना येउं मागुती देह जरी भंगे,
बहुत जनांसह करी पेशवा दिल्लीवर चाल,
तिथें लोळवी बादशहाला, खरा करी बोल,
मरतां मरतां मारूं म्हणती अविंध ते नष्ट,
दगा कसा पेशव्यांस द्यावा करिति गुप्त बेत,
स्वामिभक्त ते भानु[2] भोंसले[3] होते सांगातीं,
धन्य! धन्यास्तव उभय वीर ते मरावया सजती!
राजपथांतुनि मिरवत चाले फौज मराठ्यांची,
मिरवत चाले एक पालखी त्यांत पेशव्यांची.
पाळत राखुन नीच मुसुंडे तोंच पुढें घुसले,
पालखींतले खासे ओढुन अहा! ठार केले!
दुःखद वार्ता उठे पेशवे आज ठार झाले.
'पेशवाइचा ध्रुव ढळला आजि' जन सारा बोले!
ईश्वरकरणी नकळे कोणा अघटित काय घडे,
भानु भोंसले स्वयेंच पडले स्वामिपथीं उपडे!

---

[1] येसूबाई व अंबिकाबाई. [2] बाळाजीपंत भानु. [3] संताजी भोंसले.

लढे भोंसले समरीं भानू बसे पालखींत,
मरति राजपाथें येति पेशवे सुखें स्वधामांत,
स्वराज्यसनदा राजसतीही येति राजगेहीं,
शाहु नृपाच्या संतोषाला नुरे मेर कांहीं.
**'पेशवाइचा ध्रुव ढळला ?'** हा संशय झणिं फिटला,
धन्य ! धन्य ! पेशवे बोलला बोल खरा केला !
धन्य ! धन्य ! महाराज शिवाजी धन्य ! शाहुराजे,
धन्य ! पेशवे भट बाळाजी नमन तुम्हां माझें !

*　　　*　　　*

पोवाडेगायन सुरू असतां किल्ल्याचा दरवाजा बंद असल्यानें पोवाडे कोण गात होतें हें बाहेरील माणसांना दिसणें शक्य नव्हतें. पण आंत पोवाडे ऐकावयाला बसलेल्या कित्येकांना पहिले पोवाडे जितके रुचले, तितका हा शेवटचा पोवाडा कांहीं एकंदरींत रुचला नाहीं. शाहिरानें हा पोवाडा गाण्याला सुरवात करतांच श्रोत्यांपैकीं एक वीस वर्षांचा धट्टाकट्टा तरुण जवळच्या आपल्याच उमरीच्या पण आपणाहून गलेलठ्ठ अशा भीमसेनी तरुणाच्या कानाशीं लागून 'हा शाहीर पेशव्यांचा लेंकावळा आहे कीं काय ?' असें कुत्सितपणें म्हणाला; तें ऐकून तो प्रौढ तरुण नुसतें संमतिदर्शक हंसला. अशीच त्या दोघांची कुत्सितपणाची भाषा पोवाड्याचे दोन चौक पुरे होऊन तिसरा अर्धा होईतों चालली होती. पण तिसऱ्या चौकांतील 'जाधवजी, घाटगे, पिंगळे, प्रतिनिधि रिपु सारे' ह्या चरणाला सुरवात होतांच त्याधट्टया-कट्टया तरुणाची चर्या एकदम पालटली—ती रागीट दिसूं लागली; आणि पुढें 'जिकडे तिकडे फंदाफितूरी बदनेकी झाली, अशा संकटीं बाळाजीनें बाजू राखियेली' हे चरण ऐकतांच तर त्याचे डोळे संतापानें लाल झाले. तो एकदम रागानें उद्गारला, "अरे ए गोंधळी ! पोवाडा बंद कर !"

तो तरुण कां रागावला हें तेथल्या इतर मंडळीला कळलें किंवा नाहीं न कळे, पण त्या शाहिराला मात्र तें कळलें असावें. कारण तो लगेच उत्तरला, " सरकार ! माफ करा. चुकून माझ्या तोंडून वेडा वांकडा शब्द निघून गेला, पण आतां पोवाडा गातांना मी खबरदारी घेतों."

आणि असें म्हणून त्या शाहिरानें परवानगीची वाट न पहातां पुढें गाण्याला सुरवात केली. शाहिराचा आवाज मधुर होता, त्याची गाण्याची ढब व डफ-तुणतुण्याची साथही तोडीस तोड होती, त्यामुळें इतर सर्वांना त्याचें गायन आवडलें होतें.

पोवाडा पुरा गाऊन होईतों त्या तरुणाचा राग कांहीं शांत झाला नव्हता; पण तो गप्प होता. गायन पूर्ण झाल्यावर मात्र त्या तरुणानें त्या शाहिरालो एकदम दांतओंठ खात विचारलें, " हरामखोरा ! बाळाजीपंत पेशवे तुझा बाप लागतो का रे ! "

बराच वेळपर्यंत त्या तरुणाच्या ह्या आडमुठ्या व मगरूरपणाच्या सवालांतील स्वारस्य तेथल्या सर्व प्रेक्षकांच्या गळीं उतरलें नव्हतें, तें आतां उतरलें. त्यांना कळून चुकलें कीं, शाहिरानें पोवाड्यांत बाळाजीपंत पेशव्यांची स्तुति केली म्हणून हा तरुण चिडला. थोड्या वेळापूर्वी 'पोवाडा बंद कर' असें त्या तरुणानें शाहिराला दरडावून सांगितलें होतें तें कां, हें देखील सर्वांना आतां कळून चुकलें. प्रत्येकजण मनांतल्या मनांत 'जाधवजी, पिंगळे, घाटगे, प्रतिनिधि रिपु सारे' हा चरण घोळून घोळून गुणगुणूं लागला.

माणसाच्या सहनशीलतेला झाली तरी कांहीं मेरमर्यादा असतेच. स्वाभिमान न मानापमान थोरांमोठ्यांना तेवढा असतो व गोरगरिबांना नसतो असें थोडेंच आहे ! शाहीर आपल्या कलेंत इतका निष्णात म्हणून नांवाजलेला होता कीं, मोठमोठे सरदार-दरखदारदेखील त्याचा गुणिजन म्हणून मान ठेवीत. त्याच्या पोवाडे-गायनाला कोणीं नांवें ठेवलीं असें आजवर कधींच झालें नव्हतें. इतकेंच काय; पण अनेक वेळां तर याहूनही चमत्कार घडून येई. एखाद्या सामान्य पराक्रमी माणसावरून कोणीं पोवाडा गावयाला

सांगितला तर शाहीर आपल्या प्रासादिक शीघ्र-कवित्वाच्या जोरावर त्या पोवाडेनायकाचें चरित्र पोवाड्यांत इतकें उज्ज्वल गाऊन दाखवी कीं, सर्वांना वाटावें, ह्या पोवाडेनायकाच्या पराक्रमांची खरी ओळख आपणाला आज झाली! इतकी ज्या शाहिराची मानमान्यता, त्याला आतांचे त्या तरुणाचे मानहानिकारक शब्द कसे सहन व्हावे! वस्तुतः त्या तरुणानें जेव्हां शाहिराला पोवाड्याचा तिसरा चौक चालला असतां पोवाडा बंद करावयाला सांगून रंगाचा बेरंग केला, तेव्हांच शाहिरानें 'अरे' तर 'कां रे' या न्यायानें त्या तरुणाला सडेतोड उत्तर द्यावयाचें. तेव्हां त्यानें मनाचा विरंगुळा करून ती वेळ कशीबशी साजरी करून नेली. पण त्या तरुणानें पोवाड्याच्या शेवटीं जेव्हां एकेरीवर येऊन शाहिराचा बाप काढण्यापासून सुरवात केली, त्या वेळीं मात्र शाहिराचा राग त्याला आवरेना. तो रागावून म्हणाला, "सरकार! इतकी आपली जीभ सैल सोडूं नका. तुम्हीं माझा बाप काढला तर मलाही तुमचा बाप काढतां येईल. हां, आतां समजुतीच्या भाषेनें बोलाल तर मी ऐकून घेईन. बाळाजीपंत पेशवेसरकार एवढे थोर पुरुष होते कीं, तुम्हां-आम्हांला त्यांच्या वहाणेच्या वादीचीही सर यावयाची नाहीं. अशा थोर पुरुषाची निंदा करून त्यांच्या नरकांत कोणीं कां पडावें!"

तो तरुण आपल्या गलेलठ्ठ साथीदाराकडे पाहून फिदिफिदी हंसत म्हणाला, "खरोखरच हा लेंकाचा त्या बाळंभटजीचा लेंकावळा दिसतो!"

"त्यांचा लेंकावळा नाहीं कोण? त्यांनीं पराक्रम करून मराठशाही तारली म्हणून आज तुम्ही आम्ही हे इथें दिसतों आहों, व महाराजही जाग्यावर आहेत. नाहींपेक्षां जाधव, घाटगे, प्रतिनिधि वगैरे स्वार्थी लोकांनीं आपल्या पाताळयंत्री चाळ्यांनीं मराठशाहीची केव्हांच होळी पेटविली असती!" शाहीर म्हणाला.

"काय? पुन्हा प्रतिनिधींची निंदा? ×××च्या लेंका! पुन्हा सूर्यावर थुंकतोस?" तो तरुण अत्यंत क्रोधाविष्ट होऊन त्या शाहिराच्या कमरेंत एक जोराची लाथ हाणीत म्हणाला, "तुडवा! तुडवा गुलामाला लाथांखालीं!"

# पेशवाईचा पुनर्जन्म

## प्रकरण पहिलें

## हा काय प्रकार?

"आम्ही मरतों; आमचें रक्षण करा!"

शार्वरीनाम संवत्सरे शके १६४२ मधील चैत्र वद्य पंचमीच्याच दिवशीं दिवेलावर्णाच्या सुमाराला छत्रपति शाहूमहाराजांच्या सातारा राजधानींतील अजिमतारा किल्ल्याच्या मुख्य दरवाजांत एक उमदा घोडेस्वार आपला घोडा दौडीत येऊन थडकला. त्याच वेळीं किल्ल्याच्या दरवाजाला असलेल्या दिंडी-दरवाजांतून कोणी चौघे लोक विव्हळत बाहेर आले. बाहेर आले कसले! किल्ल्यांतील लोकांनीं त्यांना मारपीट करून किल्ल्याबाहेर हुसकून लावलें. त्यांची ती केविलवाणी दशा पाहून नुक्ताच तेथें येऊन पोंचलेला घोडेस्वार हा काय प्रकार असावा याविषयीं बुचकळ्यांत पडल्यासारखा होऊन आपल्या घोड्यांवरून खालीं उतरला; तोंच नुक्तेच किल्ल्यांतून हाकलून लावलेल्या त्या चौघांजणांनीं त्याच्या पायांवर लोटांगणें घालून विव्हळत विव्हळत त्याला विनविलें, "आम्ही मरतों; आमचें रक्षण करा!"

"तुम्ही कोण?" त्या घोडेस्वारानें त्या चौघांपैकीं एकाला सहानुभूतिपूर्ण स्वरानें विचारलें.

"आम्ही गोंधळी आहों. आम्हांला किल्ल्यांतल्या लोकांनीं मरेमरेतों मारलें!" त्या गोंधळ्यांपैकीं एक जो मुख्य होता तो आपली कर्मकहाणी सांगूं लागला.

पण त्या मुख्य शाहिराची कर्मकहाणी सुरू होते न होते तोंच एक तरुण मुसलमान देवडीवाला पुढें होऊन एक जोराची लाथ त्याच्या कमरेंत हाणून ज्यांचा उच्चार करणें अथवा ज्या ऐकणेंदेखील सभ्य माणसाला शरम उत्पन्न करील अशा शिव्या हांसडीत म्हणाला, "मुकाट्यानें तुम्ही चालते व्हा, नाहींपेक्षां इथल्या इथें कोंबड्या-बकऱ्यांसारख्या तुमच्या माना चिरल्या जातील; याद राखा."

बोलतां बोलतां त्या देवडीवाल्यानें त्या स्वाराकडे पाहिलें व त्याच वेळीं स्वारानें त्याच्याकडे पाहिलें. लगेच त्यांना एकमेकांची ओळख पटली. तो देवडीवाला अबुबकर या नांवाचा होता व तो स्वार पेशव्यांच्या अत्यंत विश्वासू शतवीरांतील पिलाजी जाधव* या नांवाचा लढवय्या मराठा होता. कामकाजानिमित्त वारंवार किल्ल्यावर येण्याचा त्याचा सराव असल्यानें किल्ल्यावरील बहुतेक नोकरचाकर त्याच्या व तो नोकरांचाकरांच्या परिचयाचा झाला होता. अर्थात् ह्या परिचयाची मजल तोंडओळखीपलीकडे गेली नव्हती. अबूबकरचा परिचय मात्र याहून बराच दाट व विकृत स्वरूपाचा होता व त्याचे धागेदोरे प्रत्यक्ष किल्लेदार शेखमिऱ्याच्या अंतःपुरापर्यंत जाऊन पोंचले होते. शेखमिऱ्याच्या वाडेकडील वतनदारींत नूरनिहार नांवाच्या एका अनाथ मुसलमान मुलीवर दुराचाराचा व आपल्या कजाग सासूला विष घालून ठार केल्याचा आळ येऊन सहा महिन्यांपूर्वी जन्मठेप सक्तमजुरीची शिक्षा झाली होती, व ती शेखमिऱ्याच्या रयतापैकीं म्हणून तिला कैदी ह्या नात्यानें राबवून घेण्यासाठीं तेव्हांच्या वहिवाटीप्रमाणें शेखमिऱ्याच्या स्वाधीन करण्यांत आलें होतें. नूरनिहार वयानें अगदींच तरुण—केवळ अठरा वर्षांची व रूपानेंही बरीच सुंदर असल्यानें तिच्यावर म्हाताऱ्या शेखमिऱ्याचें मन बसलें. पण ती कांहीं त्याला वश होईना. त्या काळीं स्त्री कैदी झाली, कीं बेवारशी माल ठरली ! ज्याच्या आहारीं ती पडेल, त्याची ती व्हावयाची !

---

* इ. सन १७०७-८ च्या सुमाराला शाहूमहाराज दक्षिणेंत आले तेव्हां त्यांना जी मंडळी सामील झाली त्यांत पिलाजी जाधव हा एक होता. बाळाजी विश्वनाथ व चंद्रसेन जाधव यांच्यांत इ. सन १७११ मध्यें एका क्षुल्लक कारणावरून तेढ उत्पन्न होऊन ती विकोपाला गेली, व चंद्रसेनानें बाळाजीपंतांवर शस्त्र उगारलें; तेव्हां ज्या लोकांनीं बाळाजीपंतांच्या बाजूनें लढून त्यांचें रक्षण केलें, त्यांत हा होता. हा तेव्हां बाळाजीपंतांच्या पदरीं शिलेदार होता. इतिहास पहातां संपूर्ण अर्ध शतकपावेतों मराठी राज्याची सेवा केलेला व शाहूमहाराजांची समग्र कारकीर्द पाहिलेला असा त्या वेळचा हा एकच प्रमुख सरदार दिसतो. त्याच्या घराण्याला वाघोली व वाडी हे गांव इनाम असल्यामुळें हल्लीं त्या घराण्याचीं वाघोलीकर व वाडीकर अशीं दोन कुटुंबें आहेत. देवगिरीच्या जाधवांशींही ह्या घराण्याचा संबंध असावा. पिलाजीच्या घराण्यांतील एक मुलगी बडोद्याचे माजी महाराज गणपतराव गायकवाड यांना इ. सन १८५० सालीं देण्यांत आली. त्यासंबंधानें जाधवांचे वंशज बडोद्याला आले व त्यांना हल्लीं तेथें नेमणूक आहे.

अशा परावलंबी परिस्थितींत सदाचारी स्त्रीला तारुण्य व सौंदर्य ह्या ईश्वरी देणग्या हटकून मारक होतात. नूरनिहारचेंही तसेंच झालें. ती अत्यंत सदाचारी स्त्री होती, तशांत तरुण व सुंदर होती. त्यामुळें ती जशी किल्लेदाराच्या डोळ्यांत सलूं लागली, तशीच किल्लेदाराचा आश्रित देवडीवाला अबुबकर याच्याही डोळ्यांत सलूं लागली. आणि ती किल्लेदाराला झिडकारूं लागली तेव्हां अबुबकरला वाटूं लागलें कीं, किल्लेदार म्हातारा म्हणून त्याला ती झिडकारीत असेल, त्या अर्थी आपण तरुण ताकदवान् असल्यानें आपणाला ती हटकून वश होईल. त्या दृष्टीनें त्याचे प्रयत्न सारखे सुरू होते; पण नूरनिहार त्यालाही वश होईना. नूरनिहारचा नवरा* हसन महात या नांवाचा लढवय्या होता व तो पिलाजीचा दोस्त होता. तो सुमारें एकदीड वर्षांपूर्वी संसाराला वैतागून कोठें तरी बेपत्ता झाला होता. मित्रधर्म या नात्यानें मित्राच्या पश्चात् त्याच्या ह्या अनाथ पत्नीचें रक्षण करण्याची जबाबदारी आपणावर आहे हें पिलाजी स्मरत होता. आतां, नूरनिहारवर सासूच्या खुनाचा आरोप आला व खुद्द शाहूमहाराजांपर्यंत त्या गोष्टीचा बोभाटा होऊन तिला शिक्षा झाली, तेथें पिलाजीचा कांहींच इलाज नव्हता. त्यांतूनही पिलाजी तेव्हां तिच्या वतीनें कांहीं बोलला असता, पण सासूला ठार मारण्याच्या आरोपाबरोबरच तिच्यावर तेथल्या एका श्रीमान् मुसलमान गुंडानें दुराचाराचा घाणेरडा आरोपही बनवून लादला होता, व बिचाऱ्या नूरनिहारचा सत्पक्ष असला तरी ती दुबळी असल्यानें तिला तो खोडून काढतां आला नव्हता. अशा नाजुक बाबतींत तिच्या वतीनें कोणी बोलावें तर त्या पापाचा टिळा आपल्या कपाळाला लावून घ्यावा अशासारखेंच झालें असतें. पण तेव्हां जरी पिलाजीचें कांहीं चाललें नाहीं, तरी नूरनिहार गुन्हेगार ठरून सातारा किल्ल्यावर शेखमिऱ्याच्या अंमलाखालीं कैद भोगूं लागली व पिलाजी किल्ल्यावर वारंवार कामानिमित्त येत जात असल्यानें किल्ल्यांत तिच्या अब्रूवर घाला पडण्याचे प्रसंग वरचेवर उद्भवत असलेले त्याच्या निदर्शनाला येऊं लागले, तेव्हां त्यानें शेखमिऱ्यापाशीं तिच्या वतीनें बोलून तिला त्याच्या जाचांतून मुक्त केलें. शेखमिरा बराच सज्जन माणूस होता. आतां, त्यानें नूरनिहारला वश करण्याचा प्रयत्न केला; पण यांत त्याचा मोठासा दोष नव्हता. महाराजांनीं एखाद्या बदचालीच्या गुन्हेगार स्त्रीला कैदी म्हणून राबवून घेण्यासाठीं अशा एखाद्या अंमलदाराच्या स्वाधीन करावयाची याचा रूढार्थ ती त्या अंमलदाराची भोग्य वस्तु झाली असाच असे. ह्या दृष्टीनें नूरनिहार सर्वस्वी त्याचीच होती. तिचें

* 'इतिहाससंग्रह'–वर्ष ३ रें, अंक ३ रा.

प्रणयाराधन करण्यांत त्यानें कांहीं मोठासा अन्याय केला असें नाहीं * बरें; तिनें नापसंती दाखविली, तेव्हांपासून त्यानें तिचा नाद जवळ जवळ सोडलाच होता. तो जर खरा दुर्जन असता, तर तो तिला बलात्कारानेंही वश करूं शकला असता. पण तसें कांहीं झालें नाहीं. मात्र अबुबकरची गोष्ट तशी नव्हती. तो खराखुरा दुष्ट व दुराचारी माणूस होता. त्याचा नूरनिहारवर डोळा होता, व त्या बाबतींतच त्यानें पिलाजीच्या हातून एक वेळ खरपूस मार खाल्ला होता. तो दावा अबुबकरच्या मनांत होताच. अबुबकर नूरनिहारसाठीं लाळ घोटीत असतो, ही गोष्ट किल्ल्यावरच्या अनेक नोकर-चाकरांना माहीत होती, व प्रतिनिधींच्या वतीनें गमाजीनें त्याला वश करतांना हेंच आमिष दाखविलें होतें. प्रतिनिधींना पेशवाईचीं वस्त्रें मिळाल्यावर त्यांच्या मार्फत शेखमिऱ्याला सांगवून नूरनिहार त्याला मिळवून द्यावयाची असें गमाजीनें त्याच्यापाशीं कबूल केलें होतें, व त्या भावी लाभावर विसंबून तो पेशवे व त्यांचे लोक यांचा दावेदार बनला होता. याशिवाय दुसऱ्याही एका कारणामुळें अबुबकर अलीकडे उद्दाम बनला होता. शेखमिऱ्याची चौथेपणची तरुण पत्नी जुलिया हिचा तो दिलप्यारा होता. शिवाय तो शेखमिऱ्याचा भाचाही होता.

पिलाजीनें अबुबकरचा उद्दामपणा पाहून त्याला विचारलें, " अबुबकर! हा काय प्रकार आहे ? "

पिलाजीचा प्रश्न अगदीं सरळ होता. पण अबुबकरनें त्याला उद्दामपणाचें आडमुठें उत्तर दिलें, " हा साताऱ्यांतील अजिमतारा किल्ल्याचा मुख्य दरवाजा आहे, व मी किल्लेदाराचा भाचा अबुबकर आहें. समजलें का ? "

" तें मला माहीत आहे ! तूं अबुबकर आहेस; पण यापूर्वी तुला एकदां माझा

---

* 'शाहूमहाराजांची रोजनिशी' व इतर तत्कालीन ऐतिहासिक पुरावा पहातां तेव्हां गुन्हेगार स्त्रियांना सक्तमजुरीची शिक्षा देण्याची ही सर्रास रीतच होती, व खुद्द शाहूमहाराजही अशा प्रकारचे निवाडे स्वतः अनेकवार देत असत, असें दिसतें. 'सक्तमजुरीची शिक्षा झालेल्या स्त्रियांसंबंधानें ही गोष्ट लक्षांत घेण्यासारखी आहे कीं, त्या स्त्रियांचें कुलीनत्व नष्ट होऊन त्यांना दासीसारखें वागविण्यांत येई. त्यांची संतति बेवारशी समजली जात असे व तिला आईच्याच नांवानें ओळखीत असत" [न्या० मू० रानडे यांचा " General introduction to Shahu Chatrapati and the Peishwas' Diaries " हा निबंध.]

इंगा कळला आहे, तें आठवून नीट सरळ बोल. तूं मला ओळखलेंस ना ? ” पिलाजी ईर्षेला पेटून म्हणाला.

“ अरे हो ! तुला मीं ओळखलें. ही एवढी मिजास कुणाला दाखवितोस ? मला माहीत आहे, तूं नूरच्या वासावर आला असशील. पण आतां इकडचा साराच नूर पालटला आहे. बाबा ! पूर्वींचे ते दिवस आतां गेले. वाघनखांचें भय वाघ जिवंत असेपर्यंत. पण तोच वाघ मेला कीं, कोणींही त्याचीं नखें उपटून पोरासोरांच्या गळ्यांत त्यांचे ताईत गुंफून बांधावे. ज्याच्या जिवावर तूं आजवर नसती वटवट करीत आलास, तो बाळाजीपंत पेशवा उलथला, व मराठशाहींत सर्वत्र आतां श्रीपतराव प्रतिनिधींचा* दरारा दुमदुमूं लागला आहे. आतां जास्त बडबडशील तर बत्तिशी घशांत उतरेल, याद राख. आतां तुला नूर तर मिळायची नाहींच; पण तिच्या फंदांत पडलास तर तुझ्या नरडीला मात्र नख लागेल.” अबुबकर आढ्यतेनें म्हणाला.

पिलाजी आधींच मानी व हाडापेरानें खबरदार, शूरही तसाच व तसाच निःसीम स्वामिभक्तही होता. शिवाय अबुबकरविषयीं त्याला यापूर्वींपासूनच तिरस्कार वाटत होता. त्याला अबुबकरचे हे मगरुरीचे बोल—विशेषतः त्याचे नुक्त्या काल-परवां पर-लोकीं गेलेल्या आपल्या पितृतुल्य धन्याविषयीं उपमर्दकारक शब्द ऐकून ओघानेंच संताप आला, व अबुबकरनें नूरनिहारविषयीं टोमणा दिला, तो ऐकून तर त्याच्या तळव्याची आग मस्तकाला जाऊन झोंबली. दुसरें तिसरें त्यानें कांहीं केलें नाहीं, प्रथम त्या मगरूर देवडीवाल्याच्या एक खाड्कन् खाशी श्रीमुखांत भडकावली. त्यासरसें त्या देवडीवाल्याचें अवसान एकदम ओसरलें व तो चीं चीं करीत देवडीच्या अनुरोधानें मागें हटत ओरडला, “ गमाजीराव ! गमाजीराव ! धांवा हो धांवा ! हा पिलाजी माझा जीव घेत आहे.”

अबुबकरनें गमाजीला हांक मारलेली पिलाजीनें ऐकतांच त्यांची खात्री होऊन चुकली कीं, हें प्रकरण आतां नक्की हातघाईवर येणार. गमाजी त्यांच्या पूर्णपणें परिचयाचा

---

* बाळाजी विश्वनाथ पेशवे मिति चैत्र शुद्ध ६ शके १६४२ रोजीं सासवड मुक्कामीं मरण पावले. परशुरामपंत प्रतिनिधि त्यापूर्वींच मिति ज्येष्ठ शुद्ध ८ शके १६४० रोजीं मरण पावल्यामुळें तेव्हां त्यांचा पुत्र श्रीपतराव याला प्रतिनिधिपदाचीं वस्त्रें मिळालीं होतीं.

होता.तो पेशव्यांचा हाडवैरी श्रीपतराव प्रतिनिधि* याच्या हस्तकाचा यमाजी शिवदेवाचा मुलगा होता, म्हणून तर त्याची सर्वांना ओळख होतीच; पण याहीपेक्षां त्याची व्यक्तिशः अनेकांना ओळख असण्याचें कारण तो कमालीचा आडदांड व क्रूर होता हें होय. साधारणतः क्रूर माणूस म्हटला कीं तो अनीतिप्रिय असावयाचाच, व गमाजीही तसा अनीतिप्रिय होता. त्याच्या बोभाटयांचें वर्णन एका शब्दांत करावयाचें झालें तर तो प्रतिनिधींच्या गोठ्यांत माजलेला एक पोळ होता असेंच करावें लागेल. ह्या पोळाची तेव्हां अत्याचारांच्या बाबतींत पोळी पिके, याचें कारण श्रीपतराव परशरामपंतांच्या पश्चात् इ. सन १७१८ मध्यें शाहूमहाराजांचा प्रतिनिधि झाल्यापासून त्यानें आपल्या वडिलांप्रमाणेंच आपल्या गोडबोल्या कावेबाजीनें शाहूमहाराजांना आपलेंसें करून घेतलें होतें. त्या श्रीपतरावाच्या थोरवीवर त्याच्या मुतालिकाचा बडेजाव व त्या मुतालिकाचा मुलगा हा गमाजी ! सामान्यतः मनुष्य तेवढा एथून तेथून स्तुतिप्रिय असावयाचाच, व शाहूमहाराजही ह्या व्यावहारिक सिद्धान्ताला मोठासा अपवाद नव्हते. शिवाय शाहूमहाराजांची बादशहाच्या कैदेंतून सुटका होऊन ते दक्षिणेंत येण्याच्या पूर्वीपासून परशरामपंत प्रतिनिधींचें मराठशाहींत ताराबाईच्या बायकी राज्यकारभारांत बरेंच प्रस्थ माजून राहिलें होतें. परशरामपंतांची वृत्ति प्रथमपासूनच 'रामाय स्वस्ति; रावणाय स्वस्ति' या न्यायानें बारसेंही साधावयाचें व बारावेंही साधावयाचें अशी स्वार्थी असल्याबद्दल शाहूमहाराजांची जरी मुद्देमालासह खात्री पटली होती, तरी एरव्हीं परशरामपंत हे हुषार, मुत्सद्दी व पराक्रमी आणि शिवाय मराठशाहीच्या राजकारणांत मुरलेले मुरब्बी होते हेंही शाहूमहाराज

* सातारा जिल्ह्यांतील जावळी तालुक्यांत बामणोली म्हणून गांव आहे. तेथें शिवदेव शिवदे या नांवाचा इसम राही. हा मुतालिकांचा मूळ पुरुष. याला अंताजी व यमाजी असे दोन मुलगे होते. ते राजाराममहाराजांच्या कारकीर्दींत परशरामपंतांच्या हाताखालीं कारकुनी करूं लागले. गमाजी हा यमाजीचा मुलगा. प्रतिनिधींप्रमाणेंच ह्या त्यांच्या हस्तकांनींही पेशव्यांना नेहमीं विरोधच केला. यमाजीला पुढें कैक वर्षांनीं प्रतिनिधींची मुतालिकी मिळाली. तेव्हांपासून ते मुतालिक हेंच उपनांव लावूं लागले. साताऱ्याचे सरदार मुतालिक हे यांचे वंशज होत. हातवळणेकृत 'साताऱ्याचें वर्णन' व सरदेसायांची 'मराठी रियासत' या ग्रंथांत मुतालिकांचें मूळ उपनांव चावरे असें देण्यांत आलें आहे. पण प्रत्यक्ष चौकशीकरतां तें नांव चुकीचें असल्याचें कळतें.

ओळखून होते. परशरामपंतांनीं प्रथमपासूनच शाहूमहाराजांशीं स्पर्धा करणाऱ्या ताराबाईच्या पक्षाशीं संधान राखून राज्यकारभारांत नसतीं खेकटीं उत्पन्न करावीं व तीं निस्तरतां निस्तरतां शाहूमहाराजांना पुरेवाट व्हावी, ही यातायात टाळण्या-साठीं शाहूमहाराजांनीं त्यांना त्यांचें पूर्वापार प्रतिनिधिपद सरंजामासुद्धां बहाल केलें होतें. श्रीपतराव हा त्याच परशरामपंतांचा पुत्र असल्यानें तो आनुवंशिकतेनें कुटिल नीतिप्रज्ञ तर होताच; शिवाय त्यानें बाह्यतः शाहूमहाराजांशीं कधींच विरोध न दाखवितां उलट निःसीम स्वामिभक्ति दाखवावी ! तसेंच शाहूमहाराजांच्या स्वभावां-तील स्त्रैणपणा व चंचलता हे दोष ओळखून त्यानें त्यांच्या आवडत्या राजास्त्रियांची थुंकी झेलून त्या वशिल्याचाही शाहूमहाराजांची प्रीति संपादन करण्याच्या कामीं उपयोग करून घ्यावा ! अशा दुटप्पी वर्तनानें श्रीपतरावानें शाहूमहाराजांवर आपली छाप ठेवून दिली होती. कोणाही मनुष्याच्या अंगांत एखादा सद्गुण जरी प्रामुख्यानें असला तरी त्या सद्गुणाखालीं त्याचे इतर दुर्गुण झांकले जातात. श्रीपतरावांच्या अंगीं दुर्व्यस प्रतीचा पराक्रम हा एक सद्गुण होता, व प्रत्यक्ष तरवारबहाद्दरीचा शाहूमहाराजांच्या ठायीं पूर्ण अभाव असल्यानें आजवर श्रीपतरावानें बाळाजी विश्वनाथांबरोबर जाऊन शंभु-महादेवाच्या डोंगरांत पुंडाई करणाऱ्या*कृष्णराव खटावकराचा मोड केला होता. पुढें वडगांव येथें कोल्हापूरकर संभाजीराजांशीं लढून त्यांचा पराजय करण्यांत त्यानें मर्दुमकी गाजविली होती. तेवढ्यावरून शाहूमहाराजांना वाटूं लागलें होतें कीं,

* कृष्णराव खटावकर हा जातीचा देशस्थ ब्राह्मण. हा मूळपासून मोगलांचा पक्षपाती होता. शाहूमहाराजांना त्याचा फार उपद्रव होऊं लागला म्हणून त्यांनीं बाळाजी विश्वनाथांना त्याचा मोड करण्याच्या कामगिरीवर पाठविलें. तेव्हां परशराम-पंतांनीं 'तुम्ही सेनाकर्ते (बाळाजीपंत) यांजबरोबर लढाईत जाऊन आपली शर्थ करून महाराजांस संतोषित करून आम्हांस सोडवावें तरी अगर मरून तरी जावें' (पंत प्रतिनिधींची बखर) असें श्रीपतरावाला सांगितलें. त्यावरून तो बाळाजीपंताबरोबर जाऊन मोठ्या शिकस्तीनें लढला, व त्याच्या पराक्रमावर खूष होऊन शाहूमहाराजांनीं परशरामपंतांची कैदेंतून मुक्तता केली. ही गोष्ट इ. सन १७१२ च्या आरंभीं घडली. त्यानंतर इ. सन १७१९ मध्यें शाहूमहाराज व संभाजी यांच्या सैन्याचा निकराचा सामना होऊन संभाजींची दाणादाण उडाली; संभाजीचे कितिएक सरदार व तारा-बाई, राजसबाई वगैरे हस्तगत होऊन लूटही पुष्कळ मिळाली; ह्या लढाईंतही बाळाजीपंतांनीं श्रीपतरावाला बरोबर घेतलें होतें.

श्रीपतराव खराखुरा रणगाजी आहे. वास्तविक ह्या दोनही प्रसंगीं श्रीपतरावाच्या पदरीं यश पडण्याला बाळाजी विश्वनाथच मुख्यतः कारणीभूत झाले होते. पण स्वतः शाहूमहाराज तरवारबहाद्दर नसल्यानें व इतर अनेक उपायांनीं श्रीपतरावानें शाहू-महाराजांवर आपलें वजन ठेविलें असल्यानें उपरोक्त दोन पराक्रमांच्या तुटपुंज्या भांडवलावर श्रीपतरावाला शाहूमहाराजांच्या कारकीर्दीत नशीब काढतां येऊन महाराजांच्या नाकांतील बाल बनून बसतां आलें.

श्रीपतरावानें स्वतःच्या कर्तबगारीवर सारी मराठशाही आपल्या मुठींत आणण्या-चा उद्योग आरंभिला असता तर गोष्ट निराळी होती. पण तशी अद्वितीय कर्तब-गारी कांहीं त्याच्या अंगीं नव्हती; त्याची तशी महत्त्वाकांक्षा मात्र होती. महत्त्वा-कांक्षी मनुष्य त्या महत्त्वाकांक्षेला पुरा पडण्याइतका कर्तबगार नसला, कीं त्या कर्तबगारीची उणीव कुढेपणानें भरून काढण्याला तो झटूं लागतो. श्रीपतरावानेंही तसाच उद्योग आरंभिला. बाळाजी विश्वनाथ पेशवे आपल्या चतुरस्र कर्तबगारीवर पुढें येऊन पेशवे बनले, व प्रतिनिधि हा छत्रपतींच्या प्रधानमंडळांतील पेशव्यांहूनही थोर असा अधिकारी अशी प्रतिनिधिपदाची कागदोपत्रींच्या पुराव्यांनीं शाबीत होणारी थोरवी असतांही पेशव्यांपुढें प्रतिनिधि बराच निस्तेज झाला, हा अपमान श्रीपतरावाला सहन होईना. बरें; हरएक बाबींत मर्दुमकी गाजवून पेशव्याच्या पुढें पाऊल टाकण्याची तर अंगीं ताकद नाहीं! तेव्हां त्यानें घरबसल्या पेशव्यांचा द्वेष करण्याचा, कारभारीमंडळांतील कर्त्या लोकांना पेशव्यांच्या विरुद्ध चिथावण्याचा व शाहूमहाराजांच्या मनांत पेशव्यांविषयीं नाना उपायांनीं काळें ओतण्याचा सपाटा चालविला. पेशव्यांचा उत्कर्ष ज्यांना असह्य झाला होता, असे चंद्रसेन जाधव, सर्जेराव घाटगे वगैरे बरेच लोक तेव्हां श्रीपतरावाला सामील झाले. ताराबाई विरुद्ध शाहू ह्या दुफळींत परशरामपंतांनीं जें धरसोडीचें व फंदफितुरीचें स्वार्थसाधुपणाचें धोरण आजन्म अवलंबिलें होतें, तेंच श्रीपतरावानें पुढें चालू ठेवलें होतें, व त्या धोरणानें यशस्वितेचा मार्ग आक्रमण करण्याला सुलभ व्हावें म्हणून आपल्याच वृत्तीचे अनेक हस्तक त्यानें आपल्या सभोंवार जमा केले होते; त्यांतीलच एक यमाजी शिवदेव हा होता. असो.

पिलाजीनें देवडीवाल्याला 'हें काय' असें विचारतांच त्यानें बाळाजी विश्व-नाथ पेशव्यांविषयीं अनुदारपणाचे उद्गार काढून आतां मराठशाहींत प्रतिनिधींचें युग सुरू झाल्याचें सांगितलें, त्याच्या मुळाशीं अत्यंत खोल व महत्त्वाचा अर्थ भरलेला

होता. बाळाजी विश्वनाथ पेशवे दोनतीन वर्षांतील राज्यकारभाराच्या व विशेषतः त्यांना नुक्तीच सतत चारपांच महिने कोल्हापूरकर संभाजीशीं कोल्हापुराकडे जी लढाई करावी लागली* त्या लढाईच्या दगदगीनें आजारी पडून आंथरुणाला खिळले व वृद्धापकाळांतील तें दुखणें असल्यानें त्यांतच अवघ्या दहाबारा दिवसांत त्यांचा सासवड मुक्कामीं अंत झाला. ह्या गोष्टीला आज पंधरावा दिवस होता. पेशव्यांच्या निधनाची वार्ता कानीं येतांच राजवटीच्या सर्व जाणत्या माणसांना व शाहूमहाराजांना देखील पराकाष्ठेचा खेद झाला; पण श्रीपतरावाला मात्र पराकाष्ठेचा आनंद झाला. बाळाजीपंतांच्या पश्चात् पेशवाईचीं वस्त्रें त्यांचा पराक्रमी ज्येष्ठ पुत्र बाजीराव याला मिळणें क्रमप्राप्त होतें, व शाहूमहाराज,‡ खंडो बल्लाळ चिटणीस, आणि राजकारणांत मुरलेले महाराजांच्या विश्वासांतील पेशव्यांचे दिवाण अंबाजीपंत पुरंदरे† वगैरे मंडळींत त्याविषयीं खल सुरू होता. बाजीराव हा पेशव्यांचा मुलगा म्हणून त्याला पेशवाईचीं वस्त्रें मिळावयाचीं अशा अर्थाची वंशपरंपरेच्या हक्काची ही बाब नव्हती. तेव्हांच्या राजवटीला बाजीराव हाच एकटा काय तो पेशवेपदाला लायक होता. पण प्रतिनिधीनें बाजिरावाला पेशवाईचीं वस्त्रें मिळूं नयेत व सर्व सत्ता आपल्या हातीं यावी अशा दुष्ट हेतूनें बाजिरावाच्या वाटेंत नानापरींचीं विघ्नें उत्पन्न करण्यासाठीं कंबर

* ही लढाई कृष्णातीरीं इस्लामपूरच्या उत्तरेला उरुणबहे येथें ता. २०।३।१७२० रोजीं झाली.

‡ चिटणिसांच्या घराण्याची शिवाजीमहाराजांपासूनची देशसेवा इतकी उज्ज्वल व अखंड आहे कीं, त्याविषयीं निराळें कांहींच सांगावयाला नको. शिवाजीमहाराजांच्या वेळीं बाळाजी आवजी चिटणीस होते, त्यांचेच हे चिरंजीव. शाहूमहाराजांच्या राज्याच्या आधारस्तंभापैकीं हे एक होते. अशा थोर पुरुषाला अखेर इ. सन १७२६ मध्यें दारिद्र्यचितानलांत होरपळून मरावें लागलें, हें ऐकून कोणाला उद्वेग वाटणार नाहीं !

† बाळाजी विश्वनाथ पेशवे कोंकणांतून वरघाटीं आल्यावर प्रथम ज्या सद्गृहस्थांचा आश्रय त्यांना मिळाला, ते हे सासवडचे अंबाजीपंत पुरंदरे कुळकर्णी होत. ( 'पेशवाईचें पुण्याहवाचन' पहा.) अंबाजीपंतांचा पेशव्यांच्या घराण्यावरील लोभ अखेरपावेतों कायम होता. बाळाजी विश्वनाथांना इ. सन १७१३ मध्यें पेशवाईचीं वस्त्रें मिळालीं, तेव्हां पुरंदऱ्यांना पेशव्यांची दिवाणगिरी व हुजूरची मुतालिकी मिळाली.

कसली. बाळाजीपंत पेशवे आजारी पडून सासवडीं गेले, व बाजीराव, चिटणीस, पुरंदरे वगैरे पेशव्यांची आप्तेष्ट मंडळीही पेशव्यांच्या समाचारासाठीं तिकडेच गेली होती. श्रीपतरावाचा घालमेल्या स्वभाव पेशव्यांच्या परिचयाचा असल्यानें ते नेहमीं आपल्या गैरहजेरींत आपल्या विश्वासांतील कोणी ना कोणी माणूस श्रीपतरावाच्या घालमेलींवर नजर ठेवण्यासाठीं साताऱ्यांत शाहूमहाराजांसन्निध ठेवीत. असे पेशव्यांचे विश्वासू माणूस पुरंदरे हे होते. पण त्यांनाही पेशव्यांच्या अंतकाळीं त्यांच्या समाचारासाठीं सातारा सोडून जावें लागलें. तेवढ्यांत श्रीपतरावाला इकडे साताऱ्यांत मनाजोग्या उलाढाली करण्याला फावलें. पेशवे वारले, आतां आपणच मराठशाहीचे मुख्य कारभारी झालों, अशी त्यानें सभोंवारच्या माणसांची समजूत करून दिली व सभोंवारचीं माणसें आजवर श्रीपतरावावर शाहूमहाराजांची मर्जी बहाल असल्याचें प्रत्यक्ष पहात असल्यानें त्यांनाही वाटलें कीं, पेशव्यांच्या पश्चात् प्रतिनिधिच शाहूमहाराजांचे सर्वाधिकारी होणार. ह्या वेळीं बाजीराव पेशवाई मिळविण्यासाठीं धडपड करील हें श्रीपतरावाला माहीत होतें, व म्हणूनच बाजिरावाचा उठावा करण्याच्या कामीं आपणाला जे जे कोणी साह्य करतील अशी त्याला आशा होती, त्या त्या सर्व लहानमोठ्या माणसांना परोपरींचीं आमिषें दाखवून त्यानें आपल्या बाजूला वश करून घेतलें होतें. ह्या फंदफितुरीचें पीक साताऱ्याच्या किल्ल्यांत पिकविण्याच्या कामावर प्रतिनिधीचा प्रतिनिधि यमाजी शिवदेव व त्याचा मुलगा गमाजी यांची नेमणूक झाली होती. उपरोक्त पोवाड्याचा प्रकार झाला तेव्हां यमाजी कांहीं तिथें नव्हता, एकटा गमाजीच होता; व शिवाय त्याचा आखाडेदोस्त नागोजीभट्ट* नांवाचा एक होता, तोही त्याच्याबरोबर होता.

असो. आतां हें प्रकरण हातघाईवर येणार ही पिलाजीची अटकळ तंतोतंत खरी

---

* नागोजीभट्ट दानवे हा सातारा जिल्ह्यांतील लोणंदचा यजुर्वेदी देशस्थ ब्राह्मण. भिक्षुकी हा त्याचा निर्वाहाचा धंदा होता. हा ताकदीच्या दृष्टीनें जणुं प्रतिभीमसेन होता. श्रीपतराव प्रतिनिधीची ज्येष्ठ कन्या अक्काबाई हीही अत्यंत उफाड्याची मुलगी असल्यानें तिला योग्य असा वरच मिळेना, तो नागोजीभट्ट सांपडला. त्याला श्रीपतरावानें आपला जांवई केलें, व मग तीन लाखांची जहागीर देऊन त्याचें दारिद्र्य दूर केलें. नागोजीचे वंशज कडेगांव येथें आहेत. त्यांचें अलीकडे रूढ असलेलें देशपांडे उपनांव वतनदारीवरून पडलें. नागोजीभट्ट विद्वान् नसला तरी श्रद्धाळु व सरळ माणूस होता.

ठरली. अबुबकरनें हांक मारलेली ऐकतांच ते पेशव्यांचा पोवाडा ऐकतांना कुचाळ्या करणारे व पोवाडा आटोपतांच शाहिरावर शिव्यांचा वर्षाव करून त्याला व त्याच्या साथीदारांना मारझोड करण्यांत पुढाकार घेणारे दोघे तरुण प्रथम रागारागानें देवडीच्या बाहेर आले. त्याच्या मागोमाग आणखी दहावीस माणसांचा घोळका आला.

"गमाजी ! ह्या मगरूर मरगट्टयानें माझ्या थोबाडींत मारली !" अबुबकरनें गाल चोळीत चोळीत पिलाजीकडे बोट दाखवून नुक्तेच बाहेर आलेल्या दोघां गोटीबाज तरुणांपैकीं त्यांतल्या त्यांत कमी लठ्ठ अशा तरुणाला—गमाजीला म्हटलें.

"काय रे हरामखोरा !" नागोजीभट्ट पिलाजीवर चालून जाऊन हात उगारून म्हणाला, "जास्तशी मिजास दाखवितोस ! देऊं का बत्तिशी उतरून हातावर !"

पिलाजीनें त्या गलेलठ्ठाला ओळखलें. तो गमाजीचा आखाडेदोस्त नागोजीभट्ट होता. नागोजीभट्ट तेव्हां त्या प्रांतांत एक प्रसिद्ध होतकरू पहिलवान् म्हणून प्रसिद्ध होता. तो पैजांच्या कुस्त्यांच्या निमित्तानें मधून मधून सातार्‍याला येई, व ज्या आखाडयांत पिलाजी होता त्या आखाडयांतील पहिलवानाशीं नागोजीभटाची एकदां कुस्ती होऊन त्यानें विजय मिळविला होता, म्हणून त्याची पिलाजीला ओळख होती पण त्याला नागोजीभट्टाच्या ताकदीची असावी तशी जाणीव नसल्यानें 'हा ताकभातखाऊ भट आमचें काय करणार आहे !' अशा घमेंडींत तो त्याच्यावर धावून गेला. गोंधळी बिचारे बाजूलाच राहून व त्यांचें रक्षण करूं पहाणार्‍या पिलाजीशीं नागोजीभट्टाची लढत जुंपली. गमाजीही नागोजीभटाच्या मदतीला धावून गेला. त्या दोघांनीं पिलाजीला धरून एकदम डाव्या बाजूच्या दरडीवरून खालीं लोटून दिलें. आतां आपणावरही तीच पाळी येणार असें हेरून ते चौघे गोंधळी तेवढ्यांतल्या तेवढयांत काढता पाय घेण्याच्या बेतांत होते, तोंच आणखी एक स्वार घोडा दौडीत दौडीत तेथें येऊन थडकला तो घोडयावरून उतरतो न उतरतो तोंच आतांच्या विजयानें वाजवीपेक्षां जास्त शेफारून गेलेली गमाजी व नागोजीभट्ट ही दुक्कल त्या पाहुण्याचा समाचार घेण्यासाठीं पुढें सरली. नागोजीभट्ट तेवढयांत गमाजीला म्हणाला, "हा गुलाम कोणी ह्याच चोराचा—पिलाजीचा भागीदार दिसतो. याचीही आपण खाशी हड्डी नरम केली पाहिजे."

पण त्या घोडेस्वाराशीं प्रत्यक्ष दृष्टादृष्ट होतांच नागोजीभटाचें अवसान बरेंच ओसरलें. त्या स्वाराचा एकंदर डौल एखाद्या त्रयस्थालाही क्षणभर गुंग करून सोडण्याजोगा होता. तो घोड्यावरून खालीं उतरतो न उतरतो तोंच गमाजीनें एकवार

त्यांच्याकडे निरखून पाहून अबुबकरकडे वळून आज्ञा केली, "अबुबकर! मशालजी-ला मशाल घेऊन यावयाला सांग जा."

"तुम्ही सर्व मंडळी इथें दरवाजा बाहेर काळोखांत काय करीत आहां?" त्या स्वारानें जवळच चौघे गोंधळी भीतीनें थरथर कांपत उभे होते त्यांपैकीं एकाला—जो त्यांचा मुख्य शाहीर होता त्याला विचारलें.

शाहिराला वाटलें कीं, हा किल्ल्यावरचा कोणी बडा अंमलदार असावा, एरव्हीं गमाजी, नागोजीभट्ट वगैरे मंडळी त्याला पाहून चपापली नसती. न जाणो, हाही वेळीं प्रतिनिधींचा पक्षपाती व पेशव्यांचा प्रतिस्पर्धी असला तर आपणाला पेशव्यांचा पोवाडा गाइल्याबद्दल आणखी लाथाबुक्यांचा खुराक चारावयाचा! त्यापेक्षां आपण प्रथमच याचे पाय धरून केल्या अपराधाबद्दल क्षमा मागितलेली बरी, असा शहाणपणाचा विचार करून त्या शाहिरानें त्या स्वाराला नम्रतापूर्वक वंदन करून त्याची करुणा भाकली, "सरकार! आम्ही गुन्हेगार आहों. आमच्या हातून नकळत गुन्हा झाला खरा. त्याबद्दल आम्हांला क्षमा असावी."

"मग मरायला इथें रेंगाळत उभे कशाला राहिलां? काळें करून सरळ रस्त्यानें चालते व्हायचें कीं नाहीं?" गमाजी उद्दामपणानें म्हणाला.

"आम्ही जातों; आमचें डफ-तुणतुणें तेवढें द्या." शाहीर गमाजीकडे वळून त्याचे पाय धरून भीत भीत म्हणाला.

गमाजीला देखील कां नकळे, त्या गोंधळ्यांची व त्या स्वाराची मुलाखत व्हावयाला नको होती. तो नागोजीभटाला म्हणाला, "नागोजी! ह्या शिंच्यांचें डफ-तुणतुणें यांच्या स्वाधीन कर जा. एकदांची ही ब्याद एथून निघून जाऊंदे."

नागोजीभटानें गमाजीच्या बोलण्यांतील गर्भितार्थ तेव्हांच ओळखला कीं, आपण गोंधळ्यांना मारझोड केली, त्या गोष्टीचा बोभाटा होऊं नये म्हणून त्याची ही चपळाई आहे. तो लगेच कांहीं आढेवेढे न घेतां त्या शाहिराला म्हणाला, "चला या माझ्याबरोबर, तुमचें डफ-तुणतुणें मी तुमच्या स्वाधीन करतों."

भीतीमुळें आपण केव्हां एकदां एथून निसटतों असें त्या गोंधळ्यांना झालें होतें. त्या चौघांनींही भीत भीत पण शक्य तितक्या चपळाईनें देवडीच्या आंत जाऊन आपलें पोवाडेगायनाचें साहित्य घेतलें व देवडीबाहेर जो पाय काढला, ते जीव घेऊन पळाले. थोड्या वेळापूर्वी चांगला खरपूस मार खाऊन त्यांचीं हाडें

खाशीं खिळखिळीं झालीं होतीं. कोणाचे गाल सुजले होते, कोणाचे गुढगे फुटले होते, तर कोणाचें कंबरडें ढिलें झालें होतें. पण आपल्या गुन्ह्याची फेरचौकशी होती, तर आपलीं हाडें आणखी खिळखिळीं झालीं असतीं, तो जिवावरचा प्रसंग टळला म्हणून त्यांना इतका आनंद झाला होता कीं, त्या भरांत ते पूर्वीं मार खाल्ल्याच्या वेदना पार विसरून गेले होते. त्यांना पळतांना जितका आनंद झाला होता, तितकाच आनंद गमाजी व नागोजीभट्ट ह्या दोघांनाही झाला होता. कारण, त्यामुळें त्यांनीं निरपराधी गोंधळयांना मारहाण करण्याचा व विशेषतः पिलाजीला दरडीवरून खालीं मृत्यूच्या जबड्यांत लोटण्याचा जो गुन्हा केला होता, त्यावर अनायासें पांघरूण पडलें होतें.

त्या स्वारालाही ते गोंधळी इतक्या तांतडीनें पळालेले पाहून वाटलें कीं, यांनीं खरोखरच किल्ल्यावर कांहींतरी गुन्हा केलेला असावा. तितक्यांत अबुबकरच्या मागोमाग दोन मशालजी मशाली पाजळून तेथें आले. नागोजीभट्टही आला. त्या मशालींच्या प्रकाशांत सर्वांना तो स्वार स्पष्टपणें दिसला. त्याचें तें पिळदार शरीर, ती सूर्याप्रमाणें तेजस्वी व मदनालाही लाजविणारी सुरतपाक मुद्रा, धैर्य व साहस यांची मूर्तिमंत साक्ष पटवून देणारी ती भरदार छाती, आजानुबाहू ह्या विशेषणाला शोभणारे त्याचे ते हात, कमरपट्ट्यांत एक कटयार व उजव्या हातांत लांबच लांब लखलखीत पात्याचा भाला, 'जातीच्या सुंदरांना कांहींही शोभतें' ह्या सुभाषिताची साक्ष पटवून देणारा व चर्येवरील राजतेजाला आपल्या साधेपणानें लाजविणारा पांढरा शुभ्र पण वाटचालींतील धुळीनें थोडासा मळका दिसणारा असा तो पोषाक, तो सारंग्या रंगाचा उंचच उंच तेजस्वी व गोटीवंद घोडा, असा तो थाट नागोजीभटानें पाहिला तेव्हां त्याला वाटलें कीं, हा बाजीराव तर नसेल ना ? तेवढ्यांत त्या स्वारानें आपल्या घोड्याला 'सारंग्या !' अशी हांक मारून त्याच्या पाठीवरून व मस्तकावरून ममतेचा हात फिरवून पोटच्या पोराप्रमाणें त्याला चुचकारण्याला सुरवात केली, तें पहातांच तर नागोजीभटाचा संशय जास्त बळकट झाला. त्यानें यापूर्वीं बाजिरावाला प्रत्यक्ष असें एकदोन वेळांच पाहिलें होतें, पण तें चांगलें चार वर्षांपूर्वीं व तेंही अगदीं ओझरतें पाहिलें होतें. पण तेव्हां देखील त्याला बाजिरावाचा थेट असाच थाट दिसून आला होता. मात्र तेव्हांचा बाजीरावाचा घोडा असाच उमदा पण निळ्या रंगाचा होता व ओंठावर थोडीशी मिसरूड पालवलेली दिसत होती नव्हती. पण नागोजीभटानें जरी बाजिरावाला फारसें कधीं पाहिलें नव्हतें तरी त्याची उगवत्या सूर्याच्या तेजाप्रमाणें

दहा दिशांना फांकणारी कीर्ति, त्याचा पेहराव, त्याची मांडीखालच्या घोड्यावरील प्रीति या विषयींच्या रसभरित कथा अनेकांच्या तोंडून त्यानें ऐकल्या होत्या. त्यांचें प्रतिबिंब ह्या ठिकाणीं त्याला पहावयाला सांपडलें.

"गमाजी ! हा बाजीरावच काय रे ?" नागोजीभटानें गमाजीला हळूच बाजूला घेऊन विचारलें.

"हो ! तुला अजून माहीतच नव्हतें ?" गमाजी म्हणाला, "तूं त्यांना यापूर्वीं कधींच पाहिलें नव्हतेंस वाटतें ?"

"पाहिलें होतें; पण त्याला फार वर्षें झालीं. आणखी एक शंका मला होती कीं, ह्यांना मिशा कां नाहींत ? —"

"हा मूर्खा !" नागोजीभटाच्या तोंडचें वाक्य पूर्ण होण्यापूर्वींच गमाजी म्हणाला, "एवढें का तुला कळूं नये ? तूं एवढा मोठा धटिंगण बजरंगबली वाढलास; पण शरीर कमावून बसलास व अक्कल गमावून बसलास !"

"अरे ! पण मीं आतां ओळखलें !" नागोजीभट्ट हळूच म्हणाला, "बाळाजीपंत पेशव्यांना वारल्याला आज पंधरावा दिवस आहे हें मला प्रथमच माहीत होतें, पण हा बाजीरावच आहे अशी माझी खात्री नव्हती."

"पण हें पहा, आतां बाजिरावानें चौकशी केली तर आम्हीं गोंधळ्यांना मारलें व पिलाजीला दरडीखालीं लोटून दिलें, यांतला एक चकार शब्ददेखील त्याला कळवायचा नाहीं बरें ! त्या अबुबकरलाही बाजूला घेऊन सांगून ठेव."

"तें काम मी करतों; पण हा पिलाजीचा घोडा बोलेल ना ?"

"खरेंच ! आतां कसें करायचें ?" गमाजी थोडा वेळ डोकें खाजवून म्हणाला, "तूं त्या घोड्यावर स्वार होऊन त्याला पंतांच्या गोटांत पोंचवून ये."

गमाजीला युक्ति सुचली, व बाजीराव आपल्या घोड्याला गोंजारण्यांत गढून गेला होता, तेवढ्यांत नागोजीभटानें ती हां हां म्हणतां अमलांतही आणली. तो घोड्यावर बसण्यांत पटाईत होता असें नाहीं; व पिलाजीचा पाणीदार घोडा पाहून त्याला प्रथम थोडें भयही वाटलें. पण स्वतःच्या आडदांडपणाच्या अचाट शक्तीवर त्याचा भरंवसा होता, कसलेंही उमदें जनावर असलें तरी आपण आपल्या मांडीखालीं त्याचें कंबरडें मोडून त्याला वठणीवर आणूं अशी त्याला घमेंड होती. यदाकदाचित् बाजिरावाचें तिकडे लक्ष जाईल तर जाऊं नये यासाठीं गमाजी मोठ्या

मानभावीपणानें पुढें होऊन अबुबकरला हांक मारून म्हणाला, " अबुबकर ! बाजी-रावसाहेबांच्या घोड्याला आंत नेऊन पाणी पाज. तो फार दूरवरून दमून आलेला दिसतो."

गमाजीच्या आज्ञेप्रमाणें अबुबकर पुढें झाला. बाजिरावानें आपला घोडा त्याच्या हातीं दिला. लगेच गमाजीनें बोलण्याला सुरवात केली, " तुम्ही आतां थेट सासवडा-हूनच आलेले दिसतां ! "

" होय. पण प्रतिनिधि किल्ल्यांत आहेत कीं वाड्यांत आहेत ? " बाजिरावानें विचारलें.

" ते आज सायंकाळींच औंधाला, यमाईदेवीच्या उत्सवाचा आजचा शेवटचा दिवस,* म्हणून गेले आहेत." गमाजी उत्तरला.

" पण मला त्यांचें पत्र निकडीनें निघून येण्याविषयीं आलेलें होतें. शिवाय आज मीं निघण्यापूर्वी पिलाजी जाधवाला माझ्या येण्याची वर्दी देण्यासाठीं पुढें पाठविला होता ! " बाजीराव म्हणाला.

" पण पिलाजी इथें कांहीं आला नाहीं. पंतांच्या गोटांत परस्पर आला असल्यास नकळे." गमाजी चांचरत म्हणाला.

" बरें. प्रतिनिधि केव्हां येतील ? "

---

* 'औंधाच्या उत्तरेस गांवालगतच पद्माळें, नागाळें आणि विशाळें अशीं तळीं आहेत. त्यांपैकीं पद्माळें व नागाळें हीं शाबूत असून विशाळें ह बुजलेलें आहे. या ठिकाणीं सांप्रत विशाळबाग आणि बंगला आहे. सध्यांच्या पंतप्रतिनिधींच्या वाड्याजवळच यमाईचें पुरातन देवालय आहे. तें प्रेक्षणीय आहे. यमाई देवी ही पंतप्रतिनिधींची कुलस्वामिनी होय. औंध येथील डोंगरावर असलेलें श्रीमूळपीठ देवीचें देवालय व किन्हई येथील साखरगडावरील साखरगडनिवासिनी देवीचें देवालय हीं श्रीयमाइ देवीचींच स्थानें होत. हीं तीनही स्थानें यद्यपि वस्तुतः एकरूपच समजलीं जातात, तथापि यमाई देवीविषयीं अनेक मनोवेधक साक्षात्कार ऐकावयाला सांपडतात. औंध येथें यमाई देवीचा उत्सव दरसाल चैत्र वद्य १ पासून वद्य ५ पर्यंत फार दिवसांपूर्वीपासून होत असतो. परशरामपंत प्रतिनिधि हे कवि होते; त्यांच्या ईशस्तुतिपर कवितेंत त्यांची यमाई देवीवरील भक्ति दिसून येते.

" त्याचा कांहीं नेम नाहीं. कदाचित् ते उद्यां तिकडून परस्पर महारदऱ्यावर* महाराजांची स्वारी शिकारीच्या निमित्तानें गेली आहे तेथेंच येतील, किंवा येतांना वेळीं कऱ्हाडलाही जाऊन येतील."

"महाराज एकटेच गेले आहेत कीं कबिला देखील ?"

" कबिला सर्व बरोबर नसेल; कदाचित् प्रतिनिधींनीं त्यांना नुक्तीच नजर केलेली लक्ष्मी अथवा दुसरी एकादी आवडती स्त्री त्यांच्याबरोबर असेल. कारभारीमंडळांतील कांहीं लोक मात्र त्यांच्या बरोबर असावेत."

" बरें; शेखमिरा तरी किल्ल्यांत आहे का ?"

" अबुबकर ! किल्लेदारसाहेब आंत आहेत का रे ?" नुक्ताच अबुबकर बाजिरावाच्या घोड्याला पाणी पाजून बाहेर घेऊन येत होता, त्याला गमाजीनें विचारलें.

" ते खतिबांच्या घरीं † कांहीं खाजगी कामासाठीं गेले आहेत. कदाचित्

---

* साताऱ्यापासून दोन तीन मैलांवर यवतेश्वराकडे जातांना महारदऱ्याचा तलाव व तलावाच्या डाव्या बाजूला महारदऱ्याचें जंगल आहे. पूर्वी हें जंगल फार दाट होतें. ह्या जंगलांत शाहूमहाराज शिकारीला जात. [ मराठी दफ्तर-रुमाल पहिला ( १ ) पहा.] शाहूमहाराजांचा शिकारीचा नाद इतिहासविश्रुत आहेच. यवतेश्वर व महारदरा ह्या दोन तलावांतून खापरी नहर बांधून सातारानगरांत शाहूमहाराजांनीं पाणी आणलें होतें. ह्या दोन्ही ठिकाणचें पाणी फार उत्तम आहे. अलीकडे गांवच्या वाढत्या वस्तीला हें पाणी पुरें पडण्याजोगें नसल्यानें यवतेश्वराच्या अलीकडच्या तलावांतून गांवांत नळाच्या पाण्याचा पुरवठा होतो. तरीपण ह्या पाण्याला यवतेश्वर किंवा महारदरा येथील तलावांतील पाण्याची सर नाहीं. रंगमहाल राजवाड्याच्या पडक्या चौथऱ्यावर एक लहानसा जलाशय आजलाही स्वच्छ पाण्यानें तुडुंब भरलेला आढळतो; ( 'पेशवाईचा ध्रुव ढळला !' पहा.) हें पाणी यवतेश्वर किंवा महारदरा येथून जुन्या खापरी नहरांतून आलेलें असावें. आजारी किंवा सधन लोक अजून मुद्दाम प्यावयासाठीं एथून पाणी नेतात.

† अवरंगजेब बादशाहाची एक शहाजादी संभाजीमहाराजांवर फिदा होती व संभाजीराजांच्या वधानंतर त्यांचे पुत्र शाहूमहाराज बादशाही कैदेंत असतां त्यांचें तिनें पुत्रवत् पालन केलें. शाहूमहाराज कैदेंतून सुटून दक्षिणेंत आले तेव्हां शहाजादीच्या स्मरणाकरितां तिनें दिलेले पंजे व खतीब त्यांनीं बरोबर आणले. खतिबाला

इतक्यांतच येतील." अबुबकर म्हणाला. तेवढ्यांत बोलतां बोलतां त्यानें बाजिरावाचा घोडा आणून त्यांच्यासमोर उभा केला. बाजिरावानें त्याला पुन्हा चुचकारून त्याच्या पाठीवर थाप मारून म्हटलें, "सारंग्या ! तूं आज फार दमलास, नाहीं का ? चल आतां, आपण आपल्या घरीं जाऊं."

सारंगा हें जनावरच खरें; पण बाजिरावाच्या मतें त्याला एखाद्या शहाण्या माणसाइतकी अक्कल होती. जनावराची-विशेषतः घोड्याची पारख करण्यांत बाजिरावाचा हातखंडा असल्यानें त्यानें कसोशीच्या परीक्षेनें आजवर एक निळा, एक सारंगा, एक गांगा व एक अबलक असे चार रंगाचे चार उमदे जातिवंत घोडे पडली ती किंमत देऊन खास स्वतःसाठीं खरेदी केले होते; त्यांतला सारंगा हा एक होता. बाजीराव ह्या चौघांही घोड्यांना त्यांच्या रंगाच्या नांवानेंच हाक मारी. त्यांतल्यात्यांत हा सारंगा घोडा तर त्याचा जीव कीं प्राण होता. 'सारंगा मांडीखालीं असला, कीं मी साऱ्या त्रिभुवनांत विजयश्रीचें निशाण फडकवीन; व मला अश्वमेध यज्ञ करावयाचा झाला तर तो मी ह्याच्या जिवावर करीन' असें बाजीराव वारंवार विनोदानें पण अभिमानानें म्हणे.

असो. बाजीराव आपल्या सारंग्यावर स्वार होऊन जो किल्ल्यावरून निघाला, तो अदालतीच्या-:- वाड्यांत आपल्या मुक्कामाला येतांना वाटेंत त्यानें पुरंदऱ्यांच्या

---

सातााऱ्यांत घर बांधून देऊन त्यांना खुत्बा पढण्याचा अधिकार दिला. शाहूमहाराज खतिबाला आपल्या कुटुंबांतील माणसाप्रमाणें वागवीत व त्यांचा सर्व कच्चा खर्च वगैरे चालवीत. ह्या खतिबाचें घराणें साताऱ्याला अजून नांदत आहे.

-:- हा अदालतीचा वाडा शाहूमहाराजांनीं पेशव्यांना राहाण्यासाठीं दिला होता. एथेंच पेशवे रहात असत. 'हा वाडा ता. २० मार्च इ. सन १७५● रोजीं होळीच्या रात्रीं मोठी आग लागून पुष्कळसे वाडे जळाले त्यांत जळाला; तसेंच रंगमहालचा वाडाही इ. सन १८७४ मध्यें जळाला, त्याचा आतां अवशेष कांहीं नाहीं' असें श्री० सरदेसाई आपल्या मराठी रियासतींत (मध्यविभाग २) म्हणतात ! हें विधान चुकीचें आहे. यांपैकीं अवशिष्ट रंगमहालाचें छायाचित्र 'पेशवाईचा ध्रुव ढळला ?' ह्या कादंबरींत देण्यांत आलेंच आहे. अदालतीचा वाडा—ज्याला 'जुनी अदालत' म्हणतात, तोही अद्यापि शाबूत आहे. तो अजिमतारा किल्ल्याच्या पायथ्याशीं शाहूमहाराजांनीं वसविलेल्या माची पेठेंत आहे. शाहूमहाराजांनीं बांधलेल्या राज-

वाड्यासमोर घोडा थांबवून अंबाजीपंतांविषयीं चौकशी केली पण ते घरीं नाहींत; पंडितरावांच्या वाड्यासमोर थांबून पंडितरावांविषयीं चौकशी केली पण तेही नाहींत; तेव्हां तो रंगमहालावरून आपल्या मकाणाकडे जातांना आपल्या सारंग्याची आयाळ कुरवाळीत त्याला म्हणाला, "सारंग्या! हें आहे तरी काय? आज सासवडाहून निघतांना तूं कुणाचें तोंड पाहिलें होतेंस? पिलाजी आमच्या अगोदर वर्दी देण्यासाठीं निघाला त्याचा पत्ता नाहीं, प्रतिनिधि जाग्यावर नाहींत, पंडितराव नाहींत, अंबाजीपंत नाहींत, महाराज नाहींत, अशी आम्हांला आज जेथें तेथें नकाराची नाठ कां लागते आहे?"

बाजिरावाचे बोल बोलून सरावयाला आणि सारंगा उत्साहपूर्वक वर मान करून व आयाळ आणि शेपटी फुलदून फुरफुरावयाला एक गांठ पडली. बाजिरावानें सारंग्याला हा प्रश्न म्हणून विचारला नसेल, व सारंग्या शेपटीचा गोंडा आणि मानेवरील आयाळ फुलवीत वर मान करून जो फुरफुरला तोही धन्याचा प्रश्न ओळखून त्याच्या उत्तरादाखल फुरफुरला असेल असेंच नाहीं. पण आचार, विचार व उच्चार यांत हरदम पुढें पाऊल टाकणाऱ्या त्या आशावादी नरवीरानें सारंग्याच्या त्या फुरफुरण्याचा आपल्या मनोगताप्रमाणें अन्वयार्थ लावून त्याला पुन्हा विचारलें, "काय म्हणतोस? धीर सोडूं नको? छे! तुझ्यासारखा जिवाला जीव देणारा सोबती असल्यावर मी धीर कसा सोडीन?"

बाजिरावाच्या तोंडून हे शब्द निघावयाला व जवळच्या घरांतून एक सुवासिनी रस्त्यांत एका वृक्षाच्या मुळाशीं असलेल्या देवापाशीं दिवा लावण्यासाठीं समोर यावयाला एक गांठ पडली. बाजीराव तिला पाहून सारंग्याची पुन्हा पाठ थोपटून म्हणाला, "दोस्त! आपणाला शुभशकुन झाला!"

सारंगा चालतां चालतां पुन्हा फुरफुरला व शाहूमहाराजांच्या रंगमहालासमोर बाजीराव येऊन पोंचतो न पोंचतो तोंच रंगमहालाच्या मुख्य फाटकांतून कोणी तरी एक बुरखेवाली व्यक्ति ज्या दिशेनें बाजीराव चालला होता त्याच दिशेनें

---

वाड्यांपैकीं हा एवढा एकच राजवाडा कायतो आजला पूर्ण स्थितींत विद्यमान आहे. हा वाडादेखील, इंग्रजांनीं इ. सन १८४९–५० मध्यें सर्व दौलत ताब्यांत घेऊन तिचा लिलांव पुकारला तेव्हां सातारचे राजे कै० आबासाहेब (कै० आईसाहेबांचे दत्तकपुत्र) यांनीं विकत घेऊन रक्षण केला म्हणून टिकला!!! पुरंदऱ्यांचा वाडा व पंडितरावांचा वाडा हे ह्या वाड्याच्या आजूबाजूलाच आहेत.

चालत येऊं लागली. बाजिरावाचा घोडा व ती व्यक्ति यांच्यांत अंतर असें पाहूं जातां फारच थोडें, अवघें आठ दहा हातांचें होतें, पण रात्र काळोखी असल्यानें ती बुरखेवाली व्यक्ति पुरुष आहे कीं स्त्री आहे हेंही त्याला नीटसें कळेना. ती व्यक्ति जरा दूर गेल्यावर रस्त्याच्या मधोमध पाठीकडे तोंड करून उभी राहिली. आपली वाटच अडविली गेली तेव्हां बाजिरावानें तिरस्कारानें ओरडून विचारलें, "कोण आहे हें खूळ? घोड्यांच्या टापांखालीं मरून तुला मोक्ष मिळवावयाचा आहे का ?"

पण बाजिरावाच्या ह्या प्रश्नानें ती व्यक्ति भ्याली नाहीं किंवा बाजूलाही सरली नाहीं. ती शांतपणानें एवढें मात्र हळूच म्हणाली, "बाजीरावसाहेब! ही धोक्याची निशाणी आहे."

बाजिरावानें अंमळ चकित होऊन घोडा उभा करून त्या व्यक्तीकडे पाहात विचारलें, "पण कोण तूं?"

"जरा हळू बोला; भिंतीला कान आहेत." असें म्हणून त्या व्यक्तीनें बुरख्याखालीं लपविलेला हात हलकेच बाहेर काढून वर करीत म्हटलें, "हें पहा. ही चिठ्ठी बाईसाहेबांनीं दिली आहे, व खुणेसाठीं स्वतःची आंगठी दिली आहे."

त्या व्यक्तीचा हात वर झाला; पण तो कांहीं बाजिरावाच्या हाताला पोंचेना. अखेर बाजिरावानें अंमळ वांकून त्या व्यक्तीच्या हातांतील चिठ्ठी व आंगठी आपल्या हातीं घेतां घेतां तो गोंडस हात ओझरता दिसला. बांगड्यांचा मंजुळ आवाज झाला त्यावरून ती व्यक्ति स्त्री आहे एवढें त्यानें ओळखलें. व पुनः विचारलें, "पण तूं कोण ?"

यावर ती स्त्री कांहीं तरी उत्तर देणार, तोंच त्याच रस्त्यानें कोणी तरी मशाल पाजळून येत असल्याचें पाहातांच ती घाईघाईनें पुन्हा रंगमहालाकडे पळत जाऊं लागली. बाजिरावाच्या अंतःकरणाला हुरहुर लागून राहिली कीं हा काय प्रकार आहे?

## प्रकरण दुसरें
# संशयाला पाळें फुटलीं !

बाजिरावाला त्या कोणा स्त्रीनें आंगठी व पत्र आणून दिलें व ती रस्त्यानें येणाऱ्या माणसांबरोबरच्या मशालीच्या प्रकाशानें बुजाल्यासारखी होऊन दूर पळाली, तेव्हां बाजिरावाची त्या बाईविषयीं व तिनें आणून दिलेल्या आंगठी-पत्रा-विषयीं कमालीची जिज्ञासाबुद्धि जागृत झाली होती; त्यांतच नवी भर पडली कीं, हें मशाल पाजळून कोण येत असावें ? पैकीं ती बाई हां हां म्हणतां सर्वांचा डोळा चुकवून रंगमहालाकडे निघून गेल्यामुळें ती कोण असावी हें कळण्याला तात्कालिक असा कांहींच मार्ग उरला नाहीं; पण मशाल पाजळून समोरून येणारे दोघे मनुष्य जास्त जवळ आले तेव्हां बाजिरावाला त्यांचे चेहरे मात्र स्पष्ट दिसूं शकले. त्यापैकीं एक म्हातारा होता, तो साताऱ्याचा किल्लेदार शेखमिरा होता; व दुसरा अर्थातच त्याचा मशालजी रहमान होता.

शेखमिरा एकंदरींत पेशव्यांच्या व शाहूमहाराजांच्या मर्जींतील मनुष्य होता. शाहूमहाराजांची मर्जी त्याच्यावर सुप्रसन्न होण्याचें कारण शाहूमहाराज बादशहाच्या कैदेंतून सुटून आले व परशरामपंत प्रतिनिधि महाराजांबरोबर खेडकडूस* येथें झालेल्या लढाईतून पळ काढून साताऱ्याच्या किल्ल्यांत सुरक्षितपणें राहून किल्ला लढवूं लागले, तेव्हां ह्याच शेखमिरा किल्लेदारानें वश होऊन पर्शरामपंतांना पकडून महाराजांच्या स्वाधीन केलें, त्यामुळें शाहूमहाराजांनीं त्याच्यावर प्रसन्न होऊन किल्ल्याची किल्लेदारी तर पूर्ववत् त्याच्याकडे ठेवलीच; पण शिवाय त्याला भली मोठी वतन-वाडीही वांड्प्रांतीं दिली. शेखमिरा शाहूमहाराजांच्या कृपाछत्राखालीं वतनदार बनून साताऱ्यांतच स्वतःचें सैन्य व स्वतःची पागा उभारून राहिला होता.‡ यामुळें परशराम-पंताची त्याच्यावर अर्थातच इतराजी झाली होती, व श्रीपतरावानें वडिलार्जित धन-दौलतीबरोबर ही वडिलार्जित दावेदारीही जवळ केली होती. साताऱ्याच्या किल्ल्यांत

---

* 'पेशवाईची प्राणप्रतिष्ठा' ह्याच प्रसंगावर विरचिली गेली आहे.

‡ माचीवर शाहूकालीन इमारतीचे वगैरे कांहीं अवशेष आजलाही पहावयाला सांपडतात, त्यांत शेखमिऱ्याच्या पागेचाही अवशेष आढळतो.

सुरक्षित जागीं बसून स्वार्थाचे सारे बेत सिद्धीला नेण्याची संधी श्रीपतरावाला मिळाली असती तर ती त्यानें मुळींच वायां दवडली नसती. राणीवशांत दुहीचा वणवा पेटवून महाराजांचीं अनेक कारस्थानें ओळखण्याची तजवीज त्यानें अगोदरच करून ठेविली होती व किल्ल्यांतदेखील अबुबकर वगैरे बऱ्याच बाजारबुणग्या मंडळीला त्यानें वश करून घेतलें होतें. पण प्रत्यक्ष शेखमिऱ्यापाशीं मात्र त्याची डाळ शिजत नव्हती.

असो. शेखमिरा व बाजीराव यांची दृष्टादृष्ट होतांच दोघांनींही एकमेकांना ओळखलें. शेखमिऱ्यानें आपल्या पायरीला स्मरून बाजिरावाला कुर्निसात केला व विचारलें, "रावसाहेब! आपली स्वारी केव्हां आली?"

रहमान मशालजी कान टवकारून ऐकूं लागला.

बाजीराव म्हणाला, "हा येतों आहें एवढाच. प्रतिनिधि किल्ल्यावर भेटतील, निदान तूं तरी भेटशील व गेल्या पंधरा-तीन-चारांतील इकडची हालहवाल कळेल, म्हणून प्रथम किल्ल्यावर गेलों. पण तेथें पहातों तों कोणीच नाहीं."

"रावसाहेब! अल्ला आपला पुरा वाली आहे." शेखमिरा म्हणाला.

"तो कसा काय?"

"कसा काय हें काय विचारतां? आपण जर आणखी एखादा दिवस उशिरां आलां असतां, तर प्रतिनिधींनीं आपला पाडाव करण्यासाठीं रचिलेल्या कारस्थानांत आपण सफा गारद होण्याचा फार संभव होता."

"असें!"

"होय. आणि अजूनही आपण सर्व बाजूंनीं सुरक्षित अहांच असें म्हणवत नाहीं. कारण इतके दिवस प्रतिनिधि पेशव्यांचा पाडाव करण्यासाठीं हातांनीं गांठी मारीत होते ते आतां पायांनीं गांठी मारूं लागले आहेत. आम्हांला काय, आम्ही गादीचे सेवक. आज प्रत्यक्ष महाराज प्रतिनिधींच्या तोंडानें पाणी पीत असल्यामुळें आम्हांलाही प्रतिनिधींचा मुलाजा राखण्याशिवाय गत्यंतर नाहीं. पण थोडक्यांत बोलावयाचें तर—खरें; पण आपण दमून आला आहां ना!"

"होय. पण त्याचें काय मोठेंसें! तुला काय सांगावयाचें तें तूं सांग."

"मला विशेष कांहीं सांगावयाचें नाहीं; आपण आतां समक्ष आलांच आहां, आपण प्रतिनिधींना पुरून उराल यांत संशय नाहीं. मात्र माझी गरिबाची विनंति

इतकीच कीं, ह्या बंद्याची आठवण असूं द्या. नानासाहेबांनीं मला आजवर सांभाळून घेतलें,– अल्लानें त्यांना आपल्यांतून अकालीं ओढून नेलें याविषयीं नुसता खेद करण्यापेक्षां आमच्यासारख्या त्यांच्या दुबळ्या सेवकांच्या हातीं आणखी काय आहे! अल्ला त्यांना सद्गति देवो. त्यांची मीं इमानें इतबारें सेवा केली तशीच आपलीही करीन. अल्लाच्या कृपेनें आतां आपण पेशवे व्हा व आमच्यावर पूर्ववत् दयालोभ ठेवा. प्रतिनिधींनीं तर मी पेशव्यांचा पक्षपाती म्हणून माझ्यावर सूड घेण्याचें ठरविलेंच आहे."

"काय म्हणतोस?"

"तर! पेशव्यांना उलथून पाडण्याच्या कामीं मी त्यांना सामील झालों नाहीं म्हणून माझ्यावर त्यांचा केवढा घुस्सा झाला आहे!"

"म्हणजे? प्रतिनिधि आमच्या नाशाची खटपट करीत आहेत?"

"अल्ला जाणे! थोरांच्या गोष्टींत आम्हीं लहानांनीं कशाला पडावें?"

"पण प्रतिनिधींचें पांच-सहा दिवसांपूर्वी मला जें पत्र आलें, त्यावरून तर त्यांचा आमच्यावर पूर्ण लोभ दिसतो! मला पेशवाई मिळावी म्हणून त्यांनीं माझ्या वतीनें महाराजापाशीं शिष्टाई करून महाराजांचें मत मला अनुकूल बनविलें, असें त्यांच्या पत्रावरून तर दिसतें. म्हणून तर मी इतक्या तांतडीनें इकडे आलों!"

"असेल! पण प्रतिनिधींची वागणूक नेहमींच दुटप्पी असते हें आपणांला कांहीं नव्यानें सांगावयाला नको!" एवढें बोलून शेखमिरा एकाएकीं थबकून रंग-महालाच्या गच्चीकडे पाहूं लागला. लगेच त्यानें रंगमहालाच्या फाटकाकडे पाहिलें तों तेथें कोणी तरी माणूस हलकेच त्या दोघांचें संभाषण ऐकण्यासाठीं कीं काय, उभा असलेला त्याला दिसला. तो माणूस आपण तिथें उभा असल्याची शेख-मिऱ्याला चाहूल लागलेली पहातांच झपझप पावलें उचलून आंत गेला व दिसेना-सा झाला.

"कां रे? असा बावरल्यासारखा समोर काय पहातोस?" बाजिरावानें त्याला विचारलें.

"आपण अशा उघडयावर बोलत उभे राहिलों हें बरें केलें नाहीं." शेखमिरा पुन्हा एकवार रंगमहालाच्या गच्चीकडे पाहून म्हणाला, "त्या पहा, सगुणाबाई राणीसाहेब व सकवारबाई राणीसाहेब गच्चींतून आम्हांला हेरीत आहेत. त्या मला

काय म्हणतील न कळे ! हा मी चाललोंच. नाहींतर राणीसाबांहना माझा संशय यावयाचा, त्यांनीं मग महाराजांना भलतेंच कांहीं तरी सांगावयाचें व हकनाहक माझ्या गरिबाच्या पोटावर पाय यावयाचे !"

"अरे ! तुला इतकें भिण्याचें कांहीं कारण नाहीं. मीं आहें ना ?" बाजीराव म्हणाला.

"पण मी जातोंच. पाहिजे तर मी आपणांला उद्यां मोठया पहांटेला आपल्या वाड्यांत येऊन भेटेन." असें म्हणून शेखमिरा घाईघाईनें पुढें चालूं लागला. जातांना त्यानें आपल्या मशालजीला हळूच सांगितलें, "रहमान ! बाजिरावसाहेबांशीं मी अमुक बोललों असें कुणाला सांगावयाचें नाहीं हं !"

सगुणाबाई व सकवारबाई ह्या दोघी राण्या व श्रीपतराव हें त्रिकुट आपल्या नाशाला उद्युक्त झालें आहे, असें सांगण्याचा शेखमिऱ्याचा रोंख होता, हें बाजिरावानें तेव्हांच तर्कानें ताडलें. तेवढी त्याच्या मनाला हुरहुर लागून राहिली. शेखमिरा पुढें निघून जातांच त्यानेंही आपल्या घोड्याला इषारा दिला, "सारंग्या ! चल. आतां आपणाला थेट आपल्या वाड्यांत जावयाचें. तिथें गेल्यावर मग आपणाला ह्या भानगडींचा विचार करतां येईल."

रंगमहालाच्या वाड्यापासून अदालतीचा वाडा कांहीं फार दूर नव्हता. वाटेंत मध्यें खतिबांचें घर लागलें. हें घर वरून दिसावयाला अगदीं साधें होतें; पण त्याच्या चार भिंतींच्या आंत मराठशाहीच्या वैभवमंदिराला पायासकट उखडून पाडण्याच्या कामीं येतील असे कुलपी गोळे तयार करण्याचा कारखाना हरहमेष सुरू असल्याचा बाजिरावाला प्रथमपासूनच जबर संशय होता. हे कुलपी गोळे अर्थातच प्रत्यक्ष दारूसामानाचे नव्हते; बादशहा, निजाम व त्यांचे साथीदार वगैरे मराठशाहीच्या मरणघडीची वाट पहात बसलेल्या शत्रूंच्या गुप्त कारस्थानांचे होते. तसें वरवर पाहूं गेल्या खतीब हा अगदीं सामान्य माणूस होता. कृपानिधि शाहूमहाराजांचे इतके आश्रित होते त्यांतला तो एक. पण श्रीपतराव प्रतिनिधि वगैरे प्रधानमंडळांतील बडीबडी मंडळी वारंवार वेळीं अवेळीं तेथें जाऊन प्रहरांचे प्रहर बसत; 'आऊचा काऊ तो माझा मावसभाऊ' अशा बादरायण संबंधाचे खतिबाचे दूरदूरचे मुसलमान नातेवाईक व आप्तेष्ट अनेकवार तेथें येऊन उतरत; तसेंच कोल्हापुरकडील बरीच बडीबडी मंडळी व वेळींवखतीं चंद्रसेन जाधव, सर्जेराव घाटगे, कृष्णराव प्रतिनिधि वगैरे शाहूमहाराजांशीं विश्वासघात करून शत्रुपक्षाला सामील झालेले

लोकहीं ✣ कधीं कधीं त्या घरीं पायधूळ झाडून जात. ही सारी मंडळी तेथें जाई, याला जनाला दिसावयाला कारण असें होतें कीं, खतिबाची मस्तानी ह्या नांवाची एक चौदापंधरा वर्षांची अनुपम लावण्यवती अशी धर्मकन्या होती, तिची त्यांना भुरळ पडली होती. ही मस्तानी कोणाची कोण हें सर्वांनाच एक मोठें कोडें होतें. खतिबाला विचारतां तो सांगे कीं, 'दिल्लींत आपला एक कनोजी ब्राह्मण ज्योतिषी स्नेही होता. तो आपला आश्रितही होता. तो मरण पावला तेव्हां त्यानें ही मुलगी आपल्या स्वाधीन केली व तिच्या पालनपोषणाचा भार आपल्यावर टाकला. तेव्हां ही मुलगी सारी दोन वर्षांची होती'. पुढें एका वर्षानें शाहूमहाराजांची बादशहाच्या कैदेंतून सुटका होऊन ते दक्षिणेंत यावयाला निघाले तेव्हां खतीब शाहूमहाराजांबरोबर दक्षिणेंत आला. अर्थात् मस्तानीलाही त्यानें बरोबर आणलें.

खतिबाच्या कृपाछत्राखालीं सातार्‍यांतच मस्तानी लहानाची मोठी झाली. मस्तानीसाठीं मोठमोठ्या मुसलमान सरदारांच्या मागण्या येऊं लागल्या. महाराजांनींही तिचें थाटामाटानें एखाद्या अनुरूप वराशीं लग्न करून देण्याची इच्छा दर्शविली. पण खतिबानें ती गोष्ट मुद्दाम मनावर घेतली नाहीं. मस्तानीचें लग्न लांबणीवर टाकण्याचें कारण

---

✣ कृष्णराव प्रतिनिधि (परशरामपंतांचे ज्येष्ठ चिरंजीव), चंद्रसेन जाधव व सर्जेराव घाटगे हे तिघे शाहूमहाराजांना दगा देऊन शत्रूला जाऊन मिळाले, हा कथाभाग 'पेशवाईचें ध्रुवदर्शन' ह्या कादंबरींत आला आहे. विशाळगड किल्ला व तालुका परशरामपंतांनीं मागितला, तेव्हां परशरामपंत व कृष्णाजीपंत वगैरे मंडळी जी ताराबाईच्या पक्षाला होती ती आपल्या पक्षाला चिकटून राहील, अशा हेतूनें शाहूमहाराजांनीं तो किल्ला व तालुका (परशरामपंतांच्या सांगण्यावरून) कृष्णाजीपंतांच्या नांवानें करून दिला. परंतु कदूबापत्र हातीं पडतांच कृष्णाजीपंतांनीं प्रतिनिधिपदाचीं वस्त्रें कोल्हापूरकर संभाजीराजे यांपासून घेऊन 'पिराजीच्या नवसाकरितां' म्हणून विशाळगडावर पांचशें लोकांच्या जमावानिशीं येऊन, (तेथले शाहूमहाराजांचे अधिकारी) नीळकंठ बल्लाळ यांस दूर करून आपला अंमल बसविला. हें कृष्णाजीपंताचें कृत्य शाहूमहाराजांना अत्यंत राग येण्याला कारण झालें. कारण या योगानें कृष्णाजीपंत संभाजीला मिळाले ते मिळालेच; पण त्याबरोबरच विशाळगड तालुका व किल्ला हींही अनायासें त्याला मिळालीं. असें या बाबतींत शाहूचें दुहेरी नुकसान झालें. (पंतप्रतिनिधींची बखर.)

तो सांगे तें असें, 'मस्तानीच्या बापानें मरते वेळीं आपणाला तिच्या पत्रिकेवरून सांगितलें आहे कीं, कोणी उच्च कुळांतील ब्राह्मण मस्तानीशीं लग्न करावयाला तयार झाला तरच तिचें लग्न करावयाचें, नाहींपेक्षां करावयाचें नाहीं'. शिवाय खतीब आणखी असेंही सांगे कीं, 'मस्तानीच्या बापानें मरते वेळीं एक मोहोरबंद चंदनी पेटी आपल्या हवालीं केली आहे व मस्तानीच्या लग्नाच्या वेळीं जो कोणी बादशहा अथवा राजा राज्य करीत असेल, त्याच्यासमक्ष त्याच्या हातानें ती पेटी उघडली जावी' अशी त्यानें—मस्तानीच्या बापानें आपली अंतकाळची इच्छा प्रदर्शित केली होती. ती पेटी उघडण्याचा अधिकार आतां अर्थातच शाहूमहाराजांचा होता व पेटी मस्तानीच्या मालकीची होती. पण कोणा ब्राह्मणाशीं मस्तानीचें लग्न ठरेतों ती पेटी उघडावयाची नसल्यानें ती मस्तानीबरोबरच खतिबाच्या ताब्यांत होती; हा मस्तानीविषयींचा उपलब्ध वृत्तांत होता. तात्पर्य काय, मस्तानीच्या मोहानें हे सर्व लाळघोटे तिथें जमतात हा जनापवाद खरा असला तरी त्या लाळघोट्यांना आपल्या घरांत गोंधळ घालूं देण्याइतका खतीब कांहीं दुधखुळा नव्हता. बाजिरावाला हा सर्व प्रकार माहीत होता. पण त्यानें मात्र खतिबाच्या घरीं ही मंडळीं जमते याचीं कारणें मस्तानीपेक्षां अगदीं निराळीं अशीं राज्याच्या घडामोडीचीं असावीं असा केव्हांच तर्क केला होता. खतीब हा मराठशाहीचा शत्रु आहे असें जरी बाजीराव कधीं म्हणत नसे, तरी मराठशाहीच्या शत्रूंचीं खतिबाच्या घरांत निवाऱ्याच्या जागीं बसून खलबतें चालत असलीं पाहिजेत व त्यांना खतिबाची कळून किंवा न कळून संमति असली पाहिजे असा त्याचा ठाम ग्रह झाला होता. पण खतीब शाहूमहाराजांचा आवडता आश्रित पडल्यानें बाजिरावाला ह्या गोष्टीचा प्रतिकार तूर्त तरी करतां येण्याजोगा नव्हता.

आज बाजीराव खतिबाच्या घरावरून आपल्या वाड्याकडे निघाला तेव्हां त्याला त्या घरीं मारे नाच–रंग–तमाशा चाललेला दिसून आला. मधून मधून पोवाड्याचे सूर त्याला ऐकूं येऊं लागले. ही मजलस आज कोणत्या पाहुण्यांच्या बहुमानार्थ आहे याचा बाजिरावाला कांहीं तर्क करतां येईना. एकदां त्याच्या मनांत आलें कीं, आपण समक्ष जाऊन काय प्रकार आहे तो पाहावा. पण तो स्वतः व त्याचा सारंगा दोघेही सासवडाहून येथें येईपर्यंत वाटचालीच्या श्रमांनीं फार दमले असल्यानें त्यानें तिकडे जाण्याचा विचार रहित करून 'मागाहून चौकशी करतां येईल' अशी आपल्या जिज्ञासू मनाची समजूत घालून आपल्या वाड्याचा रस्ता धरला.

अंबाजीपंत पुरंदरे व खंडो बल्लाळ चिटणीस तेव्हां पेशव्यांच्या वाड्याच्या सदरेवरच कांहीं खलबतें करीत बसले होते; त्यांना बाजीराव आलेला पाहून समाधान वाटलें. बाळाजीपंत पेशवे परलोकवासी झाल्याला आज पंधरावा दिवस असल्यानें तें दुःख सर्वांच्याच अंतःकरणांत ताजें होतें. अर्थात् बाजीराव घोड्यावरून खालीं उतरतांच त्या दोघां वृद्धांनीं त्यांचें शांतवन केलें. बाजीराव आंगणांत उभा असलेला पहातांच त्याचा जिवलग दोस्त व विश्वासु सेवक मल्हारी होळकर पुढें झाला व त्यानें बाजिरावाला आदरपूर्वक मुजरा करून सारंग्याला पागेंत नेऊन बांधण्यासाठीं त्याची लगाम आपल्या हातीं घेतली.

बाजीराव हंसून म्हणाला, "मल्हारी ! तूं काय, राणोजी काय, आतां तुम्ही आमचे सामान्य हुजरे नाहीं. तुम्हीं आमचे शिलेदार; आहां. आतां तुम्ही क्रमाक्रमानें शिलेदारांचे सरदार तूं मल्हारीचा मल्हारराव व राणोजीचा राणोजीराव होणार. तुम्हांला आम्ही आतां पूर्वीप्रमाणें हुजऱ्या—मोतद्दाराचें काम सांगणें बरें नव्हे.*"

---

* बाजिरावाच्या कारकीर्दीत त्याच्या प्रोत्साहनानें पुढें आलेल्या अनेक पराक्रमी पुरुषांत मल्हारराव होळकर, राणोजी शिंदे, व उदाजी पवार हे तीन प्रमुख होत. हे तिघेही आरंभीं बाजिरावाबरोबर खेळगडी म्हणून एकत्र वाढले होते असा समज आहे. **मल्हारराव होळकर**—हा होळकर राजघराण्याचा मूळ पुरुष. ह्या राजघराण्याचे पूर्वज प्रथम पुण्याजवळ वाफ गांवीं रहात असून नंतर ते फलटण परगण्यांत पुण्यापासून बाळीस मैलांवर नीरा नदीच्या कांठीं होळ म्हणून खेडें आहे तेथें रहावयाला आले. त्यांचें पहिलें नांव वीरकर असून पुढें होळ या गांवावरून होळकर असें नांव पडलें. होळ येथें खंडूजी नांवाचा धनगर जातीचा एक वजनदार चौगुला म्हणजे ग्रामाधिकारी रहात होता. त्याला एक मुलगा चैत्र शु. ९ संवत् १७५०, ता. १५ ( किंवा १६ ) मार्च इ. सन १६९३ रोजीं झाला. त्याचें नांव मल्हारी. तो तीन वर्षांचा असतांच खंडुजी वारला, तेव्हां भाईबंदांनीं त्रास दिल्यामुळें खंडूजीची बायको जिजाई ही मुलाला घेऊन खानदेशांत तळोदें गांवीं आपला भाऊ भोजराज बारगळ चौगुला याजकडे गेली. हा भोजराज कंठाजी कदम बांडे याच्या पागेंत तेव्हां पंचवीस स्वारांचा मुख्य होता. मल्हारी हा भोजराजाच्या घरीं वाढला व वयांत येतांच भोजराजाच्या पथकांत नोकर राहिला. भोजराजानें त्याची हुषारी पाहून पुढें त्याला आपली मुलगी गौतमाबाई ही देऊन त्याचें लग्न केलें. एकदां कदम बांडे व बाजीराव यांच्या फौजांत कांहीं कलागत लागली असतां ती

मल्हारी पुन्हा एकवार मुजरा करून सारंग्याला पागेकडे चालवीत नेतांना नम्रतापूर्वक म्हणाला, “ म्हणून काय झालें सरकार ! पायींची वहाण नेहमीं पायींच शोभायची. मी काय किंवा राणोजी काय, सरकारांच्या चरणांची सेवा करूनच हुजऱ्या-मोतद्दाराचे शिलेदार झालों ना ? हेंच काय; पण सरकारांच्या कृपेनें आम्ही सरकार आतां म्हणाले त्याप्रमाणें शिलेदारांचे सरदार व मल्हारराव आणि राणोजीराव झालों तरी आम्हांला आमच्या पूर्वस्थितीचा विसर पडावयाचा नाहीं. हुजऱ्या म्हणून सरकारांची सेवा करणें ही माझी मिरास आहे.—”

इतक्यांत राणोजी कोठें बाहेर गेला होता तो तेथें येऊन बाजिरावाला मुजरा करून त्याचे जोडे उचलीत म्हणाला, “ आणि सरकार ! आपले जोडे सांभाळणें ही माझी मिरास आहे. ”

त्या दोन्ही सेवकांचे हे निःसीम स्वामिभक्तीचे बोल ऐकून बाजिरावाला तेव्हां किती धन्यता वाटली असेल ! तो प्रसन्न चित्तानें म्हणाला, “ आहे ! एकूण तुम्ही तुमचें मूळ विसरलां नाहीं, यांतच तुमच्या भावी यशाचें बीज आहे. वाढत्या वैभवाच्या वेळींही माणसानें आपलें पूर्वचरित्र विसरतां कामा नये. कृतज्ञताबुद्धि हा आपल्या सामर्थ्य-समृद्धि-शांति लाभाचा पाया असतो. हा पाया आपल्या अंतःकरणांतलि जाणिवेच्या भूमींत खोदून बांधून निघालेला असतो. जग आपल्या वैभव-मंदिराकडे पाहून आपला उदो उदो करूं लागलें तरी त्या लोकप्रियतेनें आपण शेफारून न जातां त्याचा पाया शाबूत राखण्यासाठीं झटलें पाहिजे; त्या पायाला कृतघ्नतेची घूस लागूं देतां कामा नये. तरच आपलें वैभव चिरकाल टिकतें व शुक्र-

---

मल्हाररावानें सिटविली म्हणून बाजिरावानें त्याला बांड्यांपासून इ. सन १७२० च्या सुमाराला मागून घेतलें. एथून त्याच्या भाग्योदयाला प्रारंभ झाला. **राणोजी शिंदे**–साताऱ्यापासून सहा कोसांवर कण्हेरखेड म्हणून गांव आहे, तेथें शिंद्यांचें एक घराणें पाटिलकी करून होतें. त्याच घराण्यांत राणोजी शिंद्याचा जन्म झाला. घरची गरिबी असल्यामुळें त्यानें प्रथम बाळाजी विश्वनाथाच्या पागेंत बारगिराची नोकरी पत्करली. लौकरच पेशव्यांची त्याच्यावर मर्जी बसली ( मराठी रियासत, मध्यविभाग. १ ). मॅलासन आपल्या इतिहासांत राणोजीविषयीं म्हणतो कीं, ‘राणोजी प्रथम बाजिरावापाशीं त्याचे जोडे सांभाळणारा हुजऱ्या होता. त्याची अपूर्व स्वामिभक्ति पाहून बाजिरावानें त्याला योग्यतेला चढविलें.’ बखरी वगैरे जुने कागदपत्र पहातां देखील हें मॅलीसनचें मत सयुक्तिक दिसतें.

पक्षांतील चंद्राप्रमाणें तें सदा वाढत असतें." बाजीराव लगेच चिटणिसांकडे वळून म्हणाला, "बाबा! याला म्हणतात नेकी! मल्हारी काय किंवा राणोजी काय, आमच्या पदरीं उदयाला आले ते स्वतःच्या गुणांच्या व मर्दुमकीच्या जोरावर उदयाला आले. पण ते मूळ विसरण्याला तयार नाहींत. अशा स्नेह्यासोबत्यांवरून आपण आपल्या पंचप्राणांची कुरवंडी करावी असें कोणत्या धन्याला वाटणार नाहीं! नाहीं तर आमचे प्रतिनिधि पहा! बाबा! शाहूमहाराज पर्शरामपंतांच्या छातीवर तक्ता ठेवून त्यांना ठार मारीत होते,* तेव्हां तुम्हीं महाराजांची मनधरणी करून त्यांना जीवदान दिलें; पण त्यांनीं अखेरपावेतों तुमच्याशीं देखील दुटप्पी आचरण ठेविलें. आणि श्रीपतराव काय किंवा कृष्णराव काय, बाप तसे बेटे! प्रतिनिधींच्या पराक्रमाचा रस्ता नानासाहेबांनीं मोकळा करून दिला, असें असतां नानासाहेबांच्या हयातींत तर श्रीपतरावांनीं त्यांना हर बाबतींत विरोध केलाच; पण त्यांच्या पश्चात् देखील मराठशाहीच्या राज्यकारभारांतून पेशवेवंशाचें समूळ उच्चाटण करण्याचे श्रीपतरावांचे उपद्व्याप सुरू आहेत!"

"एकूण रावसाहेबांच्या कानापर्यंत ही ओरड गेली आहे म्हणावयाची!" चिटणीस म्हणाले.

"तर! माझ्या ग्रहांचा काय गुण आहे न कळे; माझ्याविरुद्ध कोणी कांहीं कारस्थानें केलीं तरी त्यांचा सुगावा मला हटकून लागतो." बाजीराव म्हणाला.

---

* शाहूमहाराजांनीं पर्शरामपंतांना कैदेंतून सोडवून प्रतिनिधिपद व विशाळगड किल्ला, तालुका वगैरे सरंजाम दिला; तो परशरामपंतांनीं कृष्णाजीपंताच्या नांवानें घेतला, व तो कृष्णाजीपंत तसाच विशाळगडीं जाऊन ताराबाईशीं फितूर होऊन तिचा प्रतिनिधि बनला; तेव्हांचा हा प्रसंग आहे. "पुत्रांनीं केलें हें त्याचे संमतीवांचून कसें होईल? म्हणून समक्ष प्रतिनिधीस आणिलें व जेठी पैलवान बोलावून आणून आज्ञा केली जे 'तक्ता उरावर ठेवून डोळे काढावे.' खंडो बल्लाळ चिटणीस घरीं स्नान करीत होते, त्यांस हें वर्तमान समजतांच तसेंच धावून येऊन जेठीनें उरावर गुडघ्याचा पाय दिला तो पाहून आधीं जेठीस धरून माघारें पाडलें....तसेंच पुढें जाऊन महाराजांस साष्टांग नमस्कार घालून विनंति केली जे—'ब्राह्मणास इतका उग्र दंड होऊं नये. बेडी घालावी कैदेंत ठेवावें.' यावरून बेडी आणवून लोहार आणवून घालण्यास आज्ञा झाली." (चिटणीस विरचित 'थोरले शाहूमहाराज यांचें चरित्र.')

"म्हणूनच म्हणतों कीं, परमेश्वर आपला पाठीराखा आहे. आम्हींदेखील आज इतक्या रात्रीपर्यंत एथें विचार करीत बसलों आहों–"

चिटणिसांच्या तोंडचें वाक्य पूर्ण होण्यापूर्वींच बाजीराव म्हणाला, "हो ! तेंच मला इथें येतांच क्षणीं वाटलें, कीं इतक्या रात्रीं तुम्ही, हे अंबाजीपंत, ही मंडळी इथें कशी ?"

"आणि राणोजी ! तूं काय खबर आणलीस ?" अंबाजीपंतांनीं राणोजीला विचारलें.

राणोजी उत्तरला, "सरकारांनीं व आपण उभयतां जो कयास बांधला आहे, त्याचाच वेलविस्तार सध्यां होत आहे."

"तो कसा काय ?" अंबाजीपंतांनीं प्रश्न केला.

"तें मी सांगतों. पण सरकारांना जरा हातपाय धुऊन सदरेवर बसून विश्रांति तरी घेऊं द्या !" राणोजी म्हणाला.

"हो ! रावसाहेब ! आपण अगोदर विश्रांति घ्या. मग आपण सर्वजण मिळून सवडीनें काय बोलावयाचें तें बोलूं. सारी रात्र आपलीच आहे." अंबाजीपंत म्हणाले.

बाजीराव म्हणाला, "आतां विश्रांतिच घ्यावयाची आहे. जरा गोविंदाला हांक मारा पाहूं !"

गोविंदाचें नांव काढतांच गोविंदा बुंदेले* समोर हात जोडून तयार ! त्यानें विचारलें, "काय आज्ञा आहे रावसाहेब !"

---

*रत्नागिरिजवळ नेवरें गांव आहे, हें गोविंदपंताचें मूळ गांव होय. गोविंदपंत १३।१४ वर्षांचा असतां त्याचा बाप बाळाजीपंत वारला, आणि नेवऱ्याच्या कुळकर्णाची व्यवस्था त्याच्याकडे आली. तो व्रूड व खेळाडू असल्यानें त्याच्या हातून ती व्यवस्था न होतां भाईबंदांनीं त्याला सर्वस्वीं नागविलें. तेव्हां गोविंदपंत कोंकण सोडून देशावर आला. नोकरीसाठीं हिंडतांना त्यानें बाजिरावापाशीं शागीर्दाची नोकरी पत्करली. पुढें त्याचे गुण बाजिरावाच्या नजरेला येऊन त्यानें त्याला पराक्रम गाजविण्याची संधि दिली, व गोविंदपंतानें त्या संधीचा फायदा घेऊन तो उत्तरेंतील महाराष्ट्रीय सरदारांत प्रमुखपणें चमकूं लागला. हा वीर पानिपतच्या लढाईंत धारातीर्थीं पतन पावला. ( मराठी रियासत, मध्य विभाग–३ ). गोविंदपंतानें बुंदेलखंडांत स्वपराक्रमावर जहागीर संपादन केली, तेव्हांपासून ह्या घराण्याचें उपनांव बुंदेले असें पडलें असावें. हा कऱ्हाडा ब्राह्मण होता.

" देवघरांत एका चौरंगावर ह्या नानासाहेबाच्या अस्थि नेऊन ठेव, व उद्यां त्या माहुलीला कृष्णेंत पोंचवावयाच्या आहेत; एवढी कामगिरी तुझ्याकडे लागली." असें म्हणून बाजिरावानें आपल्या हातांतील चांदीचा डबा गोविंदाच्या हवालीं केला.

ह्या नानासाहेबांच्या अस्थि असें कळतांच गोविंदानें त्या प्रणामपूर्वक देवघरांत एका चौरंगावर नेऊन स्थापन केल्या. लगेच पुरंदरे, चिटणीस, मल्हारी सारंग्याची व्यवस्था लावून आला होता तो, व राणोजी यांनीं देवघरांत जाऊन श्रद्धापूर्वक त्या अस्थींना नमस्कार केला. त्या वेळीं सर्वांच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहूं लागल्या. वास्तविक ह्या सर्व मंडळीनें बाजिरावाचें शांतवन करावयाचें; पण आतां बाजिरावालाच त्यांचें शांतवन करणें प्राप्त झालें.

नंतर बाजिरावानें थंडगार पाण्याचें स्नान केलें व थोडेंसें भोजन घेतलें. गोविंदा शागिर्दानें धन्यासाठीं आचाऱ्याकडून सुग्रास स्वयंपाक तयार करविण्यांत चतुराईची कमाल केली होती, व धन्यानेंही जेवतांना त्याला शाबासकी दिली. ती ऐकून त्याला धन्यता वाटली. गोविंदाला बाजिरावाच्या आवडीनिवडी माहीत असल्यानें त्याला सर्वस्वीं आवडेल असाच भोजनाचा बेत त्यानें ठेविला होता. त्याची बाजिरावानें मनसोकळेपणानें तारिफ केलेली ऐकून पुरंदऱ्यांनीं गोविंदाला बाजिरावाची अर्धी बायको ठरवून त्याची थट्टा करण्यालाही कमी केलें नाहीं. जेवतांना देखील राजकारणाबाबतच्याच गोष्टी चालल्या होत्या. चिटणीस, मल्हारी व राणोजी यांच्याही हकिकती तेव्हांच ऐकून घेतां याव्या म्हणून बाजिरावानें गोविंदाला सांगून आपलें ताट मुद्दाम बाहेरच्या दालनांत मांडविलें होतें. प्रथम बराच वेळ बाळाजीपंतांच्या आजाराविषयींच्या वगैरे घरगुती गोष्टी झाल्यावर बाजीराव मुद्द्यावर आला. त्यानें प्रतिनिधींचें आपणाला गौरवपूर्वक पत्र आल्याचें सांगितलें, तें ऐकून सर्वांना पराकाष्ठेचा अचंबा वाटला.

पुरंदरे म्हणाले, " इथेंच कांहीं तरी दगा असला पाहिजे."

चिटणीस म्हणाले, " हो ! मलाही तसेंच वाटतें."

बाजिरावानें भोजन पूर्ण झाल्यावर आपोष्णी घेतां घेतां विचारलें, " यांत दगा काय असणार ? श्रीपतरावांची वागणूक 'वचस्येकं मनस्येकं' अशा स्वरूपाची आहे, एवढें मात्र यावरून स्पष्ट दिसतें. पण त्यांतही मला कांहीं आश्चर्य वाटत नाहीं. श्रीपतरावांना मी कांहीं आज नव्यानें ओळखीत नाहीं. शाहूमहाराजांनीं तुम्हां सर्वांच्या आग्रहानें मलाच पेशवाईचीं वस्त्रें देण्याचा निश्चय केला, व याविरुद्ध

आपण महाराजांचे कान फुंकले तरी जें व्हावयाचें तें होऊन वर आपली अप्रतिष्ठा मात्र होणार, हें ओळखूनच श्रीपतरावांनीं वाहात्या गंगेंत हात धुऊन घेतले."

"छे ! तें तसें नाहीं." पुरंदरे पुन्हा म्हणाले.

"तर कसें ?" बाजिरावानें विचारलें.

श्रीपतरावांचें पत्र तुमच्यापाशीं आहे का ?" पुरंदऱ्यांनीं विचारलें.

"हो ! आहे." बाजीराव आंचवावयाला उठतां उठतां म्हणाला, "तें पत्र तुम्हांला पहावयाचें आहे का ?"

"होय. त्याशिवाय आमची संशयनिवृत्ति व्हावयाची नाहीं." पुरंदरे म्हणाले.

"थांबा दाखवितों." असें म्हणून बाजिरावानें आंचवून येतांच गोविंदानें पुढें केलेला विडा सेवन करून मग आंगरख्याच्या खिशांतून पत्र काढून तें पुरंदऱ्यांच्या हातीं दिलें. पुरंदरे व चिटणीस पत्र समईजवळ घेऊन वाचण्यांत गढून गेले. तेवढ्यांत बाजीराव मल्हारी व राणोजी यांचा समाचार घेऊं लागला. हाताखालचा कितीही हलक्या दर्जाचा नोकर असला तरी त्याच्याशींही अत्यंत प्रेमळपणाचें वर्तन ठेवून त्याला आपलासा करून घेण्यांत बाजिरावाचा अगदीं हातखंडा होता.

"काय मल्हारी ! तुला खानदेशांतल्यापेक्षां इकडे जास्त सुख वाटतें कीं नाहीं ?" बाजिरावानें मल्हारीला विचारलें.

मल्हारी उत्तरला, "होय सरकार ! इकडे सुख न लागावयाला काय झालें ? ही माझी मायभूमिच आहे. आपल्या मायभूमींत आपलें मन रमलें नाहीं असें कधीं-तरी झालें आहे ?"

"पण सरकार ! मल्हारीला अजून बांध्यांकडून वरच्या वर बोलावणीं येतच आहेत." राणोजी मध्येंच म्हणाला.

"होय का रे मल्हारी ?" बाजिरावानें विचारलें.

"छे ! सरकार ! हा राणोजी उगाच पराचा पारवा करून कांहीं तरी भकतो." मल्हारी एकीकडे राणोजीला गप्प रहाण्याविषयीं नेत्रसंकेत करीत म्हणाला.

"पण मुळांत पर आहे म्हणूनच राणोजीला त्याचा पारवा करतां आला ना !" बाजिरावानें हंसून विचारलें.

राणोजी मध्येंच म्हणाला, "सरकार ! मुळांतच केवळ पर नसून पारवा आहे. मल्हारीचा मामा ह्या कामगिरीवर आलेला नाहीं असें त्याला म्हणूं दे पाहूं !"

"काय ! भोजराज इथें आला आहे ?" बाजिरावानें विचारलें.

" होय. पण मामा कांहीं एवढ्यासाठीं आले नाहींत. ते आईला पोंचविण्यासाठीं म्हणून आले. " मल्हारी म्हणाला.

भोजराज जो आला होता, तो वस्तुतः आपल्या लेंकीला अर्थात् मल्हारीच्या बायकोला—गौतमाबाईला पोंचविण्यासाठीं म्हणून आला होता. आतां, जिवाई म्हणजे भोजराजाची बहीण व मल्हारीची आई त्याच्या बरोबरच इकडे आली हें खरें. पण ती जिकडे आपलीं लेंक-सून हीं लेंकरें रहावयाचीं, तिकडे त्यांच्या सहवासांत आपणही राहून रोजगारी लेंकाच्या संसारसुखांत स्वतः मरतां मरतां अंशभागी व्हावें म्हणून आली होती. तसेंच भोजराजापाशीं बांडयांनीं मल्हारीला आग्रहानें बोलाविलें होतें हेंही खरें. पण मल्हारीच्या मनांतून ही आपली मायभूमि सोडून खरोखरच जावयाचें नव्हतें. कांहीं काळापूर्वी बांडे व पेशवे यांच्यांत कसल्याशा क्षुल्लक बाबीमुळें लढा उत्पन्न झाला होता; त्याबाबत तडजोड करण्यासाठीं म्हणून तो जो पेशव्यांपाशीं आला, तो आपल्या पदरीं रहाण्याचा पेशव्यांचा आग्रह पडल्यावरून इकडेच त्यांच्या पदरीं राहिला होता. बाळाजीपंतांनीं अत्यंत समंजसपणानें बांड्यांच्या बाबतींत मल्हारीच्या शब्दाला मान देऊन बांड्यांशीं तर जुळतें घेतलेंच; पण मल्हारीलाही त्याचें शौर्य-धैर्य-चातुर्य पाहून शिलेदार करून आपल्या पदरीं ठेवून घेतलें. त्याची त्याच्या जन्मगांवीं—होळखेड्यांतील वतनदारी त्याच्या भाऊबंदांनीं बऱ्याच वर्षांच्या चालू वहिवाटीच्या सबबीवर बळकावली होती, तीही पेशव्यांच्या कृपेनें त्याला आतां परत मिळाली होती. अशी सर्व सोय इकडे झाल्यावर मल्हारी पुन्हा खानदेशांत आपल्या मामाकडे किंवा बांड्यांकडे तरी कशाला जातो म्हणेल !

" एकूण जिवाईदेखील इकडे आली आहे तर ! " बाजीराव म्हणाला.

" होय." मल्हारी उत्तरला, " माझी सर्वच मंडळी आली आहे म्हणाना ! "

" तर मग आतां आपण तिला राहून घेणार. तसेंच भोजराजालाही मला एकवार भेटायला सांग. तो आमचे विश्वासू लोक फितूर करण्यासाठीं आला काय ? " बाजिरावानें उद्गार काढले.

" नाहीं सरकार ! " मल्हारी दचकल्यासारखा होऊन म्हणाला, " मामा तसे मनुष्य नाहींत. बांड्यांनीं मला तिकडे बोलावलें किंवा मामांनीं तो निरोप आणला, तरी त्यांत माझ्याविषयींच्या शुद्ध प्रेमाखेरीज दुसरें तिसरें कांहींदेखील नाहीं."

मल्हारीला बाजिरावाचे बोल रागाचे वाटले म्हणून त्यानें असा खुलासा केला;

पण बाजिरावाच्या बोलण्याचा आशय तसा नव्हता. त्यानें मल्हारीची संशयनिवृत्ति केली, "अरे ! मी उगाच थट्टेनें म्हणालों. बांडे काय किंवा तुझा मामा काय, दोघेही सज्जन माणूस आहेत हें मला माहीत आहे. बाकी, ह्या म्हाताऱ्याला एकवार मला भेटून जावयाला सांग. त्याला पगडी बांधून त्याच्या देशीं पाठवून देऊं." लगेच बाजिरावानें राणोजीकडे वळून त्याचा कुशल समाचार घेतला, "बरें; राणोजी ! तुझें कसें काय, ठीक चाललें आहे ?"

"होय सरकार !" राणोजी उत्तरला.

"तुम्ही अंबिकाबाई राणीसाहेबांच्या माहेरचीं माणसें, तेव्हां तुमची जरा जास्त विचारपूस करायला हवी !" बाजीराव म्हणाला.

"हो ! राणीसाहेबांच्या माहेरचा माणूस म्हणूनच राणीसाहेबांच्या लोभाच्या भाराखालीं त्याचा चक्काचूर होण्याची पाळी आली होती." मल्हारी हंसून म्हणाला.

"खरेंच ?" बाजिरावानें विचारलें.

"होय." मल्हारी उत्तरला.

"तें कसें काय ?" बाजिरावानें विचारलें.

"अंबिकाबाई राणीसाहेब अलीकडे सगुणाबाई राणीसाहेब व सकवारबाई राणीसाहेब यांच्या तंत्रानें वागूं लागल्या आहेत. त्या नात्याच्या जोरावर प्रतिनिधि अंबिकाबाई राणीसाहेबांना इरेला घालून राणोजीला आपल्या पक्षांत ओढून घेऊं पहात होते." मल्हारी म्हणाला.

"पण मीं त्यांना दाद दिली नाहींना ?" राणोजी म्हणाला, "आणि सरकार ! आपणालाही माझी पुन्हा अशी हात जोडून विनंती आहे कीं, असला खोटा मोठेपणा आपण मला देऊं नका. मीं आपणाला कितीकदां सांगितलें आहे कीं, अंबिकाबाई राणीसाहेब आम्हां कण्हेरखेडकर शिंद्यांच्या वंशांतील नाहींत.† उगाच ढुंगणावर माती थापली म्हणून ती मांसाशीं मिसळून एकजीव थोडीच व्हावयाची आहे !"

† पेशवाईच्या अखेरीला इंग्रज सरकारच्या हुकुमावरून पेशवाईंत इनामत-जहागीर वगैरे मिळालेल्या अनेक वतनदार घराण्यांनीं आपल्या वंशपरंपरागत वतनदारीविषयीं कैफियती सादर केल्या, त्यांत कण्हेरखेडकर शिंद्यांची जी कैफियत आहे तिच्यांत 'शाहूमहाराजांची अंबिकाबाई नांवाची राणी शिंद्यांच्या घराण्यांतील होती ती आपल्या—कण्हेरखेडकर शिंद्यांच्या घराण्यांतील नाहीं, दुसऱ्या कोणा शिंद्यांच्या घराण्यांतील असेल', असें स्पष्ट म्हटलें आहे. ( मावजी व पारसनीसकृत 'कैफियती

" वाः ! राणोजी ! महाराजांच्या मेहुणेपणाचा मान अनायासें मिळतो, तो तुला नकोसा होतो ! " मल्हारी म्हणाला.

राणोजी म्हणाला, " पण असला खोटा मान काय करावयाचा ? सुजेनें अंगावर वाढलेल्या मांसानें सौंदर्यांत किंवा सामर्थ्यांत जरा देखील भर न पडतां शरीर उलट बेढब व किळसवाणें मात्र दिसूं लागतें. असेल माझ्या अंगीं सामर्थ्य, तर मी माझ्या पराक्रमांच्या जोरावर मानमान्यतेला चढेन. भिकेची हांडी शिंक्याला थोडीच चढावयाची आहे ! "

बाजिरावानें यावर आणखी कांहीं विनोदी कोटिक्रम केला असता; पण इतक्यांत पुरंदरे व चिटणीस यांचें पत्र वाचून संपलें व पुरंदरे बाजिरावाकडे वळून म्हणाले, " रावसाहेब ! पत्र वाचलें."

" आतां तुम्हांला त्याविषयीं काय बोलावयाचें तें बोला." बाजीराव म्हणाला, पेशवाईचीं वस्त्रें मला मिळावयाचें टळत नाहीं अशी खात्री होतांच महाराजांच्या हाताला हात लावून त्यावर दानाचें उदक सोडण्याची प्रतिनिधींची ही शक्कल और आहे कीं नाहीं ? "

" तें तर स्पष्टच दिसतें आहे; पण त्यांत आपण म्हणतां त्याहूनही खोल अर्थ भरलेला आहे." पुरंदरे चिटणिसांकडे वळून म्हणाले, " खरें ना बाबा ! मी म्हणतों हें ! "

" हो ! " चिटणीस म्हणाले.

" तें आणखी काय ? " बाजिरावानें पृच्छा केली.

" ह्या पत्राच्या मुळाशीं कांहीं तरी बनावटगिरी आहे." चिटणीस हातांतील पत्राची घडी उघडून पुन्हा एकवार त्यावरून नजर फिरवीत म्हणाले, " ह्या पत्रावर सही खुद्द प्रतिनिधींची आहे. पण महाराजांनीं आम्हां दोघांच्या समक्ष आपणांकडे पाठविण्याच्या पत्रावर स्वदस्तुरची सही केली, तें पत्र मग कुठें आहे ? "

" महाराजांनीं स्वदस्तुराचें पत्र मला पाठविलें होतें ? " बाजिरावानें आश्चर्यपूर्वक विचारलें.

---

व याद्या.' ) बहुतेक इतिहासकार अंबिकाबाई ही कण्हेरखेडकर शिंद्यांच्या वंशांतील होती असें म्हणतात. पण त्या सर्वांहून या कैफियतीचें महत्त्व जास्त वाटतें. कारण, राजघराण्याशीं संबंध असतां ती बहुमानाची गोष्ट मुद्दाम कोण कशाला नाकबूल करील!

" होय." पुरंदरे म्हणाले, " आमच्या देखत त्या पत्रावर महाराजांचा शिक्का-मोर्तब झालेला आम्हीं पाहिला."

" उदाजी पवार* सासवड येथें पत्र घेऊन आला तेव्हां पत्र देतांना 'महाराजांच्या खास आज्ञेवरून आपण हें पत्र पाठवीत आहों, हें महाराजांचें स्वदस्तुरचें पत्र आहे असें समजून आपण ताबडतोब निघून यावें' असा श्रीपतरावांचा तोंडी निरोप मात्र त्यानें मला सांगितला."

" इथेंच कांहीं तरी पाणी मुरतें आहे." पुरंदरे आवेशानें बैठकीवर मूठ आपटून म्हणाले, " इथें कांहीं तरी दगाफटका आहे खास."

राणोजी मध्येंच म्हणाला, " मलाही तसाच संशय येतो."

पुरंदऱ्यांनीं राणोजीकडे वळून विचारलें, " खरें, राणोजी ! तूं खतिबांच्या घरीं गेला होतास, तो तुला तेथें कांहीं नवीन सुगावा लागला का ? "

बाजीराव कांहीं आठवल्यासारखें करून म्हणाला, " खरेंच; आज खतिबांच्या घरीं एवढी मजलस चालली आहे ती कोणासाठीं ? "

" ती मजलस खतिबांचे पाहुणे व प्रतिनिधींचे पाहुणे यांच्यासाठीं चालली आहे. " राणोजी म्हणाला.

" हे पाहुणे कोण ? " बाजिरावानें विचारलें.

" औरंगाबादचे हकीम महंमदअली व रामदासपंत‡ हे कीं काय ? " चिटणिसांनीं मध्येंच विचारलें.

---

* पवारांचें घराणें महाराष्ट्रांत फार पुरातन, अतिविस्तृत व विख्यात आहे. हे मूळचे सुपें पेट्यांतील कितीएक गांवचे पाटील शहाजीच्या जहागिरींत नांदत असतां शिवाजीजवळ काम करून उदयाला आले. उदाजीचा बाप संभाजी यानें जिंजीच्या वेढ्यांत पराक्रम केल्यावरून त्याला रामचंद्रपंत अमात्यानें योग्यतेला चढविलें. पुढें उदाजी व त्याचे बंधु शाहूमहाराजांच्या कारकीर्दीत ( बाजिरावाच्या पेशवाईत ) विशेष मान्यतेला चढले.

‡ पेशव्यांशीं निजामाच्या वतीनें वाटाघाटी करणाऱ्या माणसांत रामदासपंत व हकीम महंमदअली यांचा प्रामुख्यानें समावेश होतो. रामदासपंत हा शिकाकोल ब्राह्मण होता. तो निजामाच्या नोकरींत होता. बाळाजी बाजीराव ऊर्फ नानासाहेब पेशवे होण्यापूर्वींच्या रामदासपंताच्या हालचालींचा नक्की इतिहास उपलब्ध नाहीं. पण त्याच्या उत्तरचरित्रांत त्यानें तिकडे नोकरी निजामाची करावयाची, पेशव्यांशीं

"होय." राणोजी उत्तरला.

"काय, रामदासपंत इकडे आला आहे?" बाजिरावानें कपाळाला आंठ्या घालून संशयास्पद प्रश्न केला, "आणि तोच बहुधा प्रतिनिधींचा पाहुणा असेल!"

"होय. आणि महंमदअल्लीही वस्तुतः त्यांचाच पाहुणा आहे. तो लोकांना सांगतो आपण खतिबाचा पाहुणा म्हणून, व खतीबही तसेंच सांगतो; पण आमचा कांहीं त्यावर विश्वास बसत नाहीं. त्या दोघांच्या इकडे येण्यांत कांहीं तरी गूढ हेतु असावा." पुरंदरे म्हणाले.

"असावा कां? आहेच. बाळाजीपंतनानांनीं बादशहाकडून बादशाही मुलखांत चौथाई व सरदेशमुखीचे जे हक्क मराठ्यांच्या नांवानें संपादन करून आणले, ते हक्क हैद्राबाद प्रांतापुरते कांहीं रोकडपैसा व कांहीं जहागिरीदाखल मुलूख घेऊन महाराजांनीं सोडावे, अशी निजामाच्या वतीनें महाराजांपाशीं शिष्टाई करण्यासाठीं हे दोघे तरणेबांड शिष्ट इकडे आले आहेत. परवां मी सासवडाहून आल्यावर महाराजांच्या भेटीला गेलों, तेव्हां महाराज, प्रतिनिधि, रामदासपंत व हकीम महंमदअल्ली यांचीं याविषयीं खलबतें चाललेलीं मीं ओझरतीं ऐकलीं, त्यावरून मला तरी माहीत." पुरंदरे चिटणिसांकडे वळून म्हणाले, "तेव्हांच बाबा! मी तुमच्यापाशीं हें बोललों नाहीं?"

"हो!" चिटणीस म्हणाले, मीही सासवडाहून आल्यावर प्रतिनिधींची व माझी भेट झाली, तेव्हां प्रतिनिधींनीं माझ्यापाशींही मोघमपणानें ही गोष्ट काढली होती खरी."

राणोजी इतका वेळ गप्प बसून हें संभाषण ऐकत होता, तो पुढें होऊन म्हणाला, "तर मग आनंदराव सुमंतांना घेऊन रामदासपंत व हकीमजी जे उद्यां हैदराबादेकडे

---

दोस्ती ठेवावयाची, व स्वार्थासाठीं फ्रेंचांसारख्या परक्यांना सामील होऊन धन्याचें अनिष्ट करावयाचें, अशा ज्या अनेक भानगडी केल्या, त्या इतिहासांत नमूद आहेत. तो पेशव्यांचा दोस्त म्हणवी, पण तेव्हांच ताराबाईसारख्या पेशव्यांच्या प्रतिस्पर्ध्यांशीं संगनमत ठेवी! शाहूमहाराजांच्या पश्चात् रामराजा गादीवर आल्यावर ताराबाईनें रामदासपंताच्या पुतण्याला पेशवा करण्याचा घाट घातला होता! ह्या रामदासपंताच्या उत्तरचरित्रावरून त्याच्या पूर्वचरित्राची कल्पना करतां येण्याजोगी आहे. ह्या धूर्त स्वार्थसाधूचा वृत्तांत पेशवाईवरील पुढील कादंबऱ्यांतून येईलच. हा निजामाचा दिवाण असतां त्याचा ता. ७।४।१७५२ रोजीं भालकी येथें खून झाला.

जावयाला निघणार असल्याच्या गोष्टी मघाशीं त्यांच्यांत आपापसांत चालल्या होत्या, त्या त्याविषयींच असतील."

"त्यांच्या त्याविषयीं गोष्टी चालल्या होत्या ?" बाजिरावानें विचारलें.

"होय." राणोजी उत्तरला.

"आणि आबा ! तुम्हांला किंवा बाबांना महाराजांनीं या बाबतींत कसें करावें म्हणून विचारलें देखील नाहीं ?"

"नाहीं." पुरंदरे म्हणाले.

चिटणीस म्हणाले, "प्रतिनिधींनीं माझें मत विचारलें; पण मीं त्यांना म्हटलें कीं बाजिरावसाहेब येऊंद्यात, त्यांना वस्त्रें मिळूंद्यात, मग आपण त्यांच्या विचारानें काय करणें तें करूं."

"तें तर त्यांना मुळींच रुचलें नसेल !" बाजीराव म्हणाला.

इतक्यांत पहारेकऱ्यानें आंत येऊन वर्दी दिली, "धनीसाहेबांच्या पायांपाशीं पोवाड्यांची हजेरी लावण्यासाठीं गोंधळी बाहेर आले आहेत."

बाजिरावाला सहज सुचलें, 'आपण किल्ल्यावर गेल्या वेळीं आपणाला जे गोंधळी भेटले ते तर आले नसतील ना !' त्याच क्षणीं मल्हारीची कल्पना चालली, 'खतिबांच्या घरीं पोवाडे गाणारे गोंधळीच धनीसाहेब आल्याचें कळल्यामुळें मदतीच्या आशेनें आले असावे.' चिटणीस व पुरंदरे ह्या दोघांनाही या वेळीं राजकारणविषयक भानगडींची इतकी चिंता लागून राहिली होती कीं, त्यांना गोंधळ्यांचे पोवाडेच काय पण अप्सरा–गंधर्वांचें गायनदेखील तेव्हां ऐकावयाला नको होतें. ते हुजऱ्याला म्हणाले, "त्या गोंधळ्यांना जाऊन सांग कीं, आज रावसाहेब दमून आले आहेत, त्यांना जागरण होईल, म्हणून आज कांहीं तुमचे पोवाडे ऐकण्याची त्यांची इच्छा नाहीं. म्हणावें, उद्यांबिद्यां आलां तर तुमची हजेरी लागेल."

राणोजी व मल्हारी ह्या दोघांनाही पोवाड्यांचा भारी शोक ! दोनपांच कोसांवर अमक्या ठिकाणीं पोवाडेगायन आहे असें त्यांना कळलें तर रात्रीं बेरात्रीं जंगल–झाडींतून देखील ते एकटे दुकटे घोड्यावरून दौडत तेथवर जावयाचे. तशांत राणोजीनें आतांच थोड्या वेळेपूर्वीं खतिबांच्या घरीं जे पोवाडे ऐकले होते ते तर फारच छान होते व ते गाणाऱ्या शाहिराचा कंठही अत्यंत मधुर होता. आज बाजीराव प्रवासाच्या श्रमांनीं दमून गेला होता हें राणोजीलाही दिसत होतें. पण खतिबांच्या घरीं पोवाडेगायन करणारेच गोंधळी इकडे आले असल्यास त्यांच्या

पोवाडेगायनाच्या श्रवणानें बाजिरावाला जास्त शीण न होतां झालेला शीण कमी होण्यालाच मदत होईल अशी त्याला खात्री होती म्हणून जरी चिटणीस व पुरंदरे यांनीं गोंधळ्यांना धुडकावून लावण्याचा बेत केला होता, तरीही 'आपण म्हणतों तेच ते गोंधळी असल्यास आपण धनीसाहेबांना आग्रह करून त्यां गोंधळ्यांचा एक तरी पोवाडा ऐकावयाला लावूं ' अशा इरादानें प्रथम तेच ते आहेत कीं काय याचा पडताळा पाहण्यासाठीं तो बाहेर गेला.

गोंधळी आल्याची खबर देण्यासाठीं पहारेकरी आंत गेला, तेवढ्यांत त्या चौघांत आपसांत कांहीं कुजबूज चालली होती. डफ व तुणतुणें वाजविणारे साथीदार पोवाडे गाणाऱ्या शाहिराला म्हणत होते कीं, 'इथें जरी पोवाडे गाण्याची परवानगी मिळाली तरी पेशव्यांचा पोवाडा गाऊं नये; कारण न जाणों, प्रतिनिधींसारख्या ज्यांना ज्यांना त्या पोवाड्यांत चिमटे घेण्यांत आले आहेत, त्यांच्यापैकीं कोणी एथें असला तर त्याच्या नाकाला मिरच्या झोंबावयाच्या व थोड्या वेळापूर्वी किल्ल्यावर आपलीं हाडें खिळखिळीं झालीं तीं पुन्हा एखादे वेळीं तशाच लाथांबुक्क्यांखालीं कुटलीं जावयाचीं.' पण शाहिराला ही प्रसंगावधानाची युक्ति रुचेना. त्याचें मत पडलें कीं, 'हा पेशव्यांचा वाडा. इथें आपण पेशव्यांचें यशोगीत गावयाचें नाहीं तर आणखी कोठें गावयाचें ! असल्या सुंदर कवित्वाबद्दल आपणाला पेशव्यांकडून चांगलें पारितोषिक मिळेल व आपल्या गुणांचें चीज होइल.' हा त्या शाहिराचा आग्रह पाहून त्याच्या साथीदारांनीं त्याला तडजोडीचा उपाय सुचविला कीं, 'पेशव्यांचाच पोवाडा तुला इथें गावयाचा तर निदान त्या तिसऱ्या चौकांतील तीं दोनतीन कडवीं गाळून तरी गा'. यावर त्या शाहिरानें पुन्हा वाढता हट्टाग्रह सुरू केला कीं, 'नाहीं. तीं कडवीं तर मी गाळणार नाहींच; पण पोवाड्याच्या शेवटीं बाळाजीपंत पेशव्यांच्या मरणानंतर आज–या घटकेपर्यंत शाहूमहाराजांच्या दरबारीं पेशव्यांना नामोहरम करण्यासाठीं जीं जीं कारस्थानें रचिलीं जात आहेत, त्यांवर आणखी एक नवा चौक रचून तो गाणार, व आपल्या शीघ्रकवित्वाची बाजिरावसाहेबांच्या मनाला साक्ष पटवून देऊन त्यांजकडून वाहवा मिळविणार'.

आणखीही त्या गोंधळ्यांची आपसांत अशीच कांहीं कुजबूज चालली असतां राणोजी त्यांना पाहून आंत गेला, व त्यानें बाजिरावापाशीं त्या गोंधळ्यांची इतकी प्रशंसा केली कीं, त्यामुळें बाजिरावालाच नव्हे पण पुरंदरे व चिटणीस यांनाही ते पोवाडे ऐकावेसे वाटून गोंधळ्यांना वाड्यांत हजेरी लावण्याची परवानगी मिळाली.

## प्रकरण तिसरें

# ही सौंदर्यलता कोण ?

"ह्या गोंधळ्यांना मीं किल्ल्यावर पाहिलें होतें." गोंधळी समोर येऊन मुजरा करून उभे राहिलेले पाहून बाजीराव म्हणाला, "होय ना रे ?"

"होय सरकार !" त्या चौघां गोंधळ्यांतील मुख्य शाहीर म्हणाला.

"मग तुम्ही तेथून इतके जीव घेऊन पळाला ते कां ?"

शाहीर उत्तरला, "सरकार ! आम्ही कोल्हापूरच्या अंबाबाईचे सेवेकरी गोंधळी. आम्हांला कोल्हापूरकर संभाजीमहाराजांकडून नक्त नेमणूक आहे. आम्ही ह्या प्रांतांतील जत्रा-उत्सवांना जात असतों. तेथें आम्हांला बरी कमाई होते. आम्ही औंधाला यमाईच्या उत्सवाला गेलों होतों. तेथून येतां येतां वाटलें, कीं सातारा राजधानीचें नगर; तेथें थोर थोर लोक आहेत, शाहूमहाराजही गुणिजनांचे पुरस्कर्ते आहेत, तेव्हां तेथें गेल्यास चांगली किफायत होईल; म्हणून आजच इथें आलों. कोणीं आम्हांला सांगितलें कीं, 'महाराज किल्ल्यावर आहेत' त्यांच्या चरणांपाशीं प्रथम हजेरी लावावी म्हणून आम्ही प्रथम किल्ल्यावर गेलों. पण तेथें कळलें कीं, कालच महाराजांची स्वारी महादऱ्याच्या जंगलांत शिकारीला गेली. तेथल्या लोकांनीं आम्हांला पोवाडे गाण्याचा फारच आग्रह केला म्हणून तेथें चार पोवाडे गाइले; त्यांत शेवटीं पेशव्यांचा पोवाडा गाइला. तो कांहीं तेथल्या एक दोघां प्रमुख लोकांना रुचला नाहीं. त्यांनीं आम्हांला मारहाण करून किल्ल्याच्या बाहेर घालवून दिलें. इतक्यांत एक घोडेस्वार तिथें आला; तो आमची बाजू घेऊन बोलूं लागला. तेव्हां देवडीवाला मुसलमान त्याच्याशीं भांडूं लागला. तेथल्या लोकांची त्याच्याशीं बाचाबाची झाली व त्यांतल्या त्या लठ्ठशा दोघांनीं—आपण पाहिलेंच आहे; आपणाशीं बोलत होता तो व आमचें डफ तुणतुणें आम्हांला ज्यानें दिलें तो—अशा दोघांनीं त्या घोडेस्वाराला दरडीखालीं लोटून दिलें."

शाहिरानें खूण सांगितली त्यावरून बाजिरावानें तर्कानें ओळखलें कीं, तो देवडीवाला अबुबकर असावा, व त्या लठ्ठशा माणसांपैकीं एक गमाजी असावा. पण दुसरा लठ्ठ माणूस कोण हें मात्र त्याच्या लक्षांत येईना. त्यानें शाहिराला विचारलें, "आणि तो दुसरा लठ्ठ माणूस कोण ?"

शाहीर उत्तरला, " सरकार ! त्याचें नांव आमच्या नीटसें लक्षांत नाहीं. पण आपल्यासमोरून आम्ही डफ तुणतुणें घेऊन खालीं येत होतों तेव्हां तो माणूस त्या दरडीखालीं लोटल्या गेलेल्या घोडेस्वाराच्या घोड्यावर स्वार होऊन आमच्या मागोमाग आला व आमच्यापुढें निघून गेला, एवढें मात्र आम्हीं पाहिलें."

तरीही तो माणूस नागोजीभट्ट असावा असें कांहीं बाजिरावाच्या ध्यानीं येईना. मात्र घोडेस्वाराविषयींचा वृत्तांत ऐकून त्याला संशय आला कीं, तो पिलाजी जाधव तर नसेल ! पिलाजीला गमाजी वगैरे मंडळीनें दगा दिला असेल, व त्या अन्यायावर पांघरूण घालण्यासाठीं आपण पिलाजीविषयीं चौकशी केली तेव्हां त्यांनीं कानांवर हात ठेवले असतील, असेंही त्याला वाटलें. त्यानें शाहिराला विचारलें, " त्या घोडेस्वाराचें नांव तुला माहीत आहे ?"

" नाहीं सरकार ! " शाहीर उत्तरला.

इतर मंडळींचेंही मत पडलें कीं, 'पिलाजी जाधव कांहीं तो नसेल; तो आज फारां दिवसांनीं घरीं आला म्हणून बायकोशीं गोष्टी बोलण्यांत रंगून इकडे यावयाचें विसरला असेल; तो उजाडतांच येईल.' 'ह्या विषयाची मागाहून चौकशी केली पाहिजे.' असें म्हणून बाजिरावानें शाहिराला विचारलें, " बरें; तुम्ही तेव्हां पळालां ते कां?"

शाहीर उत्तरला, " सरकार ! आम्हीं आपणांला तेव्हां ओळखलें नाहीं. कसूर माफ असावी. आम्हांला वाटलें कीं, आपणही त्याच मंडळींतले कोणी बडे अंमलदार असाल. त्या मंडळीनें आपणापाशीं चुगली केली तर आमचें हकनाहक मरण ओढवेल, ह्या भयानें आम्हीं पळालों. आपणच बाजीरावसाहेब असें आम्हांला तेव्हां कळतें, तर तेथेंच आम्ही आपले पाय धरून दाद मागितली असती. आपल्या पायांपाशीं आम्हांला यावयाचेंच होतें."

" बरें; तुमच्या त्या पोवाड्यांत त्या मंडळीला चिडण्यासारखें असें आहे तरी काय ? " बाजिरावानें विचारलें.

" तोच पोवाडा तुम्हीं आतां खतिबांच्या घरीं गाइला का ? " राणोजीनें मध्येंच विचारलें.

" नाहीं. खतिबांच्या घरीं जमलेल्या एकंदर मंडळीचा रोख पेशव्यांच्या विरुद्ध दिसला, म्हणून आम्हीं तेथें तो पोवाडा गाइला नाहीं. " शाहीर उद्गारला.

" आणि तुम्हांला खतिबांच्या घरीं जावयाला कोणीं सांगितलें ? कीं तुम्हीं आपण होऊनच गेलां ? " पुरंदऱ्यांनीं प्रश्न केला.

" नाहीं सरकार ! " शाहीर राणोजीकडे पाहून उत्तरला, " दक्षिणी पेहराव केलेले एक गोरेसे गृहस्थ तेथें जे बसले होते, त्यांनीं आमचे पोवाडे औंधाला यमाईच्या देवळांत परवां ऐकले होते. ते पोवाडयांचे शोकी दिसतात. आम्ही ह्याच वाड्यांत विचारीत विचारीत यावयाला निघालों असतां ते आम्हांला वाटेंत भेटले· त्यांनीं आम्हांला ओळखलें व खतिबांच्या घरीं बोलावून नेलें. त्यांनींच आम्हांला आतां येतांना एक होन बिदागी दिली. "

" राणोजी ! हे गृहस्थ कोण ? श्रीपतराव तर नव्हेत ? " बाजिरावानें विचारलें.

" नव्हे. ते सुमंत* असावे." राणोजी शाहिराकडे वळून म्हणाला, " ते कनोजी पगडीवाल्या गृहस्थांच्या शेजारीं बसले होते तेच ना रे ? "

" होय तेच." शाहीर उद्गारला.

" सुमंतच ते." राणोजी म्हणाला.

" अस्सें ! " बाजीराव किंचित् ओंठ चावून क्षणभर विचार करून शाहिराला म्हणाला, " बरें; तूं तो पेशव्यांचा पोवाडा तेवढा आम्हांला गाऊन दाखीव."

" जशी आज्ञा सरकार ! " असें म्हणून शाहिरानें पेशव्यांचा पूर्वोक्त पोवाडा खड्या सुरांत गाऊन दाखविला. थोड्या वेळापूर्वी आपल्या साथीदारांपाशीं उद्गार काढल्याप्रमाणें त्यानें त्या पोवाड्यांत शेवटीं नवा चौक रचून खरोखरच ह्या घटके-पर्यंतचें शब्दचित्र तेथल्या मंडळीसमोर उभें केलें. प्रतिनिधि वगैरे मंडळींच्या पाताळ-यंत्रांबद्दल ज्या गांवगप्पा अलीकडे ऐकूं येत होत्या, त्यांचें त्यात हुबेहूब वर्णन आलें. सर्वांना पराकाष्ठेचा आनंद झाला, व शाहिराच्या त्या शीघ्रकवित्वाबद्दल कमालिचें कौतुकही वाटलें. बाजिरावानें त्या गोंधळ्यांना पांच होन बक्षिस देण्याला पुरंदऱ्यांना सांगितलें.

---

*आनंदराव रघुनाथ सुमंत हा ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण औरंगाबादेला रहात असे. शाहूमहाराजांनीं दक्षिणेंत येतांना त्याला सुमंतपद दिलें. हा आपल्या कामांत कुशल होता. तथापि त्याचें वागणें नेहमीं पेशव्यांच्या विरुद्ध असल्यानें त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. पेशव्यांच्या मध्यस्थीशिवाय तो परभारें उद्योग करी, त्यामुळें एकतंत्री उद्योगाला व्यत्यय येई. ( मराठी रियासत, मध्यविभाग–३ ) क्षुल्लक वैयक्तिक स्वार्थासाठीं देशहितावर निखारा ठेवण्याच्या कामीं श्रीपतराव प्रतिनिधि व हा, दोन्ही सारखेच.

शाहीर म्हणाला, "सरकार! आपली यादगिरी म्हणून आपलें एखादें वस्त्र आम्हांला मिळेल तर बरें."

लगेच बाजिरावानें आपला दरबारसारख्या प्रसंगीं कमरेला बांधावयाचा भरजरी शेला शाहिराच्या अंगावर फेंकला. शिवाय पुरंदऱ्यांनीं त्यांना पांच होनही बक्षीस दिले. शाहिर व त्याचे साथीदार खूष होऊन सर्वांना मुजरा करून निघाले.

"आतां एथून तुम्ही कुठें जाणार?" मल्हारीनें विचारलें. त्याला चौकशी करण्याचें कारण, आतांचा पेशव्यांचा पोवाडा त्याला फारच आवडला होता व त्या शाहिराला लिहितां वाचतां येत असल्यास त्याच्याकडून तो उतरून घेण्याचें त्याच्या मनांत होतें.

शाहिराच्या एका साथीदारानें बाहेर नुक्ताच चंद्रोदय होऊन स्वच्छ चांदणें पडलें होतें व आकाशही निरभ्र होतें, तिकडे नजर टाकून उत्तर दिलें, "आतां आम्ही महारदऱ्याला महाराजांची स्वारी आहे, तेथें वस्तीला जाणार, व उद्यां महाराजांच्या पायांपाशीं हजेरी लावणार."

शाहिराला आपल्या साथीदाराचें हें मध्येंच लुडबुडणें कां न कळे, आवडलें नाहीं. त्यानें त्याला हलकेंच न बोलण्याविषयीं इषारा दिला. पण त्याकडे त्याचें लक्ष गेलें नाहीं. अखेर त्यानें त्या साथीदाराला हातानें हलवून गप्प राहाण्याची खूण करून मल्हारीच्या प्रश्नाला मिळालेल्या उत्तराला पुस्ती जोडली, "आतां आम्ही सदाशिवपुऱ्यांत* आमच्या एका ओळखीच्या गृहस्थाकडे जाऊं व तेथून उद्यां मोठ्या पहांटेला उठून महाराजांच्या पायांपाशीं जाऊं."

मल्हारीनें त्या शाहिराला जरा बाजूला घेऊन विचारलें, "काय रे! उद्यां सकाळींच मला महाराजांपाशीं धनीसाहेब आल्याची वर्दी देण्यासाठीं यावयाचें आहे. तेव्हां मी तुला भेटलों तर हा एवढा पोवाडा मला शिकविशील का?"

"हो! जरूर शिकवीन." असें आश्वासन देऊन शाहीर आपल्या साथीदार गोंधळ्यांसह तेथून निघून गेला. रस्त्याला लागतांच त्यानें आपल्या त्या लुडबुड्या साथीदाराला खासें खडसावलें, "शंभूसिंग! तूं अगदींच शंभु कसा रे? आपले बेत

---

* साताऱ्याच्या ज्या भागाला सध्यां व्यंकटपुरा म्हणतात, त्याच भागाला पूर्वी सदाशिवपुरा असें नांव होतें. बाळाजी विश्वनाथ पेशव्यांचे जांवई व सध्यांच्या इचलकरंजीकरांचे पूर्वज व्यंकटराव घोरपडे यांनीं नंतर एथें आपली पागा बांधली व तेव्हांपासून त्या भागाला व्यंकटपुरा हें नांव पडलें.

असें जगाला सांगत सुटायचें वाटतें!" शाहिराचें बोलणें शंभुसिंगानें मुकाट्यानें ऐकून घेतलें. लगेच शाहीर आपल्या दुसऱ्या दोन साथीदारांकडे वळून म्हणाला, "अप्पाजी! शहाजी! मी म्हणतों हें खरें कीं खोटें?"

अप्पाजी या नांवाचा साथीदार म्हणाला, "खोटें कसें? आपण शिरावर घेतलेलें काम म्हणजे सुळावरची पोळी आहे. उडी साधली तर पोळी मिळणार, नाहीं तर सुळीं जावयाची पाळी!"

शहाजी या नांवाचा दुसरा साथीदार म्हणाला, "म्हणूनच मी शंभुसिंगाला कोल्हापूर सोडल्यापासून सांगत असतों कीं, आपण मध्यें कांहीं बोलूं नये. आपण सांगितलेल्या कामाचे व घातलेल्या अन्नाचे धनी!"

हें त्या गोंधळ्यांचें संभाषण रस्त्यानें जातांना चाललें होतें. तें पेशव्यांच्या वाड्यांतील मंडळीला ऐकूं येणें शक्य नव्हतें. आणि वेळीं कोणाला तें ऐकूं आलें असतें तरी त्याचा अर्थबोध कोणालाही होऊं नये इतकें तें संदिग्ध होतें.

गोंधळी बाहेर निघून गेले, त्यांच्या मागोमाग थोड्या वेळानें चिटणीस व पुरंदरे घरीं जावयाला निघाले. राणोजी व मल्हारी मशाली घेऊन त्यांना पोंचविण्यासाठीं त्यांच्याबरोबर निघाले. या वेळीं चंद्रोदय झाला होता खरा; पण चिटणीस व पुरंदरे हे दोघेही वयोवृद्ध पडले, त्यांतून चिटणिसांना तर अलीकडे वयोमानाप्रमाणें कमी दिसे व पुरंदऱ्यांचा पाय थोडासा दुखावला होता, त्यांना वाटेंत चांदण्याचा प्रकाश पुरण्यासारखा नव्हता.

पुरंदरे बाजिरावाचा निरोप घेतांना म्हणाले, "रावसाहेब! आपण आज फार दमलां आहां व रात्रही बरीच झाली आहे, तेव्हां आतां आपण झोंप घ्या. पुढें कसें काय करावयाचें तें उदयीक आपण ठरवूं."

यावर बाजीराव उत्तरला, "बरें आहे."

चिटणीस व पुरंदरे जातांच गोविंदानें बाजिरावाचा बिछाना तयार केला व आतां बाजीराव झोंपीं जाणार, तोंच पहारेकऱ्यानें येऊन वर्दी दिली, "धनीसाहेब! बाहेर राजवाड्यांतील कोणी दासी आली आहे, ती आपणांला भेटूं इच्छितें."

राजवाड्यांतील दासी आल्याचें ऐकतांच बाजिरावाला वाड्यांत येतांना कोणा तरी एका स्त्रीनें एक पत्र व आंगठी दिली होती त्याची आठवण झाली. लगेच त्यानें गोविंदाला हांक मारून आपला आंगरखा आणविला व खिशांतून पत्र आणि आंगठी

ह्या दोन्ही जिनसा बाहेर काढतां काढतां पहारेकऱ्याला त्या दासीचें नांव विचारून यावयाला सांगितलें. पहारेकरी बाहेर जाऊन पुन्हा आंत आला तेव्हां बाजीराव आंगठीचें निरीक्षण करण्यांत गढून गेला होता. त्या आंगठीवरील 'श्रीलक्ष्मी' हा तीन अक्षरी ठसा पाहून तो बुचकळ्यांत पडला कीं ही श्रीलक्ष्मी कोण ? त्याचा पत्रावरून तरी कांहीं उलगडा होईल म्हणून त्यानें पत्र उघडलें. पहारेकरी आला तो बाजीराव आंगठीचें निरीक्षण करण्यांत गढून गेला आहे असें पाहून दरवाजांतच उभा होता. त्यानें तेवढ्यांत पुढें होऊन सांगितलें, " धनीसाहेब ! ती दासी आपलें नांव कांहीं सांगत नाहीं. 'मघाशीं आपण घोड्यावरून येतांना मी आपणांला रंगमहालासमोर भेटलें होतें, तीच मी म्हणून धनीसाहेबांना सांग' असें ती म्हणते."

" जा. तिला थोडा वेळ उभें राह्यला सांग. " असें म्हणून बाजीराव तें पत्र वाचूं लागला. पहारेकरी पुन्हा बाहेर जाऊन पुन्हा आंत आला व धनीसाहेब पत्र वाचनांत गढून गेले आहेत असें पहातांच पूर्ववत् दरवाजांत उभा राहिला.

* * *

बाजिरावानें पत्र वाचलें; तें पुढीलप्रमाणें होतें:

'श्रीमंत बाजीरावसाहेब यांचे चरणसेवेसी. सालाबादप्रमाणें गेल्या आश्विनमासीं कऱ्हाड येथें* पंतांच्या कोटांत. शारदीय नवरात्रींतील उत्सवाचे दिवशीं आपण

* कऱ्हाड ही प्रतिनिधींची तेव्हांची राजधानी. एथील त्यांच्या वाड्याला पंतांचा कोट असें म्हणतात. याशिवाय सातारा व पुणें येथेंही प्रतिनिधींचा वाडा आहे; त्याला पंतांचा गोट असें म्हणतात. कऱ्हाडचा हा वाडा म्हणजे एक मोठा थोरला भुईकोट किल्लाच आहे. कऱ्हाड हें क्षेत्र असून ह्या क्षेत्राच्या वायव्य कोंपऱ्यावर कृष्णा व कोयना ह्यांच्या प्रीतिसंगमाच्या कोनाशीं हा वाडा आहे. ह्याचा घेरही तसाच किल्ल्यासारखा मोठा विस्तृत असून पश्चिमेच्या अंगाला एक मोठी अपरंपार दरड आहे. तिच्या खालून कोयना नदी दक्षिणोत्तर वाहते. आंतील बाजूला देवीचें देवालय, राजवाडा, चौक, पटांगणें, कारंजीं, पागेची विशाळ चौसोपी इमारत, पुढें पदरच्या कामगारांचीं घरें वगैरे मोठी वस्ती आहे. जगदंबा हें प्रतिनिधींचें उपास्य-दैवत होय. ह्या देवीच्या देवघरालाच 'थोरलें देवघर' म्हणतात. ह्या देवीची मूर्ति सुमारें वीतभर उंचीची असून ती अस्सल सुवर्णाची आहे. आश्विनमासीं नवरात्रांत ह्या देवीचा थाटाचा उत्सव होई. रात्रौ जमलेल्या हरिदासांचीं कीर्तनें, व कला-

आलां होतां, त्या प्रसंगीं आपण प्रतिनिधींपाशीं कोणा कलावंतिणीची फार स्तुति केली, तें आपणाला आठवत असेलच. तीच मी लक्ष्मी. तेव्हांपासून माझा जीव मीं आपणांवरून ओंवाळून टाकला आहे. आपणांला पेशवाईपदांचीं वस्त्रें मिळूं नयेत म्हणून प्रतिनिधींचीं भयंकर कारस्थानें सध्यां चाललीं असून त्यांची मला बरीच गुप्त माहिती आहे. आपण ह्या दासीला एकवार आपली समक्ष भेट घेण्याची साधि दिल्यास दासीवर आपले अनंत उपकार होतील, व सर्व गोष्टींचा समक्ष खुलासा करतां येईल. रात्रौ सर्वत्र सामसूम झाल्यावर माझी दासी पुन्हा आपणांकडे येईल. तिच्या हातीं आपण मला आपल्या महालांत येण्याची आज्ञा करावी. त्या बेतानें मी तयार आहें. ही दासी माझ्या अत्यंत विश्वासांतील आहे, व मी तर मनानें आपल्याच चरणांची दासी आहें. तेव्हां आपणांला कोणत्याही प्रकारची काळजी करण्याचें कारण नाहीं. खुणेसाठीं ह्या पत्रासोबत मीं माझी आंगठी पाठविली आहे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

आपली चरणदासी

**लक्ष्मी**

* * *

बाजिरावानें तें पत्र एकदां वाचलें, पुन्हा वाचलें; पण ही लक्ष्मी म्हणजे अमकी असें कांहीं त्याला नक्की आठवेना. पत्रांत लिहिल्याप्रमाणें गेल्या नवरात्रांत पंतांच्या कोटांतील शारदीय उत्सवाच्या दिवशीं कऱ्हाड येथें आपण गेलों होतों, व तेथें पुराण, कीर्तन, गवई-कलावंतिणींचें गायन वगैरे नानापरींच्या रमणीय उपकरणांनीं तो उत्सव सालाबादप्रमाणें साजरा झाला होता, एवढें त्याला आठवलें. पण त्या उत्सवांत अमक्याच कलावंतिणीची आपण प्रतिनिधींपाशीं स्तुति केली असें मात्र त्याला नक्की आठवेना. त्यानें बराच वेळ तो प्रसंग स्मरणशक्तीच्या जोरावर डोळ्यांसमोर आणण्याचा प्रयत्न करून पाहिला; पण फुकट ! याचा अर्थ बाजीराव स्मरणशक्तीचा धड नव्हता असा नव्हे. त्याची स्मरणशक्ति इतकी तीव्र

---

वंतिणींचें नृत्यगायन उजाडेपर्यंत चाले. जसे कितिएक हरिदास कुशल असत, तशाच कित्येक कलावंतिणी इतक्या रूपसंपन्न व नृत्यगायनपटु असत कीं, बहुधा तेथून उठावेंसेंच वाटत नसे. ह्या कलावंतिणींचीं वस्त्रेंभूषणेंही तशींच नयनमनोहर असत. इ. सन १७९७ मध्यें कऱ्हाडला प्लेग झाला होता, तेव्हां उपरोक्त 'थोरलें देवघर' औंध येथें आलें; व तेव्हांपासून नवरात्राचा उत्सव औंधालाच होत असतो.

होती कीं, एकदां एखादी गोष्ट अथवा एखादी व्यक्ति त्यानें पाहिली, कीं ती आठवण त्याच्या स्मृतिपटलावर वज्रलेपानें लिहिली जाई. पण खरे थोर, खरे कार्यकर्ते जे पुरुष असतात, त्यांच्या अंतःकरणांत व स्मरणशक्तींत जगांतील गाबाळग्रंथाला सहसा वाव नसतो. वरच्या लक्ष्मीच्या पत्रांत उल्लेखिलेली गोष्ट अशीच गाबाळग्रंथी अगदीं क्षुल्लक होती. थोरांमोठयांच्या घरीं असे रंगेल रंग हरहमेष चालावयाचे; बाजिरावासारखे थोर माणूस तेथें खास निमंत्रणावरून अनेकदां जावयाचे; तेथें एखादी आल्हादकारक गोष्ट घडली कीं, त्यांनीं त्याविषयीं स्तुतिपर उद्गार काढावयाचे; यांत अशक्य अथवा असंभाव्य असें कांहींदेखील नव्हतें. वरच्या पत्रांत लिहिल्याप्रमाणें बाजिरावानें त्या उत्सवाच्या दिवशीं एखाद्या कलावंतिणीची तिच्या गायन-नर्तन-कौशल्याबद्दल प्रतिनिधींपाशीं स्तुति केली असेलही. बाजीराव तसा खूपच रंगेला गडी होता. शिवाय तो तेव्हां ऐन पंचविशींतील भरज्वानीचा फांकडा तरुण, स्वरूपानेंही तसाच अप्रतिम सुंदर—केवळ मदनाचा पुतळा. अशा रंगेल जवानाला रूपयौवनसंपन्न व गायननर्तनकुशल कलावंतिणींची योग्य तेथें प्रशंसा करावीशी वाटावयाचीच. तसेंच वरचें पत्र लिहिणाऱ्या लक्ष्मीप्रमाणें कोणाही विलासी यौवनललनेला असल्या मदनसुंदर, पराक्रमी व वैभवशाली तरुणाविषयीं अभिलाष उत्पन्न व्हावयाचाच. लक्ष्मीचीच गोष्ट कशाला ! ती तर बोलून चालून—ती आपल्या पत्रांत म्हणते त्याप्रमाणें—एक कलावंतीण होती. पण थोरामोठयांच्या घराण्यांतील सौंदर्यवती कुलयुवतींना, कुमारिकांना, सौभाग्यवतींना, व वृद्धा नारींनाही बाजीरावाविषयीं अशीच धन्यता व आपलेपणा वाटे. सौंदर्यवती कुलयुवतींना वाटे कीं, देवा ! असला पुत्र माझ्या कुशींत जन्माला येऊं दे. कुमारिकांना वाटे कीं, परमेश्वरा ! मला असला पति मिळूं दे. सौभाग्यवतींना वाटे कीं, भगवंता ! असला पाठीराखा भाऊ मला मिळूं दे. विधवांना वाटे कीं, ईश्वरा ! ह्या नाहीं तर पुढच्या जन्मीं तरी मला असलें सौभाग्य लाभूं दे. वृद्धा नारींना वाटे कीं प्रभुराया ! या नाहीं तर पुढच्या जन्मीं तरी असला पुत्र माझ्या कुसव्यांतून निर्माण होऊं दे. सौंदर्याची आवड कोणाला नाहीं व कां असूं नये ? त्या आवडीच्या मुळाशीं वासना, भावना किंवा कृति यांचा अधमपणा मात्र असूं नये. त्यांत बाजिरावासारखा रूप-गुण-बुद्धि अशा त्रिविध सौंदर्याचा मूर्तिमंत पुतळा पाहून तर साक्षात् सौंदर्यदेवतेलाही क्षणभर त्या पुतळ्याकडे स्तिमित वृत्तीनें पाहात उभें राहावेंसें वाटावें. सुंदर चेहरा ही मुकी पण स्वयंभू शिफारस आहे असें म्हणतात तें कांहीं खोटें नाहीं.

सांगण्याचें तात्पर्य काय कीं, पंतांच्या कोटांतील शारदीय उत्सवांत कोणी गुणी व सुंदर कलावंतीण बाजिरावावर मोहित झाली असेल, व बाजिरावानेंही तेव्हां यजमानांच्या तोंडावर तिची मुक्त कंठानें प्रशंसा केली असेल. पण ती लक्ष्मीच होती कीं आणखी कोणी सरस्वती होती, याची चौकशी करण्यांत बाजिरावानें तेव्हां आपलें मस्तक शिणविलें नव्हतें. विलास–विहार हें वाडवडिलांच्या संपत्तीवर चरणाऱ्या निव्वळ चैनी खुशालचंदाचें जीवनसर्वस्व असो; पण कर्तबगारांच्या जीवनांत त्या विलास-विहारांना मर्दुमकीच्या नक्त रकमेवरील आणे-पैपेक्षां जास्त किंमत नसते. सामान्यतः शूर वीर पुरुष विलासप्रिय असतात हें खरें; पण विलास हें त्याचें खेळणें असतें. ते स्वतः विलासांच्या हातांतील खेळणें बनून रहात नसतात. पार्थादि पांडव, श्रीकृष्ण किंवा शिवाजीमहाराज असे सदा जागरूक असणारे वीर तर केवळ विलासांच्या आधीन कधींच होत नाहींत; पण संभाजीमहाराजांप्रमाणें एखादा वीर बेभानपणें विलासांत रंगून गेला असला तरी जीविताची अखेरची कसोटी लागण्याचा प्रसंग आला कीं तोदेखील खरा कर्तव्यदक्ष धर्मवीरसा शोभूं लागतो. राणा हमीरसारखा नरवीर आपल्या रमणीशीं विलास करण्यांत रंगून गेला असतां भुकेनें वखवखलेला अक्राळविक्राळ वाघ त्या विलासमग्न दंपत्याचा बळी घेण्यासाठीं धावून आला,. तेव्हां राण्यानें तशा एकतानतेच्या स्थितींत– कीं ज्या स्थितीला ज्ञाते लोक पूर्ण समाधियोगाची उपमा देतात, ज्या स्थितींत माणूस जगाला पूर्णपणें विसरून जातो, त्या स्थितींतदेखील त्या वाघाला ठार केलें! बाजीराव विलासी होता, पण तो असा सदैव जागरूक होता. विलासांविषयींची आवड त्याला त्याच्या कर्तव्याचा विसर पाडूं शकत नसे व कर्तव्याच्या वेळीं त्याला विलासांची आठवणदेखील होत नसे. त्यामुळेंच उपरोक्त पत्र लिहिणारी कोणी लक्ष्मी जरी त्या पंतांच्या कोटांतील शारदीय उत्सवापासून मनानें बाजिरावाला सर्वस्वार्पण करून त्याचें अहोरात्र चिंतन करीत बसली होती, तरी बाजिरावाच्या ती गोष्ट मनींही नव्हती. त्यामुळें विचार करकरूनही आपणाविषयीं इतकी कळकळ बाळगणारी ही लक्ष्मी कोण, याची नीटशी कल्पना त्याला होईना. पत्रांत ती लक्ष्मी पंतांच्या कोटांतील उत्सवाची आठवण देते, व आज ती शाहूमहाराजांच्या रंगमहालांत बसून कारस्थानें करते, याचा अर्थ काय? कुठें त्या दिवशीं कलावंतिणींच्या गायननर्तनानें गजबजून गेलेला तो पंतांच्या कोटांतील दिवाणखाना व कुठें हा शाहूमहाराजांचा रंगमहाल! बाजिरावाला कांहीं केल्या तर्क चालेना.

पण तें पत्र पहातां ती लक्ष्मी कलावंतीण कोणीही असली तरी ती उपेक्षणीय आहे असें मात्र बाजिरावाला वाटेना. त्या लक्ष्मीचा आपल्या सध्यांच्या परिस्थितींत जर कांहीं उपयोग होण्याजोगा असेल तर तो आपण जरूर करून घेतला पाहिजे असा स्वतःच्या मनाशीं विचार करून बाजीराव बाहेर जाण्यासाठीं बिछान्यावरून उठला, तों पहारेकरी दरवाजांत उभा !

" काय रे ! " बाजिरावानें विचारलें.

" धनीसाहेब ! ती दासी बाहेर उभी आहे. ती आपणाला शक्य तितक्या लौकर भेटूं इच्छिते." पहारेकरी मुजरा करून म्हणाला.

बाजीराव तसाच उठून बाहेर सदरेवर गेला, तों ती दासी तेथें तोंडावरून बुरखा घेऊन उभी होतीच. बाजिरावानें तिला विचारलें, " तूं कोणाकडून आलीस ? "

दासी बुरखा सांवरीत उत्तरली, " सरकारांनीं मघांचें पत्र वाचलेंच असेल."

" होय. पण त्यावरून मला नीटसा अर्थबोध झाला नाहीं. तुझें नांव काय बरें ?

त्या दासीनें पुन्हा बुरखा सांवरीत बाजिरावाच्या प्रश्नाला उत्तर देण्याची हेतु-पुरःसर टाळाटाळ करून विचारलें, " बाईसाहेबांनीं पत्रांत आपणाला भेटण्याची इच्छा दर्शविली आहे, त्याप्रमाणें त्यांना इथें येऊन भेटूण्याची परवानगी आहे का ? "

बाजीराव क्षणभर विचार करून उत्तरला, " हो ! पण तूं तुझें नांव काय, तसेंच तुझ्या त्या बाईसाहेब कोण, हें मला सांगशील कीं नाहीं ? "

" तें सारें मी सांगतें. आणखीही कांहीं महत्त्वाच्या गोष्टी मला सरकारांना सांगावयाच्या आहेत. पण असल्या गोष्टींचा खल एकांताच्या जागीं झालेला बरा. ह्या कानाचें त्या कानाला कळतां उपयोगी नाहीं." दासी म्हणाली.

" तर मग ये, आंत ये." असें म्हणून बाजीराव आपल्या शयनमंदिरांत गेला. दासीही त्याच्या मागोमाग गेली. आंत जातांच तिनें हलकेच शयनमंदिराचा दर्शनी दरवाजा लोटून घेतला. दासीनें खाशांपाशीं अशा प्रकारची वर्तणूक करणें म्हणजे कांहींसा अतिप्रसंग करणें होय. पण वेळेचें महत्त्व ओळखून बाजिरावानें तें तितकेंसें मनावर घेतलें नाहीं.

दरवाजा लावतांच त्या दासीनें एका बाजूला नम्रपणें उभें राहून आपल्या चेहेऱ्या-वरील बुरखा दूर केला व कोमल स्वरांत विचारलें, " आतां तरी सरकारांना ह्या दासीची ओळख पटते का ? "

इतका वेळ बुरख्याखालीं झांकला गेलेला तो सुंदर चेहरा आतां उघडा होतांच त्याच क्षणाला बाजिरावाची खात्री पटली कीं, ही कांहीं कोणी सामान्य दासी नसावी. तिनें परिधान केलेलीं उंची वस्त्रें व उंची अलंकार नुसत्या एकेका वस्त्राच्या किंवा अलंकाराच्या किंमतींत एकेक दासी विकत घेतां येईल इतके बहुमोल होते. तिचा प्रत्येक अवयव इतका सुंदर होता कीं, असलें सौंदर्य विलासप्रिय शाहूमहाराजांच्या रंगमहालांत दासीपणाच्या रूक्ष प्रांतांत आजवर वनवास भोगीत राहिलें असेल हें बाजिरावाला मुळींच संभवनीय वाटेना. इतर अवयवांच्या ठायीं ठसठशीत स्वरूपांत वास्तव्य करणाऱ्या सौंदर्याची गोष्ट परती राहो; पण इतकी सुंदर दासी शाहूमहाराजांच्या एखाद्या राणीला लाभली व ती महाराजांना भुरळ पाडील ह्या भयानें तिच्या यजमानीण राणीनें तिची व महाराजांची दृष्टभेट होऊं दिली नाहीं, असा खरा प्रकार असणेंही शक्य होतें. पण तिचे सुंदर कोमल व मांसल हात, तसेंच तिच्या पायांचीं पावलें इकडे बाजिरावाची तीक्ष्ण नजर पोंचतांच त्याला वाटलें कीं, हे हात व हे पाय कांहीं दासीपणांत रावलेले दिसत नाहींत, ते विलासांत रुळलेले लोळलेले दिसतात. शिवाय त्या स्त्रीनें बुरखा टाकून 'आतां तरी सरकारांना ह्या दासीची ओळख पटते का' असें विचारलें, तेव्हां बाजीराव साहजिकपणेंच विशेष चौकस दृष्टीनें तिच्या चेहऱ्याकडे पाहूं लागला. तेव्हां त्याला अंधुक ओळख पटली कीं, आपण यापूर्वी कुठेंतरी केव्हांतरी हा सुंदर चेहरा पाहिलेला असावा. पण ती ओळख अंधुक होती. त्यामुळें बाजिरावाला 'ओळख आहे' असेंही म्हणवेना व 'ओळख नाहीं' असेंही म्हणवेना. तो आपण आजवर जागोजागीं निरनिराळ्या निमित्तांनीं पाहिलेल्या सुंदर स्त्रिया मनांतल्या मनांत आठवूं लागला.

## प्रकरण चवथें

# असें कसें झालें ?

बाजिरावासमोर ती कोण सुंदर स्त्री उभी राहिली होती व त्यांचें काय संभाषण झालें, हें पहाण्यापूर्वी आपण नागोजीभटाची पुढें काय गत झाली तें पाहूं.

इकडे किल्ल्यावर बाजिरावाचें गमाजीशीं उभ्या उभ्या संभाषण चाललें होतें, त्याच वेळीं तेथील—सातार्‍यांतील पंतांच्या गोटांत* श्रीपतराव प्रतिनिधींची पत्नी राधाबाई व प्रतिनिधींचा हस्तक यमाजी यांचें एका क्षुल्लक पण नाजूक बाबतींत संभाषण चाललें होतें. प्रतिनिधींच्या अक्का व ताई ह्या अनुक्रमें दहा व सात वर्षांच्या दोन मुली व त्यांचा वडील भाऊ प्रतिनिधींचा एकुलता एक मुलगा परशुराम ही तिघें भावंडें आपसांत खेळत होतीं. किंवा खरें बोलावयाचें तर खेळत होतीं कसलीं, एकमेकांशीं भांडत होतीं. ज्या क्षुल्लक पण नाजूक कारणामुळें राधाबाई व यमाजी यांच्यांत संभाषण चाललें होतें, त्याच कारणामुळें ह्या भांवडांचें भांडण चाललें होतें. तें कारण असें;—पिलाजी जाधवाची बायको कमळा व मल्हारी होळकराची बायको गौतमा ह्या दोघी रंगमहाल राजवाड्यांत गेल्या असतां अक्का व ताई ह्यांना यमाजीबरोबर बाहेरून येतांना पाहून त्यांनीं अक्काची चेष्टा केली. गौतमा नुक्तीच खानदेशांतून इकडे आल्यामुळें प्रतिनिधि कोण, त्यांची बायको कोण किंवा त्यांचीं मुलें कोण, असली बड्या माणसांची तिला कांहींच माहिती नव्हती. तिनें जेव्हां अक्का व ताई ह्या दोघी गलेलठ्ठ व रूपानें साधारणतः सामान्य कोटींत शोभणार्‍या मुली—त्यांतल्या त्यांत अक्का ही त्या दोघीं बहिणींत वयानेंही मोठी व शरिरानेंही अगडबंब अशी पाहिली, तेव्हां ती कमळेच्या कानाशीं लागून म्हणाली, "अग बाई! ही मुलगी केवढी अगडबंब आहे! हिला नवरा शोधायचा तर एखादा हाणमच शोधायला हवा!"

गौतमेला जनावरांची आवड फार. ती सदाशिवपुर्‍यांत रहात असे, तेथल्या एका शेजार्‍यानें आज सकाळींच आटपाडीहून खिलारी बैलांची जोडी विकत आणलेली तिनें पाहिली होती. ही हाणम जातीच्या बैलांची जोडी आहे असें तिनें त्या

---

*हा 'पंतांचा गोट' सातार्‍यांत रविवार पेठेंत आहे. इतर ऐतिहासिक स्थळांप्रमाणें त्याही वाड्याला सध्यां विपन्नावस्था प्राप्त झालेली आहे हें सांगावयाला नकोच!

शेजाऱ्याच्या तोंडून ऐकलें होतें, व इकडे गाय बैल हीं जनावरें पहावीं तर तीं ब्राह्मण जातींचींच पहावीं असा तिचा कुतूहलजनक ग्रह झाला असल्यानें तो शब्द आज तिच्या जिव्हाग्रीं घोळत होता. असो.

गौतमेचे हे शब्द यमाजीनें तर ऐकलेच पण अक्कानेंही ऐकले. यमाजी कांहीं बोलला नाहीं; पण अक्का मात्र तेथल्या तेथें फुणफुणली. वयाच्या मानानें अक्काला जाणिव फार होती. श्रीमंतांच्या थोरा—मोठ्यांच्या मुलांबाळांना लहान वयांत आणखी कांहीं कळलें नाहीं तरी 'आपण थोरांची मुलें, आपण इतरांवर हुकमत गाजवावयाची व इतरांनीं आपणासमोर जी जी करीत रहावयाचें' एवढें त्यांना हटकून कळतें. श्रीमंतांचीं मोठीं माणसें घ्या किंवा मुलें घ्या, त्यांची खुष-मस्करी कोणीं केली, कीं तीं खूष व्हावयाला वेळ नाहीं व खऱ्या किंवा खोट्या कारणासाठीं कोणीं थोडीशी कुचेष्टा केली, कीं तीं कोपायमान व्हावयालाही वेळ नाहीं. हेंच अक्काचें उदाहरण पाहिलें, तरी अक्काच्या बाबतींत गौतमा जे शब्द आपल्या मैत्रिणीपाशीं बोलली, त्यांतील कुचेष्टेचा भाग वजा घालतां फारशी अति-शयोक्ति नव्हती. पण अक्काला तेच शब्द फार झोंबले. याचें कारण गौतमाही कोणा फाटक्या शिलेदार—बारगिराची बायको अक्कासारख्या पंतप्रतिनिधींच्या कन्येची अशी कुचेष्टा करते म्हणजे काय ! अक्काला अजून लग्नांतील व संसारांतील खांचा-खोंचा बिनचूक कळूं लागल्या नव्हत्या. पण प्रतिनिधींच्या घरांत तिच्या लग्नाविषयीं वाटाघाटी चालत, मुलगी अजस्त्र धूड पडली व शिवाय सौंदर्याच्या दृष्टीनेंही जरा नरमच, त्यामुळें तिच्याजोगा मान-धन-देह—संपन्न वर कोठेंच मिळेना म्हणून राधाबाई व श्रीपतराव नेहमीं चिंता करीत, हे सारे सोहाळे अक्काच्या डोळ्यांसमोरच होत, त्यामुळें आपण फार सुंदर नाहीं व शरिरानें अगडबंब आहों, हे आपले निसर्गदत्त दोष अक्काला ठळकपणें कळूं लागले होते. अशा स्थितींत गौतमेचे खोंचिक शब्द तिच्या जिव्हारीं जाऊन झोंबल्यास नवल काय ! ती तेथें जी फुण-कटली ती घरीं येतांच राधाबाई सदरेला बसली होती तिच्यापाशीं जाऊन रडूं लागली. यमाजीला अक्का कां फुणकटली हें माहीत असल्यानें राधाबाई जेव्हां जेव्हां अक्काला 'रडायला काय झालें' म्हणून विचारूं लागली व अक्का कांहीं बोलेना, तेव्हां यमाजीनें पुढें होऊन खरा प्रकार निवेदन केला. राधाबाई शांत व सुस्वभावी असल्यानें तिनें गौतमा व कमळा यांच्या विरुद्ध ब्र देखील न काढतां अक्काची समजूत घालण्याचा यत्न केला. पण यमाजी प्रतिनिधींचा आश्रित पडल्यानें व 'आपल्या

धन्याच्या मुलांमाणसांपासून तों तहत गुरांढोरांपर्यंत प्रत्येकाची खुषामत करणें हें आपलें कर्तव्यच केवळ नव्हे, तर आपल्या भाग्योदयाचा राजमार्ग आहे' अशी त्याची ठाम समजूत असल्यानें त्यानें त्या आपल्या पेशाला साजेशी अक्काची समजूत घालण्याचा प्रयत्न केला, " उगी रहा तूं अक्का ! त्या चटोर पोरींना आपण पकडून आपल्या गोठ्यांत शेण भरावयाला लावूं, मग तर झालें ! पिलाजी व मल्हारी तसे मग्रूर व त्यांच्या बायका ह्या शिंच्या अशा मग्रूर ! पेशव्यांच्या ताटाखालचीं हीं मांजरें फार माजलीं आहेत. पण आतां पेशव्यांचें ताट जाग्यावर राहील तर त्याखालच्या ह्या मांजरांची प्रतिष्ठा राहील ना ? "

राधाबाईला असल्या कज्जेकफावती मनापासून आवडत नसत. तिनें चटकन् विषय बदलला, " यमाजीअप्पा ! आमच्या अक्काला योग्य असा एखादा नवरा मुलगा शोधून काढण्याची कामगिरी मी तुमच्यावर सोंपवित्यें बरें ! "

इकडे राधाबाई व यमाजी यांच्यांत अक्काच्या लग्नाच्या अशा वाटाघाटी चालल्या होत्या, तों जवळच अक्का, ताई, परशराम हीं मुलें खेळत होतीं त्यांच्यांतही तोच विषय निघाला. हें थोरांचें अनुकरण लहानांनीं केलें. पण त्या अनुकरणाची अवस्था 'करायला गेली गणपती व झाला मारुती' अशी झाली ! अक्काला चिडविण्यापुरताच ताई व परशराम यांनीं त्या संधीचा फायदा करून घेतला. अक्का चिडली, अंमळशानें रडली, व आणखी अंमळशानें तिचा राग अनावर होऊन तिनें ताईच्या श्रीमुखांत भडकावण्यालाही कमी केलें नाहीं. त्यांचें भांडण मिटवितां मिटवितां राधाबाईला पुरेवाट झाली. अखेर घरांतली एक कुणबीण ताईला घेऊन बाहेर आंगणांत गेली.

ह्या गोष्टीला थोडा वेळ होतो न होतो तों दिवेलावणीच्या समयीं ताई आंगणांतून आंत राधाबाईपाशीं धावत आली व उत्सुकतेनें सांगूं लागली, " अग आई ! बाहेर बघ काय गम्मत आहे ! "

" काय गंमत आहे ? " राधाबाईनें विचारलें.

" एका भल्या मोठ्या लठ्ठ माणसावर बसून एक घोडा आपल्या दारीं आला आहे ! " ताई हर्षून उत्तरली.

प्रथम ताई पोरसवदा कांहीं तरी बोलते आहे असेंच सर्वांना वाटलें. पण असें आहे तरी काय, तें पहाण्यासाठीं यमाजी बाहेर येतो तों खरेंच ! त्याच्या परिचयाचा

नागोजीभट्ट भल्या मोठया घोड्याला खांद्यावरून खालीं ठेवतांना त्यानें पाहिला.

"नागोजीभट्ट ! हें रे काय ?" यमाजीनें विचारलें.

नागोजीभट्ट प्रथम त्या घोड्याला मांडवाच्या एका मेढीशीं अडकवून ठेवून नंतर आपलें अंग झाडीत यमाजीसमोर येऊन म्हणाला, "यमाजीनें सांगितलें कीं, पिलाजीचा घोडा पंताच्या गोटांत पळवून ने, तो घोडा मी घेऊन आलों."

"पण तो असा पाठीवर घेऊन ?" यमाजीनें कुतूहलानें राधाबाईला हांक मारून म्हटलें, "वहिनी ! बाहेर येऊन ही गम्मत जरा पहा तरी !"

राधाबाई व तिच्या मागोमाग सर्व मुलें, कुणबिणीसुद्धां धावत बाहेर आल्या. प्रथम कांहीं गम्मत त्यांच्या ध्यानीं येईना. पण यमाजीनें जेव्हां नागोजीभटानें घोडा पाठीवरून आणला असें सांगितलें, तेव्हां सर्वांनीं आश्चर्यानें तोंडांत बोटें घातलीं !

"कोण हो हा ?" राधाबाईनें विचारलें.

"हा आमच्या ओळखीच्या एका भटजींचा मुलगा आहे." यमाजी उत्तरला.

"बाई ! बाई ! बाई ! यानें एवढें मोठें जनावर उचलून पाठीवरून आणलें तरी कसें ?" अक्का म्हणाली.

"नागोजीभट्ट ! असें कसें झालें रे ?" यमाजीनें विचारलें.

नागोजीभटानें पोवाडेगायनापासून तो घोडा पुढें पळविण्याची आवश्यकता कां भासली एथवरची सर्व हकीकत संगतवार सांगितली. त्यांत अर्थातच पिलाजीच्या कडेलोटाची बाब आलीच. यमाजी राधाबाईला म्हणाला, "वहिनी ! मघांशीं त्या कमळा व गौतमा अक्काची कुचेष्टा करीत होत्या ना, त्यांतल्या कमळेचा हा पिलाजी नवरा."

यमाजीच्या ह्या सांगींतील गर्भितार्थ 'कमळेच्या नवऱ्याची अशी वाताहात उडाली, छान झालें' असें म्हणण्याचा होता. राधाबाईनें तें ओळखलें. पण तिला एकंदरींत झाला हा प्रकार कांहीं रुचला नाहीं. ती म्हणाली, "म्हणून काय झालें! त्या पोरीच्या जन्माचें वाटोळें झालें ना ?"

"वाटोळें झालें म्हणजे ? तसाच तो मल्हारी हातीं लागला पाहिजे ! म्हणजे त्याचीही अशीच खाशी चांदी आटवून टाकतों. हरामखोर लेकाचे आमच्या अक्काची थट्टा करतात काय ?" यमाजी म्हणाला.

असला खुनशीपणा राधाबाईसारख्या सात्त्विक वृत्तीच्या सतीला कसा रुचणार !

ती यमाजीला म्हणाली, “ यमाजीअप्पा ! असें वड्याचें तेल वांग्यावर काढणें बरें नव्हे.”

यावर यमाजी उत्तरला, “ वहिनी ! हें राजकारण आहे. तुम्हांला तें कळावयाचें नाहीं.”

“ हें राजकारण कसलें डोंबलाचें ? ” असें राधाबाई आपल्या मनाशीं म्हणाली. यमाजीच्या बोलण्यानें तिचें समाधान झालें नाहीं. पण यमाजीला अशा खलप्रवृत्तीपासून परावृत्त करण्याचें सामर्थ्य आपल्या अंगीं नाहीं, हें ओळखून ती गप्प बसली.

यमाजीनें नागोजीभटाला विचारलें, “ पण काय रे नागोजीभट्ट ! तूं एवढा मोठा झालास अजून तरी तुला घोड्यावर बसतां येत नाहीं का ? ”

“ तसें बसतां येतें; पण चांगलेंसें बसतां येत नाहीं. तशांत हा घोडा पाहिला तो फारच नाठाळ. मी किल्ल्यावरून निघालों तो याच्यावर स्वार होऊनच निघालों. पण थोड्याशा अंतरावर मी येतों तोंच त्यानें उड्या मारून मला उलथून टाकण्याचा आव आणला ! मनांत म्हटलें कीं, आतां काय करावें ? ह्याला तसेंच वाटेंत सोडून द्यावें तरी पंचाईत. अखेर घेतलें त्याला उचलून पाठीवर आणि काय ! ” नागोजीभट्ट म्हणाला.

सर्वांना नागोजीभटाच्या ताकदीचें कौतुक वाटलें. थोडा वेळ विश्रांति घेऊन नागोजीभट्ट माघारा किल्ल्यावर निघाला तेव्हां यमाजीनें त्याच्यापाशीं गमाजीला निरोप सांगितला, “ नागोजीभट ! गमाजीला सांग, कीं आतां घरीं जातांना मला भेटून जा. आणि तुझें जेवण व्हावयाचें आहेना ? ”

“ होय. ” नागोजीभट्ट उत्तरला.

“ मग तो जेवूनच कां जाईना ! दमून आला आहे तो, त्याला म्हणावें जेवूनच मग किल्ल्यावर जा. ”

“ मी गमाजीबरोबर घरीं जेवावयाला जाणार आहें.” नागोजीभट्ट म्हणाला.

“ मग त्या दोघांनाही आज आमच्याच घरीं जेवायला येऊं दे ना परते ! ” राधाबाई म्हणाली, “ आणि यमाजीअप्पा ! तुम्हीही इथेंच जेवा.”

राधाबाईला त्या यःकश्चित् भिक्षुकाविषयीं इतकी कींव अथवा आपुलकी वाटण्याचें कारण यमाजीनें तर्कानें ओळखून नागोजीभटाला तिच्या इच्छेप्रमाणें गमाजीसह जेवायला यावयाला सांगितलें. नागोजीभटाला त्यांत कांहीं विशेष वाटलें नाहीं. तो हो म्हणून वाटेला लागला. त्याला त्यांत विशेष तें काय वाटणार ! बोलून

चालून भिक्षुक तो, व असा गरीब भिक्षुक म्हणजे परान्नपुष्टतेचा मूर्तिमंत पुतळा असावयाचा. पण यमाजीला मात्र तें थोडेंसें चमत्कारिक वाटलें. त्याला संशय आला, 'राधाबाईच्या मनांत हा बजरंग आपला भावी जांवई व्हावा अशी इच्छा तर नसेल ना ?'

वरवर दिसावयाला यमाजीच्या तर्काची ही भरारी कोणाला अगदींच अचरट-पणाची व अशक्य कोटींतील वाटेल; पण यमाजी असल्या अशक्य गोष्टी अकारण गृहित धरण्याइतका अचरट नव्हता. तो चांगलाच बुद्धिवान् होता. एरव्हीं त्याला श्रीपतरावानें आपला उजवा हात मानून कां वागविलें असतें ! आतां, त्याची बुद्धि नेहमीं कुटिल मार्गानें चाले हें खरें; पण एरव्हीं त्याचा श्रीपत-रावापाशीं जम बसताच ना. तो जरी तर्कभाषा पढलेला नसला, तरी त्याला उपज-तच तर्कशास्त्राचें व्यवहारोपयोगी ज्ञान पुरेपूर होतें. श्रीपतरावाला त्याच्या मोठ्या मुलीच्या लग्नाविषयीं अलीकडे चिंता लागून राहिली होती, ह्या मुलीला शोभणारा धडधाकट जांवई शोधावा तरी कुठें ! अक्काबाई तेव्हां जरी सारी दहाअकरा वर्षांची होती, तरी तेव्हांच्या रूढीप्रमाणें ती गळ्याला लागलेली होती. तेव्हां मुलींचीं लग्नें पांचव्या, सहाव्या किंवा सातव्या वर्षींच होत. तशांत अक्का ही फारच उफाड्याची मुलगी असल्यानें आज तीन-चार वर्षें तिच्यासाठीं वरसंशोधन चाललें होतें, तरी कोठेंच कांहीं जमेना. त्यांतूनही एखादा तोडीस तोड मुलगा आढळलाच तर गोत्रांच्या चांचणींत तो गळावयाचा, किंवा तो हातीं लागला तरी त्याला ही मुलगी करून घेण्याला त्या मुलाचीं आईबापें तयार नसावयाचीं ! सुखवस्तु व इभ्रतदार घराण्यांत कोणी मुलगा मिळेना तेव्हां श्रीपतरावानें आपल्या पत्नीच्या मतानें असाही शोध चालविला होता कीं, एखादा गरीब व ज्याला लोकांत अथवा राजदरबारीं फारसा मान नाहीं पण जो कुलीन व शरिरानें अक्काला नवरा शोभण्याजोगा धट्टाकट्टा आहे, असा एखादा मुलगा सांपडला तरी त्याच्याशीं अक्काचें लग्न करून द्यावयाचें व मग आपल्या मुलीसाठीं त्याला चारदोन लाखांची जहागीर तोडून द्यावयाची.

यमाजीला श्रीपतरावाचा हा बेत माहीत होता, व त्यानें यमाजीला देखील 'असा एखादा मुलगा आढळांत आल्यास पहा' असें सांगितलें होतें. यमाजीच्या मनांतून आपल्या गमाजीलाच ही मुलगी करून घेण्याचें होतें. कारण त्या निमित्तानें भली मोठी जहागीर अनायासें त्याच्या पदरीं पडली असती. पण यमाजी हा आपला हस्तक म्हणून असो, त्याचें गोत्रांत जमेना म्हणून असो, कीं आणखी कांहीं

कारणामुळें असो; श्रीपतराव व राधाबाई ह्या दोघांनींही त्या बाबतींत आजवर मौन धरलें होतें.

'वहिनींच्या मनांतून नागोजीभटाला जांवई करावयाचा आहे कीं काय' अशा यमाजीच्या तर्काचें मूळ वर दर्शविल्याप्रमाणें होतें. तशांत नागोजीभट्ट गेल्यावर राधाबाई जेव्हां जास्त आस्थापूर्वक त्याची चौकशी करूं लागल्या, तेव्हां तर यमाजीच्या संशयाला दुजोरा मिळाला.

"यमाजीअप्पा! ह्या नागोजीचें लग्न झालें आहे का हो?" राधाबाईनें विचारलें.

"नाहीं." यमाजी उत्तरला.

"तो घरचा अगदींच गरीब असेल! भिक्षुकीवरच याच्या कुटुंबाचा निर्वाह चालतो ना?"

"होय. त्याच्या घराण्यापाशीं संपदा काय ती शरीरसंपदा."

"पण घराणें एरव्हीं कुलीन आहे ना?"

"होय."

"आणि कुटुंब केवढेंसें आहे?"

"बरेंच मोठें आहे."

"असला मुलगा आमच्या अक्काला मिळाला तरी चालेल. गरिबी काय, आम्हांला दूर करतां येईल. पण जोडा फार छान दिसेल नाहीं?"

यमाजी यावर नुसता हंसला.

राधाबाईनें त्या हंसण्याचा अर्थ ओळखला व आपल्या मुखावाटे निघालेले शब्द सांवरून घेतले, "म्हणजे मी कांहीं आजच अक्काचें लग्न ठरवीत नाहीं हो! आपलें उगाच म्हटलें. पण एक ध्यानांत ठेवण्याजोगें स्थळ आहे, नाहीं?"

"जसें तुम्हां दोघांच्या मर्जीला येईल तसें!" यमाजी म्हणाला. त्याच वेळीं त्यानें मनांतल्या मनांत उद्गार काढले, "ह्यांना माझा सोन्यासारखा मुलगा जांवई नकोसा झाला, व हा भीमसेनी भिक्षुक मात्र आवडला!" गौतमा बोलली "त्यांत गैर तें काय झालें? यांनादेखील हा हाणमोबाच आवडणारसें दिसतें."

आणखी बराच वेळ ह्या गोष्टीवर राधाबाई व यमाजी यांच्यांत आडपडद्यानें भवति न भवति चालली होती. इतक्यांत गमाजी व नागोजीभट्ट तेथें आले. भोजनाची तयारी होतीच. आज नागोजीभट्ट जेवावयाचा म्हणून राधाबाईनें त्याच्या देहाच्या मानानें भात, पोळी वगैरे अन्न शिजविण्याविषयीं स्वयंपाकिणीला अगोदरच

सूचना दिली होती; म्हणूनच केवळ अन्नाला तोटा आला नाहीं. इतरांना नागोजी-भटाचा प्रशस्त आहार पाहून 'हा माणूस आहे कीं बकासुर आहे' अशी दुग्धा पडली असेल; पण राधाबाईला मात्र तें पाहून खरेंखुरें समाधान वाटलें. तिनें बोलून दाखविलें नाहीं; पण मनांतल्या मनांत मात्र म्हटलें, " माझ्या अक्काला हा नवरा शोभेल. आतां उद्यां घरीं येणें झाल्यावर त्यांच्यापाशीं गोष्ट काढायला हवी."

जेवणखाण आटोपल्यावर यमाजी, गमाजी व नागोभट्ट किल्ल्यावर घडलेल्या प्रकाराविषयीं गोष्टी बोलत सदाशिवपुऱ्यांतील आपल्या रहात्या घरीं जावयाला निघाले. जातांना पिलाजीचा घोडा इथेंच ठेवावयाचा कीं बरोबर न्यावयाचा या-विषयीं थोडीशी वाटाघाट होऊन अखेर असें ठरलें कीं, त्याला बरोबर न्यावें. यावेळीं गमाजीनें नागोजीभटाची त्याला तो घोडा आवरतां येईना म्हणून थट्टा करून स्वतः त्यावर आरोहण त्याला करून घरीं नेण्याचें ठरविलें. यमाजीनें त्याला नीट समजावून सांगितलें, " गमाजी ! जनावर फार नाठाळ दिसतें. जरा संभाळून बैस."

गमाजी घोड्यावर स्वार होऊन त्याला टांच मारतां मारतां उत्तरला, " मी कांहीं नागोजी नव्हे ! "

यावर नागोजीभट्ट उत्तरला, " नागोजीला जरी घोड्यावर बसतां आलें नाहीं, तरी त्याला खांद्यावरून एथवर आणतां तरी आलें."

गमाजी जातां जातां उत्तरला, " तें खरें; पण नागोजीवर स्वार होऊन एथवर येणाऱ्या घोड्यावर मी स्वार झालों आहें. नागोजीभट्ट नुसतें शरीर कमावून बसला आहे; पण मी अश्वारोहणाचें कौशल्य कमावून बसलों आहें."

गमाजीची टांच बसतांच घोडा चौफेर चौक टाकीत पळूं लागला. यमाजी व नागोजीभट्ट हे उगवत्या चांदण्यांतून गप्पा मारीत पायींच चालू लागले. ते घरीं येऊन पहातात तों तेथें अजून घोडा किंवा गमाजी यांपैकीं कोणींच येऊन पोंचलें नव्हतें. त्यांना प्रश्न पडाला कीं, असें कसें झालें ?

## प्रकरण पांचवें

# अपरात्रीं

आतां गमाजीचा शोध लावण्यापूर्वी आपणाला अदालतीच्या अर्थात् पेशव्यांच्या वाड्यांत बाजिरावाच्या शय्यामंदिरांत बुरखा घेऊन आलेली ती स्त्री कोण होती व ती तेथें कशासाठीं आली होती हें पहावयाचें आहे.

ती स्त्री बाजिरावासमोर उभी होती; पण बाजिरावाला कांहीं तिची ओळख पटेना. तीही कांहीं बोलेना. ती सारखी बाजिरावाकडे टक लावून पहात होती. पहिल्या पहिल्यानें श्रीमंत आपणावर रागावतील कीं काय ह्या भयानें तिची थोडीशी गाळण उडाली होती. पण श्रीमंतांच्या चर्येवर रागाची छटा मुळींच दिसली नाहीं, उलट कुतूहलात्मक निगूढ भावनांची मनोल्हादक हिरवळ तेथें रुजलेली पहावयाला सांपडली; तेव्हां तिची तिला खात्री पटली कीं, आपलें अशा अपरात्रीं एथें चोरून येणें कांहीं अगदींच अस्थानीं झालें नाहीं. इतका धीर आल्यावर तिच्या गुलाबी गालांवर अनुरक्ततेची नवी लाली खुलूं लागली व अंतःकरणांत उसळलेल्या स्मित-हास्याच्या मुग्ध लहरींचें दहिंवर पिऊन प्रफुल्ल होऊं पहाणाऱ्या कुंदकळ्यांप्रमाणें मधूनमधून तिची सुमनोहर दंतपंक्ति तिच्या पोंवळ्यांसारख्या लाल ओंठांबाहेर डोकावून पाहूं लागली.

असा कांहीं वेळ गेला तरी कोणीच कांहीं बोलेना. अखेर ती स्त्री आपण होऊन बोलती झाली, "आपण मला ओळखलें नाहीं का?"

"नाहीं. मी तुम्हांला नीटसें ओळखलें नाहीं." बाजीराव म्हणाला. प्रथम 'तुला' असें एकवचनी संबोधन उपयोगांत आणावें असें बाजीरावाच्या मनांत होतें; पण ती समोरची स्त्री कोणी दासी नसून दासीहून थोर अशी कोणीतरी स्त्री असली पाहिजे व तसें असल्यास तिला एकवचनानें संबोधिल्यानें तिचा अपमान होईल ह्या विचारानें त्यानें तिला बहुवचनानें संबोधिलें.

"आपण गेल्या नवरात्रांत कऱ्हाड येथें पंतांच्या कोटांतील उत्सवांत आलां होतां ना?"

"होय."

"तेव्हां आपण यजमानांपाशीं कुणा कलावंतिणीची वाखाणणी केल्याचें आपणांला आठवतें का?"

"हो! आठवतें." बाजीराव नक्की असें कांहींच न आठवतां केवळ अनुमान-धक्क्यानें उत्तरला.

"मग तीच मी नव्हे का?"

"पण मग तूं इकडे कुठें?"

"तें मी सांगत्यें. पण त्या वेळीं मीं आपणांला कृतज्ञतापूर्वक मुजरा केलेला आपणाला आठवतो का?"

"आठवतो. पण तुझें नांव काय?"

"माझें नांव लक्ष्मी."

"मग थोड्या वेळापूर्वीं मला एक पत्र व एक आंगठी आणून देणारी दासी ती कोण?"

"ती माझी दासी."

"तिचें नांव काय?"

"तें सारें मी आपल्याला सांगत्यें. पण त्यापूर्वीं मला आपणापासून अभय पाहिजे आहे."

"पण माझ्यापासून तुला भय कोणतें आहे, तें अभय देऊं?"

"नाहीं-पण मला अभय पाहिजे आहे."

"बरें; तुला अभय आहे."

"मघाशीं आपणाकडे पत्र घेऊन आली, ती महाराजांकडून मला मिळालेली नवी दासी नूरनिहार आहे."

"नूरनिहार? म्हणजे किल्ल्यावरची कुणबीण?"

"होय."

"बरें; पण—"

"सांगत्यें. आपण आतां काय विचारणार तें मला माहीत आहे. आपण आतां माझ्या स्वतःविषयीं विचाराल, तर मी प्रतिनिधींच्या पदरीं होतें हें आपणांला माहीतच आहे. त्यानंतर नुक्ती परवां—दहाबारा दिवसांपूर्वीं प्रतिनिधींनीं मला महाराजांच्या सेवेंत अर्पण केली; तेव्हांपासून मी रंगमहालांत राहूं लागल्यें आहें."

"बरें; पण त्या पत्राचा अर्थ काय?"

"त्या पत्राचा अर्थ—प्रातिनिधि आपणांला पाण्यांत पहातात हें आपणांला माहीत आहेच. त्या दिवशीं नवरात्रांत मीं आपणांला समक्ष पाहिलें; त्यापूर्वीं मी आपल्या

सौंदर्याची व पराक्रमाची बोलबाला ऐकत होत्यें त्याची साक्ष माझ्या मनाला त्या दिवशीं पटली. तेव्हांपासून मला वाटत होतें कीं, आपल्या सेवेंत माझा जन्म जावा. त्या गोष्टी होणें जाणें परमेश्वराधीन आहे. पण तेव्हांपासून मीं मनानें आपल्या चरणांपाशीं माझ्या जिव्हाळ्याच्या आपुलकीचा नंदादीप तेवता केला आहे. मी परवांपर्यंत प्रतिनिधींच्या सेवेंत होत्यें तरी आपलेंच चिंतन करीत होत्यें, व आतां मी महाराजांच्या* सेवेंत रुजू झाल्यें आहें तरीदेखील मी आपलीच आहें. आपलें कल्याण जेणेंकरून होईल अशी कोणतीही गोष्ट करण्याला मी अहोरात्र एका पाया-वर तयार असत्यें. आपणाला कदाचित् हें मानवणार नाहीं. मी अशानें प्रतिनिधींशीं किंवा महाराजांपाशीं बेइमान होत आहें असा आपणांला संशय येण्याचा संभव आहे. पण इथें तसें कांहीं नाहीं. प्रतिनिधींचें अथवा महाराजांचें जरादेखील अकल्याण व्हावें अशी माझी मुळींच इच्छा नाहीं. पण त्यांच्या अथवा दुसऱ्या कोणाच्या हातून आपलें अकल्याण होत असेल व तें मला टाळतां येण्याजोगें असेल तर तें टाळणें हें मात्र मीं माझें पवित्र कर्तव्य समजतें. ह्याच कर्तव्याच्या जाणिवेनें मला मघांशीं तें पत्र लिहिण्याची व आतां इथें समक्ष येण्याची बुद्धि दिली."

"असें माझें कोणतें अकल्याण करण्याचें महाराजांच्या अथवा प्रतिनिधींच्या मनांत आहे ?"

"महाराजांच्या मनांत आपलें अकल्याण करण्याची बुद्धि नाहीं. पण महाराज अलीकडे हरएक बाबींत प्रतिनिधींच्या तंत्रानें वागतात हें आपण जाणतांच."

"बरें मग ?"

"आणि महाराज कांहींसे भोळे, बरेचसे चंचल व संशयी आहेत त्यामुळें प्रति-निधींसारख्या कारस्थानी माणसांना महाराजांवर छाप पाडून स्वतःचीं कारस्थानें सिद्ध करायला फावतें. प्रतिनिधि तसे फार चतुर आहेत. कुणाला कसें वश करावें हें त्यांना फार छान कळतें. त्यांनीं या वेळीं महाराजांवर वजन पाडण्यासाठीं मला महाराजांच्या सेवेंत अर्पण केली, हें मी न सांगतांही आपणाला कळण्याजोगें आहे. पण ह्या गोष्टीचा आतां प्रामुख्यानें उल्लेख करण्याचें कारण परमेश्वर आपला पाठी-राखा असल्यामुळेंच मला या वेळीं महाराजांचा आसरा मिळाला."

"तो कसा काय ?"

---

* शाहूमहाराजांच्या अनेक रक्षांत लक्ष्मी ह्या नांवाची एक रक्षा असल्याचा ऐतिहासिक पुरावा उपलब्ध आहे.

"तों असा. प्रतिनिधींचा माझ्यावर मूळपासूनचा विश्वास व महाराजांची माझ्या ठायींची आवड, म्हणून महाराजांच्या रंगमहालांत आल्यापासून प्रतिनिधि व महाराज यांचीं गुप्त कारस्थानें सुरू असतांना देखील मला तिथें प्रवेश मिळतो. असेंच एक भयाण कारस्थान महाराजांच्या भोळेपणाचा फायदा घेऊन प्रतिनिधींनीं नुक्तें परवांच पार पाडल्याचें मीं समक्ष पाहिलें आहे."

"तें कोणतें ?"

"आपणांला पेशवाईपदाचीं वस्त्रें घेण्यासाठीं येण्याविषयीं महाराजांचें जें आज्ञापत्र आलें आहे, त्यावर महाराजांची स्वाक्षरी आहे का ?"

"नाहीं. असें आज्ञापत्र मला मुळींच आलेलें नाहीं."

"मग कोणतें आलें ?"

"मला पत्र आलें तें प्रतिनिधींच्या—सहीशिक्क्याचें. प्रतिनिधींनीं महाराजांच्या सांगण्यावरून लिहिलेलें पत्र आलें आहे."

"इथेंच घोंटाळा आहे. महाराजांची सर्व कारभाऱ्यांशीं आपणांला पेशवाईचीं वस्त्रें देण्याबद्दल बरीच वाटाघाट झाली व सर्वानुमतें आपणालाच पेशवाईचीं वस्त्रें द्यावीं असें ठरून त्याप्रमाणें महाराजांनीं प्रतिनिधींना सांगून आज्ञापत्र लिहविलें आणि त्यावर स्वाक्षरी केली, हें सर्व मीं माझ्या डोळ्यांनीं पाहिलें आहे."

"तर मग तें आज्ञापत्र काय झालें ?"

"तें कांहीं मला माहीत नाहीं. पण प्रतिनिधींच्या तेव्हांच्या एकंदर हालचाली ज्या माझ्या नजरेला आल्या, त्यांवरून प्रतिनिधींच्या कुटिल कारस्थानांवर कांहींसा प्रकाश पडण्यासारखा आहे. मी आणि नूरनिहार अत्यंत बारकाईनें पहात होतों,—प्रतिनिधींनीं पुष्टिपत्रावर तें आज्ञापत्र ठेवून त्यावर मधोमध्य एक रेशमी फीत कागदाच्या आधारासाठीं म्हणून गुंडाळून तें आज्ञापत्र महाराजांपाशीं सहीला आणलें. महाराजांनीं त्यावर स्वाक्षरी केली व लगेच प्रतिनिधींनीं बाजूला वळून पुष्टिपत्रावरील फीत सोडून कसलेसे दोन कागद बाहेर काढून घेतले. त्यांतला एक निखालस कोरा व लांब होता व त्यावर महाराजांची स्वाक्षरी होती. दुसरा जो आज्ञापत्र म्हणून होता तो आंखूड होता व त्यावर अर्थातच महाराजांची स्वाक्षरी झाली नाहीं. त्यावरून मीं ओळखलें कीं, प्रतिनिधींनीं महाराजांना चकविलें. त्यांनीं पुष्टिपत्रावर एक सबंध कोरा कागद व त्याच्यावर आज्ञापत्र म्हणून एक अर्धवट लहान कागद ठेवून हे दोन कागद आहेत हा खरा प्रकार गुप्त राखण्यासाठीं दोन्ही

कागदांचे सांधे फितीखालीं झांकून टाकले. आणि महाराजांची स्वाक्षरी घेतली ती कोऱ्या कागदावर घेतली."

"आणि त्या कोऱ्या कागदाचें पुढें त्यांनीं काय केलें ?"

"कोण जाणे! पण ह्या एकंदर प्रकारावर माझी नजर होतीच. थोडया वेळानें प्रतिनिधि वाडयाबाहेर पडले तेव्हां मीं नूरनिहारला ते कुठें जातात तें पाहून येण्यासाठीं त्यांच्या मागोमाग पाठविलें. तिनें प्रतिनिधि खतिबांच्या घरीं गेल्याचें मला येऊन सांगितलें. मी रंगमहालांत आल्यापासून पहातयें आहें; रामदासपंत व हकीम महंमदअल्ली या नांवाचे कोणी दोघे माणूस निजामाकडून महाराजांपाशीं राजकारणाच्या बाबतींत कसल्याशा वाटाघाटी करण्यासाठीं इकडे आलेले आहेत. त्यांपैकीं हकीम खतिबांच्या घरीं पाहुणा म्हणून उतरला आहे, व सुमंत, प्रतिनिधि वगैरे बडीं बडीं धेंडें आतांशा खतिबांच्या घरीं वेळीं अवेळीं कांहींना कांहीं खलबतें करीत बसलेलीं असतात. ज्या दिवशीं हा प्रकार झाला, त्या दिवशीं कोल्हापुराकडची कांहीं पाहुणेमंडळीही खतिबांच्या घरांतच जमली होती असेंही मला नूरनिहारनें येऊन सांगितलें."

लक्ष्मीच्या तोंडून ही बातमी ऐकून बाजीराव क्षणभर किंकर्तव्यमूढ झाला. थोड्या वेळापूर्वीं राणोजीनें खतिबांच्या घरीं सुमंत, रामदासपंत वगैरे मंडळी जमून खलबतें करीत असल्याची बातमी आणली होती. शिवाय पुरंदरे व चिटणीस यांच्या तोंडूनही हीच बातमी याहीपेक्षां निश्चित स्वरूपांत ऐकावयाला मिळाली होती. 'त्या खलबतांशीं प्रतिनिधींच्या ह्या कारवाईचा तर कांहीं संबंध नसेल ना' अशी जबरदस्त शंका बाजिरावाला आली. 'कदाचित् सुमंत वगैरे मंडळी जी उदयीक औरंगाबादेकडे जावयाची आहे, ती ह्याच कामासाठीं जावयाची नसेल ना' असाही एक प्रश्न त्याच्यासमोर उभा राहिला. त्यानें लक्ष्मीला विचारलें, "तुम्हांला प्रतिनिधींच्या हालचालींचा यापेक्षां कांहीं निश्चित सुगावा लागला का ?"

"यापेक्षां निश्चित बातमी काढण्याचाही मी उद्यां प्रयत्न करून पाहीन." लक्ष्मी म्हणाली.

"तो कसा काय ?"

"ही माहिती आपणांला खतिबांच्या मुलीकडून कळण्याजोगी आहे."

"कुणाकडून ! मस्तानीकडून ?"

"होय."

" हो ! तिच्याकडून मात्र ही माहिती मिळण्याजोगी आहे खरी."

" हें आपण खरें कशावरून धरतां ? "

लक्ष्मीच्या ह्या प्रश्नाला बाजीराव नीटसें उत्तर देऊं शकला नाहीं. तो बोलला तें सकारण बोलला; पण तें साक्षीपुराव्यानें सिद्ध करतां येण्याजोगें नव्हतें, किंवा उघड उघड बोलून दाखवितां येण्याजोगेंही नव्हतें. मस्तानी बाजिरावाच्या चांगली परिचयाची होती. त्याला तिनें बरेंच मोहित करून सोडलेलें होतें. पण त्या मोहाची पापाचारांत गणना करतां येईल इतका तो मोह मलिन नव्हता. बाजिरावाला मस्तानीचा मोह पडला होता असें म्हणण्यापेक्षां मस्तानीनें आपल्या सर्वांगसंपन्न लावण्यानें बाजिरावाला मोह पाडला होता असेंच म्हणणें जास्त सयुक्तिक दिसेल. पण त्याबद्दल मस्तानीलादेखील दोष देतां येण्याजोगा नव्हता. तिच्या अंतःकरणांत बाजिरावाविषयीं अभिलाषबुद्धि निःसंशय वसत होती खरी; पण पापवासनेपासून मस्तानीदेखील धुतलेल्या तांदुळासारखी पवित्र होती. असें कसें ? बाजीराव व मस्तानी यांची एकमेकांच्या ठायीं अभिलाषबुद्धि होती पण पापबुद्धि नव्हती असें कसें ? असा एक नाजुक प्रश्न एथें प्रत्येकाच्या अंतःकरणांत उत्पन्न होणें शक्य आहे. त्याचें कारण असें कीं, सुंदर व संग्राह्य वस्तूविषयीं प्रेम कोणाला वाटत नाहीं? सौंदर्योपासना हा जीवमात्राचाचसा काय, वस्तुमात्राचाही स्वभावधर्म आहे. सुंदर पुष्पांना पाहून भृंगासारखे मानवेतर जीवही मोहित होतात व हिरा-माणिक-मोतीं अशीं अमोल रत्नेंही सुवर्णाच्या कोंदणांत बसून विलासी युवयुवतींच्या अंगाखांद्यावर लोळण्यासाठीं भूगर्भांतून किंवा समुद्रगर्भांतून बाहेर येतात. सुंदर वस्तु कोणाला हवी हवीशी वाटणार नाहीं ! त्यांतून तें सौंदर्य सर्वांगसंपूर्ण—गुणसौंदर्य, बुद्धिसौंदर्य, रूपसौंदर्य अशा त्रिविध रूपांनीं संपन्न असेल तर ती सर्वसुंदर, सर्वज्ञ व सर्वसमर्थ अशा परमेश्वराची सगुणमूर्ति होय असेंच म्हटलें पाहिजे. हीं तिन्ही सौंदर्यें पृथक् पृथक् दृग्गोचर झालीं म्हणजे त्यांतील उत्तमता, मध्यमता व अधमता असे त्यांचे तीन विभाग पडतात व ते भिन्न स्वरूपांत उपकारक अथवा अपकारक ठरतात. कुचल्याचें फळ काय कमी सुंदर असतें ! पण त्या फळाच्या पोटीं विष असतें, म्हणून त्या सौंदर्याची कोणाला मातब्बरी वाटत नाहीं. सर्पाची कान्ति किती सुंदर असते ! पण तें सौंदर्य विघातक असतें. रूपसुंदर स्त्रीपुरुषें वृत्तीनें अधम असूं शकतात, गुणसुंदर स्त्रीपुरुषें रूपसुंदरतेच्या अभावींही आदरणीय वाटतात, व रूपसुंदर नसलेलीं माणसेंही बुद्धिसुंदर असूं शकतात. अशा ह्या त्रिविध सौंदर्याचें निधान बाजीराव आहे अशी मस्तानीची खातरजमा

झाल्यामुळेंच ती त्याच्यावर अनुरक्त झाली होती. ती स्वतःदेखील जशी अप्रतिम सुंदर तशीच फार चतुर व गुणी मुलगी होती. तिच्या गुणांची अगर बुद्धीची पारख करण्याची संधि बाजिरावाला आजवर कधीं फारशी मिळाली नव्हती; तरीही ती बरेच दिवस डोळ्यांसमोर असल्यानें तिच्या एकंदर चालचालणुकीवरून ती जशी रूपसुंदर तशीच गुणसुंदर व बुद्धिसुंदरही असावी अशी बाजिरावाची अटकळ होती. प्रफुल्ल असें गुलाबाचें फूल अगर पौर्णिमेचा निरभ्र चंद्र पाहून आल्हाद कुणाला होणार नाहीं ! तशीच बाजिरावाची मस्तानीविषयींची आवड होती. बाजिरावाची आपण इतकी आवडती आहों हें मस्तानीला माहीत असो किंवा नसो, बाजिरावाला मात्र पक्कें माहीत होतें कीं, मस्तानीचे आपण आवडते आहों. त्या तिच्या आवडींत म्हणजे पापवासना असेल असला अधम संशय बाजिरावाच्या मनाला आजवर कधींच शिवला नव्हता. मस्तानीचें जन्मरहस्य खतीब सांगे तें बाजिरावाला माहीत होतें. अशा कुलकन्येकडे बाजिरावासारखा नरवीर पापी दृष्टीनें कसा पाहील ! पण इतक्या खोलांत शिरून बाजीराव व मस्तानी यांच्या एकमेकांवरील प्रेमाची छाननी करीत बसण्यापेक्षां थोडक्यांत त्यांच्या एकमेकांवरील प्रेमाचें व एकमेकांच्या ठायींच्या आवडीचें वर्णन करावयाचें तर त्या प्रेमाला निर्मल गंगाजलाचीच उपमा दिली पाहिजे. त्या प्रेमावरून बाजिरावाची इतकी मात्र खात्री होती कीं, आपल्या हिताची एखादी गोष्ट करण्याची संधि मस्तानीला मिळाली तर ती वायां जाणार नाहीं; उद्यां मस्तानी आपणाला भेटली व आपण तिला आतांच लक्ष्मीनें ध्वनित केलेल्या कार-स्थानाविषयीं विचारलें तर तिला जेवढी म्हणून माहिती आहे तेवढी ती आपणाला बिनहरकत सांगेल.

पण लक्ष्मीदेखील आपणावर प्रेम करणारी एक स्त्री आहे, व तिचें प्रेम केवळ अव्यभिचारी नसेल अशी बाजिरावाची आतांच्या तिच्या एकंदर संभाषणावरून कल्पना झाली असल्यानें मस्तानीविषयीं इतकी आपुलकीची भाषा आपण बोलूं लागल्यास लक्ष्मीला तिच्याविषयीं हेवा वाटण्याचा संभव आहे, असें पाहून बाजीराव आपला विचारौघ एकदम आवरता घेऊन म्हणाला, " मस्तानी ही फार प्रेमळ मुलगी आहे. लहानपणापासून तिला मी पहातों आहें. तुमचा व तिचा जर परिचय असेल तर ती तुम्हांला खरी बातमी तेव्हांच देईल."

लक्ष्मीनेंही ह्या प्रश्नाचा जास्त कीस काढला नाहीं. तिनें मस्तानीकडून परस्पर माहिती काढून ती बाजिरावाला कळविण्याचें कबूल केलें. ती पुढें म्हणाली, " तसेंच

किल्ल्यावरील आणखीही कांहीं कारस्थानें ओळखतां आलीं तर पहावीं म्हणून मीं नूरनिहारला थोड्या वेळापूर्वीं किल्ल्यावर पाठविलें आहे. ती आल्यावर जर कांहीं विशेष आपणांला कळविण्याजोगें असलें तर मी कळवीन."

"तेवढें कराल तर तुमचे माझ्यावर फार उपकार होतील." बाजीराव म्हणाला.

"ह्यांत उपकार कसले? उलट अशा अडचणींच्या वेळीं आपल्या उपयोगीं पडण्याची सोन्याची संधि आपण मला आणून देत आहां याबद्दल मीच आपली ऋणी आहें. माझी इच्छा मूळपासून काय आहे हें मीं आतांच आपणांला निवेदन केलें आहे. मी याचक आहें; आपण दाते आहां!—"

एवढें बोलून लक्ष्मी एकाएकीं थबकली. आपण अतिप्रसंग केला कीं काय, असें तिला वाटलें. बाजिरावालाही तसेंच वाटलें. 'शाहूमहाराजांची रक्षा ही, ही माझ्या चरणीं सर्वस्वार्पण करूं म्हणते म्हणजे काय?' ह्या विचारानें तो विस्मयचकित झाला. त्याला मनापासून लक्ष्मीचें हें कृत्य रुचलें नाहीं. तेथल्या तेथें स्पष्ट शब्दांनीं तिचा धिक्कार करावा असेंही त्याला वाटलें. पण त्यानें आपला राग आवरून धरला. 'कामिनी ह्या सर्पिणींसारख्या केव्हां उलटतील याचा नेम नसतो, यास्तव त्यांच्याशीं फार जपून वागावयाला हवें' असें त्याचें मन त्याला सांगूं लागलें. लक्ष्मी आपली पापवासना व्यक्त करावयाला शरमली, त्याचा फायदा घेऊन बाजिरावानें नुसत्या स्मितहास्याच्या एक दोन लकेरींनीं तिला गारेगार करून सोडलें व तिच्या मुग्ध मनीषेला मुग्ध उत्तर दिलें, "लक्ष्मीबाई! मी तुमचे उपकार विसरणार नाहीं."

लक्ष्मी म्हणाली, "आपण पेशवे झाल्यावर मला—"

बाजीराव मध्येंच उद्गारला, "असल्या गोष्टींचा जास्त कीस काढावयाचा नसतो; त्या मनोमन ओळखावयाच्या असतात."

बाजीराव जें बोलला तें पूर्ण अनुरक्ततेचें द्योतक आहे अशींच उल्लूपणाच्या भरांत लक्ष्मीनें आपली समजूत करून घेतली. बाजिरावावर ती इतकी मोहित झाली होती कीं, या वेळीं बाजिरावानें तिचें मन न दुखवितां तिला असल्या दुर्वासनेपासून परावृत्त करण्याचा कितीही प्रयत्न केला असता तरी तिनें त्याचा अर्थ 'हा प्रियाराधनाचा प्रथम प्रवेश' असाच घेतला असता. मग 'असल्या गोष्टी मनोमन ओळखावयाच्या असतात' असें बाजीराव म्हणाला त्याचा तसाच गोड अर्थ तिनें घेतला, यांत नवल तें काय! 'आतां आपल्या इच्छेला व प्रयत्नांना यश येऊन एकदां बाजिरावाला पेशवाईचीं वस्त्रें मिळालीं, कीं आपणाला आपल्या अपेक्षेप्रमाणें त्याच्या पदरीं खास आसरा

मिळणार' असें मनोराज्य करीत लक्ष्मी बाजिरावाचा निरोप घेऊन बाहेर वाड्याबाहेर पडते न पडते, तोंच वाड्याच्या फाटकासमोर कोणी माणूस घोड्यावरून उतरतांना तिनें पाहिला. ती एकाएकीं थबकलेली पाहून बाजीराव तिला पोंचविण्यासाठीं आंगणांत आला होता तो आणखी अंमळ पुढें होऊन विचारूं लागला, "लक्ष्मी-बाई ! तुम्ही कां थबकलां ?"

लक्ष्मीच्या तोंडून ह्या प्रश्नाला उत्तर मिळण्यापूर्वींच त्या नव्या माणसानें प्रश्न केला, "बाजिरावसाहेब कुठें आहेत ?"

"कां, कोण आहे ?" बाजिरावानें पुढें होऊन विचारलें.

"पिलाजीची काय अवस्था आहे ?" त्या नव्या माणसानें प्रश्न केला.

"त्याचा तपास अजून लागला नाहीं. पण तूं कोण ?" बाजिरावानें पुन्हा विचारलें.

"मी भोजराज बारगळ."

"अस्सें ! भोजराजबाबा ! तुम्ही का ते ? या, असे सदरेवर या." असें म्हणून बाजीराव भोजराजाला घेऊन आंगणांतून आंत येऊं लागला. लक्ष्मी तुर्त्तीच फाटकाच्या बाहेर गेली होती नव्हती; तिला रंगमहालापर्यंत जाण्याला सोबत लागेल कीं काय असें त्याच्या मनांत येऊन त्यानें तिला विचारलें, "तुम्हांला सोबत देऊं का ?"

इतक्यांत थोड्या अंतरावर झाडाच्या सावलीखालीं उभी असणारी कोणी व्यक्ति आणखी चार पावलें पुढें येऊन हळूच उद्गारली, "बाईसाहेब ! सोबतीला मी आहें."

"कोण तें ?" लक्ष्मीनें उभ्या उभ्या हळूच विचारलें,

"अगदीं बोलूं नका. एथल्या झाडांझुडपांनादेखील कान असायचे!" उत्तर मिळालें.

लक्ष्मीनें ओळखलें कीं, हा आपल्या नूरनिहारचाच आवाज. आतां तिला अर्थातच निराळ्या सोबतीची आवश्यकता नव्हती. तिनें क्षणभर मागें वळून पाहून 'सोबत नको; मी जात्यें' असें बाजिरावाच्या प्रश्नाला उत्तर देऊन पुढचा पल्ला गांठला. बाजिरावानेंही ती बाब तेवढ्यावरच सोडली.

सदरेवर येतांच भोजराजानें बाजिरावाला प्रथम विचारलें, "रावसाहेब ! पिलाजीची काय खबर आहे ?"

"तेंच तर मला एक गूढ पडलें आहे. पिलाजी माझ्यापूर्वी सासवडाहून इकडे येण्याला निघाला, तेव्हांपासून ह्या वेळपर्यंत तो मला भेटला नाहीं. आमच्या साऱ्या लोकांची अटकळ होती कीं, तो इथें येतांच प्रथम आपल्या आवडत्या बायकोला भेटावयाला गेला असेल. दुसरी माहिती कांहीं गोंधळ्यांनीं थोडया वेळापूर्वी सांगि-तली, त्यावरून वाटतें कीं, किल्ल्यावर त्याला कांहीं तरी दगाफटका झाला असावा."

" तसेंच मला देखील वाटतें. " भोजराज म्हणाला, " कारण थोड्या वेळापूर्वी आम्हांला मोठ्या चमत्कारिक रतीनें तसें कळलें. "

" तें कसें काय ? "

" आपण आल्याची बातमी दिवेलावणच्या सुमारालाच आम्हांला कळली होती, म्हणून आपल्याबरोबर पिलाजीही आला असेल व आतां तो व मल्हारी असे घरीं येतील मग येतील अशी वाट पहात आम्ही चांदण्या रात्रीं आंगणांत गप्पा मारीत बसलों होतों. इतक्यांत पिलाजीचा घोडा धावत धावत नेमका आमच्या-समोर येऊन उभा राहिला. "

" हें मोठेंच आश्चर्य आहे ! " वाजीराव म्हणाला, " मला एवढें मात्र ओझ-ओझरतें कळलें कीं, यमाजीच्या मुलाशीं पिलाजीची किल्ल्यावर कांहीं बाचाबाची झाली व त्या लोकांनीं पिलाजीला किल्ल्याच्या दरडीखालीं लोटून दिलें. त्याचा घोडाही यमाजीच्या एका हस्तकानें माझ्या देखतच पळविला. पण तें मला मागाहून कळलें."

" पिलाजीची बायको घोडा घरीं आल्यापासून सारखी डोळ्यांना पदर लावून रडते आहे."

" रडणारच. पण तिला म्हणावें, तूं इतकी चिंता करूं नकोस. राणोजी व मल्हारी यांना मीं पिलाजीचा तपास करण्याला सांगितलें आहे. ते अजून घरीं आले नाहींत का ? "

" नाहींत."

" तुमची व त्यांची चुकामूक झाली असेल."

" असेल. मग मी आतां काय करूं ? "

" तुम्ही आतांच्या आतां असेंच किल्ल्यावर जाऊन तपास कराल तर बरें होईल."

" मी जाऊन तपास करतों. पण प्रतिनिधींचीं माणसें इतकीं अरेराव माजलीं आहेत हें कांहीं एकंदरींत बऱ्याचें लक्षण नाहीं." असें म्हणून भोजराज वाजिरावा-चा निरोप घेऊन तेथून आपल्या घोड्यावर स्वार होऊन किल्ल्याच्या अनुरोधानें निघाला.

वाजिरावाला चिंता पडली कीं, आतां कसें करावें ! त्यानें भोजराजाला किल्ल्यावर जाऊन तपास करण्याला सांगितलें खरें; पण तेवढ्यानें त्याचें समाधान होईना. पिलाजी काय किंवा आणखी कोणी काय, आपल्या जिवाला जीव देणारीं जीं एकनिष्ठ माणसें, त्यांच्यावर संकट गुदरलें असतां आपण स्वतः त्या संकटनिवारणार्थ झटणें हें

आपलें पाहिलें कर्तव्य आहे, असें त्याची मनोदेवता त्याला स्पष्ट सांगत होती. वस्तुतः आपल्या लोकांच्या जिवाला जीव द्यावयाला आपण निरंतर तयार असलें पाहिजे, ही जाणीव बाजिरावाच्या अंतःकरणांत नेहमींच जागृत असे. असें असतां आज पिलाजींच्या बाबतींत तो इतका तरी स्वस्थ राहिला याचें कारण आज वाटचालीच्या श्रमानें तो बेसुमार दमला होता. अशा अपरात्रीं बाहेर जाणें त्याच्या अगदीं जिवावर आलें होतें. पण आतां त्याचें त्यालाच वाटलें कीं, 'नाहीं कांहीं झालें तरी आपण आपल्या माणसाचा शोध स्वतः जातीनें जाऊन केला पाहिजे.'

तो मध्यरात्रीचा सुमार असल्यानें बहुतेक नोकरचाकर झोंपीं गेले होते. बाहेर पहारेकरी तेवढे जागे होते व घरांत गोविंदा जागा होता. तो नुसतें झोंपेचें मिष करून बाजिरावाच्या शयनमंदिरासमोरच्या मोकळ्या दालनांत बिछान्यावर पहुडला होता. बाजिरावाच्या मनांतून इतक्या अपरात्रीं आपल्या कोणाही नोकरचाकराला त्रास द्यावयाचें नसल्यानें तो स्वतःच उठला व कपडे करून बाहेर निघाला. बाहेर जाऊन पागेंतील घोडा स्वतः बाहेर काढून त्यावर स्वार होऊन थेट किल्ल्यावर जावयाला निघावें असा त्याचा बेत होता. पण तेवढ्यांत गोविंदा चाहूल ऐकून समोर आला व हात जोडून विनवूं लागला, " धनीसाहेब ! काय आज्ञा आहे ? "

" कांहीं आज्ञा नाहीं. तूं दमला आहेस; स्वस्थ झोंप जा." बाजीराव म्हणाला.

" पण आपण तर कपडे करून बाहेर चालला आहां ! "

" हो ! मी बाहेर चाललों आहें."

" पिलाजीचा शोध करावयाला ना ? "

" होय."

" मग मी आपल्याबरोबर येऊं का ? "

" तूं येणार ? "

" हो ! येणार म्हणजे ? काशीबाईसाहेबांनीं मला उभ्या जन्माचें एकवार सांगून ठेविलें आहे कीं, 'आपण धनीसाहेबांजवळ नसूं तेव्हां तूं निरंतर त्यांच्या सन्निध असत जा.' आतां सारे लोक झोंपीं गेले असतील; तेव्हां मी पागेंतून आपला घोडा घेऊन येतों."

" बरें तर, तसें कर." बाजीराव गोविंदाच्या स्वामिभक्तीचें मनांतल्या मनांत कौतुक करीत म्हणाला, " पण हें पहा, कोणता घोडा आणशील ? "

" कोणता आणूं ? "

" सारंगा आज दमला आहे, त्याला आजची रात्र विश्रांति घेऊं दे. तूं बांड्याला घेऊन ये."

" बरें आहे." असें म्हणून गोविंदा तसाच घाईघाईनें कपडे करून पागेकडे गेला. बाजीराव तोंवर सदरेवरच उभा होता. थोड्या वेळानें गोविंदानें एक घोडा स्वतःसाठीं व बाजिरावाचा बांडा घोडा बाजिरावासाठीं आणला. दोघेही आपापल्या घोड्यांवर स्वार होऊन किल्ल्याकडे जावयाला निघाले. ते थोड्या अंतरावर जातात न जातात, तोंच रंगमहालाच्या दरम्यान् कोणी तरी स्त्री त्यांच्या रस्त्यांत मध्यावर येऊन उभी राहिली.

ही स्त्री राजवाड्यांपैकीं विशेषतः लक्ष्मीच्या विश्वासांतील कोणी असावी असा संशय साहजिकपणें बाजिरावाच्या मनांत उत्पन्न झाला. म्हणूनच त्यानें घोड्याला आवरीत विचारलें, " कोण आहे ?"

" पण आपल्याबरोबर कोण आहे ? "

" तो माझ्या विश्वासांतील माणूस आहे."

" आणि मघांशीं बाईसाहेब आपल्या वाड्याबाहेर पडल्या तेव्हां घोड्यावरून आला तो कोण ?"

" तोही माझ्या विश्वासांतील माणूस होता. कां बरें ? "

"नाहीं; आजकाल विश्वासाची दुनिया उरलेली नाहीं. प्रतिनिधींकडील एखादा माणूस यावा व त्यानें इकडून सर्व वित्तंबातम्या काढून घेऊन नेमक्या प्रतिनिधींना जाऊन सांगाव्या; ह्या पापाला फार भ्यावें लागतें."

" पण मघांशीं आमच्या वाड्यांत एक घोडेस्वार आला होता तें तुला कसें माहीत झालें ? "

" मी तेव्हां बाईसाहेबांची वाट पहात बाहेर उभी होत्यें. " नूरनिहार सभोंवार संशयित मुद्रेनें पहात म्हणाली, " पण आपण इथें बोलत उभें रहाणें सुरक्षितपणाचें नाहीं. आपण आतां कुठें चाललां ? "

" कां बरें ? "

" आपणापाशीं माझें एक महत्त्वाचें काम होतें."

" तुझ्या बाईसाहेबांनीं कांहीं निरोप सांगितला आहे का ? "

" निरोप सांगितला आहेही व नाहींही. पण आपण कुठें चाललां ? "

" पण कां तें तर सांग ! "

"आपण आतांच्या आतां किल्ल्यावर जाण्याची कृपा कराल का?"

"कां! किल्यावर काय आहे?"

"आपणाला पिलाजी जाधवाचा कांहीं पत्ता आहे का?"

"नाहीं. त्याच्याच शोधांत आम्हीं आहों."

"तर मग तो किल्ल्यावर आहे. पण त्याचें जीवित धोक्यांत आहे; व त्याच्याबरोबर इतरांवरही संकट कोसळण्याचा संभव आहे. आपण आतांच्या आतां किल्ल्यावर गेलां तर कांहीं तरणोपाय आहे. आपण तेथें जा व किल्लेदारापाशीं तपास करा, म्हणजे आपणाला पिलाजी भेटेल."

"पण तो किल्ल्यावर कसा गेला?"

"तें मी अशा घाईच्या वेळीं सांगत बसत नाहीं. आपण प्रथम किल्ल्यावर जा; तिथें आपल्याला साऱ्या गोष्टी कळतील." असें म्हणून नूरनिहार लगबगीनें पुढें चालूं लागली.

बाजिरावानें विचारलें, "तूं कुठें चाललीस?"

नूरनिहार चालतां चालतां उत्तरली, "मी पिलाजींच्या घरीं जाऊन येतें."

"कशाला?"

"कमळा व गौतमा यांच्या अब्रूवर आज रातोरात दरोडा पडण्याचा संभव आहे. त्यांना वेळींच सावध केलें पाहिजे."

"याचा अर्थ काय?" बाजिरावानें विस्मयचकित होऊन विचारलें.

नूरनिहार जातां जातां यावर एवढेंच उद्गारली, "सरकार! क्षमा करा. पण गेला क्षण एकेक लाखाच्या मोलाचा जातो आहे. गौतमा व कमळा यांना मीं जाऊन वेळींच सावध केलें नाहीं, तर उजाडत्या दिवशीं त्या साध्वींच्या अब्रूची वांगडी पिचलीच असें समजा. तेव्हां मला अगोदर तिकडे जाऊं द्या; आपण असेच्या असे किल्ल्यावर जा. मात्र तिथें गेल्यावर एक करा, पिलाजीची चौकशी करतांना माझ्या नांवाचा मुळींच उच्चार करूं नका. मी माझ्या स्वतःविषयीं तितकी भीत नाहीं. पण यांत संबंध लक्ष्मीबाईसाहेबांचा येतो; तो जर उजेडांत आला, तर संशयाचें पिशाच्च महाराजांच्या मनाचा आश्रय करून त्यांच्या हातून लक्ष्मीबाईसाहेबांच्या नाशिबावर वरवंटा फिरवायला कमी करणार नाहीं."

बाजिरावाच्या मनाला नूरनिहारच्या तोंडून निघालेल्या ह्या अस्फुट वार्तेनें कमालीच्या बोंचण्या लावल्या होत्या. नूरनिहार सर्व गोष्टी स्पष्टपणानें ओकून

टाकील तर बरें असें त्याला वाटत होतें. पण त्याची ती मनीषा कांहीं पूर्ण झाली नाहीं. नूरनिहार तेथून शक्य तितक्या लगबगीनें निघून गेली. आतां आपण काय करावें? प्रथम गौतमा व कमळा यांच्या रक्षणाला त्यांच्या घरीं जावें कीं त्यापूर्वीं किल्ल्यावर जावें, असा दुहेरी पेंच त्याला पडला. त्यानें गोविंदाला विचारलें, "गोविंदा! आतां कसेंरे करावें?"

गोविंदा उत्तरला, "धनीसाहेब! मला वाटतें, आपण आतां प्रथम किल्ल्यावर जावें. राणोजी व मल्हारी आपल्या घरींच गेले आहेत; तसाच कांहीं प्रसंग आला तर ते तिकडे गौतमा व कमळा यांचें रक्षण करावयाला पुरेसे आहेत."

वाजिरावाला गोविंदाचा हा विचार पटला. क्षणभर त्याला वाटलें कीं, भोजराज किल्ल्यावर गेला आहे, तो पिलाजीचा शोध करील. पण पुन्हा त्याला शंका आली कीं, भोजराज कसा झाला तरी परका माणूस! प्रतिस्पर्ध्यांच्या हातून पिलाजीची जी गत झाली तीच भोजराजाचीही होणार नाहीं कशावरून! तेव्हां प्रथम किल्ल्यावर जावें व मग पुढचें पुढें पहातां येईल, असा मनाचा धडा करून बाजीराव गोविंदासह किल्ल्यावर जावयाला निघाला.

प्रकरण सहावें

# चकमक



मल्हारराज पिलाजीच्या चौकशीसाठीं बाहेर पडल्यावर कमळा, गौतमा व तिची सासू जिवाई ह्या तिघीजणी अंगणांत चांदण्यांत बसून नानापरींचे तर्ककुतर्क करीत होत्या कीं, असें कसें झालें? पिलाजीचा घोडा तेवढा घरीं चालून आला व पिलाजी कुठें गेला? कमळा त्या घोड्यापाशीं गेली व त्याच्या पाठीवरून प्रेमानें हात फिरवीत त्याला विचारूं लागली, "हणमंत्या! तूं तुझ्या धन्यांना कुठें टाकून आलास रे?"

हणमंत्या आपल्या धनिणीच्या प्रश्नाला उत्तर म्हणून कीं काय, एकवार खिंकाळला.

"काय म्हणतोस! त्यांना शत्रूंनीं वाटेंत गांठलें! आणि ती बातमी सांगण्यासाठीं तूं पुढें आलास होय?" कमळेनें पुन्हा हणम्याच्या पाठीवरून हात फिरवीत त्याला विचारलें.

कमळेच्या ह्या प्रश्नाला पूर्वपरंपरा होती. श्रीरामाचा हनुमान तसा हा पिलाजीचा हणमंत्या घोडा होता. आजवर अनेक प्रसंगीं हणमंत्याची स्वामिभक्ति निदर्शनाला आली होती. थोड्या दिवसांपूर्वीं पेशव्यांबरोबर वडगांवच्या लढाईत पिलाजी गेला होता, तेव्हां त्याला जखम लागून तो पडला असतां ह्याच विश्वासू जनावरानें भरउन्हांत धन्याच्या देहावर आपल्या देहाचें चौखुरी छत उभारून त्या छताच्या सांवलीखालीं धन्याचें रक्षण केलें होतें. त्यापूर्वीं एकदां पिलाजी कोठूनसा घरीं येतांना एकाएकीं बेशुद्ध होऊन घोड्यावरून खालीं पडला, तेव्हां हाच हणमंत्या एखाद्या विश्वासू माणसाप्रमाणें तेथें प्रहरभर तिष्ठत उभा होता. असेंच कांहींतरी अरिष्ट आज पिलाजीवर कोसळलें असेल, एरव्हीं एकटा हणमंत्या इतक्या अपरात्रीं एकटा आला नाहीं, असें कमळेला वाटलें.

आणि चमत्कार असा कीं, कमळेचा हा प्रश्न ऐकतांच **हणमंत्या मुकट्यानें** वाटेला लागला. तें पाहून कमळा गौतमेला म्हणाली, "अगबाई! गौतमे! हा चालला कुठें?"

इतक्यांत हणमंत्या पुन्हा एकवार मागें वळून पहात खिंकाळला. कमळेनें तर्कानें ताडलें कीं, हा आतां आपणाला एखाद्या इच्छित स्थळीं नेत असावा.

"गौतमे! आतां कसें ग करायचें?" कमळेनें मागें वळून विचारलें.

"चल, आपण त्याच्या मागोमाग जाऊन काय आहे तें पाहूं तर खरें!" असें म्हणून गौतमाही आपल्या सासूला सांगून कमळेच्या सोबतीला निघाली. जिवाईच्या मनांतून आपल्या सुनेनें इतक्या अपरात्रीं घराबाहेर जावें असें नव्हतें. पण कमळेला वाईट वाटेल म्हणून तिनें होकार दिला. मात्र जातांना उजेडासाठीं चूड पाजळून घेण्याला सांगितलें. कमळेचा दोन तीन वर्षांचा मुलगा सटवोजी जिवाईच्या मांडीवर झोंपीं गेला होता, त्यामुळें कमळेलाही त्याची धास्ती नव्हती. त्या दोघींनीं जिवाईच्या शब्दाला मान देऊन दोन चुडी पेटवून हातीं घेतल्या व त्या हणमंत्याच्या मागोमाग रस्त्याला लागल्या, तोंच समोरून कोणी तरी दोघे माणूस चुडी पाजळून येत असल्याचें त्यांना दिसून आलें. हे कदाचित् राणोजी व मल्हारी असावे असें त्या दोघींना वाटल्यानें त्या क्षणभर जागच्या जागींच उभ्या राहिल्या. तेवढ्यांत समोरून चुडी पाजळून येणारे मनुष्य जरा जास्त जवळ आले, तेव्हां मात्र त्या दोघींचीही निराशा झाली. ते त्यांच्या अपेक्षेप्रमाणें राणोजी व मल्हारी नसून निराळेच कोणी होते.

"गौतमे! कोण ग हे?" कमळेनें विचारलें.

"तेंच तर कळत नाहीं!" गौतमा म्हणाली.

इतक्यांत ती मंडळी जास्त जवळ आली. त्यांच्या आपसांतील बोलण्याच्या आवाजावरून कमळेनें त्यांना ओळखलें व ती गौतमेला म्हणाली, "गौतमे! अग, हे तर यमाजी व त्याचा मुलगा गमाजी असावेसें वाटतें."

"त्यांना इतक्या रात्रीं इकडे येण्याचें काय कारण?" गौतमेनें विचारलें.

"तेंच तर कळत नाहीं." कमळा म्हणाली.

कमळेचा तर्क बरोबर होता. ते यमाजी व गमाजी हे बापलेंकच होते. कमळा व गौतमा यांचे त्यांच्या आगमनाविषयीं तर्ककुतर्क चालले आहेत तोंच ते दोघे त्यांच्याजवळ येऊन पोंचले.

"कमळे! मल्हारी व राणोजी घरांत आहेत का?" यमाजीनें विचारलें.

"नाहींत." कमळा उत्तरली.

इतक्यांत गमाजी समोर उभा असलेल्या घोड्याला पाहून यमाजीला म्हणाला, "हा पहा तो घोडा."

यमाजीनें त्या घोड्याकडे पहात कमळेला विचारलें, "तर मग हा घोडा इथें कसा आला?"

" त्याचेंच तर आम्हांला कोडें पडलें आहे." कमळा म्हणाली.

" ह्याच पोरीनें सायंकाळीं अक्काची थट्टा केली ना ? " गमाजीनें यमाजीला विचारलें.

" होय. " यमाजी म्हणाला.

" ती खोटें बोलत असली पाहिजे." असें पुटपुटत गमाजीनें दोन पावलें पुढें होऊन एकदम एकेरीवर येऊन विचारलें, " कमळे ! असें पहा, आमच्यापाशीं अशी लपवाछपवी कांहीं चालावयाची नाहीं. दगलबाज नवऱ्यांच्या दगलबाज बायका तुम्ही, तुमच्या तोंडून खरी गोष्ट कधींच बाहेर फुटावयाची नाहीं हें आम्हांला माहीत आहे. पण—"

गौतमा गमाजीचे हे अपमानास्पद शब्द ऐकून एकदम चिडून म्हणाली, " हं ! गमाजीराव ! जरा तोंड आटोपून बोला. दगलबाज कोणाला म्हणतां ? इथें कांहीं तुमच्या बटकी–कुळंबिणी लागून गेल्या नाहींत."

" नाहीं तर काय ? " गमाजी आढ्यतेनें म्हणाला.

" काय म्हणालां ? " कमळा व गौतमा ह्या दोघींनीं मिळून एकदम कडा सवाल केला.

" तेंच म्हणालों." गमाजी पूर्ववत् बेमुर्वतखोरपणानें उत्तरला, " तुम्हीं आमच्या बटकी-कुळंबिणी नसलां तरी तुमच्या व तुमच्या दादल्यांच्या अशा गुणांनीं ते दिवस तुमच्या कपाळीं लौकरच येतील."

" आमच्या दादल्यांनीं किंवा आम्हीं तरी तुमचें असें काय घोडें मारलें ? " गौतमेनें विचारलें.

यमाजीनें मध्येंच विचारलें, " आज सायंकाळीं अक्काची थट्टा करणाऱ्या त्या तुम्हीच ना ? "

गौतमा व कमळा ह्या दोघीही ह्या प्रश्नानें क्षणभर वरमल्यासारख्या झाल्या. गौतमेच्या तोंडून सायंकाळीं थट्टेचे शब्द निघून गेले होते खरे. त्याबद्दल सूड घेण्याच्या इराद्यानें जर ही बापलेकांची जोडी आली असेल, तर आपण तेव्हां ती मोठीच चूक केली खरी, असें गौतमेला वाटूं लागलें. तिनें एकवार कमळेकडे पाहिलें व कमळेनें तिच्याकडे पाहिलें. गौतमेच्या त्या पाणीदार नजरेंतही तेव्हां पश्चात्तापाचें पाणी खेळूं लागलें होतें. कमळेनें तिच्याकडे पाहिलें तेंदेखील अशा प्रश्नार्थक दृष्टीनें पाहिलें, " मीं तुला तेव्हां सांगत नव्हतें का, त्या पोरीला एखादा ह्राणमोबा मिळो नाहींतर टोणगोबा मिळो, आपण असल्या थोरांमोठयांच्या गोष्टी बोलूं नये म्हणून ? "

ही कमळेच्या मनांतली—तिच्या दृष्टींतली—गोष्ट झाली. पण उघड उघड ती आपल्या मैत्रिणीची अशी थोडीच फजिती होऊं देते ! तिनें गौतमेचा पक्ष सांवरून धरण्याच्या इराद्यानें शक्य तों गमाजी व यमाजी ह्या दोघांची समजूत घातली कीं, 'गौतमेला ती प्रतिनिधींची मुलगी आहे हें माहीत नव्हतें म्हणून ती तसें बोलून गेली.' पण तिच्या त्या नरमाईच्या बोलांनीं गमाजी जास्तच शेफारून गेला व अद्वातद्वा बोलूं लागला.

म्हातारी जिवाई इतका वेळ दूर बसून सारें ऐकत होती. ती हें प्रकरण उगाच जास्त जास्त चिरडीला जाऊं लागलें असें पहातांच मध्यें पडून म्हणाली, "बाबांनों ! माझ्या सुनेच्या हातून चूक झाली, तिच्याबद्दल मी क्षमा मागतें; मग तर झालें ?"

म्हातारीच्या ह्या विनवणीचा गमाजीच्या मनावर कांहींच परिणाम झाला नाहीं; पण यमाजीला मात्र किंचित् नमतें घ्यावेंसें वाटलें. म्हातारीच्या नम्रपणाचा निदान एवढा उपयोग झाला कीं, सर्वच मंडळी मूळ मुद्दा सोडून एकेरीवर येऊं पहात होती, त्यांचीं मनें जरा स्थिरस्थावर झालीं व यमाजीनें पुन्हा पूर्वपदावर येऊन विचारलें, "विचारलेल्या प्रश्नाला सरळ उत्तर ह्यांनीं दिलें असतें तर ! आतां तरी सांग म्हातारे ! हा घोडा इथें कोणीं आणला ? राणोजीनें कीं मल्हारीनें ?"

कमळा मध्येंच म्हणाली, "तुम्ही आधीं सांगा, ह्या घोड्याचा धनी कुठें आहे ?"

"मसणांत आहे." गमाजी रागारागानें उत्तरला.

"लोकांच्या माणसांना मसणांत पाठविण्याच्या ऐवजीं तूंच कां नाहीं मसणांत जात रे मेल्या ?" कमळा एकेरीवर येऊन म्हणाली.

गमाजीनें कमळेच्या ह्या बोलांनीं चिडून एकदम तिच्यावर झडप घातली व तिचें मनगट पकडून तो म्हणाला, "बेवकूब गद्धी ! तुझी जिभली आज फारशी सैल सुटली आहे ? चल. तुझ्या त्या मुर्दाड नवऱ्याला तसा मसणांत पाठविला, आतां तुला ज्या अक्काची थट्टा तुम्ही दोघींनीं मिळून केली, त्या अक्काच्या घरांतली कुळंबीण बनवून सोडतों. मग अक्काचें लग्न होईल तेव्हां तिची थुंकी झेलून जगायला तुला तिच्या सासरीं पाठवून देणार. फार माजली आहेस तूं, तुझा माज असाच उतरविला पाहिजे."

गमाजी कमळेचें मनगट आपल्या उजव्या हातांत घट्ट धरून वल्गना करीत होता, तोंच कमळेनें त्याच्या हाताला असा सडकून चावा घेतला कीं, त्यामुळें गमाजीचा माज मात्र तेव्हांच उतरला, व त्याचा हात लुला पडून त्याच्या चापां-

तून कमळेचें मनगट सुटलें. गमाजीनें पुन्हा जास्तच संतापून कमळेवर हात टाकण्या-साठीं हात उचलला; पण तेवढ्यांत गौतमेनें जवळ उभा असलेल्या हणमंत्याची लगाम धरून गमाजीच्या पाठीवर फडाड्कन् असे दोन चार सणसणीत कोरडे लगावले कीं तो म्हणे शाबास!

गौतमा व कमळा आतां अगदीं हट्टाला पेटल्या होत्या. त्यांच्या वाटेला जाण्याची गमाजीची काय पण यमाजीचीही छाती होईना. पण जिवाईला मात्र तो एकंदर प्रकार पाहून हें भांडण आतां कोणत्या थराला जातें नकळे, असें भय वाटूं लागलें. ती एकाएकीं मोठ्यानें ओरडली, "धावा हो धावा! हे दांडगे माझ्या पोरींना निष्कारण छळीत आहेत."

इतक्यांत मागाहून कोणीतरी दोघांनीं येऊन अकस्मात् गमाजी व यमाजी यांच्या मानगुटी पकडल्या. तेवढ्यांत जिवाईच्या मांडीवरील सटवोजी दचकून जागा होऊन रडूं लागला. गमाजी व यमाजी 'हें काय! हें काय?' असें पुटपुटत एकदम गांगरून मागें वळून पहातात, तों त्यांची व त्याच क्षणीं इतर सर्वांची खात्री झाली कीं, ते दोघे राणोजी व मल्हारी होते.

"इतक्या अपरात्रीं तुमचें आमच्या घरीं काय काम?" मल्हारीनें गमाजीची मान धरून त्याला गदगदां हलवीत विचारलें.

जिवाई, गौतमा व कमळा यांना आतां नवा हुरूप आला. गौतमा जिवाईच्या मांडीवर रडत असलेल्या सटवोजीला घेऊन समजावीत गमाजी व यमाजी यांना म्हणाली, "तुम्हांला आमचे दादले पाहिजे होते ना? ते हे घ्या. आतां बोला त्यांच्याशीं काय बोलायचें तें."

"तुम्हीं थोड्या वेळापूर्वीं माझ्याशीं मारामारी केली व पुन्हां आतां आमच्या बरोबर येत असलेल्या नागोजीभटाला कृष्णेश्वरापाशीं* रस्त्यांत गांठून मारलें, खरें ना?" यमाजीनें किंचित् नरमाईच्या भाषेंत विचारलें.

"आम्हीं तुम्हांला व तुमच्या त्या भटाला मुळींच दगा दिला नाहीं. उलट तुम्हीं मात्र आमच्या पिलाजीला कां दगा दिला, त्याचा अगोदर जाब द्या."

* हें कृष्णेश्वराचें देवालय सातार्‍यांत तेव्हांच्या सदाशिवपुरा पेठेंत व आजच्या व्यंकटपुरा पेठेंत शहराच्या पश्चिम टोंकाला यवतेश्वराच्या पायथ्याशीं आहे. बाजि-रावाचा मेहुणा कृष्णराव चासकर यानें तें इ. सन १७२३ (शके १६४५) मध्यें बांधलें. अर्थात् कथानकाच्या वेळीं तेथें नुसती कृष्णेश्वराची लिंगप्रतिमाच होती.

यमाजीनें आपल्या आवाजांत कांहींसा कणखरपणा आणून विचारलें, " कृष्णेश्वरापाशीं तुम्हीं मला घोड्यावरून ओढून मारलें नाहीं ? "

" नाहीं." मल्हारी उत्तरला.

झालें ! तेथें त्यांची जुंपली. यमाजी व गमाजी म्हणत तेंही खरें होतें व राणोजी आणि मल्हारी म्हणत तेंही खरें होतें. गमाजी पिलाजीच्या घोड्यावर स्वार होऊन निघाला, तेव्हां त्यानें पूर्वानुभवावरून शक्य तितक्या सावधपणें तो घोडा हांकण्याची जरी शिकस्त केली, तरी धन्याशीं सुताप्रसगें सरळ व परक्याशीं कमालीच्या मुर्दाडपणानें वागणाऱ्या त्या अक्कलवान जनावरानें नागोजीच्या कह्यांत वागण्याचें साफ नाकारलें. त्यांतूनही त्याला कसाबसा आवरीत घोड्यानें स्वतःच्या लहरीनुसार आंखलेल्या वांकड्यातिकड्या वाटेनें गमाजी कृष्णेश्वरापाशीं येतो न येतो, तोंच कोणी तरी दोघां बुरखेवाल्यांनीं पुढें सरून त्याच्यावर छापा घालून त्याला खालीं ओढून त्याची खाशी कणीक तिंबली, व तशाच स्थितींत त्याला तिथें टाकून ते बुरखेवाले पळाले. गमाजीच्या मांडीखालील घोडा जो तेवढ्यांत कुठें उधळला त्याचा पत्ताच नाहीं. गमाजी तशा स्थितींत आपल्या पायांनीं एकदांचा आपल्या मकाणापर्यंत गेला. तेथें यमाजी व नागोजीभट त्याची वाट पहात बसले होतेच. त्यांना गमाजीनें आपली कर्मकहाणी सांगितली; त्यावरून सर्वांनीं तर्क केला होता कीं गमाजीला एकटा गांठून चोप देणारे व त्याचा घोडा पळविणारे ते दोघे गुंड राणोजी व मल्हारी हेच असावेत. म्हणून अंदाजानें यमाजी, गमाजी व नागोजीभट्ट त्या गुन्हेगारांचा तपास करीत त्यांच्या मकाणापर्यंत आले. वाटेंत कोणी तरी नागोजीभटाला गांठून चोपलें व तेथून पळ काढला. तेव्हां नागोजीभट बिचारा मुकाट्यानें भीतीनें माघारा गेला ! तों पिलाजीचा घोडा तेथें उभा असलेला पहातांच त्या बापलेकांच्या संशयाला दुजोरा मिळाला. तेव्हां राणोजी व मल्हारी यांनींच आपणाला व नागोजीभटाला मार दिला असला पाहिजे हा गमाजीचा संशय त्यांच्या मतें सकारण होता.

पण राणोजी व मल्हारी ह्या दोघांनींही ह्या बाबतींत कानांवर हात ठेवले तेंही त्यांच्या मतें अगदीं बरोबर होतें. पुरंदरे व चिटणीस यांना त्यांच्या घरीं पोंचवून ते दोघे आतां आपल्या घरीं येत होते. त्यांना ह्या एकंदर प्रकाराची गंधवार्ताही नव्हती. पिलाजीची किल्ल्यावर दुर्दशा झालेली त्यांना पेशव्यांच्या वाड्यांत गोंधळ्यांच्या तोंडून कळली होती तेवढीच.

अखेर त्यांची समजूत पटेना व आपला शब्द माघारा घेण्याला कोणीही तयार होईना, तेव्हां हें प्रकरण मारामारीच्या थरावर जाणें अगदीं अपरिहार्य होतें. यमाजी व गमाजी यांना यःकश्चित् बायकांनीं आपणाला अत्यंत तुच्छतेनें झिडकारलें म्हणून चीड आली होती. त्यापूर्वी सायंकाळीं गौतमेनें प्रतिनिधींच्या अक्काची अजाणपणानें थट्टा केली होती; तिचा परिणाम आगींत तेल ओतल्याप्रमाणें झाला होता. राणोजी व मल्हारी यांनाही ह्या दोघां मुर्दाडांनीं त्यांच्या बायकांचा अपमान व त्यांच्याशीं अतिप्रसंग केल्याबद्दल चीड येणें स्वाभाविक होतें. प्रतिनिधि व पेशवे यांच्यांतील वैमनस्य उभयपक्षींच्या नोकरचाकरांच्या मनांत फार दिवसांपासून प्रतिबिम्बित झालेलें होतेंच. अशा अंतर्वैमनस्याला असें एखादे वेळीं अनपेक्षित रीत्या तोंड लागलें कीं ठिणगीचा वणवा व राईचा पर्वत व्हावयाचाच. त्यांतूनही वेळीं ह्या गैरसमजाची मजल मारामारीपर्यंत येऊन ठेपली नसती; पण गमाजीनें ती आणली. गमाजी म्हणजे गर्वाचा व अरेरावीचा मूर्तिमंत पुतळा होता. तो स्वतः चांगला ताकदवान् गडी होता;पण ताकदीपेक्षांही त्याची घमेंड मोठी होती. मल्हारी व राणोजी हे जरी यमाजीप्रमाणें गलेलठ्ठ नव्हते तरी ताकदीचा एकंदर आढावा काढतां ते एकेकटे-ही गमाजीला भारी होते. गमाजीची ताकद आखाड्यांतल्या तांबडमातींत लोळून, दहीं दूध लोणी मनमुराद खाऊन व शेजारीपाजारी बायाबापड्यांची कुचेष्टा करण्यांत गुंडगिरी गाजवून जुळली होती; पण राणोजी व मल्हारी यांनीं आजवर खऱ्या-खुऱ्या रणमैदानावर हाडें कसवून ताकद कमविली होती. शिवाय ते कुस्ती खेळ-ण्यांतही चांगलेच पटाईत होते. ते गमाजीसारख्याला थोडीच दाद देणार!

प्रथम गमाजी व राणोजी यांची झोंबी जुंपली. यमाजीनेंही पाहिल्यानें थोडीशीं लुडबुड केली; पण राणोजीनें त्याला नुसत्या नजरेच्या दराऱ्यानेंच गप्प बसविलें. गमाजीही मल्हारीच्या हातचे चार खरपुस तडाखे खाऊन शुद्धीवर आला.

कमळा व गौतमा यांच्या डोळ्यांचें पारणें फिटलें. ज्या तोंडानें गमाजीनें त्या दोघींना कुळंबिणी करण्याच्या निरर्गल गप्पा ठोकल्या होत्या, तेंच तोंड मल्हारीशीं होणाऱ्या मारामारींत दुःखाचे उसासे टाकतांना पाहून गौतमा उपहासपूर्वक हंसून म्हणाली, "झालें! आतां खाशी रग जिरली!"

गमाजीनें जखमी झालेल्या लांडग्याप्रमाणें वारंवार गौतमा व कमळा यांच्याकडे पाहिलें. पण त्या पहाण्यांत जीव नव्हता. मल्हारीनें त्याला कुस्तीच्या अवघड पेंचांत जखडून टाकल्यामुळें त्यांची जी कुचंबणा झाली होती, त्याचें तें द्योतक होतें.

अखेर यमाजीनें मध्यस्थी करून एकदांचें कसेंबसें गमाजी व मल्हारी यांचें भांडण मिटविलें.

गौतमेनें उपहासपूर्वक पुन्हा विचारलें, "कां ? आम्हाला कुळंबिणी बनवायची भाषा आतां पुन्हा कधीं बोलाल का ?" लगेच ती मल्हारीकडे वळून म्हणाली, "त्यांना तसे मोकळे सोडूं नका. पिलाजीचें काय झालें तें त्यांना विचारा."

"बोल, पिलाजी कुठें आहे ?" मल्हारीनें पुन्हां गमाजीच्या मानेवर हात ठेवून विचारलें.

आतां गमाजीला पेंच पडला कीं, याला सांगावें तरी काय ? पिलाजीला आपण दरडीखालीं लोटून दिलें असें सांगावें तर इथल्या इथें ही मंडळी आपणाला फाडून खाईल.बरें;आपणाला माहीत नाहीं म्हणून सांगावें तर तेंही रुचण्याजोगें नव्हतें.अखेर त्यानें एका क्षणांत कांहींतरी विचार करून उत्तर दिलें, "पिलाजी किल्ल्यावर आहे."

पिलाजीला दरडीवरून लोटून दिल्यावर त्याची काय गत झाली हें गमाजीला मुळींच माहीत नव्हतें, किंवा त्यानें त्याच्या मेल्याजित्याची चौकशीही केली नव्हती. असें असतां त्यानें राणोजी व मल्हारी यांना पिलाजी किल्ल्यावर असल्याचें धडकावून सांगितलें तें याच अंतस्थ हेतूनें कीं, ह्या निमित्तानें तरी हे दोघे एकवार आपल्या हातीं लागूं देत, कीं मग किल्ल्यावर त्यांची आपणाला खाशी खोडकी जिरवितां येईल. इतकेंच काय; पण गमाजीच्या तेव्हांच्या मनोमय दुष्ट विचारांची मजल एथवर गेली होती कीं, 'एकवार पिलाजीप्रमाणेंच मल्हारी व राणोजी यांचीही वाट लागली म्हणजे त्यांच्या बायकांना बोलल्याप्रमाणें दीडदमडीच्या कुळंबिणी बनवून सोडल्या नाहींत तर नांव कशाला?' गौतमा नुक्तीच खानदेशांतून साताऱ्यांत आली होती. तिचें सौंदर्य गमाजीच्या डोळ्यांत सलूं लागलें होतें. पण मनांतली पापवासना मूर्त स्वरुपाला कशी आणावी, याचा त्याला कांहीं उपाय सुचत नव्हता, तेथें त्याचा नाइलाज होता. तरीही गमाजीची कुटिल बुद्धि त्या दिशेनें कोणाला न कळत भरधांव धापूं लागली होती. भोजराज आणखी थोड्या दिवसांनीं आपल्या गांवीं खानदेशांत जातांच कोणत्या ना कोणत्या खऱ्या किंवा खोट्या गुन्ह्याची घोरपड मल्हारीच्या गळ्यांत बांधून त्याला तुरुंगांत डाम्बावयाचें, व मग एकटी अनाथ गौतमा अचानक आपल्या जाळ्यांत ओढावयाची असे त्याचे बेत होते. ते बेत आज अनायासें शक्यतेच्या बाजाला येणार असें पहातांच त्याला मनांतून पराकाष्ठेचा आनंद झाला.

" काय, पिलाजी किल्ल्यावर आहे ? " मल्हारीनें दरडावून विचारलें.

" होय." गमाजीनें निर्धोकपणें निखालस खोटें उत्तर दिलें.

" तूं हें खरें सांगतोस ? " मल्हारीनें पुन्हा विचारलें.

" होय. खरें तर खोटें कशाला सांगूं ? " गमाजी साळसूदपणें उत्तरला.

" पहा बरें ! जर का हें खोटें ठरलें, तर आमच्याशीं गांठ आहे." असें म्हणून मल्हारीनें राणोजीकडे वळून विचारलें, " राणोजी ! आतांच्या आतां आपण किल्ल्या-वर जावयाचें का ? "

" अलबत् ! " राणोजी म्हणाला.

" तुमच्याबरोबर मीही येत्यें." कमळा म्हणाली.

जिवाईनें कमळेची समजूत करून तिला घरांत बसावयाला सांगितलें, व राणोजी आणि मल्हारी यांना मात्र जाऊं दिलें.

गमाजी यमाजीकडे वळून म्हणालाः " बाबा ! तुम्ही आतां घरीं जा. मी यांच्याबरोबर किल्ल्यावर जाऊन येतों."

पिलाजी किल्ल्यावर नाहीं हें यमाजीला माहीत असल्यानें त्याला एकट्या गमाजीला राणोजी व मल्हारी यांच्याबरोबर किल्ल्यावर जाऊं देणें सुरक्षितपणाचें वाटेना. त्याला गमाजीचा गुप्त कावा काय माहीत ! तो घरीं जाण्याचें नाकबूल करून त्या मंडळीबरोबरच किल्ल्यावर गेला.

कमळेच्या मनांतून आपल्या पतीच्या शोधार्थ जावयाचें फार होतें; पण जिवाई-पुढें तिचा नाइलाज झाला. तरीही तिचें मन तिला सारखें बोंचीत होतें, 'काय करावें ! धनीसाहेबांच्या कानांवर तरी ही गोष्ट घालायला नको का ?'

राणोजी, मल्हारी वगैरे मंडळी किल्ल्यावर निघून गेल्यावर बराच वेळपर्यंत—चांगला प्रहर दीड प्रहर होईपर्यंत कमळा, गौतमा व जिवाई आंगणांतच चांदण्यांत गोष्टी बोलत बसल्या होत्या. पण त्या गोष्टींत कोणाचेंही मन नव्हतें. त्या तिघींचेही डोळे राणोजी, मल्हारी व पिलाजी यांच्या व त्यांच्याबरोबर सुदैवानें पिलाजी आला तर त्याच्या वाटेकडे लागून राहिले होते.

# प्रकरण सातवें

# किल्ल्यांतील सांवळागोंधळ

मोजराज जो सर्वांच्या प्रथम किल्ल्यावर पिलाजीचा शोध करण्यासाठीं म्हणून गेला, तो किल्ल्याच्या दरवाजांत जाऊन पोंचतांच तेथें त्याचा मार्ग रोधल्यासारखा झाला. प्रथम त्याला देवडीवाला अबुबकर ओळखीना म्हणून त्याचा किल्ल्याच्या आंत प्रवेश होईना व लगेच त्यानें स्वतःची ओळख देऊन किल्ल्यावर येण्याचा आशय निवेदन केला तेव्हां तर मधाचें पोळें चोरण्यासाठीं आलेल्या माणसावर मधमाशांचा थवा तुटून पडावा तसे किल्ल्याच्या दरवाजांत गांधीलमाशांप्रमाणें घोंघावणारे लोक त्याच्यावर तुटून पडले. त्या बिचाऱ्यानें त्यांपैकीं कोणाचें कांहीं वांकडें केलें नव्हतें. असें असतां ते त्याच्यावर तुटून पडले याचें एक कारण असें कीं, तो पिलाजीची चौकशी करण्यासाठीं आला हें होय, व दुसरें कारण, सायं-काळीं गोंधळ्यांना मारपीट करण्यांत अबुबकरसह सर्व लोकांनीं मनःपूर्वक मदत केल्याबद्दल गमाजीनें त्या सर्वांना शराबेची मनमुराद मेजवानी दिल्यामुळें ते सारे त्या तारेत होते !

ह्या झगड्यांत अबुबकरनें पुढाकार घेतला होता. त्याला पुढाकार घेण्याला त्याच्या दृष्टीनें सबळ कारणेंही होतीं. नूरनिहारवर प्रथमपासूनच त्याचा डोळा होता, हें पूर्वींच निवेदन करण्यांत आलें आहे. त्याच नूरनिहारचें अबुबकराला चीड आणण्याजोगें वर्तन आज पिलाजीच्या बाबतींत घडलें होतें. नूरनिहार जी आपल्या धनिणीचें—लक्ष्मीचें पत्र व आंगठी बाजिरावाच्या हातीं पोंचवून परत रंगमहालांत आली, ती तशीच रंगमहालांतील भुयारांतून कोणाला नकळत लक्ष्मीच्या सांगण्या-वरून किल्ल्यावर गेली. सकवारबाई व सगुणाबाई ह्या दोघी राण्या अलीकडे प्रतिनिधीशीं कारस्थानें करून बाजिरावाचा मोड करण्याच्या विचारांत होत्या, व किल्ला हें त्यांच्या कारस्थानांचें केंद्र बनलें होतें. तेथला भेद आणण्यासाठीं लक्ष्मीला नूरनिहारचा फार उपयोग होई. कारण नूरनिहार आजवर किल्ल्या-वरच कैदी म्हणून राबत असल्यानें तिला तेथली परिस्थिति खडान् खडा माहीत होती. नूरनिहार ही लक्ष्मीची दासी असली तरी ती स्वतः किंवा तिची धनीण ह्या पेशव्यांच्या इतक्या पक्षपाती असतील याची कोणालाही कल्पना नव्हती.

त्यामुळें त्या दोघींच्या हालचालींविषयीं कोणी फारशी शंका घेत नसे. नूरनिहार किल्ल्यावर जाई, ती देखील किल्लेदाराची अलीकडील चौथी पत्नी जुलिया तिची मैत्रीण होती, तिला भेटण्याच्या मिषानें जाई, व तिच्याकडून किल्ल्यावर कोण काय बोललें वगैरे बिनतोड बातम्या काढून त्या गुपचूप लक्ष्मीपाशीं येऊन निवेदन करी. आतां, सर्वच बातम्या तिला जुलियेपासून कळण्याजोग्या नसत; पण जुलिया ही अबुबकरची आवडती असल्यानें तिला त्याच्यामार्फत बऱ्याच गोष्टी कळत व तिच्या तोंडावर अबुबकरची स्तुति करून नूरनिहार आपला कार्यभाग साधी. मात्र हें करतांनादेखील ती अबुबकरविषयीं फारसा आदर दाखवीत नसे. कारण, न जाणो, त्यामुळें जुलियेला निष्कारण सवतीमत्सर वाटावयाचा! याशिवाय आणखी बातम्या हस्तगत करण्यासाठीं ती किल्लेदाराचा नोकर रहमान याला इरेला घाली. रहमान हा जसा किल्लेदाराचा विश्वासू नोकर होता, तसाच नूरनिहारचाही त्याच्या ठायीं बंधुभावानें विश्वास होता. अबुबकरच्या पापी दृष्टीपासून स्वसंरक्षण करण्याच्या कामीं नूरनिहारला रहमानचा फार उपयोग होई. तो जसा सुस्वभावी होता तसा बराच भोळाही होता. त्यामुळें गमाजी वगैरे मंडळींनें त्याला आपल्या कटांत सामील करून घेतलें असतांही नूरनिहारला त्याच्यापासून तेथें हरहमेष घाटत असलेल्या कारस्थानांचा तळठाव काढणें फार सोपें जाई. किंबहुना शत्रूच्या गोटांतील बित्तंबातमी कळावी एवढ्याचसाठीं नूरनिहारनें रहमानला यमाजीच्या कटांत सामील व्हावयाला भाग पाडलें होतें.

आजदेखील किल्लेदारीण पडशा-खोकल्यानें कांहींशी आजारी होती. तिला भेटण्याचें मिष करून नूरनिहार भुयाराच्या वाटेनें किल्ल्यावर गेली, तों रहमानच तिला सर्वांच्या अगोदर भेटला. त्यानें तिला महत्त्वाची बातमी सांगितली, "तुझ्या पिलाजीदादाला आज किल्ल्याबाहेरच्या दरडीवरून खालीं लोटून देण्यांत आलें आहे असें आतांच मला कळलें."

"केव्हां कळलें?" नूरनिहारनें विचारलें.

रहमान उत्तरला, "दोन घटका रात्रीला किल्लेदाराबरोबर मी किल्ल्यावर आलों तेव्हां."

नूरनिहारनें त्याबाबत तेथल्या तेथें जास्त चौकशी केली, तेव्हां तिला एकंदर खरा प्रकार कळून आला. लगेच तिनें प्रथम किल्लेदाराला भेटून चार माणसें पाठवून पिलाजीचा शोध करविला, व त्याला त्या दरडीखालील कांटेरी झाडझाडोऱ्यांतून

शोधून काढून किल्ल्यावर आणविलें. पिलाजीला आणविलें असें म्हणण्यापेक्षां त्याचा जिवंत मुद्दा उचलून आणला असें म्हणणेंच जास्त सयुक्तिक. कारण पिलाजी दरडीखालीं सांपडला तो बेशुद्ध स्थितींतच सांपडला, व त्याला तेथून किल्लेदाराच्या घरांत आणण्यांत येऊन त्याला औषधोपचार करण्यांत आले, तरी बराच वेळपर्यंत त्याला शुद्धबुद्ध नव्हती. सुदैवानें त्याचा एखादा अवयव मात्र कायमचा जायबंदी झाला नव्हता. नाहीं म्हणावयाला त्याच्या दोन्ही गुडघ्यांना लहानशा जखमा झाल्या होत्या, डोक्याला कांहींसा मार बसला होता व अंग ठिकठिकाणीं कांटेऱ्यांनीं ओरबाडून निघालें होतें. पण आनंदाची गोष्ट ही कीं, ह्या गंडांतरांत प्राणघातक अशी एकही जखम पिलाजीला झाली नव्हती. मात्र बराच वेळपर्यंत तो शुद्धीवर येईना. पण आतां नाहीं घटकेनें तो शुद्धीवर येणार याविषयीं कोणालाच शंका नव्हती.

पिलाजी मरतां मरतां वांचला, यांत अबुबकरला तितका विषाद वाटला नाहीं; पण नूरनिहारच्या कळकळीनें पिलाजीचा पुनर्जन्म झाला व नूरनिहारला तरी रहमाननें ही बातमी सांगितली म्हणून कळली, याचा विषाद वाटला. त्याला वस्तुतः पिलाजीच्या जगण्यामरण्याशीं कांहींच कर्तव्य नव्हतें. पिलाजीनें त्याला एकदां नूरनिहारच्या बाबतींत चौदावें रत्न दाखविलें होतें; पण त्यांत देखील त्यानें पिलाजीचें हाडवैर पत्करण्याला पुरें पडण्याजोगें कांहींच कारण नव्हतें. असें असतांही तो संतापला तो कां, याचें समर्पक उत्तर तो नूरनिहारच्या ठायीं आसक्त होता हें होय. गमाजी वगैरे लोकांना तो वश झाला होता, तो नूरनिहार आज ना उद्यां आपणाला लाभेल या आशेनेंच केवळ वश झाला होता; पिलाजीवर त्याचा दांत होता तो पिलाजी नूरनिहारचा आवडता व ती पिलाजीची आवडती म्हणून होता; व रहमान त्याच्या डोळ्यांत सले तो तरी नूरनिहारचा कैवारी होता म्हणूनच. रहमान आणि पिलाजी हे वस्तुतः अबुबकरचे शत्रु नव्हते, किंवा नूरनिहारला ह्या जगांत कोणीच कैवारी असूं नये असेंही अबुबकरला कधीं वाटलें नाहीं. कारण, त्याच्या मनांतून नूरनिहारवर कोणत्या एखाद्या गोष्टीबद्दल सूड घ्यावयाचा होता असें नाहीं. उलट पक्षीं नूरनिहारचीं कैवारी माणसें त्याला प्रियच असत. पण पिलाजी व रहमान हीं तशा प्रकारचीं कैवारी माणसें नाहींत, तीं जीं नूरनिहारची बाजू सांवरून धरण्याला हरघडी तयार असतात तीं नूरनिहार आपल्या पचनीं पडावी अशा स्वार्थी हेतूनें प्रेरित होऊन तयार असतात, असा त्याला जबर संशय होता. नूरनिहार नाका-डोळ्यांनीं सुंदरांत गणली जाणारी, तारुण्यानें रसरसलेली व तशांत

बेवारशी स्त्री, तिच्यावर बहीणभावंडांच्या अथवा मातृपितृवत्सलतेच्या नात्यानें निष्पाप प्रेम करणारें एकतरी माणूस जगांत असेल असें अबुबकरला वाटत नव्हतें. त्याला नूरनिहारच्या बाबतींत पापवासनेची कावीळ झाली होती, त्यामुळें नूरनिहारचा कैवार घेणारा जगांतील प्रत्येक मनुष्य तिला वश करण्यासाठींच तिचा कैवार घेत असावा असें त्याच्या विकृत दृष्टीला दिसे. हा अबुबकरच्या अंत:करणांत भिनलेला दावानल नूरनिहार रहमानच्या साह्यानें पिलाजीचें संरक्षण करण्याला धावलेली पाहून एकदम भडकला. जुलियेपाशीं नूरनिहार आपली स्तुति करते तो तिचा निव्वळ मायावीपणा आहे अशी त्याची खात्री झाली. नूरनिहार आतां निखालस आपल्या हातांतून निसटणार व त्याला कारण पिलाजी, असें पाहून त्याला मनापासून वाटूं लागलें कीं, 'हा पिलाजी एकदांचा उलथेल तर किती छान होईल ! पण पिलाजीच्या नाशाची ही आपली वासना आतां अतृप्त रहाणार.. पिलाजी आतां आज ना उद्यां खणखणीत बरा होणार, व त्याचा नाश करण्याची खटपट केल्याच्या अपराधाचें खापर आपल्या माथीं फुटणार. नूरनिहार जास्त बिथरून पिलाजी किंवा रहमान यांपैकीं कोणाच्या तरी गळ्यांत पडणार, व आपली मात्र मधल्यामध्यें उगाच लांडया कोल्ह्यासारखी अवस्था होणार !'

अशी सर्व बाजूंनीं निराशाच अबुबकरच्या वांट्याला येतांच त्याची पिसाळलेल्या कुत्र्यासारखी अवस्था झाली. त्याच्या दारूच्या धुंदींत ह्या नव्या कैफाची भर पडली. स्वभावत: कडव्या वृत्तीचा आततायी मनुष्य एकवार निराशेच्या फेऱ्यांत सांपडून चिडला कीं काय करणार नाहीं ! त्यांतूनही कनक व कान्ता ह्या दोन बाबतींतील निराशा, व त्यांतल्या त्यांत कांतेविषयींची निराशा अशा नादी माणसाच्या वांट्याला आली म्हणजे त्याला ती मरणापेक्षांही अनेक पटींनीं दु:सह होऊन बसते. अबुबकरचीही थेट अशीच अवस्था झाली. नूरनिहारच्या बाबतींत त्यानें आजवर अंत:करणांत जोपासून वाढविलेल्या आशेचें रोपटें आज अगदीं सुकून गेलें, त्यामुळें त्याला इतकी चीड आली कीं, 'नूरनिहारला व तिच्या कैवाऱ्यांना ह्या जगांतून कायमचें नाहींसें करून टाकावें; तसें करतांना आपणाला मरावें लागलें तरी बेहेत्तर' इतकी त्याच्या मनाची तयारी झाली. अनेक रजपूत वीर युद्धांत विजयी होण्याच्या बाबतींत पूर्ण निराश होतांच लढतां लढतां मरावयाचें अशा निश्चयानें जोहाराला प्रवृत्त होतात. त्या निर्वाणीच्या निश्चयानें ते केशरी पोषाख धारण करून प्रथम आपल्या बायका-मुलांना त्यांची आपल्या पश्चात् आपल्या शत्रूंच्या हातून बेअब्रू

होऊं नये म्हणून सर्रास कापून काढतात, व मग रणांगणांत उडी घेऊन शत्रूशीं झगडतां झगडतां मरतात. अशा प्रकारचे सर्वांगावर रोमांच उभे करणारे वीरवृत्तीचे मासले आपणाला तत्कालीन किंवा पूर्वकालीन इतिहासांत अनेक पहावयाला सांपडतात. तशाच प्रकारचा पण त्याहून तत्त्वतः भिन्न असा जोहार करण्याला अबुबकर दारूच्या तारेंत तेव्हां तयार झाला. त्याचा निश्चय झाला, " बस्स ! नूरनिहार आपल्या हातची गेली, आतां ह्या उनाड मैनेची आशा करावयाला नको. पण ही मैना सुखासमाधानानें पिलाजी किंवा रहमान यांपैकीं कोणा एकाच्या पिंजऱ्यांत बसून मंजुळ बोल बोलेन म्हणेल तर आपण तिला जिवंत ठेवणार नाहीं. तिची मुंडी मुरगळून तिला तर आपण ठार करणारच; पण पिलाजी, रहमान वगैरे ज्या नादान लोकांच्या नादानें ती इतकी उनाड बनली, त्या तिच्या कैवाऱ्यांना व त्यांचे कैवारी जे जे कोणी भेटतील त्या सर्वांना आपण एकजात कापून काढणार व अखेर स्वतः मरणार ! आपणाला आतां दुनियेची काय पर्वा आहे ! आप मर गया और दुनिया डुब गया ! "

विषयांधतेच्या भरांत इतका अविवेकी बनलेला वेडा पीर अबुबकर दारूच्या धुंदींत प्रथम 'जो हातीं सांपडेल त्याला कापून काढीन' अशा इराद्यानें प्रथम किल्लेदाराच्या घरांत पिलाजीला कापून काढण्यासाठीं गेला; पण किल्लेदारानें त्याचा आंत प्रवेश होऊं दिला नाहीं. नूरनिहार व रहमानही आंत पिलाजीच्या शुश्रूषेंत गुंतलीं असल्यानें त्यांना ठार करण्याचा त्याचा बेतही आपोआपच लांबणीवर पडला. पण तो असल्या अडचणींना जुमानणारा नव्हता. त्यानें किल्लेदाराच्या घराबाहेरील लोकांत आपल्या प्रतिज्ञेची फुशारकी मारण्याला सुरवात केली, " बस्स ! आज पिलाजी हातीं लागला नाहीं, तर त्याच्या घरीं जाऊन त्याच्या बायको-पोरांना तरी मी खास छळीन."

ही अबुबकरची प्रतिज्ञा नूरनिहारच्या कानीं गेली तेव्हां तिला अर्थातच मोठी चिंता पडली कीं आतां कसें करावें ! अबुबकर बोललेला शब्द खरा करण्याला कमी करणार नाहीं. तो गमाजी वगैरे आपल्या साथीदारांच्या साह्यानें पिलाजीच्या बायकोला छळूं शकेल, याविषयीं तिची खात्री होती. यापूर्वीचे असे अनेक दाखले तिच्या डोळ्यांसमोर होते. स्त्रियांना आपली अब्रू राखण्यासाठीं किती परींनीं कष्ट सोसावे लागतात व अशा चांडाळांच्या छळानें त्यांना कसें त्राहिभगवान् होऊन जातें, याचा तिला स्वतःला अनुभव होताच शिवाय आपल्या पाठीराख्या पिलाजीची

व पिलाजीच्या पत्नीची अब्रू म्हणजे आपलीच अब्रू होय असें तिला वाटे. त्यामुळें अबुबकरची वल्गना ऐकून तिला कमळेविषयीं फार चिंता वाटूं लागली. ताबडतोब तिनें रहमानला हांक मारली, व 'राजवाड्यांत लक्ष्मीबाईसाहेबांच्या कांहीं कामासाठीं आपणाला जावयाचें आहे त्यासाठीं रहमान आपल्या सोबतीला असावा' असें किल्लेदाराला सांगून रहमानला आपल्या बरोबर घेऊन ती बाहेर पडणार, तोंच पिलाजी कांहींसा शुद्धीवर येऊन कमळा व सटवोजी यांना केविलवाण्या स्वरानें हांका मारूं लागला.

किल्लेदार भला माणूस होता. शिवाय 'परि माझा पांडवांकडे ओढा' या न्यायानें त्याचा प्रथमपासूनच सत्पक्षीय पेशव्यांकडे ओढा असल्यानें व पिलाजी हा पेशव्यांचा शतवीर असल्यानें त्याला पिलाजीविषयीं सहानुभूति वाटणें शक्य होतें. दुसरी गोष्ट पिलाजीच्या यातनांची त्याला कल्पना नसल्यानें न जाणो, कदाचित् ह्याच जिवावरच्या अपघातांत त्याचा अंत होणार असला तर त्याला त्याच्या प्रेमळ बायकोमुलांची अखेरची भेट झालेली बरी, असा पोक्त विचार करून किल्लेदारानें नूरनिहारला बाहेर गेल्यावर कमळेला ह्या एकंदर प्रकाराची खबर देण्याला सांगितलें.

"बरें आहे; तेवढें काम मी करत्यें." असें म्हणून नूरनिहार रहमानसह किल्ल्याबाहेर पडली. वस्तुतः ती जी राजवाड्यांतील कामाच्या मिषानें बाहेर पडली होती, ती त्याच—कमळेला भेटण्याच्याच इराद्यानें बाहेर पडली होती. पण तिला तें उघड उघड बोलून दाखवावयाचें नव्हतें.

कोठेंही झालें तरी कप्या घालून कोंबडीं झुंजविणारे लोक हे असतातच. असे लोक किल्ल्यावरच्या नोकरचाकरांत थोडेथोडके होते असें नाहीं. तशांत नूरनिहारच्यासारखा नाजुक विषय त्यांना टवाळी करण्याला मिळाल्यावर त्यांच्या टवाळीला उधानाची भरती आल्यास नवल काय ? नूरनिहार ही अशी सर्वस्वी अनाथ अबला; अशा बेवारशी मालावर वारसा शाबीत करण्यासाठीं सभोंवारच्या बाजारबुणग्यांत ओघानेंच अहमहमिका सुरू असावयाची. त्या लोकांच्या किंवा तत्कालीन समाजाच्या दृष्टीनें त्यांत म्हणजे मोठें पाप होतें असें नाहीं. कनक व कांता यांचा मोह बहुजनसमाजाला कधीं टाळतां आला आहे ? जगांत कोणत्या काळीं असा एकछत्री सुज्ञ समाज कधीं नांदत होता किंवा पुढें कधीं काळीं नांदेल, कीं, कनक व कान्ता ह्या दोन दुर्दमनीय मोहांचा चिखल अंगाला फांसण्यांत त्याला कंटाळा वाटला किंवा वाटेल ? तसेंच कनक व कान्ता यांची

भल्या अथवा बुऱ्या मार्गानें प्राप्ति करून घेण्याची संधि लाभली असतां त्या संधीचा फायदा करून न घेण्याइतकी निर्लेप नीतिमत्ता समाजाच्या आचरणांत पूर्णांशानें प्रतिबिम्बित झाली आहे असें कधीं तरी आजवर झालें आहे ? याविषयीं अमक्याच काळांतील अमक्याच लोकांना दोष देण्याचें कारण नाहीं. जेथें गांव तेथें म्हारवडा हा असावयाचाच, रामराज्याच्या वेळीं रावण जन्मावयाचेच ! याच न्यायानें प्रतिकूल परिस्थितींतही पातिव्रत्याला प्राणांहून थोर मानणारी नूरनिहार सातारा किल्ल्यावर होती, तेव्हां तिच्या सभोंवार तिच्यावर पापी नजर ठेवणारे किंवा तिच्या पडत्या काळाचा फायदा घेऊन तिची टर करण्यांत जिवाची करमणूक करणारे टवाळ लोकही होतेच. त्यांची मूळपासूनच टवाळी करण्याकडे प्रवृत्ति, व अबुबकरसारखा वेडापीर ते नाचवितील तसा नाचण्याला तयार ! त्यांनीं त्याला लगेच भर दिली, " वेड्या ! तुझ्या नाकावर टिचवून नूरनिहार रहमानच्या गळ्यांत गळा घालून रात्रीं बेरात्रीं बाहेर हिंडूं लागली कीं नाहीं ! तुला नूरनिहारनें केवळ पायांतल्या पायपोसाप्रमाणें कःपदार्थ लेखलें ! छीः ! छीः धिक्कार असो तुला ! तुझ्या जागीं आमच्यांतला कोणी असता तर त्या रहमानला व त्या नूरनिहारला केव्हांच ह्या जगांतून नाहींशीं करून टाकता. मग त्यांत मरण वांट्याला आलें असतें तरी बेहेतर ! "

आजूबाजूच्या लोकांच्या ह्या चिथावणीमुळें दारू पाजून झिंगविलेल्या माकडाच्या हातीं पेटतें कोलीत मिळाल्याप्रमाणें अबुबकरची अवस्था झाली. तो तेथल्या तेथें नूरनिहार व रहमान यांच्यावर सूड घेण्याची, व पिलाजीची नूरनिहारला भूल पडली म्हणून पिलाजीच्या बायको-मुलावर सूड घेण्याची प्रतिज्ञा करून दारूच्या नशेंत आपल्या आणखी चारपांच साथीदारांसह किल्ल्याबाहेर पडला. नूरनिहार व रहमान त्यापूर्वीच पुढें निघून गेलीं असल्यानें तीं कांहीं तेथें त्यांच्या हातीं सांपडलीं नाहींत; पण भोजराज मात्र तोफेच्या तोंडीं देण्यासाठीं उभा केल्याप्रमाणें त्यांना किल्ल्याच्या देवडीसमोर उभा असलेला सांपडला भोजराजाचा गुन्हा काय तो एवढाच कीं अबुबकर देवडीबाहेर येतांच त्यानें त्याजपाशीं पिलाजीविषयीं चौकशी केली, " पिलाजीची काय खबर आहे ? "

" कोण रे तूं पिलाजीची इतकी कळकळीनें चवकशी करणारा ? " अबुबकरनें दारूबाजीच्या ऐन अंमलांत विचारलें.

भोजराजाला वाटलें कीं, आपण आपलें खरें नातें सांगितल्यानें ह्या माणसांना वचक वाटून ते आपणाला पिलाजीविषयीं खबर देतील. म्हणून तो उत्तरला, " बाजीरावसाहेबांच्या सांगण्यावरून मी एथें आलों आहें. पिलाजीचा स्नेही जो मल्हारी होळकर, त्याचा सासरा मी. पिलाजीच्या बायकोनें मला एथें पिलाजीची चौकशी करण्यासाठीं पाठविलें आहे."

पिलाजीच्या बायकोचें नांव निघतांच अबुबकरला आणखी दारू न पितांच आणखी दारू प्याल्याप्रमाणें जादा कैफ चढला. तो आपल्या इतर सोबत्यांना उद्देशून आढ्यतापूर्वक बरळला, " हरामखोर तो पिलाजी व त्याचा बाप हा सात हरामखोर ! "

भोजराजानें ओळखलें कीं, हें प्रकरण कांहीं एकंदरींत ठीक नाहीं. त्या मंडळीनें त्याच्याशीं सामोपचारानें बोलण्याचें सोडून एकदम शिवीगाळ करण्याला सुरवात केली. तेव्हां तो प्रसंगावधान राखून गप्प राहिला नसता, तर दिवेलावणीच्या वेळीं जी गत पिलाजीची झाली तीच गत आतां त्याचीही झाली असती. दारूच्या नशेंत त्या लोकांच्या हातून हा प्रमाद होत आहे असें पहातांच त्याला त्यांची कींव आली व 'मूर्खांच्या संगतीला काय लागावयाचें' असा विवेक करून स्तब्ध रहाण्याचा शहाणपणा त्यानें केला. पण तोही त्याच्या अंगाशीं आला. त्याला शिव्या तर सहन कराव्या लागल्याच; पण ही त्याची सहनशीलता आहे असें त्या मूढांना न वाटतां तो जात्याच भित्रा आहे अशी त्यांची कल्पना झाली. त्यामुळें ते फारच शेफारून गेले व इतका वेळ त्यांचीं तोंडेंच अत्याचार करीत होतीं, त्यांच्या जोडीला त्यांचे हातही सज्ज झाले. अबुबकरच्या हातांतील सोटयाचा पहिला तडाका भोजराजाच्या पाठींत बसला. भोजराज जरी वयानें वृद्ध होता तरी तो कमी ताकदवान् किंवा कमी शूर होता अशांतली गोष्ट नाहीं. तो चांगला कसलेला योद्धा होता व रणांगणावर त्यानें एकेका वेळीं अबुबकरसारख्या कैक मुर्दाडांचे मुड्दे लोळविले होते. पण आज तो जो किल्ल्यावर आला तो लढवय्या या नात्यानें शस्त्रास्त्रांनीं सज्ज होऊन रणांगणावर आला नव्हता, यामुळें त्याला अबुबकर वगैरे कैफी लोकांच्या पाशवी पुंडगिरीचा प्रतिकार करण्याला कांहीं साधन नव्हतें. तरीही त्यानें आपल्या प्रतिस्पर्ध्यांची ही पुंडगिरी म्हणजे केवळ दारूची धुंदी आहे हें ओळखून तेव्हांच घोडयावरून खालीं उडी ठोकली व एकेकाला खाशी जोरकस गचांडी देऊन लोळविलें. त्यांतले एकदोन तेथल्या तेथें पडून धडपडूं लागले, व अबुबकर आणि दुसरे जे त्यांतल्यात्यांत शाबूत होते, त्यांनीं एकदम 'दगा ! दगा !' अशी आरडा-

ओरड केली. आतां मात्र आपला तरणोपाय नाहीं हें भोजराजानें ओळखलें व तात्पुरतें स्वसंरक्षण करण्यासाठीं म्हणून चपळाईनें आपल्या घोड्यावर स्वार होऊन तेथून पळ काढला.

भोजराजानें तेथून पळ काढला म्हणूनच तो बचावला. कारण देवडीबाहेरील आरडाओरड ऐकून किल्ल्यांतलि बरेच लोक व स्वतः शेखमिरा किल्लेदारही बाहेर आला. त्यानें चौकशी केली तेव्हां अबुबकरनें आपलें एकतर्फी गाऱ्हाणें त्याच्या-समोर गाइलें, "भोजराज नांवाच्या थेरड्यानें एथें येऊन आमच्याशीं विनाकारण मारामारी केली."

किल्लेदाराला वाटलें, भोजराजाला इथें येऊन अशी मारामारी करण्याचें काय प्रयोजन ! आणि त्यांतल्यात्यांत त्यानें किल्ल्यावरील लोकांना मारलें म्हणजे काय बिशाद आहे ! "बस्स ! ह्या अरेरावाचा बंदोबस्त हा झालाच पाहिजे." किल्लेदार आवेशानें म्हणाला, "ह्या गुन्हेगाराचें शासन हें झालेंच पाहिजे."

अबुबकरच्या डोळ्यांवरील दारूची धुंदी आतां बरीच उतरली होती. तो म्हणाला, "जरूर शासन झालें पाहिजे. किल्लेदारसाहेब ! आपण परवानगी द्याल तर आम्ही आतांच्या आतां जाऊन त्याला पकडून आणतों. तो इतका मगरूर आहे कीं, आम्ही किल्लेदारापाशीं कागाळी नेऊं असें त्याला म्हणालों," अबुबकरनें किल्लेदाराच्या क्रोधाच्या वणव्यांत खोडसाळपणाचें तेल ओतलें, "तेव्हां तो म्हणाला, तुमच्या त्या बुड्ढ्या किल्लेदाराच्या पिकलेल्या दाढीचे केंस उपटून तिच्यावर मी थुंकेन."

किल्लेदाराला हें अपमानकारक विधान ऐकून चीड कां नाहीं येणार ! त्यानें संतापाच्या भरांत एकदम हुकूम सोडला, "बस्स ! त्या मगरूर मरगठ्याला धरून बांधून माझ्यासमोर आणा व त्याचे डोळे माझ्या दाढीसारखे पांढरे होईतों माझ्या दाढीच्या केंसागणिक चाबकाचे कोरडे त्याच्या पाठीवर हाणा."

अबुबकराला जें पाहिजे होतें तें मिळालें. दारूची नशा कांहींशी उतरल्यामुळें केवळ बेजबाबदारीनें आपण पिलाजीच्या घरावर चालून जाऊन त्याच्या बायको-पोरांची विटं-बना कशी करावी असें भय त्याला वाटत होतें, तें किल्लेदाराची आज्ञा ऐकतांच आपोआप दूर झालें. आतां किल्लेदाराच्या आज्ञेच्या नांवावर आपण भोजराजाला तर लोळवूंच; पण त्याच्या बरोबरच पिलाजीच्या निमित्तानें कमळा, रहमान, नूरनिहार वगैरे जीं जीं माणसें आपले दुष्मन झालीं आहेत त्या त्या सर्वांना एकजात खच्ची करण्यालाही आपणाला ह्या पडत्या फळाच्या आज्ञेचा उपयोग होईल, याविषयीं अबुबकरला

शंका उरली नाहीं. त्यानें किल्लेदाराच्या सांगण्यावरून आपल्याबरोबर पांचचार निवडक लोक घेऊन थेट पिलाजीच्या घराकडे आपला मोर्चा वळविला. जातां जातां त्या चांडाळचौकडीची आणखी अशीही मसलत ठरली कीं, आतां जातांना प्रथम यमाजी-पंताच्या घरीं जावें व त्या बापलेकांना हा प्रकार सांगावा, म्हणजे अनायासें तेही आपल्या मदतीला धावून येतील. ही मसलत अबुबकरच्या विशेष पथ्यावर पडण्याचें कारण असें कीं, यमाजी व गमाजी यांनीं त्याला नूरनिहार मिळवून देण्याचें आगाऊ कबूल केल्याप्रमाणें या वेळीं त्यांचा विशेष उपयोग होण्यासारखा होता.

* * *

अबुबकर वगैरे मंडळींची बाजीराव आणि गोविंदा यांची फार थोड्या अंतरानें चुकामूक झाली. ते निघून गेले व लगेच हे दोघे किल्ल्यावर येऊन पोंचले. गोविंदा आपला व बाजिरावाचा असे दोन्ही घोडे सांभाळण्यासाठीं किल्ल्याच्या देवडीबाहेरच उभा राहिला व बाजीराव एकटाच आंत गेला. बाजिरावानें प्रथम पिलाजीविषयीं चौकशी केली. किल्लेदाराच्या घरांत जाऊन त्याची गांठ घेतली. पिलाजी अजून बेशुद्ध स्थितींतच असल्यानें बाजीराव त्याला केवळ डोळाभर पाहूं शकला इतकेंच.

“ शेख ! हा माझा माणूस तुझ्या ताब्यांत आहे; त्याच्या जीविताची जबाबदारी तुझ्यावर आहे.” बाजीराव म्हणाला.

“ कबूल ! ” किल्लेदार उत्तरला, “ पण सरकार ! आपल्या व प्रतिनिधींच्या झगड्यांत माझी मात्र मधल्या मध्यें दामटी वळूं नये म्हणजे झालें. तसेंच किल्लेदार ह्या नात्यानें मला जो जो बंदोबस्त करावा लागेल, त्याच्याआड आपण येऊं नये.”

किल्लेदाराच्या ह्या संदिग्ध बोलण्याचा अर्थ बाजिरावाच्या ध्यानीं येईना. तो म्हणाला, “ शेख ! तुझ्या अंमलबजावणीच्या कामीं मी तुला प्रतिकार करीन अशी तुला शंका तरी कां आली ? ”

“ पण कांहीं बाबतींत माझ्याविषयीं आपल्या मनांत विकल्प येण्याचा संभव आहे. उदाहरणार्थ पिलाजीवरचा प्रसंग—”

“ छे ! तसा विकल्प मी कधींच मनांत येऊं देणार नाहीं.” बाजीराव किल्लेदाराचें पुरतेपणीं ऐकून न घेतां म्हणाला, “ तसें पाहूं गेलें असतां पिलाजीवर हा जो प्रसंग गुदरला तो तुझ्या किल्ल्यावर तुझ्या हुकमतींतील लोकांच्या हातून गुदरला. पण त्याबद्दल मीं तुला जबाबदार धरलें नाहीं, इतकेंच काय; पण ह्या कामीं गुन्हेगार कोण कोण आहेत हें मला माहीत असूनही मीं मनावर घेतलेलें नाहीं.”

बाजिरावाचे हे शब्द किल्लेदाराला वर्मी झोंबले. पण त्याचा परिणाम बाजिरावाला इष्ट असाच झाला. किल्लेदाराला हा वेळपर्यंत वाटत होतें कीं, पिलाजीवर कसा काळ ओढवला याविषयीं बाजिरावाला कांहींच माहिती नसेल. तशी माहिती असती तर त्यानें किल्ल्यावर येतांच गुन्हेगारांची चौकशी प्रथम केली असती; पण तसें त्यानें कांहींच केलें नव्हतें. इतकेंच काय; पण पिलाजीची चौकशी करतां त्याला पिलाजी बेशुद्ध स्थितींत आढळला तेव्हां असें कसें झालें म्हणूनही त्यानें विचारलें नव्हतें, व आपल्या अमलांत असला अत्याचार घडणें आपणाला लांच्छनास्पद आहे असें मानून किल्लेदारानेंही आपण होऊन त्या गोष्टींची वाच्यता केली नव्हती. पण हा सर्व प्रकार बाजिरावाला माहीत असूनदेखील बाजीराव त्याविषयीं कांहीं बोलत नाहीं असें कळतांच तो आपण होऊनच मनांतल्या मनांत शरमला कीं, आपण मात्र भोजराजाला गुन्हेगारीबद्दल पकडून आणण्यासाठीं अबुबकरला पाठविण्यांत उतावळेपणा केला. आतां बाजिरावानें जर भोजराजाविषयीं विचारलें तर आपण काय सांगावें हेंच किल्लेदाराला सुचेना. त्याच्या मतें भोजराज गुन्हेगार होता. पण त्याचें शासन करावयाचें त्यानें मनावर घेतलें असतें तर पिलाजीच्या जिवावर उठणाऱ्या इतक्या लोकांनाही मग शासन भोगणें प्राप्त झालें असतें. त्या इतर लोकांची गोष्ट राहो, त्याचा स्वतःचा भाचा अबुबकर त्यांत प्रथम सांकटला गेला असता.

पण किल्लेदाराच्या सुदैवानें बाजिरावानें भोजराजाविषयींचा प्रश्न तितका धसाला लावला नाहीं. त्यानें किल्लेदारापाशीं त्याच्याविषयीं जुजबी चौकशी केली व किल्लेदारानेंही 'आपणाला भोजराज भेटला नाहीं' असें शब्दशः खरें पण जुजबी उत्तर दिलें. त्याच वेळीं अबुबकर भोजराजाला पकडून आणण्यासाठीं गेल्याचें त्याला पक्कें आठवत होतें. पण त्यानें स्वतःच्या मनाशीं असा विचार केला होता कीं, भोजराजाला अबुबकरनें पकडून आपल्यासमोर आणलें म्हणजे आपण त्या दोघांचीही परस्पर समजूत घालून त्यांना सोडून देऊं. त्यामुळें आपला भाचाही बचावेल व भोजराजाला सोडल्याचें श्रेयही अनायासें आपल्या पदरीं पडेल.

" बरें; तूं म्हणाला होतास कीं आपण पहांटेच्या प्रहरीं बोलूं, तें काय ?" बाजिरावानें जातां जातां विचारलें.

आपणाला माहीत आहे तें सांगावें कीं सांगूं नये, असा किल्लेदारानें क्षणभर विचार केला. तेवढ्यांत त्याच्या सदसद्विवेकबुद्धीनें त्याला असें सांगितलें कीं, एका

नोकराला एकाच वेळीं दोन धन्यांची इमानें इतबारें नोकरी करतां येणें शक्य नाहीं. अर्थात् प्रतिनिधि व पेशवे यांपैकीं कोणा एकाचा पक्ष आपण घेतला, कीं दुसरा पक्ष आपणाला तुटणार. दुसरें असें कीं, प्रतिनिधींशीं तरी किल्लेदाराचें म्हणण्यासारखें सूत नव्हतें. परशरामपंत प्रतिनिधींना पकडून त्यानें शाहूमहाराजांच्या स्वाधीन केल्यापासून आज आठ नऊ वर्षें तो अनुभव घेत होता, त्यावरून आपणाविषयीं प्रतिनिधींच्या मनांत दावेदारी आहे हें त्याला माहीत होतें. इतकेंही करून त्यानें आजकाल प्रतिनिधींसमोर हरएक बाबतींत नमतें घेण्याचा उपक्रम केला होता, याचें कारण प्रतिनिधि हा अलीकडे भोळ्या शाहूमहाराजांच्या गळ्यांतला ताईत—सांबाच्या पिंडीवरील विंचू बनला होता हें होय. प्रतिनिधींच्या मर्दुमकीचा भर त्याच्या कुटिल कारस्थानांवर व लावालावींच्या कौशल्यावर होता; पण पेशवे जसे मुत्सद्दी तसेच शूरही होते. अर्थात् प्रस्तुतच्या झगड्यांत अखेर वीरश्री पेशव्यांनाच माळ घालणार; आज जरी आपण त्यांच्या उपयोगी पडलों नाहीं, तरी त्यांचें काम अडून राहील असें नाहीं; आपण आपला कोंबडा झांकून ठेवला म्हणजे उजाडावयाचें राहील असें नाहीं; मात्र 'ऐन आणीबाणीच्या वेळीं किल्लेदारानें आपणाला मदत केली नाहीं' एवढा पेशव्यांचा ठपका आपणावर कायमचा राहील व पुढें पेशवे अधिकारारूढ झाल्यावर त्यांचा रोष आपणाला नडेल' असा साधकबाधक विचार करून अखेर किल्लेदारानें पेशव्यांचीच बाजू निश्चयपूर्वक उचलून धरण्याचें ठरविलें व सांगितलें, " रावसाहेब ! मी आपणाला एक अत्यंत महत्त्वाची बातमी सांगतों. पण माझें नांव बाहेर फुटणार नाहीं, याविषयीं आपणाकडून मला वचन पाहिजे आहे."

" हें घे वचन." असें म्हणून बाजिरावानें किल्लेदाराच्या हातावर हात दिला.

किल्लेदार उद्गारला, " प्रतिनिधींनीं निजामाला सादर करण्यासाठीं कसलासा एक खलिता सुमंतांच्या हातीं दिला आहे व रामदासपंत आणि गुलाम महंमदअल्ली यांच्यासह सुमंत आजच्या आज मोठ्या पहांटेला औरंगाबादेकडे जावयाला निघणार आहेत, असें मला खातिबांच्या घरीं समजलें."

" अस्सें ! " बाजीराव कांहींसें स्वगत व कांहींसें प्रगट उद्गारला. त्याला गोंधळ्यांच्या निवेदनावरून जें कांहीं कळलें होतें, लक्ष्मीनें त्याला जी माहिती दिली होती व राणोजीनें जो भेद आणला होता. त्याचाच हा निष्कर्ष होता. मात्र यापूर्वीची माहिती अनुमानसूचक होती, तिचें जास्त व्यवस्थित स्वरूप कळण्याला त्याला किल्लेदाराच्या निवेदनाची मदत झाली इतकेंच.

" बरें; तूं खतिबांच्या घरीं सायंकाळीं कशासाठीं गेला होतास ? " बाजिरावानें विचारलें.

किल्लेदार उत्तरला, " तेथें मला बोलावून सुमंतांनीं प्रतिनिधींच्या तर्फेनें 'तूं आमचा माणूस आहेस, एवढें समजून वाग ' असें सांगितलें, व आपण साताऱ्यांत आल्यावर आपल्या हालचालींवर नजर ठेवण्याची कामगिरी मजवर सोंपविली."

" ठीक आहे." बाजीराव म्हणाला, " मी आतां जातों. पण जातां जातां तुला जें प्रतिनिधींच्या तर्फेनें सुमंतांनीं सांगितलें तेंच सांगतों कीं, तूं माझा माणूस आहेस. प्रतिनिधींप्रमाणें लांचलुचपतीचा प्रकार माझ्यापाशीं कांहींदेखील नाहीं. पण मी तुला एवढेंच वचन देऊन ठेवतों कीं, नानासाहेबांनीं तुला स्नेही म्हणून वागविलें, त्यांचाच मी मुलगा; मीहा त्या स्नेहांत अंतर पडूं देणार नाहीं व तूंही तें पूर्वींचें नातें विसरतां कामा नये. एखाद्या अन्याय्य कृत्यांत स्नेह्यांच्या स्नेहाचा दुरुपयोग करून घ्यावा अशी माझी मुळींच इच्छा नाहीं; तरी पण न्याय्य कृत्यांत स्नेह्याचा होईल तितका उपयोग करून घेण्याचा प्रत्येकाला अधिकार आहे. तो अधिकार माझ्या बाबतींत तुला आहे तसा तुझ्या बाबतींत मला आहे. खरेंना ? "

" हें काय विचारावें सरकार !"

" झालें तर मग. त्या नात्यानें माझें तुला एवढेंच सांगणें आहे कीं, प्रतिनिधींच्या कोणत्याही कुटिल कारस्थानांना तूं बळी पडूं नकोस. हें तूं केवळ स्नेह्यासाठीं —केवळ माझ्यासाठीं कर असें मी सांगत नाहीं. ज्या धन्याचें अन्न तूं खातोस, ज्या गादीचा तूं सेवक आहेस, त्या धन्याशीं व त्या गादीशीं इमानदारी राख म्हणजे झालें. आतां तूं जी खलित्याची बातमी सांगितलीस, तीच बातमी यापूर्वीं मला अन्य मार्गांनीं कळली आहे. प्रतिनिधींच्या कावेबाजीचा गळफांस तुझ्या व माझ्या धन्याच्या गळ्याशीं झोंबण्याचा फार संभव आहे. तूं व मी ज्या गादीची एकनिष्ठपणें सेवा करण्याला कर्तव्यानें बांधलेले आहों, त्या गादीखालीं सुरुंग पेरण्याचा निमकहरामपणाचा उद्योग प्रतिनिधींनीं निजामाच्या हातांत हात घालून आरंभिला असावा अशी माझी बालंबाल खात्री होऊन चुकली आहे. या कारस्थानाचा परिस्फोट करण्याची जबाबदारी तुझ्या माझ्यासारख्या गादीच्या सेवकांवर आहे. तुला माहीत असलेल्या गोष्टी तूं मला सांगून तुझ्यावरची ती जबाबदारी बहुतांशीं पार पाडलीस असेंच मी समजतों. त्यापुढची काय तजवीज करावयाची ती मी आतां करतोंच. पण त्या बाबतींत तुला जातां

जातां एवढेंच सांगावयाचें कीं, प्रतिनिधींच्या ह्या फंदफितुरीचें जाळें तुझ्या किल्ल्या-वर तुझ्या नोकरा-चाकरांत तुझ्या नकळत पसरण्यांत आलें आहे. त्यावर तूं करडी नजर ठेव म्हणजे झालें."

"काय, माझे नोकरचाकर फितूर झाले आहेत?" किल्लेदारानें आश्चर्यचकित होऊन विचारलें.

"होय." बाजीराव उत्तरला.

"असे ते नोकरचाकर तरी कोण?"

"त्यांचीं नांवें कांहीं मला नेमकीं सांगतां यावयाचीं नाहींत. पण सर्वांच्याच हालचालींवर तूं नजर ठेव, एवढेंच मी तुला सांगतों." एवढें सांगून व पिलाजीची योग्य काळजी घेण्याविषयीं पुन्हा एकवार किल्लेदाराला बजावून बाजीराव तेथून निघाला. बाहेर विश्वासू गोविंदा उभा होताच.

किल्लेदाराशीं बाजिरावाचें हें संभाषण सुरू असतां त्याची प्रियतमा जुलिया आंतील बाजूला उभी राहून ऐकत होती. एकदां तर ती आंत उभी असलेली किल्लेदारानें पाहिलीही. पण तिच्याविषयीं त्याला संशय कसा येणार!

बाजिराव किल्ल्याबाहेर जावयाला निघाला तेव्हां किल्लेदार त्याला दरवाजापर्यंत पोंचवून माघारा आला. आतां बाजिरावानें किल्ल्यावरील नोकरांचाकरांत फितुरीचें जाळें पसरल्याचें ध्वनित केलें होतें तें त्याच्या डोक्यांत सारखें घोळत होतें. त्या फितुरीविरुद्ध बंदोबस्त करण्यांत ढिलाई होतां कामा नये असें त्याच्या मनानें घेतलें. तो दिवेलावणीच्या वेळीं रंगमहालासमोर बाजिरावाशीं बोलत असतांना रंगमहालाच्या गच्चींतून सगुणाबाई व सकवारबाई ह्या दोघी राण्यांनीं पाहिलेलें त्याला आठवलें. त्यांचें ह्या फितुरींत प्रामुख्यानें अंग असल्याबद्दल त्याला संशय नव्हता. म्हणून त्यानें प्रथम किल्ल्याच्या देवडीवरील पहारा पक्का केला व लगेच रंगमहालांतून किल्ल्यांत येण्याच्या भुयाराच्या प्रवेशद्वाराला कुलूप ठोकून स्वतःच्या विश्वासांतील व नात्यांतील उस्मान नांवाचा पहारेकरी तेथें ठेवून दिला, व त्या किल्ल्या त्याच्या स्वाधीन करून त्याला निक्षून सांगितलें, "मला सांगितल्या-शिवाय कोणालाही भुयारांत जाऊं द्यावयाचें नाहीं किंवा भुयारांतून बाहेर येऊं द्यावयाचें नाहीं."

पण एवढा बंदोबस्त करून किल्लेदार आपल्या मकाणांत येतो व बिछान्यापाशीं जातो तों त्याची आवडती जुलिया बिछान्यावर नाहीं! इतक्या अपरात्रीं ती कुठें

गेली असावी याविषयीं चौकशी करण्याचें त्याच्या मनांत आलें; पण त्यानें मुद्दाम चौकशी केली नाहीं. कारण, आधींच जुलिया छटेल म्हणून किल्ल्यावर गाजलेली



अजिमतारा किल्ल्याचा मुख्य दरवाजा—सातारा.

चित्रकार—वा. ग. आगटे.]

होती. तशांत ती इतक्या अपरात्रीं बाहेर गेली असा बोभाटा झाल्यास टवाळ लोक जें बोलूं नये तें बोलूं लागावयाचे ! वस्तुतः जुलिया बिछान्यावर नाहीं असें पाहतांच प्रथमच किल्लेदाराच्या मनांत काळें यावयाला नको होतें. जुलिया सहज कुठें आंत बाहेर गेली असली तर इतक्यांत परत येईल अशा विचारानें किल्लेदाराच्या जागीं दुसरा कोणताही पति असता तर क्षणभर निमूटपणें तिची वाट पहाता व बराच वेळपर्यंत ती परत आली नाहीं असें पाहून मग काय ते तर्ककुतर्क लढविता. किंवा वेळीं कोणताच संशय न घेतां मुकाटयानें झोंपीं गेला असता. पण किल्लेदार साठीच्या घरांतील झाला गेला दादला होता व जुलिया ही ऐन अठरांच्या उमरीची रसरसलेली युवति होती; शिवाय ती छटेल म्हणून साऱ्या किल्ल्याभर गाजलेली होती. सामान्यतः कोणताही वृद्ध पति आपल्या इतक्या तरुण पत्नीविषयीं सदाचाच संशयग्रस्त असतो. तशांत किल्लेदाराची जुलिया छटेल म्हणून गाजलेली, मग त्याला तिच्याविषयीं संशय आला यांत नवल काय !

आणि किल्लेदाराच्या जुलियेविषयींच्या संशयाचें समर्थन करण्यासाठीं नव्हे, तर वस्तुस्थितीचें स्थूल प्रामाण्य दाखविण्यासाठीं जुलियेच्या बाबतींत एक तात्कालिक महत्त्वाची गोष्ट सांगावयाची म्हणजे 'जुलिया आतां येईल, मग येईल' अशा आशेनें वाढत्या संशयाच्या ज्वाळांत होरपळत किल्लेदार चांगली अर्धी घटका बिछान्यावरच वाट पहात बसला होता; पण ती कांहीं आली नाहीं. अर्ध्या घटकेनंतर उस्मान मात्र एकाएकीं लगबगीनें किल्लेदारापाशीं आला व म्हणाला, " किल्लेदारसाहेब ! रंगमहालांतून कोणी माणूस भुयाराच्या दारापाशीं आलें आहे. त्याला आंत यावयाचें आहे."

" कोण आलें आहे ? " किल्लेदारानें त्रासिक स्वरानें विचारलें.

उस्मान उत्तरला, " तें मीं विचारलें; पण उत्तरच मिळत नाहीं."

" कोण आहे तें कळल्याशिवाय दरवाजा उघडण्याची परवानगी नाहीं असें सांग." किल्लेदार उत्तरला.

किल्लेदाराच्या हुकुमाची तामिली करण्यासाठीं उस्मान निघून गेला. तेवढ्यांत किल्लेदाराला काय वाटलें नकळे, तोही बिछान्यावरून उठून डोळे चोळीत चोळीत चडफडत उस्मानाच्या मागोमाग तिकडे गेला.

# प्रकरण आठवें

# राईचा पर्वत



आतां आपणाला साताऱ्यापासून थोड्या अंतरावरील महारदऱ्याच्या जंगलांत—नव्हे, जंगलाच्या जरा अलीकडे उजव्या बाजूला महारदऱ्याच्या तळ्याशेजारीं शाहूमहाराजांच्या स्वारीचा लवाजम्यासह तळ पडला होता तेथें जावयाचें आहे.

एथवर साताऱ्यांतील घडामोडींचें वर्णन करतांना त्या रात्रीं—ज्या रात्रीं बाजीराव सासवडाहून पेशवाईपदाचा स्वीकार करण्यासाठीं म्हणून साताऱ्यांत आला व तेथल्या अनेक गुंतागुंतींचा तपास करतां करतां त्याला धड झोंपही मिळणें अशक्य झालें, ज्या रात्रीं पिलाजी सातारा येथील किल्लेदाराच्या घरांत बेशुद्ध पडला होता, ज्या रात्रीं यमाजी व गमाजी हे बापलेक मल्हारी होळकराच्या मानी व सदाचारी अर्धांगीशीं निष्कारण लगट करण्याच्या ऐन रंगांत आले होते, त्याच रात्रीं शाहूमहाराज महारदऱ्याच्या जंगलांतील छावणींत आपल्या सुश्रृंगारित तंबूंत झोंपीं गेले होते नव्हते, तोंच वाचकांच्या परिचयाचे झालेले ते चौघे गोंधळी छावणीबाहेरच्या पहाऱ्यावर येऊन पोंचले. तेव्हां पेशव्यांच्या विश्वासांतील* पिराजी राऊत व नाथाजी धुमाळ हे दोघे शतवीर पहाऱ्यावर होते. वास्तविक हे पेशव्यांचे सेवक पेशव्यांपाशींच असावयाचे; पण शिकारीच्या कामांत ते दोघेही अत्यंत निष्णात असल्यानें शाहूमहाराजांनीं अलीकडे त्यांना पेशव्यांपासून मुद्दाम मागून घेतलें होतें. पेशव्यांनीं त्या दोघांना शाहूमहाराजांच्या स्वाधीन करण्यांत आपला दुबार हेतु साधला होता. एक तर महाराजांचें प्रिय त्या निमित्तानें झालें व दुसरें, प्रतिनिधि शाहूमहाराजांच्या कानाशीं लागून काय काय कारस्थानें लढवितो, याची महाराज मृगयेनिमित्त दूर एखाद्या जंगलांत गेले असतांना तेथलीदेखील बित्तंबातमी मिळण्याची सोय झाली; असे पेशव्यांनीं यांत एका दगडानें दोन पक्षी मारले होते. महाराज राजधानींत असले म्हणजे पेशव्यांचा घरचा किंवा घरोब्याचा एखादा माणूस प्रतिनिधींचे होरे हेरण्यासाठीं नेहमीं त्यांच्या सन्निध असेच; पण त्याला शिकारीच्या मोहिमेंत महाराजांच्या सन्निध रहाण्याची सोय नसे, ती उणीव पिराजी व नाथाजी यांनीं भरून काढली होती.

---

* 'कादंबरीमय पेशवाई'मधील दुसरी, तिसरी व चौथी ह्या कादंबऱ्या पहा.

पिराजी व नाथाजी यांना लावण्या पोवाड्यांचा राणोजी व मल्हारी यांप्रमाणेंच शोक होता, व यापूर्वी उपरोक्त गोंधळी कसल्याशा निमित्तानें त्यांच्या परिचयाचेही झाले होते. त्यामुळें त्या गोंधळ्यांना इतक्या अपरात्रींदेखील निर्भय-पणें तेथें जातां आलें व छावणींत प्रवेशही मिळाला. इतकेंच काय; पण महाराजांना झोंपेंत त्रास होणार नाहीं इतक्या बेतानें त्या गोंधळ्यांचें तेथें महाराजांच्या लवाजम्यांतील नोकरांचाकरांच्या श्रोतृसमाजांत सुस्वर पोवाडेगायनही झालें. तें गायन त्या रात्रीं सारी रात्रभरही वेळीं चाललें असतें; पण उजाडत्या दिवशीं महाराजांची स्वारी मसूरला जावयाची असल्यानें सर्व नोकरांचाकरांना रात्रभर जागणें इष्ट वाटलें नाहीं. त्यामुळें गोंधळ्यांची एका बाबतींत मात्र निराशा झाली. त्यांच्या मनांतून त्याच रात्रीं शाहूमहाराजांसमोर पोवाडेगायन करून शाबासकी मिळवावयाची होती. पण महाराज उद्यींक प्रवास करावयाचा म्हणून आज रोजच्याहून बरच लौकर झोंपीं गेले होते. पिराजी व नाथाजी यांनीं महाराजांपाशीं त्या गोंधळ्यांची शिफारस करण्याचें कबूल केलें होतें खरें; पण आज त्यांचादेखील कांहीं इलाज चालण्यासारखा नव्हता. तरीही पिराजीनें त्या गोंधळ्यांची उद्यींक मसूर मुक्कामीं महाराजांशीं गांठ घालून देण्याचें मात्र कबूल केलें.

शाहिरानें पिराजीचें तें आश्वासन ऐकून शंभुसिंग नांवाच्या आपल्या साथी-दाराकडे वळून कांहीं संकेत करून विचारलें, "शंभुसिंग! आपण उद्यांपर्यंत थांबावयाचें का?"

शंभुसिंग उत्तरला, "मला वाटतें, आजच्या आज एथल्या मुक्कामांतच महा-राजांच्या पायांपाशीं हजेरी लावतां येती तर फार बरें झालें असतें."

शाहिरानें पिराजीला विचारलें, "महाराजांची स्वारी उद्यां मसूरला कशासाठीं जावयाची आहे?"

पिराजी उत्तरला, "मसूरच्या आसपास निगडीच्या डोंगरांत फार मोठें वाघवें उसळलें आहे. आजूबाजूच्या खेड्यांतून वाघांनीं नुसता हाहाःकार उडवून दिला आहे. त्याचा बंदोबस्त करण्याच्या निमित्तानें खाशी शिकारही सांपडेल म्हणून महाराजांनीं हा बेत केला आहे."

"मग आतां कसें करावयाचें?" शाहिरानें आपल्या तिघां साथीदारांकडे वळून विचारलें.

सर्व साथीदारांचें असें मत पडलें कीं, आपण आजची रात्र इथेंच झोंपावें व उदयीक छावणीबरोबर मसूरला जावें.

" मग काय ? आज तुम्ही इथेंच झोंपणार ना ?" पिराजीनें विचारलें.

" हो ! इथेंच झोंपणार. " शाहीर उत्तरला, " पण आपणाला बुवा ! शंकराचा प्रसाद सेवन केल्याशिवाय झोंप यावयाची नाहीं."

शाहिराच्या ह्या बोलण्यांत काय खोंच होती न कळे, पण त्याचे तिघेही साथीदार तें ऐकून एकमेकांकडे पाहून कावेबाजपणानें हंसले. पिराजी व नाथाजी यांना शाहिराच्या ह्या शंकरप्रसादाची यापूर्वी एकदां ओळख झाली होती, त्यामुळें गोंधळी हंसलेले पाहून त्यांनाही कौतुकानें हंसूं आलें.

" कां रे ? तूं कां हंसलास ? " शाहिरानें चौकस बुद्धीनें विचारलें.

" नाहीं; सरळ भांग प्यावयाची असें न म्हणतां शंकराचा प्रसाद सेवन करावयाचा असें म्हणतां, तें ऐकून आम्हांला हंसूं आलें." नाथाजी म्हणाला.

" मग काय, शंकराचा प्रसाद सेवन करावयाचा ना ? " शाहिरानें नाथाजीची मल्लीनाथी मनावर घेतली न घेतलीसें करून विचारलें.

" हो ! हो ! जरूर सेवन करावयाचा. मात्र तो बेताबातानेंच होऊं द्या, नाहींतर सर्वांचीच फजिती व्हावयाची ! " पिराजी म्हणाला.

" त्याची तुम्हांला मुळींच काळजी नको. " असें म्हणून शाहिरानें आपल्या पोतडींतून गांजा वगैरे भांग तयार करण्याचें सारें साहित्य बाहेर काढलें. आजची भांग कांहीं त्यांनीं अशी तशी बनविली नाहीं. एरव्हीं ते सारे जरी सामान्य लोक होते तरी आज त्यांना राजशाही थाटमाटाचें वारें लागलें होतें; त्यामुळें त्या भांगेंत दूध व मसाला भरपूर घालण्यांत आला होता. साऱ्या गोंधळ्यांत यांतला खरा दर्दी असा तो शाहीरच होता. अर्थात् ही सर्व सिद्धता खास त्याच्याच देखरेखीखालीं झाली होती.

भांग तयार होतांच शाहिरानें प्रथम पिराजी व नाथाजी यांना एकेक पेला भरून झोंकावयाला दिला. नंतर तेथल्या इतर मंडळीला थोडथोडी वाणगी पहावयाला दिली व शेवटीं एका निराळ्या भांड्यांत प्रथमपासून ओतून ठेवलेली होती ती ते स्वतः चौघेजण प्याले.

" त्यांत काय विशेष आहे ? " पिराजीनें विचारलें.

"त्यांत विशेष कांहीं नाहीं; भांग जास्त आहे व मसाला बेताचा आहे. आमच्यासारख्या पट्टीच्या भंगडांना असली अस्सल भांग पाहिजे असते." शाहीर भरलेला पेला ओंठाशीं लावतां लावतां म्हणाला.

"त्यांतला थोडा मासला पाहूं !" पिराजी म्हणाला.

"मासला पहाणार ?" शाहीर त्या भांड्यांतील भांग एका रिकाम्या पेल्यांत ओतून तो पेला पिराजीपुढें करीत म्हणाला, "हा मासला पहा."

पिराजीनें त्या भांगेची चव पाहिली, तों त्याला चवींतील फरक कांहीं कळला नाहीं. पण त्यानेंही त्याची जास्त चिकित्सा केली नाहीं.

सुमारें एका घटकेंतच तो शंकराचा प्रसाद आपला प्रभाव दाखवूं लागला. पिराजी व नाथाजी यांचा पहारा हळूहळू ढिला पडूं लागला. इतर लोक जे आपापल्या जागीं गेले ते शांतपणें झोंपी गेले. गोंधळीही जे पहाऱ्याजवळ घोंगड्या आंथरून पडले, ते लौकरच कांहीं हालचाल करीनासे झाले. त्या सर्व लोकांत खडें जाग्रण करणारे असे पिराजी व नाथाजी असे दोघे पहारेकरी काय ते होते. ते जरी थोड-थोडे पेंगूं लागले होते, तरी बाकीचे सर्व लोक झोंपीं गेलेले पाहून त्यांना वाटलें कीं, आपणांपेक्षां ह्या इतर सर्वांना भांग चढली. पिराजीनें गोंधळ्यांना हांका मारून पाहिल्या; पण कोणी ओ देईना. तें पाहून पिराजी नाथाजीपाशीं व नाथाजी पिराजी-पाशीं, 'आपणां उभयतांनाच काय ती भांग चढली नाहीं' अशी परस्परांची प्रशंसा करूं लागले. हें प्रशंसापुराणाचें रसाळ निरूपण सुरू असतां त्यांना केव्हां झोंप लागली याचा त्यांचा त्यांनाच पत्ता लागला नाहीं !

आणखी कांहीं वेळानें पिराजी व नाथाजी यांना गाढ झोंप लागली. ते घोरूं लागले. इतर लोकही सारे गाढ निद्रेंत निमग्न होऊन गेले. गोंधळी पिराजी व नाथाजी यांच्या पहाऱ्याच्या जाग्याजवळच झोंपले होते. बऱ्याच वेळानें त्या गोंधळ्यांपैकीं शाहीर जो होता, त्यानें वर मान करून कानोसा घेतला, तों त्याला पिराजी व नाथाजी यांचें घोरणें स्पष्ट ऐकूं आलें.

लगेच शाहिरानें आपल्या इतर सोबत्यांकडे वळून हांक मारली, "शंभुसिंग !"

पण शंभुसिंगाचा डोळा लागल्यामुळें त्यानें ओ दिली नाहीं.

शाहिरानें पुन्हा दुसऱ्या साथीदाराला हांक मारली, "अप्पाजी !"

अप्पाजीनेंही ओ दिली नाहीं.

शाहिरानें तिसऱ्या साथीदाराला हांक मारली, "शहाजी !"

पण शहाजीकडूनही ओ मिळेना. शाहिरानें लगेच झोंपल्या झोंपल्या जवळच्या साथीदाराच्या अर्थात् शंभुसिंगाच्या कानाशीं तोंड नेऊन पुन्हा हलकेंच हांक मारली, " शंभुसिंग ! "

शंभुसिंगानें दचकून जागा होत विचारलें, " कोण आहे ? "

" जागा झालास का तूं ? " शाहिरानें विचारलें.

" हो ! जागा झालों."

" अप्पाजी व शहाजी यांना हलकेंच जागे कर." शाहीर म्हणाला.

लगेच शंभुसिंगानें एकाच्या अंगावरचें पांघरूण दूर सारीत व दुसऱ्याच्या बाहूला धरून हलकेंच हलवीत हळूहळू हांका मारून दोघांनाही जागें केलें.

" ते चांगले जागे झाले का ? " शाहिरानें विचारलें.

" हो ! जागे झाले " शंभुसिंग उत्तरला.

" उठा तर." शाहीर म्हणाला.

" पण ते दोघे झोंपीं गेले का ? " शंभुसिंगानें विचारलें.

" हो ! सारे झोंपीं गेले." शाहीर उत्तरला.

" गुंगीच्या औषधाचा चांगला अंमल झाला म्हणावयाचा." शहाजी म्हणाला.

" चूप ! इथें कांहीं बोलावयाचें नाहीं. तुमची तयारी आहे ना ? " शाहिरानें विचारलें.

" हो ! " सर्व एकदम उत्तरले.

" तर मग चला उठा." शाहीर म्हणाला.

" पण पहांट झाली का ? " अप्पाजीनें विचारलें.

" तुम्ही उठा म्हटल्यावर उठा." इतक्यांत कोठूनसा कोंबडा आरवलेला एकूं आला, तेव्हां शाहीर म्हणाला, " हा पहा पहिला कोंबडा आरवला. आतां उशीर करतां कामा नये. आपापलीं हत्यारें घ्या न् माझ्या मागोमाग या."

यावर त्या चौघांचें जास्त कांहीं संभाषण झालें नाहीं. शाहीर पुढें व बाकीचे तिघे त्याच्या मागाहून असे ते चौघेजण अंगाखालच्या कांबळ्यांचे बुरखे घेऊन छावणीच्या आंत लपत छपत चालूं लागले. पिराजी व नाथाजी हे दोन्ही पहारेकरी झोंपीं गेल्यामुळें त्यांना तेथें प्रतिबंध करण्याला कोणीच नव्हतें.

* * *

शाहूमहाराज जे मोठ्या पहाटेला उठले, ते हुजऱ्याला पायखान्यांत तांब्या ठेवण्याला सांगून राबत्यासाठीं बसून उठतात तोंच चौघे बुरखेवाले मारेकरी हातांत नागव्या तरवारी घेऊन कनातीच्या चार कोंपऱ्यांना उभे !* महाराजांनीं ओळखलें कीं हे मारेकरी आहेत. पण महाराजांनीं जरादेखील न डगमगतां शांतपणानें त्या मारेकऱ्यांना विचारलें, " बाबांनो ! तुम्हांला काय पाहिजे आहे ? काय मागणें मागावयाचें तें मागा, तुमची इच्छा आम्ही पूर्ण करूं. बरें; आमचे प्राणच मागावयाचे असले तर ते मागा. हे आम्ही तुमच्या समोर उभे आहों. त्यांत एवढी चोरी बाळगण्याचें काय कारण ! "

---

* ह्या प्रसंगाविषयीं 'मराठी दप्तर—रुमाल पहिला' (पृष्ठ १२७) ह्या बखरींत पुढील प्रमाणें उल्लेख आहेः......शाहु महाराज छत्रपती हे राज्य करीत असता एक दिवसीं महारदरे गांव आहे त्याच्या आलीकडे झाडीत सिकारीस गेले. तेथे डेरे दिल्हे होते. मग सिकार खेळून त्याणी भोजन करून डेऱ्यात महाराज छत्रपती बसले होते. ते समयी एक हुजऱ्यास सांगितलें कीं पायेखान्यांत तांब्या ठेवावा. मग हुजरे याणे पायेखान्याचा झाडा न घेता तांब्या ठेवला आणि खबर दिल्ही कीं, महाराज चलावे नंतर महाराज उठोन पायेखान्यांत चवरंगावर रावत्यास बसले. पाणी घेऊन उठले तो चौकडे पहातात, चौघेजणे कनातीचे कोपऱ्यास मारेकरी हातात नागव्या तरवारी पाहिल्या. तेव्हां महाराज छत्रपती हे ईश्वरी आवतारी पुरुष पुण्यश्लोक राजा याणी पूर्वजन्मी बद्रिकाश्रमी तप आनुष्ठाण केले होते. या पुण्ययोगाचे जोराने त्या चार असामी मारेकरी याचे आवसान खता होऊन त्याची हिमत गळाली व चौघेजणाचे हातातील तरवारी गळून जमिनीवर पडल्या. ते आपले जागा उगेच सून होऊन उभे राहिले. तेव्हां शाहु महाराज छत्रपती याणी त्या मारेकरीयास बोलले कीं, तुम्ही आतां काये पहाता ह्मणा असे खासे बोलले की तुह्मी ज्या कार्यास आला ते कार्य करावे. तेव्हा ते मारेकरी काहीएक बोलेनासे जाहाले. नंतर शाहू महाराज छत्रपती याणी त्या च्यार आसामीस पुसले की, तुह्मी कोण कोणाकडील मारेकरी आला. तेव्हा महाराज यास विनंती केली कीं, आम्ही संभाजीमहाराज छत्रपती करवीर याणी आम्हास द्रव्य बक्षीस देऊन त्याणी आपल्यास मारावयाकरिता आह्मास चौघाजणास पाठविले. तो आपले तेजामुळें आमची हिमत गळाली. आपला इलाज नाही. परंतू ज्या धन्यानी पाठविले आह्मी आपली जितकी कस्त करावयाची तितकी केली आपल्यास गांठ घातली ते धनी, आपण

धन्य! धन्य त्या महापुरुषाची! साक्षात् यमदूत नागव्या तरवारी घेऊन समोर उभे असतांनाही त्यांच्या चित्ताची शांतता तिळभरदेखील ढळली नाहीं. त्यांच्या पुण्याईचा प्रभाव असा कांहीं विलक्षण होता कीं, त्यांना पहातांच त्या चारही मारेकऱ्यांच्या हातांतील तलवारी एका क्षणांत आडव्या झाल्या.

महाराजांनीं त्यांना विचारलें, "हें काय? तुम्ही आम्हांला मारण्यासाठीं आलां होतां ना?"

"होय महाराज!" एक मारेकरी उत्तरला.

"मग असे स्तब्ध कां उभे राहिलां? हेंच तुमचें धैर्य व शौर्य काय?" महाराजांनीं निर्भयपणें स्मित हास्य करून विचारलें.

"महाराज!" मुख्य मारेकरी पुढें होऊन म्हणाला, "आमचें सारें शौर्यधैर्य आपणासारख्या देवावतारासमोर फिक्कें पडलें." लगेच त्या मारेकऱ्यानें आपल्या हातांतील तरवार महाराजांच्या पायांपाशीं ठेवून त्यांचे पाय धरले व म्हटलें, "महाराज! आम्ही आपले अनन्यापराधी आहों. आपण आम्हांला शासन करावें."

इतर तिघां मारेकऱ्यांनाही काय वाटलें कोण जाणे, त्यांनींदेखील आपल्या म्होरक्याचें अनुकरण केलें.

---

धनी, मालक याप्रमाणें चौघा मारेकरी याणी महाराज छत्रपती यास अर्ज केल्या-वरून मर्जी खुष जाहाली. नंतर मनात आणले की हुजरे याचा मोठा गुन्हा आहे. मग त्या चौघा मारेकरीयास समक्ष हुकूम दिला की हुजरे यास ठार मारावा. त्या चार आसामीनी आज्ञेप्रमाणें हुजरे यास ठार मारिला. हा विश्वासुक चाकर असोन आह्मास एकादे वेळेस दगा देईल. मग संभाजी महाराज छत्रपती करवीरकर याणी चार आसामी तिकडून मारेकरी आल्या होत्या त्यास च्यार सोन्याची कडी त्याचे हातात घातली व पोशाख व कांहीं द्रव्य बक्षीस देऊन त्या आसामीची फार नावाजी केली आणि संभाजी महाराज करवीरकर याणी च्यार आसामी मारेकरी तिकडून पाठविले होते त्याजबरोबर एक जासूद जोडी व पत्र देऊन रवाना करून त्याजकडे दिल्हे व करवीरकर महाराज छत्रपती यास पत्र पाठविले. त्यातील मजकूर हे चार आसामी मोठे मर्दाने शूर आहेत. यास आपले सनीध आक्षई ठेवावे. याजपासून सेवाचाकरी चौष परमपरेने घेऊन याचे आगत्ये चालवावे. याप्रमाणें पत्र संभाजी महाराज छत्र-पती करवीरकर यास शाहुमहाराज छत्रपती संस्थान सातारा याणी त्यास लेहून पाठविले. —(येथें मूळ बखरींतील भाषाच कायम ठेविली आहे.)

महाराजांना वाटलें कीं आपण हें काय पहातों ? असें झालें तरी कसें ? आपला जीव घेण्यासाठीं आलेले हे लोक आपणाला न मारतां व एथून पळून जाण्याची संधि असतांना पळूनदेखील न जातां उलट केल्या अपराधाबद्दल शिक्षेची याचना करतात याचा अर्थ काय ? लगेच त्यांनीं त्या चौघांनाही आपल्या हातानें धरून वर उठवून विचारलें, " तुम्हांला आमच्यापासून काय पाहिजे आहे ? "

मारेकऱ्यांचा म्होरक्या म्हणाला, " आम्हांला कृतापराधाबद्दल क्षमा पाहिजे आहे, किंवा क्षमा करण्याची आपली इच्छा नसेल तर शासन पाहिजे आहे."

" पण अगोदर आम्हांला सांगा, तुम्ही जे आमच्या जिवावर उठलां, ते कां ?"

म्होरक्या हात जोडून उत्तरला, " महाराज ! कृपा करून तेवढें मात्र आपण आम्हांला विचारूं नका. तो खरा प्रकार सांगितल्यानें आम्ही आमच्या धन्याशीं बेइमान झाल्याच्या पातकाचे धनी होऊं. कोणाही सेवकानें आपल्या धन्याशीं बेइमान व्हावें असें आपण कधींही म्हणणार नाहीं; कारण आपण धर्मावतार आहां. तेव्हां तेवढें न विचारतां आपण आम्हांला क्षमा केली तर आम्ही आपला पुण्यमहिमा गात आमच्या धन्यापाशीं जाऊं; आपण आम्हांला शासन करणार असाल तर तें भोगण्यालाही आमची तयारी आहे."

त्या मारेकऱ्यांच्या एकंदर वृत्तीवरून महाराजांनीं कल्पना केली कीं, हे कांहीं सामान्य मारेकरी नसावे, हे थोर अंतःकरणाचे लोक असावे. त्यांनीं आपल्या कारस्थानाचा इतिहास कथन केला असता तर तो महाराजांना ऐकावयाला पाहिजे होता. म्हणून ते त्यांना पुन्हा म्हणाले, " तुम्ही फार सज्जन लोक दिसतां. तुम्हांला शासन तर आम्ही करणार नाहींच; पण तुम्हीं तुमच्या प्रेरक धन्याचें नांव सांगितलें तर आम्हांला आनंद वाटेल व तुमच्या शौर्यधैर्याचें चीज होईल."

" छे ! छे ! महाराज ! असली निमकहरामी आमच्याकडून होणें नाहीं. आपण कल्पना करा, आम्ही आपले सेवक असून आमच्या त्या धन्यावर मारेकरी म्हणून आपण आमची योजना केली असती, व तेथेंही असाच प्रसंग ओढवल्यावर आम्हीं आपल्या नांवाचा परिस्फोट केला असता, तर तें आपणांला रुचलें असतें का ? "

महाराज ह्या प्रश्नानें अगदीं निरुत्तर होऊन म्हणाले, " खरें आहे."

" आपली एवढीच इच्छा ना कीं, आमच्या धन्याच्या मनांत आपणांविषयीं किल्मिष राहूं नये ? " म्होरक्यानें विचारलें.

" हो ! असेंच धरून चाला." महाराज उत्तरले.

" तर मग त्याची काळजी आपणांला नको. आम्ही आमच्या धन्यापाशीं जाऊन त्याला सांगूं कीं, 'छत्रपति शाहूमहाराज हे परमपुण्यप्रतापी धर्मावतार आहेत, अशा देवपुरुषाशीं दावेदारी करून कोणाचें कधींच कल्याण व्हावयाचें नाहीं'. मग तर झालें ना ? "

महाराज यावर काय बोलणार ! आतां, त्यांच्या जागीं दुसरा कोणी सामान्य राजपुरुष असता तर तो त्या मारेकऱ्यांना मनस्वी छळून त्यांच्यापासून त्यांच्या धन्याचें नांव काढून घेता. पण महाराज तसे नव्हते. त्यांना त्या नांवापेक्षां त्या मारेकऱ्यांच्या निःसीम स्वामिनिष्ठेचें जास्त कौतुक वाटलें. असल्या नेकजात नोकरांचा धनी शोभणारा माणूस खरोखरीच मोठा भाग्यवान् असेल असें महाराजांना वाटून ते म्हणाले, " बरें; आम्ही आतां तुमच्या बाबतींत काय करावें अशी तुमची इच्छा आहे ? "

" महाराजांनीं कृपावंत होऊन महाराजांचे गुणानुवाद गाण्यासाठीं आम्हांला आमच्या धन्याकडे जाऊं द्यावें." म्होरक्या पुन्हा पूर्ववत् हात जोडून म्हणाला.

" ठीक आहे; तुम्ही जा. " महाराज म्हणाले, " पण तुम्ही एथून निर्भयपणें कसे जाल ? तुम्हांला आमचे पहारेकरी अडवणार नाहींत का ? "

" आम्हांला कोणीदेखील अडवूं शकणार नाहीं. आम्ही जसे आंत आलों तसेंच बाहेर जाऊं." असें म्हणून तो म्होरक्या आपली तरवार उचलून व पूर्ववत् बुरखा घेऊन तडक तेथून चालूं लागला. त्याच्या मागोमाग त्याचे साथीदारही चालते झाले.

महाराज लगेच आपल्या डेऱ्यांत आले व जवळच्या राहुटींत *मेघाजी हुके-

---

* शाहूमहाराजांच्या पदरीं हुकेबारदार होता व शाहूमहाराजांच्या एका प्रचलित चित्रांतही ते हुका ओढीत आहेत असें दाखविण्यांत आलें आहे. पण वस्तुस्थिति अगदीं निराळी होती. तिच्यावर पुढील उताऱ्यानें प्रकाश पडण्याजोगा आहेः— "...शाहू महाराज छत्रपति हे काही हुका ओढीत न्हवते; परंतु स्वारीबरोबर हुकेबारदार मेगोजी (मेघोजी ?) हा शेगडीत कोळसे घालून विस्तु व गुडाखू दरमहा सरकारातून सामान लागेल ते घेऊन फिरत असे. तेंव्हा महाराज छत्रपती यास सर्व मंडळीनी आर्ज केला कीं सरकार स्वारी आपण हुका ओढीत नाही; परंतु ज्याची चाकरी त्याणे स्वामीशेवा केली पाहिजे. मग महाराज छत्रपती याणी सर्वांचा आर्ज मान्य करून मग मेगोजी हुकेबारदार यास आज्ञा जाहाली. मग त्याणे हुका तयार

बारदार होता त्याला हांक मारून आज्ञा केली, "मेघाजी! आज रात्रौ आमच्या डेऱ्याच्या पहाऱ्यावर कोण पहारेकरी होते त्यांना बोलावून आण."

"आज्ञा महाराज." असें म्हणून मेघाजी तसाच पहारेकऱ्यांना बोलावण्यासाठीं गेला. तो देवडीवर जाऊन पहातो तों पिराजी व नाथाजी नुक्ते डोळे चोळीत उठून बसले होते.

मेघाजी त्या दोघांना म्हणाला, "महाराजांनीं तुम्हांला आतांच्या आतां बोलाविलें आहे."

पिराजी व नाथाजी यांना पहाऱ्यांत आपल्या हातून ढिलाई झाली हें माहीत झालें होतें. त्याविषयीं जाब विचारण्यासाठींच महाराज आपणाला बोलावतात कीं काय असें पिराजीला वाटलें. त्यानें नाथाजीपाशीं तसें बोलूनही दाखविलें. यापूर्वींच ते दोघे आपण भांगेच्या अंमलांत असे कसे सांपडलों याची खिन्नतापूर्वक चिंता करीत होते. तेवढ्यांत नाथाजीला रात्रौ त्यांच्या बाजूला झोंपीं गेलेल्या गोंधळ्यांची आठवण झाली, त्याबरोबर त्यानें तिकडे वळून पाहिलें तों जाग्यावर कोणीदेखील नाहीं! ते आपोआपच महाराजांकडे गेले, कीं आणखी कुठें गेले, याचा त्या दोघांनाही कांहीं अंदाज करतां येत नव्हता.

"महाराजांपाशीं आणखी कोणी आहे का?" नाथाजीनें विचारलें.

"नाहीं." मेघाजी उत्तरला.

इतक्यांत श्रीपतराव घोडा दौडीत तेथें येऊन पोंचला. त्यानें मेघाजीपाशीं चौकशी केली, "मेघाजी! महाराज उठले का?"

"होय." मेघाजी उत्तरला.

लगेच श्रीपतराव घोड्यावरून उतरून थेट आंत गेला. व महाराजांना भेटतो न भेटतो, तोंच पिराजी व नाथाजी हेदेखील मेघाजीबरोबर आंत गेले. श्रीपतरावानें पाहिलें. तों महाराज बरेच रागावलेले दिसले. श्रीपतरावाला रागाचें कांहीं कारण कळेना. तो बुचकळ्यांत पडल्यासारखा झाला.

पिराजी व नाथाजी आंत आले. ते महाराजांना मुजरा करून अदबीनें बाजूला उभे राहिले. महाराजांनीं आपल्या ज्या हुजऱ्याच्या हातून पायखान्याचा झाडा

---

करून आणून द्यावा. नंतर शाहू महाराज छत्रपती याणी हुक्याची तोटीस हातात घेऊन आपले तोंडास मात्र लावावी. याप्रमाणे सरकार नित्य करीत होते."—'मराठी दप्तर रुमाल पहिला'.—पृष्ठ १२१.–(येथें मूळ बखरींतील भाषा कायम ठेविली आहे).

घेण्याच्या बाबतींत गाफीलपणा झाला होता त्याचा प्रथम शिरच्छेद करविला व मग पिराजी आणि नाथाजी यांना विचारलें, " आज रात्रभर तुम्हीच पहाऱ्यावर होतां का ? "

" होय महाराज ! " पिराजी उत्तरला.

" मग तुम्हींच त्या चौघा मारेकऱ्यांना आंत सोडलें ? " महाराज म्हणाले.

'मारेकरी' हा शब्द ऐकतांच सर्वांच्या अंतःकरणाला जणुं धरणीकंपाचा धक्का बसला. श्रीपतराव किंकर्तव्यमूढ होऊन महाराजांच्या तोंडाकडे पाहूं लागला. पिराजी व नाथाजी यांची किती गाळण उडाली असेल याची तर कल्पनाच केलेली बरी. त्यांना महाराजांच्या बोलण्याचा उमज जरी पडला नाहीं, तरी एवढें मात्र त्यांना समजून चुकलें कीं, आपलीं आतां शंभर वर्षें भरलीं.

" तुम्ही रात्रभर जागे होतां कीं झोंपलां होतां ? " महाराजांनीं विचारलें.

पिराजी व नाथाजी यावर काय बोलणार ! जागे होतों असें तें म्हणतील तर त्यांना खरोखर झोंप लागली होती, तेवढ्या मुदतींत काय काय अनर्थ झाले असतील कोण जाणे ! बरें; झोंप लागली होती, असें म्हणावें तर आपण पहारेकरी असून झोंपलों म्हणून शासन आपल्या वांट्याला येणारच. अशा स्थितींत काय बोलावें हेंच त्यांना कळेना.

" रात्रौ आंत कोण कोण माणसें आलीं, त्यांनीं काय काय केलें, हें तुम्हांला माहीत आहे का ? " महाराजांनीं विचारलें.

" महाराज !" पिलाजी हात जोडून भयचकित कांपऱ्या आवाजानें म्हणाला, " रात्रौ आमच्या ओळखीचे कांहीं गोंधळी मात्र आंत आले होते "

" त्यांनीं आंत येऊन काय काय केलें ? "

" त्यांनीं एकदोन पोवाडे गाइले व मग ते आमच्या शेजारींच झोंपीं गेले. "

" आणि त्यांच्याबरोबर तुम्ही झोंपीं गेलां !"

" महाराज ! आमच्या हातून चूक झाली. आम्हांला झोंप लागली खरी."

" आणि ते गोंधळी आतां कुठें आहेत ? "

पिराजीनें यावर कांहीं उत्तर न देतां एकवार नाथाजीकडे मात्र पाहिलें नाथाजी म्हणाला, " महाराज ! ते गोंधळी केव्हां निघून गेले त्याची आम्हांला दाद लागली नाहीं. पण कदाचित् ते इतक्यांतच परत येतील."

" कशासाठीं ? " महाराजांनीं विचारलें.

" त्यांना महाराजांच्या पायांपाशीं हजेरी लावावयाची आहे." नाथाजी उद्गारला.

महाराजांच्या मनांत ओघानेंच संशय आला, 'हे जे गोंधळी म्हणतात तेच तर मारेकरी नसतील ना?' महाराजांनीं विचारलें, " ते गोंधळी किती होते?"

" चौघे होते महाराज!" पिराजी उत्तरला.

महाराजांवर पडलेले मारेकरीही चौघेच असल्यामुळें महाराजांचा संशय दृढ झाला. त्याचें निरसन करून घेण्यासाठीं महाराजांनीं विचारलें, " ते गोंधळी केव्हां उठून गेले हें तुम्हां दोघांपैकीं कोणालाच कळलें नाहीं ना?"

" नाहीं महाराज!" पिराजी व नाथाजी एकदम उत्तरले.

" बरें; थोडया वेळापूर्वी चौघे बुरखेवाले मनुष्य नागव्या तरवारी हातीं घेऊन बाहेर जातांना तरी तुम्ही पाहिले असतील. त्यांना तुम्हीं कसें सोडलें?"

नाथाजी खालीं मान घालून उत्तरला, " महाराज! त्यांना देखील आम्हीं पाहिलें नाहीं."

" एवढा वेळपर्यंत तुम्ही झोंपीं गेलां होतां?"

पिराजी किंवा नाथाजी यावर कोणत्या तोंडानें उत्तर देणार! ते खालीं मान घालून स्वस्थ उभे राहिले.

श्रीपतराव इतका वेळ स्तब्ध उभा होता, तो मध्येंच म्हणाला, " महाराज! आतां मी येतांना तळ्याच्या पलीकडील बाजूनें कोणी चौघे माणूस जातांना पाहिले खरे."

इकडे इतकी चौकशी सुरू झाल्यावर बोलून चालून महाराजांवर मारेकरी पडल्याचा अत्यंत महत्त्वाचा प्रसंग तो, त्याचा छावणीभर गवगवा होण्याला कितीसा उशीर! महाराजांच्या मनांतून त्या मारेकऱ्यांच्या बाबतींत काय करावयाचें आहे किंवा त्यांनीं काय केलें असेल, याचा जरादेखील विचार न करतां जो तो उगाचच चिंता करण्यांत चूर होऊन गेला. मारेकरी पळून गेले व रात्रीचे गोंधळीही पळून गेले असें ऐकतांच गोंधळी व मारेकरी एकच असतील किंवा कसें ह्या तर्कानें खऱ्या गोष्टीचा तपास लावणें सोपें जावें म्हणून दोघे-चौघे मनुष्य जेथें गोंधळी वगैरे रात्रौ झोंपीं गेले होते तेथें धावत जाऊन कांहीं खूणगांठ सांपडतेशी पाहूं लागले. तों त्यांच्या नशिबानें त्यांना तेथें डफ-तुणतुणें व एक शाल सांपडली. लगेच त्यांनीं तो मुद्देमाल आणून महाराजांसमोर हजर केला.

महाराज तो माल पहातांच प्रतिनिधींकडे वळून म्हणाले, "प्रतिनिधि! आम्हांला वाटतें, रात्रीचे जे गोंधळी तेच हे मारेकरी असावे."

श्रीपतरावाला किंवा दुसऱ्या कोणालाही एथवरचा खरा प्रकार कांहींच माहीत नव्हता. तो महाराजांनीं थोडक्यांत वर्णन केल्यावर श्रीपतरावांची चतुरस्त्र तर्कबुद्धि चौफेर उधळूं लागल्यास नवल काय! त्यानें प्रथमच जेव्हां पिराजी व नाथाजी हे पेशव्यांच्या विश्वासांतील लोक पहारेकरी आहेत व त्यांच्या हातून पहाऱ्याच्या कामीं ढिलाई झाल्यामुळें मारेकरी आंत येऊं शकले असें ऐकलें, तेव्हां पहिला संशय त्यांच्या मनांत आला तो हा कीं, बाजिरावानें हे मारेकरी पाठविले असले पाहिजेत व पिराजी आणि नाथाजी यांनीं दगलबाजीनें झोंपेचें मिष करून त्यांना आंत सोडलें असलें पाहिजे. श्रीपतरावांचा हा तर्क जरी एकांगी व पेशव्यांविषयीं पूर्वग्रहदूषित झालेल्या मतावर उभारण्यांत आलेल्या मनोगताचा मनोरा होता, तरी त्यांत एक प्रकारचा प्रामाणिकपणा होता. तो असा कीं, 'बाजिरावानें ही खटपट लटपट केली असली पाहिजे'. आतां, त्या पूर्वग्रहदूषित तर्काचा महाराजांच्या मनांत बाजिरावाविषयीं विष कालवण्याच्या कामीं उपयोग करून घेण्याकडे उपयोग करून घेण्याची स्वार्थमूलक इच्छा तेव्हांच श्रीपतरावाच्या मनांत उत्पन्न झाली होती ती गोष्ट निराळी.

'जशी इच्छा तसें फळ' या न्यायानें कीं काय, श्रीपतरावानें तो माल जेव्हां पाहिला, तेव्हां त्यांतील शालीकडे तेवढें त्यांचें नेमकें लक्ष गेलें. त्यानें ती शाल उचलून हातीं घेतली. तिच्याकडे निरखून पहातां श्रीपतरावाच्या चेहऱ्यावर आश्चर्य-युक्त आनंदाचें तेज झळकूं लागलें. त्यानें शाल उलटून पालटून पाहिली, तिचे चारी कोंपरे निरखून पाहिले, तेवढ्यांत महाराजांनीं त्याला विचारलें, "त्या शालींत एवढें निरखून काय पहातां?"

श्रीपतराव किंचित् हंसून म्हणाला, "महाराजांवर जे मारेकरी पडले, त्या कारस्थाना-विषयीं कांहीं महत्त्वाच्या गुलदस्तांतील गोष्टी ही शाल माझ्याशीं बोलते आहे!"

"म्हणजे काय?" महाराजांनीं विचारिलें.

"मी स्पष्ट बोलतों तें महाराजांना रुचो किंवा न रुचो; पण महाराजांनीं उपेक्षा करण्याजोगी ही गोष्ट नाहीं." श्रीपतराव पिराजी व नाथाजी यांजकडे वळून म्हणाला, "कायरे! तुमच्या ह्या कटांत तुम्ही दोघे, ते गोंधळी चौघे, आणखी कोणा-कोणाची तुमच्या पेशवेसरकारांनीं ह्या कामीं योजना केली होती?"

पिराजी महाराजांकडे वळून दोन्ही हात जोडून विनवूं लागला, "महाराज! आमचें ह्यांत कांहींदेखील अंग नाहीं. ते गोंधळी अशा प्रकारचे नराधम असतील असें आम्हांला वाटलें नाहीं. ते पोवाडे चांगले म्हणतात व आम्हांला पोवाड्यांचा नाद फार, शिवाय त्यांनीं महाराजांच्या पायापाशीं हजेरी लावण्याची उत्कट इच्छा दाखविली, म्हणून आम्हीं त्यांना थारा दिला."

महाराज पिराजीच्या बोलण्याकडे दुर्लक्ष करून श्रीपतरावाला म्हणाले, "प्रतिनिधि! तुम्ही आतां शालीचें काय बोललांत?"

"ही शाल बोलते कीं श्रीमंत बाजीराव जे महाराजांना इतके भरंवशाचें कूळ वाटतात, ते तसे नाहींत. गोगलगाय व पोटांत पाय अशी त्यांची स्थिति आहे हें मी महाराजांना प्रथमपासून सांगत आलोंच आहें. पण बाजिरावांचा नीचपणा इतक्या थराला येऊन पोंचेल अशी मात्र मला देखील कल्पना नव्हती. बाजिरावांना पेशवाईचीं वस्त्रें मिळूं नयेत असें मी म्हणतों, यांत महाराजांना व त्यांच्या कांहीं कारभाऱ्यांना माझा द्वेषभाव दिसून येतो. पण मी जो इतका विरोध करतों, तो एवढ्याचसाठीं कीं, महाराजांच्या व मराठशाहीच्या मुळावर जन्मलेल्या अशा श्रीमंत मारेकऱ्यांच्या हातांतील शस्त्रास्त्रांना खुद्द महाराजांच्या हातून तरी अधिकारदानाचें पोलादी पाणी मिळूं नये." श्रीपतराव ती शाल महाराजांसमोर टाकून म्हणाला, "ही पहा! ही श्रीमंत बाजिरावांची शाल. हें कोंपऱ्यांत त्यांचें नांव आहे. ही शाल ह्या मारेकऱ्यांपाशीं कशी आली?"

"काय! ही पेशव्यांची शाल?" महाराजांनीं आश्चर्यानें भुंवया चढवीत विचारलें.

"होय. ही पेशव्यांच्या चिरंजिवांची शाल!" श्रीपतराव उत्तरले. त्यांनीं बाजिरावाच्या नांवाचा उल्लेख करतांना त्याला पेशवे या नांवानें संबोधण्याचें हेतुपुरःसर टाळलें.

महाराजांनीं पिराजी व नाथाजी यांच्याकडे वळून विचारलें, "खरें सांगा. तुम्ही पेशव्यांच्या ह्या कटांत सामील होतां किंवा नाहीं?"

पिराजी व नाथाजी यांना श्रीपतरावाच्या स्वभावाची यापूर्वींच चांगली ओळख पटली होती. त्यांना देखील आपल्या धन्याची शाल गोंधळ्यांपाशीं कशी आली व हा एकंदर प्रकार काय आहे हें जरी माहीत नव्हतें, तरी बाजीराव असल्या नीच कर्माचा प्रवर्तक होईल हें त्यांना स्वप्नांत देखील खरें वाटलें नसतें. पण तसें सिद्ध करण्याला त्यांजपाशीं कांहींच साधन नव्हतें. त्यांच्यापाशीं एकच साधन

होतें, तें महाराजांचे पाय धरून आपलें निरपराधित्व त्यांच्या मनावर ठसविण्याचें; त्या साधनाचा उपयोग त्यांनीं करून पाहिला. महाराज अत्यंत शांत व कनवाळु आहेत, महाराजांचा पेशव्यांच्या ठायीं विश्वास आहे, अपराध्यांना देखील महाराज क्षमा करतात हें आतांच सर्वांना महाराजांनीं मारेकऱ्यांच्या बाबतींत जें उदारपणानें वर्तन केलें त्यावरून सर्वांना कळून चुकलें होतें, त्या महाराजांच्या सुस्वभावावर पिराजी व नाथाजी यांचा सारा भरंवसा होता.

पण !—त्या दोघांच्याही विनवण्या आज निष्फळ झाल्या. महाराज शत्रूवरही प्रेम करण्याइतके प्रेमळ व कनवाळू होते खरे. कनवाळुतेच्या तेजानें निरंतर प्रकाशमान् होणारे देदीप्यमान सूर्यदेव ते होते. पण आज त्या सूर्यदेवाला ग्रहण लागलें होतें, त्यामुळें त्याच्या कृपेचा एकही किरण पिराजी व नाथाजी यांच्यापर्यंत पोंचू शकला नाहीं. महाराजांच्या मनानें ठाम घेतलें कीं, हे दोघे बेरड ह्या कटांत असले पाहिजेत व बाजीराव ह्या कटाचा सूत्रचालक असला पाहिजे. त्या मारेकऱ्यांवर आपण दया केली ती मोठी चूक केली असेंही त्यांच्या मनानें घेतलें. त्यांनीं तसें तेथें बोलूनही दाखविलें. पिराजी व नाथाजी निरुत्तर झालेले पाहून तर महाराजांचा संशय जास्त दृढावला. ते श्रीपतरावाला म्हणाले, " प्रतिनिधि ! तुम्ही आतांपर्यंत बाजिरावाविषयीं जें जें बोलत आलां, त्यांत बराच सत्यांश होता असें आतां हळुहळू आमच्या निदर्शनाला येऊं लागलें आहे."

श्रीपतराव म्हणाला, " आई भवानीनें वेळींच महाराजांना परिस्थितीचें ज्ञान करून दिलें म्हणावयाचें ! "

महाराज म्हणाले, " ह्या कटाचा तपास लावलाच पाहिजे." लगेच त्यांनीं पिराजी व नाथाजी यांना विचारलें, " कायरे ! तुम्ही जर ह्या कटांत नव्हतां, तर ते मारेकरी तुमच्या पहाऱ्यांतून बिन्‌बोभाट आंत कसे आले व आतां बाहेर कसे गेले ? "

पिराजी व नाथाजी यांनीं कपाळाला हात लावला. ते तरी काय बोलणार !

लगेच महाराजांनीं श्रीपतरावांना आज्ञा केली, " प्रतिनिधि ! ह्या दोघांही दगलबाजांचा शिरच्छेद करा."

ही भयंकर शिक्षा ऐकून पिराजी व नाथाजी जिवंतपणींच मेल्यासारखे झाले. त्यांच्या मनांतून ते सर्वस्वीं निर्दोषी होते; पण जनाला त्यांची निर्दोषता कशी पटावी ! श्रीपतरावाला तर त्या दोघांना ती भयंकर शिक्षा मिळालेली ऐकून खेद वाटला नाहींच; पण इतर नोकरचाकर जे आजूबाजूला उभे होते त्यांना

देखील ती शिक्षा अगदीं समर्पक वाटली. पिराजी व नाथाजी हे एरव्हीं तेथल्या सर्वांचे आवडते होते. फार काय, इतरांपेक्षां ते महाराजांचेही फार आवडते होते. पण ते महाराजांच्या मारेकऱ्यांचे साथीदार होते असें कळतांच त्यांच्याविषयीं कोणाला कसा आदर वाटेल! प्रत्येकाला वाटूं लागलें कीं, ह्या दोघां हरामखोरांना महाराजांनीं जी शिरच्छेदाची शिक्षा दिली तीदेखील फारच सौम्य झाली. यांना हत्तीच्या पायाशीं बांधून, पेटत्या खाईंतून चालवून किंवा दगडांनीं ठेंचून ठार मारलें पाहिजे. महाराजांचें अन्न खाऊन त्यांच्यावर उलटतात म्हणजे काय!'

महाराजांच्या तोंडून शिक्षेचा उच्चार होतांच तिची अंमलबजावणी व्हावयाला कितीसा उशीर लागणार! पण श्रीपतराव म्हणाला, "महाराजांनीं ह्या गुन्हेगारांना शिक्षा ठोठावली ती योग्यच झाली; पण महाराजांना माझी हात जोडून अशी विनंति आहे कीं, ह्या प्रकरणाची योग्य चौकशी होईतों शिक्षेची अंमलबजावणी होऊं नये."

सर्वांना वाटलें कीं, श्रीपतरावाचें अंतःकरण किती कोमल व स्वभाव किती शांत! या प्रसंगीं त्यानें दयाळुपणाच्या बाबतींत महाराजांनाही लाजविलें. प्रत्यक्ष पिराजी व नाथाजी यांनादेखील तसें वाटलें मग इतरांची काय कथा!

महाराजांनाही तसेंच वाटलें. ते म्हणाले, "प्रतिनिधि! हे हरामखोर मारेकऱ्यांना धडधडीत उजळ माथ्यानें आंत येऊं देतात व बाहेर जाऊं देतात, यापेक्षां यांच्या अपराधाचा आणखी कोणता पुरावा पाहिजे?"

श्रीपतराव म्हणाला, "तरीही महाराजांनीं माझी तेवढी विनंति मानावी. महाराजांची परवानगी असेल तर मी ह्या प्रकारणाची चौकशी करतों. त्या चौकशींत हे खरोखरच गुन्हेगार ठरले तर त्यांना झाली ही शिक्षा ठीकच आहे. पण जर चौकशीअंतीं ते निर्दोषी आहेत असें सिद्ध झालें, तर विनाकारण निरपराध्यांना शासन केल्याचा दोष महाराजांवर येईल, व शिवाय बाजीराव ह्या सर्व अनर्थाचें खापर माझ्या माथीं फोडून म्हणतील, प्रतिनिधींनींच हें कारस्थान केलें. आधींच प्रातिनिधि महाराजांची एकनिष्ठपणें सेवा करतात व महाराज प्रतिनिधींचा शब्द मानतात हें पेशव्यांच्या पक्षाला बघवत नाहीं. त्यांत आणखी ही नवी भर कशाला हवी! दुसरें असें कीं, ह्या दोघांची फितुरी ही महाराजांविरुद्ध रचण्यांत आलेल्या गुप्तकटाच्या वृक्षाची एक फांदी आहे. ही फांदी तोडल्यानें साऱ्या वृक्षाचें निर्मूलन झालें असें नाहीं. जोंपर्यंत त्या वृक्षाचें मूळ शाबूत आहे, तोंपर्यंत त्याची एक फांदी तोडली तरी त्याला अशा दुसऱ्या दहा फांद्या फुटूं शकतील."

महाराजांना श्रीपतरावाचे हे दूरदर्शीपणाचे बोल सोळा आणे पटले. त्यांनीं श्रीपतरावांच्या सूचनेला मान्यता दिली, " ठीक आहे. तुम्ही ह्या कटाचा तपास काय करावयाचा तो करा."

" मी तपास करतों. पण बाजिरावांचा जाब मात्र महाराजांनीं स्वतःच विचारावयाला हवा." श्रीपतराव म्हणाला.

" होय. त्यांचा जाब आम्ही विचारूंच. ते आज बहुधा आमच्या भेटीला येतीलच." महाराज म्हणाले, " तुम्ही आजच्या आज साताऱ्यांत माणूस पाठवून तेथें ते आले असले तर त्यांना ताबडतोब आमच्या भेटीला मसूर मुक्कामीं घेऊन या."

इतकें संभाषण चाललें आहे, तोंच महाराजांच्या लवाजम्यांतील एक माणूस व मल्हारी बोलत बोलत महाराजांसमोर आले. मल्हारीनें महाराजांना मुजरा करून निवेदन केलें, " बाजीरावसाहेब साताऱ्यांत आले आहेत. त्यांची महाराजांना अशी विनंति आहे कीं, महाराजांची भेट कुठें घ्यावी याविषयीं आज्ञा व्हावी; म्हणजे त्याप्रमाणें बाजीरावसाहेब महाराजांच्या दर्शनास येतील."

इतक्यांत मल्हारीबरोबर आलेला मनुष्य श्रीपतरावाच्या कानाशीं लागून हळूच म्हणाला, " मल्हारी माझ्यापाशीं त्या गोंधळ्यांविषयीं चौकशी करीत होता. त्याचा देखील ह्या कटांत हात असण्याचा संभव आहे."

मल्हारी काय किंवा राणोजी काय, जेवढे कोणी पेशव्यांचे पक्षपाती, तेवढ्या सर्वांविषयीं श्रीपतरावाच्या मनांत तिरस्कार व अविश्वास असणें स्वाभाविकच होतें. त्यांत आणखी ह्या नव्या बातमीची भर पडतांच श्रीपतरावाच्या संशयाला दुजोरा मिळाला. पण त्यानें तो मनांतला संशयभाव मनांतच झांकून ठेवून बाह्यतः अगदीं सरळ मनानें मल्हारीला प्रश्न केला, " मल्हारी ! रात्रौ इथें जे गोंधळी आले होते ते तुझ्या परिचयाचे आहेत का ? "

आज पहांटेला इकडे काय हलकल्लोळ उडाला याची गुणगुण मल्हारीला नुक्तीच कळल्यामुळें त्या सत्रांत आपला चेंदामेंदा निष्कारण उडावयाचा ह्या भयानें त्यानें कानांवर हात ठेवले, " छे! माझी व त्यांची ओळख नाहीं."

श्रीपतरावांनीं भुंवया चढवून आतांच मल्हारीविषयीं बातमी देणाऱ्या मनुष्याकडे अंगुलिनिर्देश करून विचारलें, " तर मग तूं याच्यापाशीं त्या गोंधळ्यांची चौकशी कां करीत होतास ? "

मल्हारीच्या डोक्यांत आतां प्रकाश पडला कीं, चोराच्या हातीं जामदारखान्याच्या किल्ल्या देण्याप्रमाणें आपली अवस्था झाली. आणि खरेंच, त्यानें जर त्या माणसापाशीं गोंधळ्यांविषयीं चौकशी केली नसती, तर त्याच्यावर आळ सहसा आला नसता. ती चौकशी त्यानें केली ती केली व त्यावर पांघरूण घालण्यासाठीं आतां असत्य भाषण केलें; ह्या दोन्ही गोष्टी त्याला मारक झाल्या. पण आतां त्याला इलाज काय !

मनुष्य एकदां प्रवाहपतित झाला म्हणजे तो सारखा वहातच जातो. प्रवाहाच्या विरुद्ध दिशेनें पोहून तडीला येण्याची ताकद सर्वांच्याच अंगीं असते असें नाहीं. मल्हारीचेंही तसेंच झालें. एकवार तो परिस्थितीच्या प्रवाहांत सांपडला, त्यांतून बाहेर पडण्यासाठीं म्हणून त्यानें जी धडपड सुरू केली तीच त्याला व त्याच्याबरोबर इतरांनाही मारक झाली. त्यानें आपली निर्दोषता सिद्ध करण्यासाठीं रात्रौ पेशव्यांच्या वाड्यांत गोंधळ्यांचें गायन झालें, तेथें आपणाला त्या गोंधळ्यांनीं पोवाडे शिकविण्याचें कबूल केलें होतें वगैरे खऱ्याखुऱ्या गोष्टी सांगितल्या. पण त्यामुळें महाराज किंवा श्रीपतराव यांची संशयनिवृत्ति न होतां उलट त्यांना मल्हारीविषयीं तर पक्का संशय आलाच; पण बाजिरावाचें देखील ह्या कारस्थानांत प्रामुख्यानें अंग असावें असाही त्यांचा समज होऊन बसला.

" ही शाल बाजीरावसाहेबांचीच ना ? " श्रीपतरावानें समोरची शाल मल्हारीला दाखवून विचारलें.

" ही बाजीरावानें गोंधळ्यांना बक्षीस दिली असेल ! " महाराज म्हणाले.

" होय." मल्हारी कांपऱ्या स्वरानें उत्तरला. यामुळें फार तर ते गोंधळी बदमाष आहेत असें ठरेल याची त्याला अटकळ होती. पण परिणाम भलताच झाला. मात्र प्रथम बाजिरावाचा नामनिर्देश त्याच्या देखत झालेला नसल्यानें त्या शालीच्या जोरावर श्रीपतराव बाजिरावालाच कटाचा सूत्रधार ठरविण्याचा प्रयत्न करीत असेल असें त्याला वाटलें नाहीं.

" महाराज ! " श्रीपतराव महाराजांकडे वळून म्हणाला, " मल्हारीला ह्या कटाची बातमी माहीत असली पाहिजे. " लगेच तो मल्हारीकडे वळून म्हणाला, " काय रे ! तूं ह्या कटांतील साथीदार आहेस किंवा नाहीं ? "

मल्हारी आकाशाकडे पहात हात जोडून उद्गारला, " ईश्वरसाक्ष, माझा किंवा माझ्या धनीसाहेबांचा ह्या कटाशीं कांहींदेखील संबंध नाहीं."

" बरोबर ! तुमचा संबंध कसा असणार ! तुझ्या धनीसाहेबांना परस्पर पाहुण्याच्या हातून साप कसा मारावा हें चांगलें कळतें; व त्यांच्याच तालमेंत तयार झालेला त्यांचा सेवक तूं ! " श्रीपतराव महाराजांकडे वळून म्हणाला, " महाराज ! आतां काय करावयाचें ? "

" याला कैद करा व आतांच्या आतां साताऱ्याला जासूद पाठवून बाजिरावाला इकडे बोलवा. तो येण्याला अळं टळं करील तर त्याला कैद करून आमच्यासमोर आणा. पण तो आजच्या आज आमच्यासमोर आला पाहिजे." असें म्हणून महाराज आंत गेले.

श्रीपतरावानें आपल्या विश्वासांतील सहा शिपायांना जवळ बोलावून आज्ञा केली, " ह्या तिघांही गुन्हेगारांना कैद करून सातारा किल्ल्यावर रवाना करा."

तेव्हांच श्रीपतरावानें साताऱ्याच्या किल्लेदाराला एक व यमाजीला एक अशीं दोन पत्रें लिहून त्या सहा शिपायांपैकीं एकाच्या स्वाधीन केलीं. लगेच दुसऱ्या चार शिपायांना बोलावून त्या चौघां गोंधळ्यांना पकडून आणण्याच्या कामावर त्यांची रवानगी केली. नंतर महाराजांशीं कांहीं वेळ श्रीपतरावाचें गुप्त खलबत झालें व तो लगेच आपल्या घोड्यावर स्वार होऊन दोघां साथीदारांसह साताऱ्याकडे चालला. जातांना ती शाल मात्र त्यानें न चुकतां बरोबर घेतली. त्याच्या मागोमाग पिराजी, नाथाजी व मल्हारी यांना घेऊन शिपाई साताऱ्याकडे रवाना झाले. त्या वेळीं त्या तिघां निरपराधी माणसांना ही विटंबना सोसतांना काय वाटलें असेल बरें ! त्यांतही मल्हारीला जेव्हां पिराजी व नाथाजी यांना महाराजांनीं देहान्त शासन फर्माविल्याचें आणि ह्या खटल्याची चौकशी श्रीपतरावामार्फत व्हावयाची ठरल्याचें कळलें, तेव्हां त्याची खात्री झाली कीं, पिराजी व नाथाजी यांच्याप्रमाणें आपणाला महाराजांनीं जरी देहान्त शासन फर्माविलें नसलें, तरी आपलीही अखेर तीच गत होणार. त्यानें पिराजी व नाथाजी यांना तसें स्पष्ट बोलून दाखविलें. त्यांनीं 'असें कां' म्हणून विचारलें तेव्हां पहांटेपर्यंत साताऱ्यांत काय काय अनर्थ घडले याचा पाढा वाचण्याचें त्याच्या मनांत आलें; पण त्यानें जीभ आवरली. मात्र तेथल्या घटनेचे सूचक असे एवढेच शब्द त्यानें स्वतःशीं उच्चारले, " साताऱ्यांत प्रतिनिधींचीं कारस्थानें हाणून पाडण्यासाठीं आम्हीं जीं रात्रभर त्यांच्या कैवाऱ्यांचीं हाडें नरम केलीं, त्याचा सूड घेण्यासाठीं प्रतिनिधि आतां आमचीं पाळेंमुळें खणून काढल्याशिवाय राहणार नाहींत. असो. परमेश्वराची मर्जी ! "

## प्रकरण नववें

# तेव्हां इकडे काय चाललें होतें ?

श्रीपतराव साताऱ्यांत यावयाला निघाला, त्याच्या मागोमाग पिराजी वगैरे कैदीही येऊं घातले होते. त्यांना महारद्र्यापाशींच सोडून आपणाला आतां खुद्द साताऱ्यांत तेथें त्या रात्रीं काय चाललें होतें हें पहाण्यासाठीं जावयाचें आहे. गौतमेच्या निमित्तानें मल्हारी व राणोजी यांची यमाजी व गमाजी यांच्याशीं लढत जुंपली व ते सर्व पिलाजीच्या शोधार्थ किल्ल्यावर यावयाला निघाले, व बाजीरावही किल्ल्यावरून अपरात्रीं निघाला, एवढें वाचकांना माहीत आहे. यमाजी व गमाजी यांचा उद्देश मल्हारी व राणोजी यांना किल्ल्यावर नेऊन दगा देण्याचा होता, तर उलट राणोजी व मल्हारी यांनीं त्या दोघां बापलेंकांना 'बाप दाखव नाहीं तर श्राद्ध कर' अशा पेंचांत पकडलें होतें. याचा परिणाम कोणत्याही स्वरूपाचा असला तरी तो फार भयंकर झाला असता यांत संशय नाहीं. पण परमेश्वराच्या कृपेनें तो प्रसंग टळला. बाजीराव किल्ल्यावरून खालीं जावयाला व ते चौघे यावयाला एक गांठ पडली. बाजीराव नुक्ताच किल्ल्यापासून शंदोडशें कदमें जातो न जातो तों ही मंडळी त्याला भेटली. लगेच त्यानें घोडा थांबवून चौकशी केली, "राणोजी ! हा काय प्रकार आहे ?"

राणोजी उत्तरला, "धनीसाहेब ! ह्या लोकांनीं पिलाजीला किल्ल्यावर कोंडून ठेवलें आहे, त्याचा तपास करण्याला आम्ही त्यांना घेऊन चाललों आहों."

मल्हारी तेवढ्यांत पुढें होऊन म्हणाला, "धनीसाहेब ! ह्या दोघांविरुद्ध माझी फिर्याद आहे."

"फिर्याद कसली ?" बाजिरावानें घोड्यावरून खालीं उतरून विचारलें.

"ह्या निर्लज्जांनीं आमच्या बायकांशीं अतिप्रसंग करण्याची वेळ आणली होती. आम्ही तेवढ्यांत घरीं गेलों म्हणून बरें, नाहींपेक्षां कोणता प्रसंग ओढवला असता याचा नेम नाहीं."

मल्हारीच्या तोंडचा निर्लज्ज हा शब्द यमाजी व गमाजी ह्या बापलेंकांना खासा झोंबला. गमाजी एकदम सर्पासारखा फुसफुसत म्हणाला, "हं ! मल्हारी ! जरा तोंड आटोपून बोल !"

बाजीराव शांतपणानें म्हणाला, "ऐका. शांतपणानें मला काय तें सांगा, असे वर्दळीवर येऊं नका."

मल्हारीनें सर्व हकीकत जशी घडली तशी बाजिरावाला निवेदन केली. त्यांत अर्थातच 'गौतमेनें अक्काची थट्टा कशी केली' असल्या बारीकसारीक गोष्टीही येऊन गेल्या. तंट्याचें मूळ शोधून काढण्याच्या कामीं अशाच बारीक गोष्टींचें महत्त्वच जास्त असतें.

बाजिरावानें मल्हारीची बाजू ऐकून घेतल्यावर यमाजी-गमाजीचीही बाजू ऐकून घेतली. त्यांतून निष्कर्ष काय निघावयाचा ! पेशव्यांबद्दल प्रतिनिधींना जी स्पर्धा वाटते, त्या स्पर्धेच्या उदरीं ह्या भांडाभांडीचा जन्म आहे हें बाजिरावाला माहीत होतें. मल्हारी व राणोजी हे दोघे त्याच्या विश्वासांतील माणूस पडले, त्यांच्यावर तर त्याचा पूर्ण भरंवसा होताच. शिवाय आतां कांहीं नव्या कारस्थानाच्या उभारणीसाठीं त्याला त्या दोघांचीही आवश्यकता होती. त्यासाठीं त्याला हें भांडण तेथल्या तेथें मिटविणें श्रेयस्कर होतें. त्या इराद्यानें त्यानें प्रथम यमाजीला विचारलें, "बरें; तुमचें म्हणणें काय ?"

यमाजी उत्तरला, "गमाजीला व नागोजीभटाला ह्या दोघांनीं कृष्णेश्वरापाशीं एकटा गांठून मारलें, त्याबद्दल हे गुन्हेगार आहेत."

मल्हारी म्हणाला, "धनीसाहेब ! आम्ही कांहीं कोणालाच मारलें नाहीं, आपल्या पायांना साक्ष ठेवून सांगतों."

राणोजी म्हणाला, "धनीसाहेब ! यांच्या सांगण्यावरून मला असें वाटतें कीं, ज्या गोंधळ्यांना ह्यांनीं किल्ल्यावर मारपीट केली, त्यांनीं ह्यांना एकटे रस्त्यांत गांठून त्यांचा समाचार घेतला असेल."

"पण हें तरी तुला कसें कळलें ? त्यांनीं मारपीट केली असली तरी तीदेखील तुमच्याच सांगण्यावरून केली असली पाहिजे." यमाजी म्हणाला.

"पण तुम्हीं तरी त्या गोंधळ्यांना किल्ल्यावर कां मारपीट केली ?" बाजिरावानें विचारलें.

ह्या प्रश्नाचें उत्तर देतांना यमाजी व गमाजी यांची गाळण उडणें अगदीं अपरिहार्य होतें. ते गोंधळूं लागलेले पाहून बाजीराव यमाजीला म्हणाला, "यमाजी ! तुम्ही प्रतिनिधींचे कैवारी आहां हें मला माहीत आहे. ज्यांचें अन्न तुम्ही खातां त्यांचा तुम्हांला अभिमान वाटणें अगदीं साहजिक आहे. त्याबद्दल तुम्हांला कोणी नांवें ठेवणार नाहीं. पण त्यासाठीं तुम्ही माझ्या माणसांना गांजूं

लागलां तर तें मात्र मला मुळींच सहन होणार नाहीं, सांगून ठेवतों. पेशवे व प्रतिनिधि यांच्यांत जी स्पर्धा आहे, तिलादेखील प्रतिनिधीच सर्वस्वी कारण आहेत हें जरी खरें असलें, तरी त्या स्पर्धेचा शेवट करण्याला ज्यांचे ते समर्थ आहेत; त्यांत त्यांच्या हुजरे-शागीर्दांनीं किंवा कुळंबिणी-मोलकरणींनीं पडण्याचें कारण नाहीं."

"तें आम्हांला कबूल." यमाजी म्हणाला.

"मग तुम्हीं आमच्या रागावरून त्या गोंधळ्यांना मारपीट कां केली ?' बाजिरावानें विचारलें.

"त्याचीं कारणें अगदीं निराळीं होतीं. तीं आपणाला कळावयाचीं नाहींत." यमाजी म्हणाला.

बाजिरावाला सर्व गोष्टी अगोदरच माहीत असल्यानें तो यमाजीच्या ह्या तोंडपाटिलकीला भाळणारा नव्हता. पण नखाच्या कामाला कुऱ्हाडी लावण्याची संवय त्याला नसल्यानें तो गोंधळ्यांच्या मारपिटीबद्दल यमाजी किंवा गमाजी यांचा जाब घेण्याच्या भरीला न पडतां म्हणाला, "बरें; तुम्हीं पिलाजीला मारहाण केली ती कां ?"

गमाजी मध्येंच म्हणाला, "मग ? त्यानें तरी आमच्या देवडीवाल्याला मारहाण केली ती कां ?"

मल्हारी संतापून म्हणाला, "धनीसाहेब ! ह्या आडमुठ्या माणसांशीं बोलण्यांत राम नाहीं. इथें मुद्द्याला मुद्दा व गुद्द्याला गुद्दा हा न्याय अमलांत आणला पाहिजे."

आतां हें प्रकरण पुन्हा हातघाईवर येणार असें पाहून बाजीराव मल्हारी व राणोजी यांना म्हणाला, "जाऊं द्या. त्यांनीं परती करूं नये ती चूक केली; पण तुम्हीही त्यांच्या नादीं काय लागतां ! आतां तुम्हांला त्यांच्याबरोबर किल्ल्यावर जाऊन काय करावयाचें होतें ?"

"आम्हांला पिलाजीचा तपास लावावयाचा आहे. ह्या मुर्दाडांनीं त्याला दगा दिला आहे." मल्हारी म्हणाला.

"मी आतांच पिलाजीला भेटून आलों. तो किल्लेदाराच्या घरीं सुरक्षित आहे. आतां तुम्ही दोघे माझ्याबरोबर चला." बाजीराव म्हणाला.

पिलाजी किल्ल्यावर सुरक्षित आहे असें कळतांच यमाजी व गमाजी हे बापलेंक बुचकळ्यांत पडले कीं 'असें कसें झालें ? पिलाजीला काळाच्या दाढेंतून ओढून किल्ल्यावर कोणीं नेलें ?'

"ठीक आहे. मग आमचें कांहीं म्हणणें नाहीं ?" मल्हारी बाजिरावाला म्हणाला, "पण धनीसाहेब ! ह्या लोकांना आपण ताकीद देऊन ठेवा कीं, ह्यांनीं पुन्हा आमच्या भानगडींत पडतां कामा नये."

राणोजीही यमाजी व गमाजी यांच्याकडे वळून म्हणाला, "बायकांशीं हुजत घालण्यांत तुम्हांला कांहीं लाज वाटावयाला हवी होती."

बाजिरावानें आपल्या घोड्यावर स्वार होतां होतां त्या दोघां बापलेकांना सांगितलें, "पुन्हा जर असल्या कागाळ्या माझ्या कानावर आल्या तर खबरदार ! मग मात्र मी त्या गांवचा नव्हे."

एथें हुजत घालून आपला पल्ला लागावयाचा नाहीं हें त्या दोघांनाही माहीत असल्यानें ते गप्प बसले. मनांतल्या मनांत मात्र ते मारे मिशीला पीळ भरीत होते, "बच्चंजी ! याद राखा ! वेळ आली म्हणजे पाहून घेऊं."

अशा प्रकारें ह्या लढ्याचा तेथें तात्पुरता शेवट झाला. यमाजी व गमाजी मनांतल्या मनांत जळफळत किल्ल्याकडे चालले. मल्हारी व राणोजी हे दोघेही बाजिरावाच्या सांगण्याप्रमाणें त्याच्या मागोमाग निघून गेले.

बाजिरावानें आपल्या वाड्यांत पोंचतांच किल्ल्यावर घडलेला एकंदर प्रकार मल्हारी व राणोजी यांना निवेदन केला. कांहीं वेळ त्या तिघांचें पुढें काय करावयाचें याविषयीं खलबत झालें. अखेर एकमतानें असें ठरलें कीं, बाजिरावानें राणोजीच्या मदतीनें सुमंत व आणखी कोणी जे निजामाकडे जाणार असतील त्यांच्या हालचालींवर नजर ठेवून शक्य तों प्रतिनिधीनें निजामाशीं काय कारस्थानें चालविलीं आहेत त्यांचा तपास करावा व मल्हारीनें पहांटेला उठून शाहूमहाराजांपाशीं जाऊन बाजीराव आल्याची खबर त्यांना द्यावी. त्याबरोबरच त्या कर्तृत्ववान् गोंधळ्यांचा तपास लागला तर लावण्याचें कामही ओघानेंच मल्हारीच्या वांट्याला आलें.

इतक्या भानगडी होईतों मध्यरात्र उलटून पहांट जवळ आली होती. अर्थात् सर्वांच्या झोंपेचें खोबरें झालें होतें. या उपरांत मल्हारी व राणोजी आपल्या घरीं जाऊन काय झोंप घेणार ! त्यांतूनही ते गेले असते व कदाचित् पहांटेची साखरझोंप त्यांच्या पदरीं पडली असती; पण राणोजीला तेथून जातां येण्याजोगें नव्हतें. सुमंत वगैरे मंडळीच्या हालचालींवर नजर ठेवण्याची कामगिरी पार पाडण्यासाठीं त्याला जागता पहारा करावयाचा होता. मग मल्हारी तरी एकटाच इतक्या

अपरात्रीं इतक्या दूर कशाला जातो ! त्यालाही पहांटेला महारदऱ्यावर महाराजांकडे जाऊन बाजीराव आल्याची खबर द्यावयाची होतीच. बाजीराव इतक्या सर्व गोष्टी ध्यानीं घेऊन त्या दोघांनाही म्हणाला, " तुम्ही आज इथेंच झोंपा."

राणोजी म्हणाला, " धनीसाहेब ! आपण वाटचालीच्या श्रमांनीं दमलेले आहां, आपण झोंपा. आम्ही झोंपून चालावयाचें नाहीं. सुमंत वगैरे मंडळींच्या हालचालींवर नजर ठेवली पाहिजे."

" बरें आहे." असें म्हणून बाजीराव आपल्या शयनमंदिरांत गेला. पण त्याला झोंप कुठून लागणार ! एकंदर राजकारणांतील भानगडींचे अनेक विंचु त्याच्या अंतःकरणाचा सारखा चावा घेत होते. तिकडे शाहूमहाराजांच्या कानीं प्रतिनिधींनीं आणखी काय काय विष ओतलें असेल व आपणाला पेशवाईचीं वस्त्रें मिळण्याच्या वाटेंत तीं कारस्थानें कितपत येतील, अशा एक ना दोन कितीतरी भानगडी त्याचें मस्तक भणाणून सोडीत होत्या. अशा स्थितींत त्यानें क्षणांत बिछान्यावर पडावें, अंमळशानें डाव्या कुशीला वळावें, पुन्हा उजव्या कुशीला वळावें, अंमळशानें उठून कोचावर बसावें, अशी चाळवणी सारखी पहांटेपर्यंत चालली होती. त्याचा विश्वासू शागीर्द गोविंदा आडून हा सर्व प्रकार पहात होता. त्यानें मधून मधून आंत येऊन धनीसाहेबांना झोंप कां येत नाहीं याची चौकशी केली, पायांना व डोक्याला तेल चोळूं का विचारलें, असें दोन चार वेळां बाजिरावानें कसेंबसें सहन केलें. पण त्यामुळें त्याच्या विचारांत वेळोवेळीं अनाहूत खंड पडूं लागले. तेव्हां शेवटीं एकदां स्वारी गोविंदावर रागावली देखील ! त्यामुळें 'शेळी जाते जिवानिशीं व खाणारा म्हणतो चिंवट' अशी गोविंदाची केविलवाणी अवस्था झाली. तो हिरमुसला होऊन बाहेर जाऊन गप्प बसला. अंमळशानें बाजिरावालाच वाटलें कीं, आपण गोविंदाचें मन वृथा दुखावलें. त्या दुःखाची भरपाई कशी करावी, हा त्याला एक पेंच येऊन पडला. गोविंदा धन्याच्या भावाचा भुकेला होता. त्याची समजूत एखादें आर्थिक बक्षीस देऊन करतां येण्याजोगी नव्हती. अत्यंत महत्त्वाची कांहीं सेवा त्याच्या हातून घेण्यानेंच त्याच्या मनाचें समाधान होणें शक्य होतें. अशी कोणती सेवा आतां त्याच्याकडून घ्यावी, याचा विचार करतां करतां बाजिरावाला एक उपाय सुचला. तो लगेच आपण होऊन उठून गोविंदापाशीं गेला व म्हणाला, " गोविंदा ! रात्रौ तुला सांगितलेली कामगिरी आतां करावयाची आहे."

" कोणती ती ? " गोविंदानें कांहींशा अप्रसन्न वृत्तीनें विचारलें.

" नानासाहेबांच्या अस्थींचें कृष्णेंत विसर्जन करावयाचें आहे."

" हो !"

" मग, तेवढें तूं करणार ना ?"

" आपली आज्ञा झाली तर !"

" जा तर; लौकर तेवढें काम आटोपून ये."

गोविंदाला ही कामगिरी ऐकून पराकाष्ठेचा आनंद झाला. तो लगेच उठला व स्नानाच्या वगैरे तयारीला लागला. बाजिरावानेंही त्या दिवशीं आपले सर्व प्रातर्विधी नेहमींपेक्षां जरा लौकर आटोपून घेतले. नंतर गोविंदानें स्नान करून श्रद्धापूर्वक आपल्या दिवंगत धन्याच्या अस्थींची पूजा केली, व मग तो त्या कृष्णेंत विसर्जन करण्यासाठीं घेऊन माहुलीला जावयाला निघून गेला.

बाजिरावाची स्नानसंध्या आटोपते तोंच मल्हारीनें येऊन वर्दी दिली, " धनी-साहेब ! थोड्या वेळापूर्वीं खतिबांच्या घरांतून एक मेणा रवाना झाला."

" त्या मेण्यांत कोण होतें ?" बाजिरावानें विचारलें.

" तें कांहीं कळलें नाहीं. पण मला वाटतें, कोणी तरी बायकोमाणूस त्यांतून गेलें असावें."

" कदाचित् खतिबाच्या घरीं आलेल्या पाहुणेमंडळींच्या बायकामाणसांपैकीं कोणीतरी असेल."

" असेल."

" आणि राणोजी कुठें आहे ?"

" तो सुमंतांच्या वाड्याकडे गेला आहे."

" बरें आहे. तो आल्यावर आम्ही काय तें पहातों. तोंवर तूं आतां महाराजांना मी आल्याची वर्दी देण्यासाठीं जातोस ना ?"

" होय."

" जा तर."

* * *

बाजिरावाच्या आज्ञेनुसार मल्हारी पागेंतील एक घोडा घेऊन महारदऱ्याकडे जावयाला निघाला. तो तिकडे जातांच प्रतिकूल परिस्थितीच्या कात्रींत कसा सांपडला गेला हें आपण पूर्वींच पाहिलें आहे. तो जातो न जातो, तोंच राणोजी लगबगीनें

तेथें आला व बाजिरावाला म्हणाला, " धनीसाहेब ! निजामाकडचे पाहुणे रात्रींच निघून गेले, व सुमंत आतांच तिकडे जावयाला निघत आहेत."

" हें तुला कोणीं सांगितलें ? "

" मीं ही बातमी सुमंतांच्या नोकराकडून काढली."

" आणि ते दोघे रात्रींच गेले म्हणतोस ? "

" होय."

" मल्हारीनें तर बातमी आणली होती कीं, आतांच थोड्या वेळापूर्वी एक मेणा खतिबांच्या घरून बाहेर पडला."

" मग त्याचा मी आतांच नक्की तपास करून येतों". असें म्हणून राणोजी खतिबांच्या घराकडे निघून गेला.

कांहीं असलें तरी आपण ह्या मंडळीला गांठून निजामाशीं चाललेल्या चोरट्या कारस्थानांचा कांहीं तपास लागला तर पहावयाचाच, असा बाजिरावाचा या-पूर्वीच निश्चय झालेला होता. त्या कामगिरीवर निघण्याची वेळ आली असें पहातांच तो राणोजी येईतों कपडे करूं लागला. प्रथम त्याला वाटलें कीं, नेहमीं-प्रमाणें साध्या पोषाकांतच जावें; म्हणून त्यानें एकवार तसा पांढरा शुभ्र पोषाक केला. पण पुन्हा त्याला असें वाटलें कीं न जाणो, आपण पाठलाग केलेला सुमंत व निजामाकडचे पाहुणे यांना रुचणार नाहीं. त्यांच्या तेथें जर खरोखरच कांहीं पाणी मुरत असलें तर ते वर्दळीवर यावयालाही कमी करणार नाहींत. शिवाय त्यांच्याबरोबर कांहीं सैनिकही खास असतील. तशीच वेळ आली, हातघाईवर प्रकरण आलें, तरीदेखील आपला टिकाव लागावा अशी आपली एकंदर तयारी असावी अशा विचारानें त्यांनीं पूर्वीचा पेहराव उतरून ठेवून युद्धोपयोगी आयुधां-नीं सज्ज असा नवा पेहराव केला. तेवढ्यांत राणोजी आला.

" राणोजी ! काय खबर आणलीस ? " बाजिरावानें विचारलें.

" धनीसाहेब ! खबर अत्यंत विस्मयजनक आहे."

" कां ? काय झालें ? "

" निजामाकडचे पाहुणे रात्रींच निघून गेले."

" मग मेणा कोणाचा गेला ? "

" मस्तानीचा."

" काय, मस्तानीही त्यांच्याबरोबर गेली ? "

" ती बाहेर गेली एवढें मला कळलें."

" आणि खतिबांची याला संमति आहे ? "

" अर्थात् ! एरव्हीं त्यांनीं मस्तानीला जाण्याला मोकळीक कशी दिली असती ! मला तरी वाटतें कीं, त्यांच्या संमतीनेंच ह्या गोष्टी होत असाव्या."

" इथें कांहीं तरी निराळा प्रकार असला पाहिजे. चल, तूं देखील पागेंतील एक घोडा काढून माझ्याबरोबर चालूं लाग. आपण प्रथम खतिबांच्या घरीं जाऊन चौकशी करूं व मग पुढें काय करावयाचें तें पाहूं."

लगेच बाजीराव व राणोजी दोघे दोन घोड्यांवर स्वार होऊन प्रथम खतिबांच्या घरीं गेले. तेथें जाऊन पहातात तों सारा शुकशुकाट ! घर नुसतें नांवाला उघडें होतें. नांवाला असें म्हणण्याचें कारण, खतिबांच्या नात्यांतील एक म्हातारी बाई काय ती घरांत होती. थोड्या वेळापूर्वी राणोजी चौकशी करून गेला तेव्हांही हीच बाई त्याला भेटली होती व तिनेंच मेण्यांतून मस्तानी गेल्याचें त्याला सांगितलें होतें. पण तोच राणोजी पुन्हा येऊन कोण कोठें गेले याविषयीं खोदून खोदून चौकशी करूं लागला, तेव्हां त्या बाईला संशय आला. ती मुळींच सरळ उत्तर देईना. राणोजीनें थोड्या अंतरावर थांबलेल्या बाजिरावाला हा प्रकार सांगितला, तेव्हां बाजीराव स्वतः घोड्यावरून उतरून पुढें झाला.

" बाई ! घरची सर्व मंडळी कुठें गेली ? " बाजिरावानें बाईला विचारलें.

कधीं नव्हत्याचा बाजीराव अशा अवेळीं आपल्याकडे आला म्हणून ती बाई घाबरून गेली. पण तिनें राणोजीला जशीं उडवाउडवीचीं उत्तरें दिलीं होतीं, तशीं बाजिरावाला उत्तरें देण्याची तिची छाती होईना. तिनें भीत भीत सांगितलें, " पाहुणे आपल्या देशीं गेले."

" पण खतीब कुठें गेले ? " बाजिरावानें विचारलें.

" ते आपल्या मुलीला घेऊन बाहेर गांवीं गेले."

" पण ते बाहेर गांवीं म्हणजे कुठें गेले ? " बाजिरावानें पुन्हा विचारलें.

" तेही पाहुण्यांबरोबर गेले असतील ! " म्हातारी उत्तरली.

" म्हणजे तुला नक्की माहीत नाहीं का ?"

" नाहीं."

" जातांना तुला त्यांनीं काय सांगितलें ? "

बाईला पेंच पडला कीं आतां कसें करावें! खतिबानें तर तिला आपण व मस्तानी कोठें जातों आहों हें सांगूं नकोस म्हणून सांगितलें होतें. तो निबंध तिनें हा वेळपर्यंत कसावसा पाळाला. पण बाजीराव जेव्हां जास्त खोलांत शिरूं लागला, तेव्हां तिची फार गाळण उडून गेली. धरावें तर चावतें व सोडावें तर पळतें, अशांतली तिची अवस्था होऊन बसली. अगदींच खोटें सांगून मोकळें व्हावें तर बाजीराव प्रश्न विचारणारा पडला! तो रागावला तर! बरें; खरें सांगावें तर खतीब घरीं आल्यावर काय म्हणतील? अखेर तिनें एकदांचा मनाचा धडा घेऊन सांगितलें, "मी सांगत्यें, पण कोणाला सांगूं नकोस असें खतिबांनीं मला सांगितलें आहे."

"तें त्यांचें बरोबर; पण खतीब मला ओळखतात व तूंही ओळखतेस, होय ना?"

"होय."

"झालें तर. कांहीं झालें तरी खतिबांना जाचक अशी कोणतीच गोष्ट आमच्या हातून व्हावयाची नाहीं. मी जो इतका खोदखोदून विचारतों, त्यांत जो माझा हेतु आहे तो खतिबांच्या कल्याणाचाच आहे. खतीब साधे मनुष्य आहेत. ते कोठें तरी कोठल्या तरी भानगडींत उगाच गुरफटले जातील याचें मला भय वाटतें. त्यांचीही गोष्ट राहो परती; पण त्यांच्या पदरीं मस्तानी आहे.—"

"हो!" बाई अंमळ उतावळेपणानें बाजिरावाला पुरतेपणीं बोलूं देण्यापूर्वीच म्हणाली, "त्या पोरीसाठींच तर खतीब इतके जपत आहेत."

"आणि आम्हांलाही तिच्याविषयींच इतकी काळजी वाटत आहे." बाजीराव म्हणाला.

बाई उद्गारली, "पण त्या दोघांविषयींही काळजी करण्याचें कारण नाहीं. इथें मस्तानीच्या सुरक्षितपणाविषयीं खतिबांना चिंता वाटूं लागली, म्हणूनच ते तिला घेऊन शाहूमहाराजांकडे गेले आहेत."

"खरें!" बाजिरावानें विचारलें.

"खरें." बाई उत्तरली.

"थोड्या वेळापूर्वीं मेणा गेला तो मस्तानीचाच ना?" राणोजीनें विचारलें.

"होय." बाई उत्तरली.

"बरें झालें. एक चिंता दूर झाली." बाजीराव राणोजीकडे वळून म्हणाला, "राणोजी! चल, आतां आपण आपल्या पुढील उद्योगाला लागूं."

बाईच्या बोलण्यावर बाजिरावाचा फारसा विश्वास बसेना. मस्तानी जी मेण्यांतून गेली, ती खतिबाबरोबर महाराजांकडे गेल्याचें त्याला खरें वाटेना. कारण तसें करण्याची खतिबाला तादृश आवश्यकता कांहींच नव्हती. कदाचित् प्रतिनिधींनीं महाराजांना खूष करण्यासाठीं लक्ष्मी जशी महाराजांच्या स्वाधीन केली, तशीच मस्तानी लांचेदाखल कोणाला न कळत निजामाच्या जनानखान्यांत पोंचविण्याचें हें कारस्थान त्यांनीं रचिलें असलें तर ! असाही त्याला संशय आला. पण तो त्यानें बोलून दाखविला नाहीं. तो त्या बाईशींही आणखी बोलत बसला नाहीं. बाईला त्याचा पुढील उद्योग काय हें जाणण्याची उत्कंठा होती; पण त्याला तसें विचारण्याचें धाडस तिला झालें नाहीं. राणोजीला तर याची कल्पनाच नव्हती.

" आपण आतां प्रथम सुमंतांच्या घरीं जाऊं, व सुमंत भेटले नाहींत तर मग त्यांचा पाठलाग करूं." बाजीराव राणोजीला म्हणाला.

" पण धनीसाहेब ! मी एक प्रश्न विचारूं का ? "

" कोणता तो ? "

" त्या मंडळींचा पाठलाग करून पुढें काय करण्याचें आपल्या मनांत आहे ? "

" आपण सुमंतांना ह्या गोष्टीचा जाब विचारूं."

" पण ते जर सामोपचारांना विचारलेल्या गोष्टींचीं उत्तरें देण्याला तयार झाले नाहींत तर ? "

" मग पुढचें पुढें पहातां येईल."

" तसें नव्हे, माझें म्हणणें असें कीं, जरी वेळीं आपणाला संशय आहे तसा एखादा महत्त्वाचा खलिता त्या मंडळीपाशीं असला, तरी ते तसें कबूल करतीलच असें कशावरून ? तेव्हां माझी सूचना अशी कीं, आपण तर जाऊंच; पण आपल्या मागोमाग सैन्याची एक लहानशी तुकडी मदतीला असलेली बरी. तशीच वेळ आली तर उपयोग होईल."

"गोष्ट खरी; पण आतां असा वेळ गमावण्यांत अर्थ नाहीं. ती मंडळी फारशी दूर गेली नाहीं तोंच आपण त्यांचा पाठलाग केला पाहिजे. तेव्हां आपण परमेश्वराचें नांव घेऊन पुढें तर जाऊं खरे ! सत्याचा पाठीराखा परमेश्वर असतो."

राणोजी यावर थोडा वेळ कांहीं बोलला नाहीं. मनांत येऊं नयेत त्या भलभलत्या कल्पना या वेळीं त्याच्या मनांत येऊं लागल्या. सुमंतांची एक गोष्ट निराळी होती. ते कोणत्याही परिस्थितींत बाजिरावाशीं अतिप्रसंग करूं शकले नसते. पण

ते निजामाचे पाहुणे केव्हां काय करतील, त्यांना प्रतिनिधींचें पाठबळ कितपत असेल, वगैरेविषयीं राणोजीचें मन फार साशंक होतें.

राणोजी कांहीं बोलत नाहीं; तेव्हां त्याला आपला विचार पटला नाहीं हें ओळखून बाजिरावानें थोडक्यांत मस्तानीविषयींचा संशय त्याच्यापाशीं प्रगट केला, तो मात्र त्याला पटला. कारण मस्तानीवर कोणत्याही उद्देशानें कां असेना पण निजामाच्या पाहुण्यांचा व आणखी अनेकांचा डोळा असल्याचें आणि सभों-वारच्या कावेबाजांचे कावे न ओळखतां येण्याइतका खतीब स्वतः भोळा असल्याचें त्याला माहीत होतें. बाजिरावानें तरी मस्तानीविषयीं इतकी कळकळ दाखविली याचें कारण ती एक ब्राह्मणकन्या आहे व तिचें एकंदर जीवन अत्यंत रहस्यमय आहे, तसेंच ती जरी मुसलमानांच्या घरांत बाढून लहानाची मोठी झाली असली तरी आपण हिंदु आहों ही जाणीव तिला अजून आहे, तिच्या रक्ताच्या प्रत्येक थेंबांत व शरीरावरील रोमरोमांत हिंदुत्वाचा अभिमान सळसळत आहे, हें बाजि-रावाला ऐकून माहीत होतें. तें राणोजीलाही ऐकून माहीत होतें. त्यामुळें निजामाकडे पावता होण्यासाठीं पाठविण्यांत आलेल्या बनावट खलित्यापायीं ओढवणाऱ्या संकटा-इतकेंच मस्तानीच्या जीविताचें व अब्रूचें महत्त्व त्या दोघांनाही वाटलें. राणोजीला मस्तानीचें महत्त्व याहूनही जास्त वाटलें तें मात्र कांहींशा विकल्पानें वाटलें. मस्तानीला बाजीराव मनापासून आवडे हें त्याला गांवगप्पांवरून पण निश्चयात्मक माहीत होतें, व त्यामुळेंच बाजिरावालाही ती आवडत असावी असा त्याचा तर्क होता. हा निव्वळ तर्क होता; बाजीराव हा रंगेल गडी आहे ह्या त्याच्या स्वतःच्या अनुभवाखेरीज दुसरा कसलाही पुरावा त्याच्या तर्काला नव्हता. पण त्यांतही त्याला स्वतःला वावगें असें कांहींच दिसलें नाहीं. त्यानें बाजिरावाच्या इच्छेवर फारसे आढेवेढे न घेतां त्याच्या शब्दाला मान तुकावली, व दोघेही तसेच सुमंतांच्या वाड्याकडे आपले घोडे दौडीत निघाले.

# प्रकरण दहावें

# थोडेंसें विषयांतर

बाजिरावानें किल्ल्यावरून येतांना यमाजी व गमाजी यांचें मल्हारी व राणोजी यांच्याशीं जें भांडण जुंपलें होतें ते अंशतः मिटविलें. त्याचे परिणाम त्यानंतर कांहींही झाले तरी तेवढ्यापुरता तो वणवा विझला एवढें तर खरें ! पण त्या वणव्याच्या मुळाशीं व वणव्याच्या विस्तारांत इतरत्र ज्या ज्वाळा भडकत होत्या, त्यांची बाजिरावाला दादही नव्हती. त्या ज्वाळांनीं तिकडे परस्पर खूपच हाहाःकार उडवून दिला होता. उदाहरणार्थ, नूरनिहार जी किल्ल्यांतून कांहीं तरी सबब सांगून रहमानासह बाहेर पडली, ती बाजिरावाला त्याच्या वाड्यापाशीं भेटून पिलाजीविषयीं खबर देऊन गेल्यापासून तिचें काय झालें, तें पहाण्याइतकी फुरसतही त्याला नव्हती व तशी चौकशी करण्याचें त्याला तादृश प्रयोजनही नव्हतें.

पण नूरनिहार ही इतकी उपेक्षणीय व्यक्ति होती असें मात्र नाहीं. नूरनिहार ही वरवर पाहूं गेल्या एक सामान्य दासी, जी दुराचाराच्या आरोपाबद्दल राजदंडाला पात्र झालेली व त्यामुळें अनीतिमानपणाचा काळा डाग जिच्या चारित्र्यावर जन्माचा उमटला होता अशी एक अभागी स्त्री ! तिच्यावरचा दुराचाराचा आरोप खरा नव्हता हें खरें; पण जग तसें मान्य करण्याला कोठें तयार होतें ? दासीजनांतही भाग्यवान् दासी नसतात असें नाहीं. शाहूमहाराजांची प्रियतमा विरूबाई ही एक दासीच होती. पण शाहूमहाराजांच्या राजवटीला तिचा दर्जा पट्टराणीपेक्षांही थोर होता. शिवाय गुलबाई, लक्ष्मीबाई वगैरे अनेक स्त्रिया महाराजांच्या विलासमंदिरांत चमकत होत्याच. त्या महाराजांच्या नाटकशाळा जशा एकीहून एक रूपवान् होत्या तशाच गुणवानही असतील व म्हणूनच त्या महाराजांच्या कृपाछत्राच्या छायेला सुखानुभव घेऊं शकल्या असतील, नाहीं असें नाहीं. केवळ महाराजांची विषयलोलुपताच त्या दासींना एवढ्या वैभवाचें वाण मिळण्याला कारण झाली नसेल. पण नूरनिहारही रूपानें त्या दासींच्या पंक्तींत पहिल्या नाहीं तरी मधल्या किंवा निदान शेवटच्या जागीं शोभण्यासारखी तरी खास होती, आणि गुणांनीं व नीतीनें तर तिनें अशा कैक दासींनाच काय पण कैक कुलस्त्रियांनाही लाजविलें असतें. फार दूर कशाला ! तिला सौंदर्याची जी ईश्वरी देणगी होती, त्या देणगीचा तिनें

महाराजांना मोहिनी घालण्याच्या कामीं उपयोग करण्याचें मनावर घेतलें असतें तर तिला तसें सहज करतां आलें असतें. आतां ती कदाचित् अत्यंत सौंदर्यवती ठरली नसती; पण सुंदर स्त्रियांत तिची खास गणना झाली असती. शरीरसौंदर्याविषयीं बोलावयाचें झालें तरी शरीरसौंदर्यांतही अनेक परी असतात. गुणसौंदर्य व बुद्धिसौंदर्य हे उच्च सौंदर्याचे प्रकार क्षणभर बाजूला ठेवून नुसत्या शरीरसौंदर्याचाच विचार केला तर एखादी स्त्री नुसती वर्णानें केवड्यासारखी गोरी असते, तिचे बाकीचे अवयव असावे तितके रेखीव नसले तरी देखील कोणाकोणाला तिच्या वर्णसौंदर्यांतच सर्व सौंदर्य सांठविलेलें आहे असें वाटून तिची भुरळ पडते. एखादी स्त्री देहसौंदर्याच्या बाबतींत दुय्यम दर्जाची सुंदर असली तरी तिचा केशभार इतका मोहक असतो कीं, कोणी रंगेल त्या नुसत्या केशभाराकडे पाहूनच तिला सौंदर्याबाबतचे सारे गुण बहाल करण्याला राजी असतो. एखाद्या स्त्रीच्या ठायीं असें निश्चित किंवा हुकमी सौंदर्य सूक्ष्म रीतीनें पाहूं गेल्या दृग्गोचर होत नसतें; पण तिच्या शरिराचा एकंदर बांधा असा मोहक व लुसलुशीत असतो कीं, त्यावरच कोणी सौंदर्यलोलुप पुरुष खूष असतो व त्या मोहकतेच्या जोडीला हंसतमुखाची ईश्वरी देणगी लाभली असल्यास मग तर विचारावयालाच नको. सौंदर्य हें बहुशः ज्याच्या त्याच्या आवडीवर अवलंबून असतें; पण मोहकता—आकर्षकता हा कोणत्याही सौंदर्याचा आत्मा असतो. नूरनिहार ही जरी सामान्य प्रतीची सुंदर होती, तरी तिच्या ठायींची मोहकता असामान्य होती. तिच्यांत मोहकता—आकर्षकता होती, ती मोहकता किंवा आकर्षकता कोणती असें कोणी विचारल्यास नेमकें उत्तर कदाचित् देतां आलें नसतें. पण तिला पाहतांच प्रत्येकाला पवित्र आनंद होई, मग विषयलोलुपांना आनंद झाल्यास नवल काय ? गुलाबाचें फुललेलें फूल पाहून सर्वांनाच तें हवें हवेंसें वाटतें व कोणाला तें उपभोगावें—कोणा तरुणाला तें खुडून हुंगावें, किंवा कोणा तरुणीला तें आपल्या वेणींत खोंचावें असें वाटतें. नूरनिहारही गुलाबाच्या फुलाप्रमाणें होती. तात्पर्य, तिनें जर मनांत आणलें असतें, तर तिला तिच्या ठायींच्या ह्या मोहकतेची फार मोठी किंमत मिळाली असती. ती किल्लेदाराची प्रियतमा होऊन बसली असती; इतकेंच नव्हे, तर थोड्याशा पुढें पुढें करण्यानें ती शाहूमहाराजांच्या अंतःपुरांत देखील त्यांची नाटकशाळा म्हणून प्रवेश करूं शकली असती. इतकें दूर कशाला ? ती सासरीं असतांना ज्या लक्ष्मीपुत्राचा तिच्यावर डोळा होता, त्याला ती वश झाली असती तर आज त्याची धर्मपत्नी ह्या नात्यानें महत्पदाला चढली असती, व तिच्या विलासविहारांना आज

पारावार उरला नसता. मग किल्ल्यावर कुळंबीण म्हणून रावण्याचें किंवा त्यानंतर आज शाहूमहाराजांच्या एका रखेलीची—लक्ष्मीची सेवा करण्यांत सुखसर्वस्व मानण्याचें तिच्या कपाळीं आलें नसतें. उलट तिनेंच मग स्वतांसारख्या कैक दासी आपल्या चरण-सेवेंत राबविल्या असल्या. मानापरी मान, धर्मापरी धर्म व वैभवापरी वैभव यांचे रुजामे मग तिच्या चरणतळीं पसरले गेले असते. आज ज्या लक्ष्मीची ती दासी होती, त्या लक्ष्मीचा दर्जा तरी 'शाहूमहाराजांची एक नाटकशाळा' एवढाच होता. महाराजांच्या इतर नाटकशाळांप्रमाणें तीही एक नाटकशाळा होती. महाराजांच्या नाटकशाळांपैकीं एका विरूबाई व्यतिरिक्त बाकीच्यांना दर्जा असा तरी काय होता! आणि विरूबाई झाली तरी देखील महाराजांची नाटकशाळाच होती ना! पण नूर-निहार तिच्यावर मोहित झालेल्या त्या वांईप्रांतींच्या मुसलमानाला वश झाली असती तर ती आज त्याची धर्मपत्नी—त्याची प्यारी बिब्बीशी शोभली नसती का?

पण नूरनिहारनें असें कांहींदेखील केलें नाहीं. तिनें आपल्या पतीच्या पश्चात् पतिभक्तीची पराकाष्ठा करून सोडली, त्यामुळें आजचे दिवस तिच्या कपाळीं आले होते! ती शाश्वत पातिव्रत्याच्या पवित्र मानसिक सुखासाठीं आजन्म वैधव्य पत्करून राहिली, म्हणून तिच्या जन्माचे निघूं नयेत तसे धिंडवडे निघाले! साऱ्या जगांत ती एक यःकश्चित् उपेक्षणीय वस्तु ठरली. इतकी उपेक्षणीय कीं, तिच्या पतीच्या पश्चात् तिच्यावर मोहित झालेल्या त्या धनवान् मुसलमान तरुणानेंच नव्हे, म्हाताऱ्या शेखमिरा किल्लेदारानेंच नव्हे, तर यःकश्चित् देवडीवाल्या अबुबकरनेंही तिचा अभिलाष धरावा, व तिला तिच्या पातिव्रत्यावर पडणारे हे साफसुरत दरोडे टाळण्यासाठीं दाद मागण्याला जगांत कोठेंही जागा राहूं नये! महाराजांचा कायदाही तिला अपराधी म्हणून बेवारशी ठरविण्याइतका व त्यामुळें कोणाही टारगट कामांधाला तिच्याकडे पापी दृष्टीनें पहाण्याची सर्रास मोकळीक देण्याइतका लवचिक असावा! आतां तो कायदा काय, बोलून चालून ती मानवांची कर्तबगारी. तेव्हांचा काळ, तेव्हांच्या चालीरीति, तेव्हांची एकंदर परिस्थिति ध्यानीं घेतां तसा कायदा करण्यांत किंवा पूर्वीपासून चालत आलेला कायदा जारी ठेवण्यांत शाहूमहाराजांनीं कांहीं अन्याय केला होता असें म्हणावयाला नको. पण तिचा धर्म—ज्या धर्मानुसार ती लहानाची मोठी झाली, ज्या धर्मा-नुसार ती आपल्या पतीची धर्मपत्नी झाली, व तिचा पति बेपत्ता होऊन तो मेला अशा भावनेनें समाजानें तिला विधवा ठरवितांच ज्या धर्मानुसार तिचें पुन्हा

पाणिग्रहण करण्याची इच्छा करण्यांत तिच्या कोणाही धर्मबांधवाला सरांस मोकळीक मिळाली, तो तिचा मुसलमानी धर्मही तेव्हां तिची पातिव्रत्याविषयींची परमोच्च कल्पना पाहून तिला खदखदां हंसत होता! तिच्यावर अनुरक्त झालेला तरुण मुसलमानसुद्धां तिचा अभिलाष करण्यांत अधर्म करीत होता अशांतली गोष्ट नाहीं. त्याला त्याच्या मुसलमानी धर्माप्रमाणें एका वेळीं चार बायका करण्याला मोकळीक होती, व नूरनिहार ज्या पातिव्रत्याला हृदयाशीं कवटाळून बसली होती, त्या पातिव्रत्यालाही तिच्या धर्मांत कोठें बळकट आधार नव्हता. त्यामुळें तिच्या मुसलमान समाजांत देखील तिच्या ह्या पतिव्रताधर्माचें कौतुक होई असें नाहीं. उलटपक्षीं त्या श्रीमान् मुसलमान तरुणानें जेव्हां तिच्या दुराचाराचा आरोप आणला, तेव्हां तिच्या शेजाऱ्यापाजाऱ्यांनीं देखील इतर साधकबाधक विचार न करतां एकदम तिच्यावर असे टोमणे हाणण्याला सुरवात केली, "काय तरी ढालगज ही पोर! असे गुण उधळणें तिला रुचलें; पण सरळ निका लावणें कांहीं रुचलें नाहीं!"

तात्पर्य, नीति हाच तर नूरनिहारचा दोषसा ठरला होता! सारें जग तिला ह्या नाहीं त्या परीनें छळीत होतें, तें ह्यासाठींच. ऐहिक सुखवैभवाचा मार्ग तिला जो कायमचा बंद झाला होता, तो तिनें स्वखुषीनें बंद करून घेतला होता; पण तिला तशा स्थितींत मानानें जगतां येणेंही अशक्य होऊन बसलें होतें. नानापरींच्या विटंबना तिच्या हात धुऊन पाठीला लागल्या होत्या, याला कारण तिचा हा स्वभाव होय. ह्या अनन्यसामान्य सदाचारप्रियतेमुळेंच प्रतिकूल परिस्थितीशीं झगडतां झगडतां आजकाल सीता-सावित्रीसारख्या पतिव्रतांच्या तोडीचें तिचें आचरण उच्च असतांही, महाराजांच्या एका यःकश्चित् रखेलीची थुंकी झेलण्याचें तिच्या कपाळी आलें होतें! लक्ष्मी बाजिरावाच्या हितासाठीं झटत होती ती बाजिरावाच्या रूपावर व पराक्रमांवर मोहित होऊन झटत होती, व नूरनिहारचें तिला त्या कामीं साह्य होत होतें त्याबद्दल 'ही दासी आपली नोकरी यथायोग्य बजावते' यापेक्षां तिच्या मनांत नूरनिहारविषयीं आदर नव्हता. पण नूरनिहार जी तेव्हां रात्रीं बेरात्रीं जिवाचीदेखील पर्वा न करतां वणवण हिंडत होती, ती केवळ आपल्या धनिणीकडून आपणाला उत्तम सेवेबद्दल शिफारसपत्र मिळावें म्हणून नव्हे; तिला बाजिरावाविषयीं आदर वाटत होता, त्याचें कल्याण व्हावें अशी तिची इच्छा होती, व लक्ष्मीची इच्छा तिच्या इच्छेशीं जुळली, म्हणूनच ती लक्ष्मीचा उजवा हात बनून वावरत होती. बाजिरावाच्या ठायीं तिची जी भक्ति होती, ती

स्वार्थी किंवा लक्ष्मीप्रमाणें वैषयिक नव्हती. बरें; बाळाजी विश्वनाथांच्या पश्चात् बाजिरावाला पेशवाईचीं वस्त्रें मिळण्यांत मराठशाहीचें कल्याण आहे, कीं सर्व राजसत्ता एकट्या श्रीपतराव प्रतिनिधीच्या हातीं एकात्रित होण्यांत मराठशाहीचें कल्याण साधावयाचें आहे, याचा राजकारणाच्या दृष्टीनें सारासार विचार करण्याइतकी पात्रताही तिच्या ठायीं नव्हती. ती एक अशिक्षित व सर्वस्वी परित्यक्ता अशी तरुण खेडवळ विधवा होती. तिला राजकारण–समाजकारण–धर्मकारण असे उच्चतम विचार कोठून सुचावयाला ! तिची ही बाजिरावाच्या ठायींची भक्ति अगदीं साधी व सामान्य होती. पिलाजी हा तिच्या अब्रूचें रक्षण करण्यासाठीं मनोभावानें तळमळणारा तिचा पाठिराखा धर्मबंधु होता व त्याच्यावर बाळाजी विश्वनाथ, बाजीराव वगैरे मंडळींचें अतोनात प्रेम होतें, त्यांच्याच कृपाछत्राखालीं पिलाजीचा सर्वतोपरी उत्कर्ष होत होता, म्हणून नूरनिहार त्यांची भिंधी होती. तिला त्या भिंधेपणांत पिलाजीच्या कल्याणाशिवाय आणखी कांहीं स्वार्थ साधावयाचा नव्हता. हा तिचा भलेपणा अर्थातच कोणाच्या डोळ्यांत भरण्यासारखा नव्हता. मग बाजिरावाला किंवा आणखी कोणाला तिचें महत्त्व कसें आणि कां वाटावें !

* * *

नूरनिहार रहमानला बरोबर घेऊन किल्ल्यावरून बाहेर पडली ती प्रथम बाजिरावाकडे गेली, व तेथून लगेच पिलाजीच्या घराकडे वळली. ती तेथें येऊन पोंचतांच कमळेला पराकाष्ठेचा आनंद झाला. कारण नूरनिहार व रहमान ह्या दोघांनीं पिलाजीचें कुशलवृत्त आणलें होतें. तें ऐकतांच कमळेला व गौतमा, जिवाई ह्या दोघींनाही समाधान वाटणें साहजिक होतें. त्यानंतर नूरनिहार लगेच राजवाड्यांत यावयाला निघाली, तेव्हां तिनें कमळा व गौतमा यांना अबुबकरविषयीं सावधगिरीची सूचना दिली. कमळा व गौतमा ह्या दोघींनाही ती सूचना पटली; पण तिची फारशी फिकीर मात्र वाटली नाहीं. कारण थोड्या वेळापूर्वी त्या दोघींनीं यमाजी व गमाजी यांना चांगलाच हात दाखविला होता, व त्यामुळें त्यांना मदोन्मत्त पुरुषांशीं झगडण्याच्या कामीं बराच आत्मविश्वास वाटूं लागला होता. म्हातारी जिवाई मात्र 'अबुबकर दारू पिऊन इकडे दंगा करण्याच्या इराद्यानें येण्याचा संभव आहे' असें ऐकतांच घाबरून गेली. इतकेंच काय; पण भोजराज पिलाजीच्या चौकशीसाठीं बाहेर गेला होता, तो एकदां कसा सुरक्षितपणें घरीं येतो अशी एक नवी चिंता तिला अबुबकरविषयींची बातमी ऐकून वाटूं लागली. ती

उलट नूरनिहारला, ती तेवढ्या अपरात्रीं माघारी जाऊं लागलेली पाहून म्हणाली, " बाई ! तूंदेखील आतां जाऊं नकोस; इथेंच झोंप. तूं सांगतेस तो मेला अबुबकर का कोण तो तुझ्या देखील पाइटावर टपलेला आहे म्हणतेस ना ? "

" हो ! पण—" नूरनिहार अडखळत म्हणाली.

असें होय नाहीं चाललें होतें, तोंच म्हातारी ज्या संकटाला भीत होती, व ज्या संकटाची आगाऊ जाणीव देण्यासाठीं नूरनिहार तेथें आली होती, तें संकट त्यांच्यासमोर मूर्तिमंत उभें राहिलें. प्रथम कोणी पांच सहा माणूस घराच्या पडवीपर्यंत आले तेव्हां त्यांनीं हातांतील मशाल मालविली असल्यानें त्यांचे चेहेरे कोणालाच दिसले नाहींत. पण रहमान व नूरनिहार ह्या दोघांनींही त्या लोकांच्या कुजबुजीवरून तेव्हांच ओळखलें कीं, ही अबुबकरची टोळधाड ! लगेच नूरनिहारनें रहमानला सावधपणें दरवाजांत उभें राहून अबुबकर व त्याचे साथीदार कदाचित् घरांत घुसण्याचा अट्टहास घेऊन बसले तर त्यांचा प्रतिकार करण्याला सांगितलें व कमळा आणि गौतमा यांना हळूच सूचना दिली, " बाई ! आपण मागच्या दरवाजानें गुपचुप एखाद्या शेजारच्या घरीं जाऊं."

" अग ! पण त्यांत इतकें भ्यायचें कारण काय ? " गौतमा म्हणाली, " बाहेर एवढे कोण आले आहेत तें तर सांगशील कीं नाहीं !"

नूरनिहार त्या दोघींना हळूच म्हणाली, " सांगितलें ना, आमचे दुस्मान आमचें समूळ वाटोळें करण्यासाठीं डोळ्यांत तेल घालून टपून बसलेले सैतान—किल्ल्यावरचा देवडीवाला अबुबकर व त्याचे साथीदार गुंड बाहेर आले आहेत. पळा, पळा लौकर. ते शुद्ध नरपशु आहेत. तशांत आज चिडलेले आहेत. ते काय करतील व काय नाहीं याचा कांहीं नेम नाहीं. ते आमच्या पाठलागावर येणार अशी माझी कल्पना होती, तिच खरी ठरली. पळा, पळा लौकर."

नूरनिहारच्या ह्या सावधगिरीच्या सूचनेचा कमळा व गौतमा यांच्यावर नाहीं म्हणावयाला थोडासा परिणाम झाला, तो त्यांना चिडविण्यापुरता झाला; रडविण्यापुरता झाला नाहीं. पण क्षणभर—फक्त क्षणभरच त्या दोघींनीं विचार केला कीं, आतां कसें करावयाचें ? एथून पळून जावयाचें कीं शत्रूला तोंड द्यावयाचें ? गौतमेचें मत पडलें कीं 'पळून कांहीं जावयाचें नाहीं; आमचें संरक्षण करण्याचें सामर्थ्य आमच्या अंगीं आहे.' कमळेलाही तो विचार पसंत पडला. पण थोड्या वेळापूर्वीं यमाजी व गमाजी यांसमोर त्यांच्या हातीं शस्त्र नसल्यामुळें त्या दुबळ्या ठरल्या होत्या, त्या

प्रसंगाची गौतमेला आठवण देऊन तिनें प्रथम घाईघाईनें घरांतून दोन तरवारी व एक भाला अशीं तीन हत्यारें हुडकून काढलीं. त्यांतली एक तरवार स्वतःच्या हातीं घेतली, दुसरी गौतमेला दिली व भाला नूरनिहारला दिला.

कमळा व गौतमा तेथून निघून जाण्याला तयार नाहींत असें पाहातांच नूरनिहार वैतागून म्हणाली, “ तुम्ही मीं सांगितल्याप्रमाणें पळून जात नाहीं ना ? मग तुमचें नशीब तुमच्याबरोबर.”

“ अग नूर ! तूं इतकी घाबरतेस कां ? आपण भ्यालों असें शत्रूंनीं पाहिलें तर त्यांना जास्त स्फुरण चढायचें नाहीं का ? ” गौतमा म्हणाली.

“ म्हणतात ना, त्यांतली अवस्था; भित्यापाठीं ब्रह्मराक्षस ! ” कमळा म्हणाली.

नूरनिहारला त्या दोघींचा जितका राग आला, त्यापेक्षांही त्यांच्या धीराचें तिला जास्त कौतुक वाटलें. त्याबरोबर तिला तिच्या डोक्यावरचा त्या दोघींच्या रक्षणाच्या जबाबदारीचा भारही बराच हलका झाल्यासारखा वाटला. स्वतःची अब्रू व स्वतःचा जीव धोक्यांत घालून त्या दोघींचें रक्षण करण्याची तिच्या मनाची तयारी होती; पण हें सत्कार्य करण्यांत आपणाला एकटीला आत्मयज्ञ करावा लागेल कीं काय अशी तिला चिंता वाटत होती. पण त्या दोघी आपल्या खांद्याला खांदा भिडवून लढण्याला तयार आहेत असें कळतांच तिला जास्त धीर आला व जास्त आनंद झाला. ती त्या दोघींनाही म्हणाली, “ इतकी तुमच्या मनाची तयारी असेल, तर फारच छान ! ”

इकडे हा प्रकार चालला आहे, तों बाहेर रहमानचें त्या मंडळीशीं काय बोलणें चाललें आहे, हें ऐकण्यासाठीं नूरनिहार पुढील दरवाजापाशीं आली व कानोसा घेत उभी राहिली. तें प्रकरण बरेंच हातघाईवर आलेलें तिला दिसलें. तेवढ्यांत कमळा व गौतमाही दरवाजापाशीं येऊन बाहेर काय चाललें आहे हें कान देऊन ऐकूं लागल्या. बाहेर रहमान दरवाजा अडवून उभा होता व अबुबकर त्याला दरवाजांतून दूर होण्यासाठीं मोठमोठ्यानें दरडावून सांगत होता. दरवाजा न सोडल्यास त्याला तेथल्या तेथें ठार करण्याच्या धमक्याही मधून तो मधून देत होता. आतां कसें होणार ! आपण रहमानच्या मदतीला धावून जावें कीं काय असा नूरनिहारला प्रश्न पडला. इतक्यांत म्हातार्‍या जिवाईनें तेथें धांवत येऊन प्रथम दरवाजाला कडी लावली. तिच्या मुर्वतीखातर म्हणून नूरनिहारला बाहेर रहमानच्या मदतीला जाण्याचा विचार निदान त्या क्षणापुरता तरी आटोक्यांत घ्यावा लागला.

" बोल. तुझ्याबरोबर नूरनिहार आली ना ? " अबुबकरनें रहमानला विचारलें.

" हो ! आली. मग ? " रहमाननें फेर सवाल केला.

" ती कुठें आहे ?"

" तिच्याशीं तुला काय करावयाचें आहे ? "

" तिच्याशीं मला निका लावावयाचा आहे. तूं मुकाट्यानें तिचा पत्ता सांगतोस कीं नाहीं ? तसाच तो थेरडा भोजराज कोठें आहे तें सांग."

इतक्यांत अबुबकरचा एक साथीदार म्हणाला, " ह्याच घरांत ती दडून बसली असली पाहिजे. रहमान ! दरवाजा बऱ्या बोलानें सोड."

रहमान व नूरनिहार यांना अबुबकर पिलाजीच्या बायकापोरांवर सूड घेण्याचा प्रयत्न करील एवढें ऐकून माहीत होतें; पण त्याबरोबरच तो भोजराजाच्या जिवावर कां उठावा याची मात्र त्यांना दुग्धा पडली. भोजराजानें किल्ल्याच्या दरवाजापाशीं अबुबकरच्या केळी तोडल्या होत्या हें त्या दोघांना काय माहीत ! त्यामुळें अबुबकरच्या तोंडून भोजराजाचें नांव निघतांच त्यांना चमत्कार वाटला. गौतमा व जिवाई यांनाही ते शब्द ऐकूं गेले, तेव्हां त्यांच्याही अंतःकरणांत कमालीची कालवाकालव सुरू झाली. कमळेलाही खेद वाटला कीं, भोजराज मुद्दाम इतक्या अपरात्रीं आपल्या पतीच्या शोधार्थ गेला; त्याच्यावर तिकडे हें काय कुभांड रचिलें गेलें ! इतका वेळ त्या सर्वांनाच भोजराज अजून कसा आला नाहीं याची चिंता लागून राहिली होती, ती आतां दुणावली. म्हातारी जिवाई इतका वेळ जी नुस्ती 'आतां कसें करावें' असा खेद करीत होती, ती आतां मनांतल्या मनांत पश्चात्ताप पावून गौतमेला हळूच म्हणाली, " सुनबाई ! आपण उगाच दादाला पिलाजीच्या शोधाला लावून दिलें. ही नसती घोरपड त्यामुळें आपल्या गळ्यांत पडली."

गौतमा ही जिवाईची सूनच खरी; पण त्या सास्वासुनांच्या स्वभावांत महदंतर होतें. जिवाई ही नुसती वीरमाता होती; पण गौतमा ही वीरकन्या, वीरपत्नी व स्वतः वीरांगना होती. सासूचे अंगचुकारूपणाचे बोल तिला मुळींच रुचले नाहींत. तिनें सासूचा अपमान होऊं नये अशा सौम्य भाषेंत त्या बोलाबद्दल नापसंती व्यक्त केली, " सासूबाई ! पिलाजी झाला तरी आपलाच नव्हे का ? प्रसंग कोणावर कधीं कसा येईल याचा नेम थोडाच असतो ! आम्ही जिव्हाळ्याच्या माणसांनीं एकमेकांना प्रसंगीं उपयोगी पडायला हवें."

कमळा जवळच उभी राहून सारें ऐकत होती. जिवाईचे स्वार्थी बोल तिला रुचले नाहींत; पण ते तिनें नुसते मनांत ठेवले व 'जग हें असें आहे! चालायचेंच' असा स्वतःच्या मनाचा विरंगुळा केला. जिवाईच्या शब्दांनीं तिच्या अंतःकरणाला जखम झाली; पण गौतमेच्या कैवाराच्या बोलांनीं ती भरून निघाली. जिवाईलाही लगेच वाटलें असावें कीं, आपण बोललों हें बरें केलें नाहीं. त्यामुळें ती गौतमेच्या शब्दांवर कांहीं उलट बोलली नाहीं. नूरनिहारचें मात्र त्यांच्या त्या बोलण्याकडे लक्ष नव्हतें. अबुबकरनें रहमानपाशीं तिची प्रथम चौकशी केली व तिच्याविषयीं असभ्यपणाचे शब्द उच्चारले; ते ऐकून तिच्या सर्वांगाचा तिळपापड झाला होता. किंबहुना आपण पिलाजीविषयीं इतकी कळकळ दाखविली, त्यावरून पिलाजीवर आपण आषक आहों असा अर्थ घेऊन अबुबकर चिडला असावा व त्या भरांत तो एथवर चालून आला असावा असाही तिनें तर्क केला. तिला तेव्हां अबुबकरच्या पाशवी प्रयत्नांचें भय तर वाटलेंच; पण त्याबरोबरच आपला आणि पिलाजीचा ऋणानुबंधाचा स्नेह असल्यामुळें कमळा वगैरे मंडळींवर हा प्रसंग गुदरला आहे, त्या अर्थीं त्या प्रसंगांतून त्या मंडळींच्या रक्षणासाठीं आपणाला काया-वाचा-मनानें झटलें पाहिजे असा तिचा निर्धार झाला.

इकडे आंत हा प्रकार चालला होता तेव्हां बाहेरही रहमान व अबुबकर यांची खडाजंगी सुरूच होती. अबुबकरनें भोजराजाची गोष्ट काढतांच रहमाननें त्याला सांगितलें, "भोजराज घरांत नाहीं."

अबुबकरला तें खरें वाटेना. तो म्हणाला, "नाहीं कसा? आहे. तो किल्ल्यापुढून जो पळाला तो भागूबाईसारखा घरांत लपून बसला आहे. त्याला पकडून आणण्यासाठीं आम्हांला किल्लेदारसाहेबांचा हुकूम झाला आहे. तूं मुकाट्यानें दरवाजा सोड."

रहमान पूर्ववत् निश्चयपूर्वक उद्गारला, "भोजराज आंत नाहीं; मी अल्लाची कसम खाऊन सांगतों."

"पण तूं दरवाजा अडवून कां उभा रहातोस?" अबुबकरनें विचारलें.

"तो तुझा प्रश्न नाहीं." रहमान उत्तरला.

"तो माझा प्रश्न नाहीं! हरामखोरा!" अबुबकर आपल्या हातांतील तरवार उगारीत म्हणाला, "मी किल्लेदाराच्या हुकुमाची तामिली करीत असतां तूं मला अडथळा करतोस?"

तरवारीचे हात अबुबकरलाच माहीत होते असें नाहीं, ते रहमानलाही माहीत होते. शिवाय रहमान कुस्त्यांच्या डावांतही पटाईत होता. त्यानें मोठ्या चपळाईनें अबुबकरचा अवसानलेला हात आपल्या डाव्या हातानें मनगटापाशीं पकडून असा जोरानें पिरगळला कीं, ऊंस पिळून रस निघावा त्याप्रमाणें त्यांतून रक्त पिळून निघतें कीं काय असा भास होण्याइतक्या दारुण वेदना अबुबकरला झाल्या. त्याचा हात खिळखिळा झाला व त्यांतून तरवार गळून पडली. रहमाननें तीच तरवार उचलून घेतली व तो पविन्यावर उभा राहून म्हणाला, "अबुबकर! तुला सांगून ठेवतों, नूरशीं जर तूं इथें तंटाफिसाद करशील तर तें मला खपावयाचें नाहीं."

"बरोबर! तुला तें कसें खपेल! तिचा एक दोस्त तिकडे मृत्युशय्येवर पडला, तेवढीच संधि साधून तूं तिला घेऊन इकडे निघून आलास, हें काय मला कळत नाहीं?" अबुबकर मुद्दाम उपहासपूर्वक दांत विचकीत म्हणाला.

"अबुबकर! हं! पुन्हा सांगतों, जरा तोंड आटोपून बोल." रहमान म्हणाला.

"त्यांत काय मोठेंसें! आटोक्याच्या बाहेर जाऊन गांवावर मोकळ्या सुटलेल्या मुलुखमैदानीच्या बाबतींत बोलतांना तोंड कोणीं काय म्हणून आटोपावें! तिला धिंगाणे घालावयाला जशा दहा दिशा मोकळ्या आहेत, तशींच जगालाही बोलावयाला दहा तोंडें आहेत."

"अशानें तुझें एकच काय पण दहा थोबाडें असलीं तरी तीं देखील रंगतील."

"दहा थोबाडें रंगविणाराचें काय थोबाड लागून गेलें आहे तें दिसतेंच आहे! तूं मुकाट्यानें दरवाजा सोडतोस कीं नाहीं?"

"नाहीं. माझा प्राण गेला तरी मी दरवाजा सोडणार नाहीं."

"दरवाजा सोडणार नाहीं तर मी मुद्दाम सोडावयाला लावणार!" असें म्हणून अबुबकरानें आपल्या साथीदारांना सूचना केली, "ह्या बेवकूब माणसाचा मुड्दा पाडा व दरवाजा फोडून आंत घुसा."

"आणि मग?" त्या साथीदारांपैकीं एकानें विचारलें.

"मग काय? ह्या घराची झडती घ्यावयाची. ह्या घरांतील दरोबस्त माणसें आपले कैदी आहेत." अबुबकर म्हणाला.

"असें कोण म्हणतो?" रहमाननें विचारलें.

"असें मी म्हणतों." अबुबकर उत्तरला.

अबुबकरची ही मनीषा ऐकून घरांतील मंडळीच्या मनांत त्या प्रसंगीच्या त्या अनर्थाविषयीं चक्क प्रकाश पडला. नूरनिहार, कमळा व गौतमा ह्या तिघींचीही बालंबाल खात्री होऊन चुकली कीं, अशा वेळीं मनाचा हिय्या करून पुढें न जाणें म्हणजे चोहों बाजूंनीं पेटलेल्या जाळांत स्वतःला कोंडून घेऊन जळून मरणें होय. नूरनिहार म्हणाली, “ गौतमे ! मरण हें वांटयाला आलेंच आहे; तें कांहीं केल्या टळत नाहीं. मग निर्वाणाची धडपड तरी आपण कां करून पाहूं नये ! ”

हा उपाय त्या तिघींनाही पटला. पण म्हातारीला मात्र तो पटेना. ती त्या तिघीही तरुण मुलींना हात जोडजोडून विनवूं लागली, “ पोरींनो ! असला अविचार कांहीं करूं नका. बाहेर जाल तर हकनाहक मराल. ते मेले चिडले तर तुमच्या मानांवर तरवारीचे घाव घालायलादेखील कमी करायचे नाहींत.”

गौतमा म्हणाली, “ सासूबाई ! नाहीं तरी तें कुठें चुकणार आहे ? ”

“ चुकणार नाहीं खरें; पण पाहिजे तर मी बाहेर जाऊन त्यांच्या हातांपायां पडून त्यांची समजूत घालून पहात्यें.तोंवर तुम्हीं मागच्या दरवाजानें पळतां आलें तर पहा.”

म्हातारीच्या बोलण्यांत कांहींच अर्थ नव्हता असें मात्र नाहीं. आपल्या सांगण्या-नें म्हणजे ते मानवी पशु अत्याचार करावयाचा आपला बेत रहित करतील अशी म्हातारीला मुळींच आशा व खात्री नव्हती. पण तिचा त्यांत निराळाच उद्देश होता. तो सकृद्दर्शनीं कमळा, गौतमा व नूरनिहार यांच्या ध्यानीं आला नाहीं; त्यामुळें त्यांना म्हातारीचा उपदेश पटेना. अखेर म्हातारीला आपला हेतु विशद करावा लागला, “ पोरींनो ! म्हातारीं माणसें सांगतात त्यांत कांहीं अर्थ असतो. ‘ता’ म्हटल्यावर ‘ताक भात’ म्हणून ज्यांना कळत नाहीं, तीं माणसें कसलीं ? मी बाहेर जाऊन कांहीं ना कांहीं गोष्टी सांगून त्या चांडाळांना थोडा वेळ थोपवून धरतें, तोंवर तुम्ही तिघीही सटवाजीला घेऊन मागच्या दारानें पळ काढा कशा ! ”

म्हातारीच्या ह्या युक्तिवादांत खूपच अर्थ सांठवलेला होता, व तो त्या तिघी मुलींना बहुतांशीं पटलाही. त्याप्रमाणें कमळा चपळाई करून मागील दाराची कडी काढावयाला गेली व म्हातारी आपला शिष्टाईचा विचार पार पाडण्यासाठीं पुढील दरवाजा उघडण्याला पुढें सरली. पण काय ! दोघींचेही प्रयत्न निष्फळ ठरले ! मागलि दरवाजा बाहेरून बंद !

“ शत्रूंनीं आपला कोंडमारा केला ! ” कमळा स्वतःशीं पुटपुटली.

“ कडी काढा ! कडी काढा ! ” म्हातारी आंतून मोठ्यानें ओरडली.

" काय ग कमळे ! दरवाजा उघडत नाहीं का ? " गौतमेनें चार पावलें मागें जाऊन विचारलें.

गौतमेच्या ह्या प्रश्नाचें उत्तर देण्याइतका अवसर कमळेला मिळण्यापूर्वींच आंत व बाहेर चाललेल्या गलबल्यामुळें सटवाजी जागा होऊन मोठमोठ्यानें रडूं लागला. अर्थात् त्याला समजावणें हें कमळेचें पहिलें काम होतें.

नूरनिहार दरवाजांतच आंतील बाजूला उभी होती. ती बाहेर अबुबकर व रहमान यांची भांडाभांडी चाललेली ऐकत होती, तरीही तिचे चौकस कान गौतमा व कमळा यांचें संभाषण ऐकत होतेच.

इकडे कमळेनें सटवाजीला पदराखालीं घ्यावयाला, नूरनिहारची दृष्टि त्या मायलेंकरांकडे वळावयाला व बाहेरील झगडा एकदम 'मारा--तोडा' या निकरावर यावयाला एक गांठ पडली. म्हातारी मोठमोठ्यानें दरवाजा ठोठावीत होतीच. पण तिला कोण दाद देतो ! आपल्या मुली तरी निसटल्या कीं नाहींत म्हणून तिनें मागें वळून पाहिलें, तों तिघीही जागच्या जागींच तटस्थ !

" अग चांडाळणींनो ! मीं तुम्हांला काय सांगितलें ? " म्हातारीनें वैतागून दांतओंठ खात विचारलें. तिच्या त्या मेघगर्जनेनें कमळा, गौतमा व नूरनिहार ह्या तिघींच्याही कानटाळ्या बसून गेल्या. लहानगा सटवाजी कमळेच्या पदराच्या आडवशाला झोपला होता, तोही दचकून रडूं लागला.

बाहेर अबुबकर आपल्या साथीदारांसह रहमानवर तुटून पडत असल्याचें नूरनिहारला त्यांच्या दंगलीवरून कळून चुकलें होतें. तिनें अबुबकरचे अखेरचे निकराचे शब्द ऐकले, ' सर्वांनीं ह्या बदमाषावर तुटून पडून त्याचे राईराईएवढे तुकडे करा व दरवाजा उघडून आंत घुसा."

नूरनिहारला आतां मात्र खास वाटलें कीं, रहमान तर या लांडग्यांच्या झडपेतून वांचत नाहींच; पण त्यानें चिडविल्यामुळें ते सारे चिडून दरवाजा उघडून अथवा फोडून आंत घुसल्यावर त्यांच्यापुढें आपणांपैकीं देखील कोणाचीं धडगत नाहीं. त्या उद्विग्नतेच्या भरांत नूरनिहार रहमानच्या मदतीला जाण्यासाठीं म्हणून दरवाजापर्यंत गेली व दरवाजा उघडण्याची शिकस्त करूं लागली. म्हातारीची त्यांतच घाई! तिला वाटलें कीं, नूरनिहार खुळ्यासारखी बाहेर भडकलेला वणवा आंत ओढून घेण्याचा प्रयत्न करीत आहे. ती नूरनिहारला बळेंच मागें ओढीत म्हणाली, " पोरी ! तुझें डोकें का फिरलें आहे ? "

" आजीबाई ! असें काय ? " नूरनिहार म्हातारीच्या हाताला जोराचा हिसडा देऊन तिला दूर लोटीत म्हणाली, " बाहेर रहमानचा मुडदा पडण्याची वेळ आली आहे, त्याचें रक्षण मला प्रथम केलें पाहिजे. चला, व्हा बाजूला ! "

नूरनिहारच्या हिसड्यासरशीं म्हातारी कोलमडून खालींच पडावयाची; पण खांबाचा आधार सांपडला म्हणून ती सांवरली. तिला नूरनिहारची ही लुडबुड मुळींच आवडली नाहीं. इतकेंच काय; पण संशयाच्या भरांत ती स्वतःशीं म्हणाली देखील, " रहमान हा नूरनिहारचा जिवलग दोस्त असल्याशिवाय ती उगीच त्याच्या जिवाला इतकी बरी जपेल ? हे दगेबाज गुंड घरांत रिघून आमच्या बायकांच्या अब्रूवर तुटून पडले तरी तिला चालतील; पण रहमानच्या केंसाला धक्का लागलेला मात्र चालणार नाहीं! "

एवढें स्वगत बोलून म्हातारीचें समाधान होईना म्हणून कीं काय, ती उघड म्हणाली, " नूर ! तुला तुझ्या ह्या दोघी वहिणींच्या अब्रूपेक्षां तुझ्या त्या दोस्ताचा जीव अधिक प्यारा वाटतो ना ? "

म्हातारीचा हा वाग्बाण फार तीक्ष्ण होता. शिवाय त्या वाग्बाणाच्या टोंकाला कुत्सित संशयाचें विषारी पाणी दिलें असल्यानें तो नूरनिहारच्या अंतःकरणांत घुसतांच नुसती जिव्हारींची जखम करूनच स्वस्थ बसला नाहीं; त्याच्या टोंकाचें विष नूरनिहारचें अंतःकरण जाळीत सुटलें. तिला वाटलें, ह्या जगांत कोणालाच स्त्री-पुरुषांचें नातें वैषयिक संबंधाशिवाय अन्य निमित्तानें ओळखतां येत नाहीं काय ? प्रत्येक मनुष्य आपल्या मातेच्या पोटीं जन्म घेतो, ती माता स्त्रीच असते. तो जिच्या पाठीला पाठ लावून किंवा जिचा वडील भाऊ शोभून जन्माला येतो, ती त्याची बहीण स्त्रीच असते. असें असतां आपणासारखाच जगांतील प्रत्येक मानवी प्राणि आहे हें जमेला धरून जगांतील इतर स्त्री-पुरुषांच्या संबंधांत त्यानें माता-पिता किंवा बंधु-भगिनी हीं नातीं ध्यानीं कां घेऊं नये ? पण जगांतील दुष्ट प्रवृत्तीचीं माणसें सुष्टतेचे आचार, विचार किंवा उच्चार कोठून आणणार ! कावळ्याला कलिंगडाच्या तुकड्याकडे पाहून देखील त्याच्या लाल रंगावरून तो मांसाचा तुकडा असेल असेंच वाटावयाचें. शेणकिड्यांना जग ही एक भली मोठी शेणाची गार आहे असेंच वाटावयाचें. नीतिभ्रष्ट, पापाचारी व विषयाधीन माणसांची समाजांतील स्त्रीजातीकडे पाहाण्याची दृष्टि हटकून पाशवीच असावयाची. त्यांच्या दृष्टीला माय बहीण अशी दिसावयाचीच नाहीं व माय-बहिणींच्या

निर्मल प्रेमाची थोरवी त्यांना कळावयाचीही नाहीं. पण म्हातारी कांहीं तशी नव्हती. पहिली गोष्ट ती स्त्री होती, व दुसरें, आपला हेवादावा करण्याचें तिला कांहीं कारण नाहीं, हें नूरनिहारला माहीत होतें. असें असतां त्या म्हातारीनें देखील आपणाला अशीं नांवें ठेवावीं, हें पाहून 'जग हें असेंच' ह्या गोष्टीची सत्यता नूरनिहारच्या मनाला पुन्हा एकवार पटली. ती म्हातारी अप्रत्यक्षपणें नूरनिहारच्या ओळखीदेखीची व संबंधाची होती म्हणून ! नाहींपेक्षां नूरनिहार या वेळीं तिच्यावर इतकी चिडली होती कीं, तिच्या तिनें झिंज्याच उपटल्या असत्या. पण इथें तिचा नाइलाज होता. तरीही तिनें म्हातारीला न जुमानतां दरवाजा उघडण्याला हात घातलाच.

पण काय ! दरवाजा बाहेरून बंद ! जसा मागील बंद तसाच पुढीलही बंद ! नूरनिहारनें ओळखलें कीं, शत्रूला आंत येण्याला सोपें जाऊं नये म्हणून रहमाननें पुढील दरवाजाला बाहेरून कडी लावली असावी. तो आणीबाणीचा प्रसंग ओळखून ती आंतून मोठ्यानें ओरडली, " रहमान ! तूं दरवाजा सोड. त्यांना पाहिजे तो म्हातारा आंत नाहीं, याविषयीं त्यांना आपली खात्री करून घेऊं दे. उगाच संशय कशाला हवा ! "

म्हातारी तेवढ्यांत आंतूनच ओरडली, " रहमान ! दरवाजा उघडूं नकोस."

नूरनिहारनें म्हातारीची समजूत घातली, " आजीबाई ! तुम्हांला भिण्याचें कांहीं कारण नाहीं. तीं तरी आमचींच माणसें आहेत. तुमच्या भावानें त्यांचा गुन्हा केला असेल, पण तो कांहीं इथें नाहीं, व आपण बाकीच्यांनीं त्यांचा कांहींच गुन्हा केलेला नाहीं. ते एकदां दरवाजा उघडून संशय फेडून घेईनात परते !"

इतकें होतें तों रहमानचा पाडाव होऊन पुढचा दरवाजा धाडकन् उघडला गेला, व अबुबकर एखाद्या त्रिभुवनविजयी वीरासारखा आंत घुसला. मात्र दरवाजा उघडला गेला तो नूरनिहारच्या शब्दाला मान देऊन रहमान बाजूला सरला म्हणून उघडला गेला किंवा म्हातारीनें दरवाजा उघडण्यास विरोध केला नाहीं, तो तिचा अबुबकरच्या चांगुलपणावर विश्वास बसल्यामुळें केला नाहीं, असेंही नाहीं. नूरनिहारनें दरवाजा उघडण्याला सांगितल्यावर तें ऐकण्याला रहमान जर दरवाजांत शाबूत उभा असता, तर त्यानें कदाचित् नूरनिहारची सूचना अमान्य करूनही दरवाजा लढविला असता. पण नूरनिहारच्या सूचनेचा अर्थ इतक्या सुलभतेनें ध्यानीं येण्याइतका रहमान चतुर नव्हता. तो प्रामाणिक होता व नूरनिहारच्या

रक्षणासाठीं तिच्या पाठीराख्या भावाच्या नात्यानें झटण्यांत मरण येतें तरी तें त्यानें आनंदानें मान्य केलें असतें. या वेळींही तो आपल्या प्रेमळ व प्रामाणिक स्वभावाला अनुसरून नूरनिहारच्या रक्षणासाठीं मेला असता तरी चतुराईनें तिच्या बोलण्यांतील आशय त्याला ओळखतां आला नसता. पण या वेळीं त्याचा नाइलाज झाला. अबुबकर व त्याचे साथीदार यांनीं त्याच्यावर एकदम हल्ला केला, व त्याला ओढून बाजूला सारून दरवाजा उघडला. अबुबकरच्या मनांतून तर रहमानला तेथल्या तेथें ठारच करावयाचें होतें. पण आतांच त्याला रहमानच्या पोलादी पंज्याचा प्रभाव कळला असल्यामुळें त्याचा उजवा हात इतका दुबळा झाला होता कीं, तो जाग्यावर आहे कीं नाहीं असें त्याला होऊन गेलें होतें.

पण एकदां घरांत घुसतां येतांच अबुबकर व त्याचे साथीदार यांचा नूर एकदम पालटला. त्यांना वाटूं लागलें कीं, आपण लढत जिंकली. त्या विजयमदानें धुंदावलेल्या डोळ्यांनीं अबुबकर नूरनिहारकडे रोखून पाहूं लागला. पण ती तिकडे लक्ष न देतां प्रथम रहमानची काय दशा झाली आहे तें पाहण्यासाठीं बाहेर निघाली. त्याबरोबर अबुबकरनें शूद्रकाच्या मृच्छकटिकांतील शकाराची पुनरावृत्ति केली. तो दोन्ही हातांनीं दरवाजा अडवीत दरडावून तिला म्हणाला, " हं ! कुठें चाललीस ? "

" दरवाजा सोड ! " नूरनिहार आधींच संतप्त झाली होती, त्यांत ह्या अडवणुकीनें आणखी संतापून म्हणाली.

" कां ? बाहेर आहे तो तुझा कोण ? "

" माझा पाठीराखा भाऊ व तुझा काळ—"

" हं मगरूर लवंडी ! —" एवढे शब्द अबुबकरच्या तोंडून निघतात न निघतात तोंच त्याला न कळत रहमान आपल्या अंगचें सारें अवसान एकत्र करून उठून उभा राहिला. परमेश्वराच्या कृपेनें व नूरनिहार, कमळा आणि गौतमा यांच्या थोर नशिबानें रहमानला म्हणण्याजोगी इजा झाली नव्हती. तो जो दांतओंठ खात उठला, तो प्रथम एखादें शस्त्र किंवा लाठी-काठी हातीं लागली तर पहावी म्हणून चौकस दृष्टीनें सभोंवार पाहूं लागला. अबुबकर व त्याचे साथीदार औट पळांचा विजय व औटपळांचा आवेश यांनीं इतके शेफारून गेले होते कीं, आपल्यामागें आपला काळ आपलें कंबरडें मोडण्यासाठीं येत आहे याची त्यांना दादच नव्हती. अबुबकर तर इतका मदांध झाला होता कीं, पाठीमागें काय चाललें आहे हें

दिसण्याची बाब दूरच राहिली, गौतमा व कमळा आपापलीं शस्त्रें पाठीमागें लपवून त्याच्या डोळ्यासमोर उभ्या होत्या तेंही त्याला दिसेना.

नूरनिहार मात्र चौकस दृष्टीनें सभोंवार पहात होती. बाहेर रहमान उठून उभा राहिला व कमळा आणि गौतमादेखील सावध आहेत असें पहातांच तिला जास्त धीर आला. ती अबुबकरच्या तोंडची ' लवंडी ' ही शिवी ऐकतांच सर्पिणीसारखी फूत्कारली, " हं ! अबुबकर ! इथें तंटाफिसाद करण्याचें कारण नाहीं. "

" खबरदार ! तुलाही बाहेर जाण्याचें कारण नाहीं." अबुबकर किंचित् मावळत्या अवसानानें म्हणाला.

नूरनिहार पूर्ववत् कडर्या आवाजांत म्हणाली, " मी बाहेर जाणार. मला अडविणारा तूं कोण ?"

" आणि तूं तरी त्या दोघां बदमाषांची कोण ? त्यांच्याशीं तुझा निक्का लागला आहे कीं काय ? " अबुबकरनें विचारलें.

नूरनिहारला पाहून अबुबकर देहभानदेखील विसरून जाऊं लागला असें पाहून त्याच्या साथीदारांपैकीं एकानें त्याला सावधगिरीची सूचना दिली, " अबुबकर ! आपणाला प्रथम भोजराजाचा तपास करावयाचा आहे."

" भोजराज इथें आलेला नाहीं." नूरनिहार उत्तरली.

" नाहीं कसा ? तो हरामखोर आंत लपून बसला असला पाहिजे. बायकांच्या मागें लपून बसण्यांत त्या नामर्दाला मोठा मर्दपणा वाटतो काय ? बोल, तो थेरडा कुठें आहे ?"

भोजराजाच्या नांवाचा अबुबकरनें असा अनुदारतेनें उल्लेख केलेला ऐकतांच गौतमा पुढें होऊन उद्गारली, " रानांत सिंह चरावयाला दूर गेला असला म्हणजे कोल्ह्यांच्या कोल्हेकुईला असाच रंग येतो."

" पण सिंह इथें नसला तरी सिंहाची छावी आहे कीं नाहीं ! " अबुबकर गौतमेची टर करण्याच्या इराद्यानें म्हणाला.

गौतमेनें यावर फक्त एकवार अबुबकरकडे भेदक दृष्टीनें पाहिलें. अबुबकरच्या नजरेंतील पाणी तिला विलक्षण विषारी भासलें. तितक्यांत त्यानें आपल्या साथीदाराकडे पाहून फिदिफिदी हंसण्याला सुरवात केलेली पाहतांच तर गौतमेचीच काय पण कमळेचीही खात्री होऊन चुकली कीं, ह्या दुष्मनांच्या थट्टेबाज हास्यांतूनच भावी अत्याचार जन्माला यावयाचा आहे. त्यांचा तो संशय फळाला येण्याला

मुळींच अवधि लागला नाहीं. अबुबकरनें आपल्या साथीदारांना फर्मावलें, " पहातां काय ? तो थेरडा कोठें लपून बसला असेल त्याला हुडकून काढा."

कमळा उत्तरली, " हं ! खबरदार पुढें पाऊल उचलाल तर. हें घर माझें आहे; जाधवांचें हें घर आहे. ह्या घरांत दंगा करण्याचा तुम्हांला मुळींच अधिकार नाहीं."

" ही कोण बोलली ?" अबुबकरनें उपहासपूर्वक विचारलें.

" हें पिलाजीचें पांखरूं! " एक साथीदार त्याच्या कानाशीं लागून उद्गारला.

" अस्सें ! हीच का त्या पोपटाची मैना ? " अबुबकरनें नूरनिहारकडे हलकट-पणानें पहात विचारलें, " हीच का तुझी सवत ? "

नूरनिहारला हा अपमान सहन झाला नाहीं. ती एकदम अबुबकरवर तुटून पडून त्याच्यावर तरवारीचा नेम फेंकीत म्हणाली, " हरामखोरा ! नीचा! तुझ्यासारख्या नराधमाशीं सामोपचाराच्या भाषेंत बोलण्याची सोयच नाहीं. तुझ्याशीं बोलायचें तर याच भाषेंत बोलायचें."

अबुबकरनें मोठया शिताफीनें तो वार आपल्या हातांतील लाठीवर झेलला. त्यामुळें तो स्वतः बचावला व लगेच आपल्या साथीदारांना म्हणाला, " ह्या साऱ्या औरती बदमाष आहेत. त्यांना प्रथम कैद करा व मग त्या म्हातारड्याचा तपास करा."

आतां मात्र खरोखरच आणीबाणीची वेळ आली. कमळा व गौतमा आपापलीं शस्त्रें उपसून पुढें झाल्या. अशी वेळा येणार हें कमळेला अगोदरच तर्कानें कळल्यामुळें कीं काय, तिनें त्या प्रसंगाशीं तोंड देण्याला सोपें जावें म्हणून सटवाजीला अगोदरच एका दुपट्यानें आपल्या पाठीशीं घट्ट बांधलें होतें. ह्या तिन्ही मुली आतां इथें रण माजविणार असें पाहातांच म्हातारीचें मात्र धाबें दणाणून गेलें. आपलें शिष्टाईचें मनोगत ह्या प्रसंगीं सर्वांनाच मानवेल अशा आशेनें ती पुढें होऊन हात जोडून अबुबकरला परोपरीनें विनवूं लागली, " बाबांनो ! उगाच अत्याचार कां करतां ? लढायचें तर मर्दाशीं लढा. ह्या गरीब पोरींनीं तुमचें काय केलें आहे ? "

पण अबुबकरनें म्हातारीला पांच चार शेलक्या शिव्या हांसडून वर एक लाथ मारून तिच्या शिष्टाईची संभावना केली. त्याचे साथीदार कमळा, गौतमा व नूरनिहार ह्या तिघींना कोंडण्यासाठीं पुढें झाले. अबुबकरला आतां भयंकर अवसान चढलें. पण तें अर्थात् तोंडपाटीलकी करण्यापुरतेंच होतें. म्हातारीला अबुबकर-च्या लाथेची ठोकर असह्य होऊन ती विव्हळत कोलमडून खालीं पडली, तेव्हां

गौतमा तिला सांवरण्यासाठीं पुढें झाली. पण तिच्या सासूप्रमाणेंच तिच्याही कपाळीं तोच भोग आला. मात्र ती ताकदवान असल्यामुळें अबुबकरच्या लाथे-सरशी खालीं पडली नाहीं.

अबुबकर दोन लाथांनीं त्या दोघींना लोळवूं शकला, यावरून त्याला विश्वास वाटूं लागला होता कीं, आपली मांडी वज्राची आहे. पण त्याची लाथ गौतमेच्या मस्तकावर प्रहार करून उसंत घेण्यासाठीं मागें सरते न सरते, तोंच रहमाननें मागाहून येऊन आपल्या हातांतील लाठीचा असा एक भरदार तडाखा त्याच्या उजव्या मांडीवर लगावला कीं, त्यामुळें तो तात्काळ भिरभिरी येऊन ओरडत दरवाजांत तोंड-घशीं पडला. आपला म्होरक्या पडला म्हणून बाकीचे साथीदार क्षणभर तिकडे वळून पहातात, तोंच रहमाननें त्यांच्यावरही आपल्या हातांतील लाठीचे सपासप एकामागून एक वार केले. त्यांनींही रहमानवर वार केले. गौतमा व कमळाही त्या साथीदारांवर तुटून पडल्या. म्हातारीची शिष्टाई तेवढ्यांत पुन्हा सुरू झाली, तेव्हां मात्र अबुबकरनें तिला बसल्याबसल्या एक लाठीचा तडाखा अशा जोरानें तिच्या मस्तकांत हाणला कीं, त्या तडाक्यानें तिला मृत्यु प्रत्यक्ष भेटविला नाहीं तरी मृत्युपंथाला लावलें यांत शंका नाहीं. गौतमा व कमळा ह्या आंतून व रहमान दर-वाजांतून, असा अबुबकर व त्याचे साक्षीदार यांच्यावर दुहेरी मारा सुरू झाल्या-बरोबर त्यांत त्या शत्रूंचा टिकाव लागेना. त्यांतल्या त्यांत कमळा मात्र इतर दोघीं-पेक्षां या बाबतींत जास्त अनुभवी व उजवी होती. यापूर्वी तिच्यावर ओढवलेल्या प्रसंगांनीं तिला तेवढ्या लढाऊ अनुभवाची जोड मिळवून दिली होती. तरी देखील ती समोर सामन्यासाठीं चिडून उभे रहाणाऱ्या मर्दांशीं बरोबरी करूं शकली नसती. असें असतांही आजच्या प्रसंगीं प्रतिस्पर्धी वीरांना हात दाखविण्याचें अतुल बल त्या तिघींच्याही अंगीं उत्पन्न झालें. तो वेळेचा महिमा होता. समरांगणावर सामर्थ्य-वान शत्रूंच्या मुंड्या चरचरां चिरणारा वीरदेखील तशा वेळीं तशा परिस्थितींत त्या अबलांसमोर दुबळा झाला असता व कमळा किंवा गौतमा यांच्या ठायीं दुसऱ्या चरित्रवान पण त्यांच्याहून कमी शूर अबला असत्या तरी त्यादेखील विषारी नागिणींसारख्या शत्रूच्या नरडीला डसण्यासाठीं धांवून गेल्या असत्या. पतिव्रतांचा छळ करण्यासाठीं व त्यांची विटंबना करण्यासाठीं पुढें सरसावणारा नष्टकर्मा कितीही शूर असला तरी तशा आणीबाणीच्या वेळीं त्यावर परमेश्वरी अवकृपेची वीज कडाडते व त्या दाहांत त्या नष्टकर्म्यांचें शौर्य-धैर्य दहन होऊं लागतें. कधीं त्याचें पारिपत्य

करण्याचें सामर्थ्य त्या सतींना प्राप्त होतें, तर कधीं त्या सतीच्या हांकेला परमेश्वर धावून येऊन शत्रूचा संहार करतो. रावणानें सीतेची विटंबना करण्याचा प्रयत्न केला, त्याचें शासन रामानें केलेंच ना? दुर्योधन-दुःशासनादि कुकर्म्या कौरवांनीं द्रौपदीला भ्रष्ट करण्याच्या वल्गना केल्या; पण अखेर द्रौपदीच्या पांच पतींना कौरवांचा मोड करण्याचें सामर्थ्य श्रीकृष्णानेंच दिलें ना? एवढा देवांचाही देव इंद्र—ज्यानें अहल्येसारख्या कुलस्त्रियांना नादीं लावून जन्मांतून उठविण्यालाही कमी केलं नाहीं! पण परिणामीं त्याच्यादेखील सर्वांगावर रक्तपिती फुटली; असा स्त्री-जातीच्या पातिव्रत्याचा महिमा अगाध आहे. त्या महिम्याला काळोखी लावण्याची वेळा जेव्हां जेव्हां येते, तेव्हां तेव्हां सत्कार्याचा व सत्कार्यप्रणेत्यांच्या कल्याणाचा भार शिरीं वहाण्यासाठीं पंचमहाभूतें देखील आपले नैसर्गिक गुणधर्म सोडून सत्याचे साह्य-कारी बनतात. रावणाच्या कचाटींतून सीतादेवीची मुक्तता करण्यासाठीं वानरसेना निघाली तेव्हां पाषाणांनीं पाण्यावर तरून त्या सेनेला पायवाट करून दिली! देवकीदेवीनें आपला शेवटचा पुत्र तरी पापात्म्या कंसाच्या हातून वांचावा असें भगवंताला आळविलें आणि वसुदेव बालकृष्णाला घेऊन चालला तेव्हां बंदी-शालेचे दरवाजे सताड मोकळे होऊन यमुनेनें देखील दुभंग होऊन त्या वाटेनें वसुदेवाला चालवीत नेलें! असो.

अबुबकरच्या लाथेनें गौतमा लीन तर झाली नाहींच; पण उलट नागिणीच्या शेपटीवर पाय पडल्यावर नागीण जशी संतप्त होते तशी ती संतापली व आपल्या हातांतील तरवार जोरानें अबुबकरच्या छातींत खुपसीत वीज कडकडावी त्याप्रमाणें ओरडली, "नापाक निमकहराम! मर्दासारखा मर्द होऊन अबलेवर हात टाकतोस? हें घे तुझ्या पापाचें प्रायश्चित!"

गौतमेच्या हातच्या तरवारीनें अबुबकरच्या काळजाचा ठाव घेतला. त्याच्या छाता-डांतून रक्ताचा प्रवाह सुरू होऊन सर्वांग—अंगाखालची जमीन देखील लालच लाल होऊन गेली. तो विव्हळत विव्हळत आपल्या इतर साथीदारांना म्हणाला, "पकडा! पकडा! ह्या खुनी जाखिणींना पकडून बांधून किल्लेदारासमोर घेऊन चला. मी तर आतां मरतोंच; पण...या अल्ला! या खुदा!"

"मेल्या नीचा! आतां अल्लाच्या आणि खुदाच्या नांवानें कशाला हांका मारतोस?" गौतमा आवेशानें दांतओंठ खात म्हणाली, "साध्वी स्त्रियांच्या अब्रूवर धाड घालण्याचा बेत करून इकडे येतांना तूं अल्लाला व खुदाला विचारून आला होतास का?"

अबुबकर मरतां मरतां आवेशाला चढून अखेरचे शब्द बोलला, " ह्या बदमाष लवंडीची बेइज्जत करा."

" बेइज्जत करा ! बेइज्जत करा ! " गौतमा उसळून म्हणाली, " त्रिभुवनांतील पापाच्या पुतळ्या ! मरतां मरतां देखील तोंडावाटे असा नरक ओकतोस ! तूं मेल्यावर नरकांत पडलास तरी त्यामुळें नरकाची किंमतदेखील कमी होईल ! "

अबुबकर आणखी कितीतरी घाणेरडे शब्द बोलला असता. पण त्याची जीभ आंत ओढली गेली व त्याला जोरानें रक्ताची उलटी झाली, त्यावरोबर त्याचा अंत झाला. त्याची ही दशा पाहून त्याचे साथीदार जे इतका वेळ कमळा व नूरनिहार यांच्याशीं झगडण्यांत चूर होते ते त्याच्या साह्याला धावावयाचे; पण त्या दोघींनींच त्यांची अशी घाबरगुंडी उडवून दिली कीं, त्यांतून ते बचावणार तेव्हां अबुबकरच्या बचावाला धावून जाणार ना !

कमळेची मात्र तेव्हां अगदीं शोचनीय स्थिति झाली होती. पाठीवर सटवाजीला सांभाळावयाचा, त्यांत तिला कांहीं दिवसही गेले होते. शिवाय अबुबकरचे ते साथीदार तर कोणत्याही स्त्रीचें मूल तिला तिच्या प्राणांहूनही प्यार असतें हें ओळखून तिच्या सटवाजीला प्रथम ठार करण्यासाठीं धडपडत होते. त्यांचा मारा चुकवून पाठीशीं बांधलेल्या पोटच्या गोळ्याच्या केंसालाही धक्का लागूं न देतां लढतां लढतां तिचा जीव बेजार होऊन गेला होता. त्यांतच दिवा विझाल्यानें तेथली परिस्थिति जास्त भयाण झाली होती. आतां ह्या काळोखांत हे काळ आपल्या बाळाच्या जिवावर उठतात कीं काय, ह्या भयानें बाळाला लपवितां लपवितां तिला पुरे वाट झाली. सुदैवानें गौतमेनें तिच्यावर लाथ हाणणाऱ्या चांडाळाची गर्दन हां हां म्हणतां धडावेगळी केली; तेवढ्यांतल्या तेवढ्यांत तिनेंही चातुर्य लढवून आंतल्या खोलींतील एका वळकटीच्या आड आपल्या बाळाला लपवून ठेविलें. तें अर्थात् तिचें तिलाच माहीत होतें. इतरांना तें कळण्याला कांहीं मार्ग नव्हता. कुलस्त्रियांच्या अब्रूवर उठलेल्या त्या नराधमांनीं त्या घरांत तेव्हांच्या त्या काळोख्या परिस्थितीचा फायदा घेऊन काय काय अत्याचार केले असते, याचें यथावत् वर्णन करणें तर दूरच राहिलें, त्याची अंधुक कल्पनादेखील सुज्ञ मनोवृत्तीला शोभणार नाहीं. असले अत्याचार पाहाण्याचें तेथल्या वास्तुपुरुषाच्या जिवावर आलें होतें म्हणूनच कीं काय, त्यानें अदृश्य रूपानें घरांतील तेवता दिवा उपडा पाडून विझविला होता.

त्यामुळें जिकडे तिकडे काळोख झाला होता. अगदीं बरोबर त्याचवेळीं बाहेर आकाशांत मेघावडंबर माजल्यामुळें चांदण्याचा प्रकाशही अगदीं फिक्का पडला.

अंमळशानें त्या घराच्या अंगणांत उजेड दिसला. अर्थात् तो प्रथम घरांतील दंगेखोरांनाच दिसला. त्यांतल्या एकानें बाहेर डोकावून पाहिलें व लगेच दुसऱ्याला म्हटलें, "अरे ! हाच तो थेरडा भोजराज. याला पकडावयाचें का ?"

"तर ! त्याला पकडल्यानें आपलें केवढें मोठें काम होणार आहे !" त्याचा दुसरा साथीदार म्हणाला.

"चला तर." पहिला साथीदार म्हणाला.

"पण हीं हातांतील सावजें कशीं सोडावयाचीं ?" तिसऱ्या साथीदारानें विचारलें.

चौथ्यानें त्यावर तोड काढली, "त्यांच्यावर आम्ही देखरेख करतों. पण आपणांला तो म्हातारा हातचा गमवतां कामा नये."

इतक्यांत भोजराज आपल्या घोड्यावरून उतरून चूड हातांत घेऊन दरवाजापाशीं आला. त्यानें दुरूनच पाहिलें तों दरवाजा उघडा ! त्याला लगेच संशय आला. येऊं नयेत तसल्या कल्पना त्याच्या मनांत घोळूं लागल्या. तो तेथेंच क्षणभर थबकून हांक मारूं लागला, "गौतमे ! अग गौतमे !"

भोजराजानें इतकी सावधगिरी दाखविली ती त्या साथीदारांच्या तेव्हांच लक्षांत आली. त्यांतल्या ज्या एकानें भोजराजाला पकडावयाचें किंवा कसें हा प्रश्न प्रथम उपस्थित केला होता, तो आपल्या दुसऱ्या साथीदाराला हळूच म्हणाला, "आतां आपण जर वेळ गमावला तर आतांच्याच प्रसंगाची पुनरावृत्ति पुन्हा व्हावयाची. म्हातारा आणखी जरा पुढें आल्यावर आपल्या हातीं सांपडेल असें आम्हांला वाटलें होतें; पण तो सावध दिसतो. त्याला आपण अचानक जाऊन पकडावें हें चांगलें."

"हो ! तसेंच करा. तोंपर्यंत आम्ही ह्या बायांना अडवून ठेवतों. भोजराज अचानक आला याचें कारण अल्ला आपला पाठीराखा आहे. ज्या कामासाठीं आपण आलों, तें काम न करतां नुसते ह्या शेळ्यामेंढ्यांच्या रक्तानें हात माखवून माघारे गेलों असतों तर किल्लेदार आपणाला काय म्हणाला असता !" एक साथीदार अगदीं हळूच भोजराजाला ऐकूं जाणार नाहीं अशा बेतानें म्हणाला.

ठरलेल्या बेताप्रमाणें भोजराजावर हुपा छापा घालण्याच्या इराद्यानें ते हळूच दरवाजापाशीं आले. आतां भोजराजाचें जरा दुर्लक्ष होईल व आपण त्याच्यावर छापा घालूं, असा त्यांचा बेत होता. पण भोजराजाचें दुर्लक्ष कांहीं झालें नाहीं,

त्याला त्या बदमाषांची चाहूल मात्र लागली. दरवाजावर त्याची नजर बराच वेळ खिळून बसली होती. तेथेंच त्याला आपल्या हातांतील चुडीच्या प्रकाशांत एक दोन माणसें आंत वावरत असलेलीं दिसलीं व अपरिचित असे पुरुषी चेहरेही ओझरते दिसले. त्याबरोबर त्याला संशय आला कीं, इथें कांहीं तरी घोंटाळा आहे. तो तसाच दरवाजापर्यंत चालत गेला व 'कोण आहे' असा प्रश्न करणार, तोंच 'पकडो साले बुड्ढेकू' असा दुहेरी ध्वनि त्याच्या कर्णपथावर येऊन आदळला व त्या ध्वनीचा क्षीण प्रतिध्वनि वातावरणांत तरंगत तरंगत गतप्रभ होतो न होतो तोंच दोघां सैतानांनीं आंतून बाहेर उड्या मारून त्याला घेरलें. एकानें त्याची मानगुटी धरली व दुसऱ्यानें त्याच्या कमरेला मिठी मारली. हा सर्व प्रकार इतक्या चपळाईनें झाला कीं सांगण्याची सोय नाहीं.

" कोण रे तुम्ही ? " भोजराजानें आश्चर्य व संताप यांनीं मिश्रित अशा स्वरानें विचारलें.

" तुझे बाप ! " ज्यानें भोजराजाच्या कमरेला मगरमिठी घातली होती, तो उत्तरला व लगेच आपल्या साथीदाराला म्हणाला, " दोस्त ! मी याला पकडून ठेवतों. तोंवर तूं कसेंही करून याचे हात घट्ट बांध."

त्या दुसऱ्या साथीदारानें भोजराजाचा गळा सोडून आंगणांत जवळच कांहीं दोऱ्या पडल्या होत्या, त्यांतली एक घेऊन भोजराजाचे हात घट्ट बांधले. आतां भोजराजाला हालचाल करतां येणें शक्यच नव्हतें. आतां आपणाला कोणाचेंही भय नाहीं असें पहातांच त्या माजोऱ्यांना मोठें अवसान चढलें. ते दोघेही मोठ्यानें गर्जून घरांतील आपल्या दोस्तांना उद्देशून म्हणाले, " दोस्त ! आतां त्या औरतींना बाहेर खेंचा."

दुसरा म्हणाला, " बस्स ! त्यांना बाहेर खेंचा. ह्या थेरड्याच्या डोळ्यांसमोर त्यांना इथल्या इथें छाटून टाकूं."

भोजराजाच्या अंतःकरणाची तेव्हां किती अनुकंपनीय अवस्था झाली असेल, याची कल्पनाच केलेली बरी. पण छे ! ती कल्पनाही सज्जनांच्या अंतःकरणाला कापीत जाणारी असल्यानें ती देखील न केलेली बरी. शिव ! शिव ! भोजराजाचे हात जर ह्या वेळीं मोकळे असते, तर त्यानें परमेश्वरापासून सहस्रनागांचें बळ आपल्या बाहूंत मागून घेऊन एकेका बुक्कीसरसा एकेका सैतानाचा कपाळमोक्ष केला असता. तें वेळीं त्याला साधलें नसतें, तर त्यानें आपल्या थोर कुळाची व आपल्या कन्येची

अब्रू अबाधित राखण्यासाठीं जरूर तर तिला तेथल्या तेथें ठारही केली असती. पण तो आतां बंदिवान झाला होता! तेथें त्याचा तरी काय इलाज!

भोजराजाच्या केंविलवाण्या विनवणीकडे पूर्ण दुर्लक्ष्य करून त्याचा तो वैरी घरांतील आपल्या साथीदारांना उद्देशून आब्यतेनें म्हणाला, "पहातां काय? ती गौतमा व ती कमळा, आणि ती ढालगज नूरनिहार हातीं सांपडली तर तिला देखील फरपटत बाहेर ओढून आणा. हा थेरडा आमच्याशीं मघाशीं मारामारी करून पळाला, त्याला किल्लेदाराकडून शासन होईल तेव्हां होईल, प्रथम आपण तर आपल्या हातीं आहे तेवढा सूड उगवून घेऊं या!"

अखेर घरांतून एकदांचे आंतील तिघे सैतान तीन माणसांना घेऊन बाहेर आले. पण उजेडांत पहातात तों काय, ते मुड्दे! त्यांतला एक कमळेचा, एक अबुबकरचा व एक जिवाईचा! त्यांपैकीं अबुबकर व जिवाई यांचे तर निव्वळ मुड्दे होते, व कमळा मात्र जिवंत कीं मेली अशा संशयास्पद स्थितींत होती. त्यामुळें सर्वांचीच मोठी निराशा झाली. गौतमा एकदांची ह्या चांडाळांच्या हातून निसटली म्हणून भोजराजाला हायसें वाटलें; पण जिवाई—आपली पाठची बहीण जिवाई तेथें बळी पडलेली पाहून त्याला परमावधीचें दुःख झालें.

"हें काय? त्या पोरटया कुठें गेल्या?" एकानें विचारलें.

"त्या घरांत लपून बसल्या असतील. जा त्यांना शोधून काढा." दुसरा म्हणाला.

"हो! चला, त्यांना शोधून काढलेंच पाहिजे." असें म्हणून सर्वांनीं आपल्या ह्या फटफजितीबद्दल चिडून दांत-ओठ खात भोजराजासह आंत प्रवेश केला. पण आंत देखिल कोणीच त्यांच्या हातीं लागेना. गौतमा व नूरनिहार कुठें पळाल्या तें पाहाण्यासाठीं मागील दरवाजाकडे त्यांपैकीं एकानें नजर फेंकली तों तो दरवाजा सताड उघडा! अर्थात् त्या दरवाजानें त्या दोघी पळाल्या असाव्या हें उघड झालें. त्यामुळें सर्व चिडले. त्यांतल्या एकानें भोजराजाला शिव्या हांसडीत विचारलें, "हरामखोरा! तुझ्या पोरीच्या वगींचीं शेजारचीं घरें तुला माहीत असलीं पाहिजेत. तीं कोणकोणतीं तें दाखवितोस, कीं करूं तुझी कत्तल?"

भोजराज जिवावर उदार होऊन बेफिकीरपणें उत्तरला, "माझी कत्तल केली तरी मी कांहीं एक सांगणार नाहीं. मी एवढें मात्र सांगतों कीं, तुम्ही जर आमच्यामुळें आमच्या शेजाऱ्यापाजाऱ्यांना देखील हकनाहक अशा अपरात्रीं गांजूं लागाल, तर ह्या आळींतून तुम्ही जिवंत सुटणार नाहीं."

भोजराजानें असें भविष्य करावयाला व एकंदर दंगलीची चौकशी करण्यासाठीं दोघे शेजारी हातांत लाठ्या घेऊन तेथें यावयाला एक गांठ पडली. योगायोगानुसार ते दोघेही भोजराजाच्या तसेंच त्या अत्याचारी नराधमांच्याही ओळखीचे निघाले. इतकेंच काय; पण ते देखील किल्ल्यावरील नोकर निघाले. ते पिलाजीचे शेजारी व भोजराजाचे परिचित खरे; पण त्यांना ओढा त्यांच्या शेजाऱ्यांपेक्षां साथीदारांचा जास्त होता. त्यांनीं आपल्या शेजारधर्माला अनुसरून ह्या भानगडीची उडती चौकशी केली, व भोजराजाला पकडणाऱ्या लोकांकडून जेव्हां 'भोजराज किल्लेदाराचा अपराधी आहे. त्याला आम्ही किल्लेदाराच्या हुकुमावरून कैद करून नेत आहों' असें ऐकलें, तेव्हां किल्लेदाराच्या हुकुमाविरुद्ध कांहीं बोलणें अथवा करणें योग्य नाहीं असा पोक्त विचार करून ते दोघेही शिष्टपणाचा आव आणून माघारे वळले. मात्र तेथल्या तेथें त्या गुंडांचा पिलाजीच्या घराला आग लावण्याचा व आजूबाजूच्या घरांतून गौतमा आणि नूरनिहार यांचा कसून शोध करण्याचा विचार चालला होता, तो आतांच्या ह्या शिष्टांनीं माघारे जातां जातां त्यांतल्या म्होरक्याला कांहीं कानमंत्र दिल्यामुळें रद्द झाला. बाहेर दिसावयाला त्या शेजाऱ्यांनीं त्या लोकांचीं घरें न जाळण्याविषयीं विनंति केली व ती त्यांनीं मान्यही केली. भोजराजाच्या सुटकेविषयीं खटपट करण्याची मात्र सोयच नव्हती. तो किल्लेदाराचा कैदी होता. असा साराच नूर एकाएकीं कसा पालटला याविषयीं भोजराजाला कांहींच कल्पना करतां येईना. तरीपण ज्या अर्थी त्या शेजाऱ्यांच्या शब्दाला इतका मान आपल्या शत्रूंपासून मिळाल्याचें त्यानें पाहिलें, तेव्हां त्याला आशा वाटूं लागली कीं, बुडत्याला काडीचा आधार या न्यायानें त्यांचा आपणाला उपयोग होईल. तो त्यांना दोन्ही हात जोडून म्हणाला, " बाबांनो ! हें आमच्यावर निव्वळ कुभांड रचण्यांत आलें आहे. या वेळीं तुम्ही आमचे शेजारी, तुम्हीआम्ही एका जातीचे मराठे. तुमच्या व माझ्या बायका-बहिणी-मुलींची अब्रू कांहीं निरनिराळी नाहीं. हा अत्याचार तुम्ही मुकाटपणें सहन करतां, मग मराठ्यांचें नांव तरी कशाला सांगतां ? "

भोजराजानें आणखीदेखील त्या शेजाऱ्यांची समजूत घालण्याचा प्रयत्न केला असता. पण त्याचे रिपु त्याला जास्त वेळ उभा राहूं देण्याला तयार नव्हते व ते शेजारीही खऱ्या मराठी बाण्याला शोभण्याजोगे चिडण्याचा कांहीं रंग दिसेना. ते उलट भोजराजाचीच समजूत घालूं लागले, " म्हातारेबुवा ! आम्ही तरी इथें काय

करणार ! जसे ते किल्लेदाराचे अंकित तसेच आम्हीही. ते किल्लेदाराच्या हुकुमाची तामिली करीत असतां आम्हीं त्यांना प्रतिबंध केला तर आमची धडगत नाहीं. त्यापेक्षां तुम्हीच किल्लेदारापाशीं गेल्यावर त्याला आपलें गाऱ्हाणें सांगा व त्याची क्षमा मागा. तो फार भला माणूस आहे; तुमची विनंति तेथें वायां जावयाची नाहीं."

"पण माझ्या घराचा सत्यनाश झाला याची गत काय ? माझी बहीण मृत्युमुखीं पडली, माझी पोर नाहींशी झाली, त्याची वाट काय ?" भोजराज ओंठ चावून आकाशाकडे पाहून म्हणाला, "परमेश्वरा ! ह्या चांडाळांच्या कुलस्त्रियांची अशी विटबंना करण्याची बुद्धि माझ्या मल्हारीला कधींच देऊं नकोस. जे करतील ते भरतील ! भगवंता ! तुला रे बाबा त्यांची लाज !"

भोजराज बंदिवान बनून चालला होता, तेव्हां त्याचे ते नामर्द शेजारी निर्लज्जपणें त्याच्याकडे पाहून हंसत होते !

प्रकरण अकरावें

# उजाडेपर्यंतच्या इतर घडामोडी

किल्ल्यावर रंगमहालांतून येण्याच्या भुयाराच्या तोंडाशीं किल्लेदारानें त्या रात्रीं मुद्दाम पहारा बसविला होता, व पहारेकऱ्यानें भुयारांतून कोणी तरी वर येण्याची अपेक्षा करीत असल्याची बातमी किल्लेदाराला येऊन देतांच किल्लेदार रागारागानें उठून भुयाराकडे गेला, हें वाचकांना यापूर्वीच विदित झालें आहे.

भुयाराच्या दरवाजापाशीं जातांच किल्लेदारानें दरडावून विचारलें, "कोण आहे?"

उत्तर मिळालें, "मी आहें."

किल्लेदारानें ह्या उत्तरानें बराच चिडून पुन्हा त्रासिक स्वरांत विचारलें, "तूं म्हणजे कोण? तूं महाराजांची राणी लागून गेली आहेस कीं काय?"

आंतून गंभीरपणानें उत्तर मिळालें, "मुकाट्यानें दार उघड. पायांवर पाणी ओत म्हटल्यावर पाणी ओतावें; सांखळ्या केवढ्याच्या म्हणून चौकशी करण्याचें काम नाहीं."

ह्या अनपेक्षित उत्तरानें किल्लेदार एकाएकीं दचकल्यासारखा झाला. त्यानें ओळखलें कीं, हें कांहीं सामान्य माणसाच्या तोंडचें उत्तर नव्हे. त्यानें दरडावणीच्या भाषेंत कोण आहे असें विचारलें, त्याचा भावार्थ इतकाच कीं, त्याचा जरा कुठें डोळा लागत होता, इतक्यांत ही कोण पिडा आली! आपण जरा दरडावून विचारतांच तें माणूस मुकाट्यानें मागच्या पायीं मागें जाईल व त्याच्याशीं बोलून झोंप मोडण्याची आपणाला गरज पडणार नाहीं अशी त्याची अपेक्षा होती. पण दरडावणीच्या प्रश्नाला दुप्पट दरडावणीचें उत्तर मिळतांच त्याला कळून चुकलें कीं, आपली साखरझोंपेची अपेक्षा आपणाला फार महाग पडणार! ज्या अर्थीं आपल्या प्रश्नाला इतकें दरडावणीचें उत्तर मिळालें, त्या अर्थीं हें राजघराण्यांतील कोणातरी माणसाचें उत्तर असलें पाहिजे, याविषयीं त्याला शंका उरली नाहीं.

किल्लेदारानें लगेच पहारेकऱ्याला आज्ञा केली, "दरवाजा उघड."

पहारेकऱ्यानें दरवाजा उघडला; त्याबरोबर राणी सकवारबाई किल्लेदारासमोर मूर्तिमंत उभी! तिला पहातांच किल्लेदाराच्या तोंडचें पाणी पळालें. त्यानें तिच्या

चरणांना वंदन करून तिची क्षमा याचिली, " राणीसाहेब ! माफ करा. मीं आपला आवाज ओळखला नाहीं. अलीकडे किल्ल्यावर फंदफितुरीचें व लावालावीचें पीक वाढत्या प्रमाणावर आहे, म्हणून मला इतक्या सावधगिरीनें वागावें लागतें. बरें; आतां राणीसाहेबांची काय आज्ञा आहे ? "

सकवारबाई भुयाराच्या दरवाजांतून वर येऊन म्हणाली, " शेख ! ह्या बंदोबस्ताच्या गोष्टी तूं कुणासमोर बोलत आहेस, याची तुला जाणीव आहे का ? तूं शुद्धीवर आहेस का ? "

किल्लेदार सकवारबाईच्या ह्या प्रश्नानें दडपल्यासारखा झाला. त्याला ह्या बोलण्याचा अर्थच कळेना. आपली इतक्या कडेकोट बंदोबस्ताची फळी फोडून देखील कांहीं फंदफितुरी राजवाड्यापर्यंत प्रवेश करूं शकली कीं काय, अशी त्याला जबरदस्त शंका आली, व प्रथम संशय त्या पहारेवाल्याचा आला. त्यानें पहारेवाल्याकडे एक तीक्ष्ण नेत्रकटाक्ष फेंकून राणीला विनीत भावानें विचारलें, " राणीसाहेब ! माझ्या हातून कांहीं गुन्हा झाला असल्यास कसूर माफ करावी."

" कसूर माफ करावी ! तुझ्यासारख्या फितुराला कसूर माफ करणें म्हणजे दारच्या विषारी रोप्याला पाणी घालून वाढवण्यासारखें आहे."

" म्हणजे काय ? "

" म्हणजे काय ? " सकवारबाई जास्त चिरडीला येऊन म्हणाली, " तुझीं कृष्ण-कारस्थानें, तुझे फितुरी कावे कोणाला कळत नाहींत अशी तुझी कल्पना आहे काय? पण शेख ! याद राख, महाराजांच्या ह्या राणीच्या पाठीला डोळे आहेत. तुम्हीं अनेक निमकहरामांनीं पेशव्यांच्या पडछाया बनून प्रतिनिधींशीं विरोध मांडला आहे, व पेशवे आम्हां दोघां राण्यांचा पाणउतारा करण्यासाठीं दीडदमडी किंमतीच्या महाराजांच्या रखेल्यांना हाताशीं धरून कारस्थानें रचीत आहेत. पण जेव्हां तुमचीं हीं सारीं पापें उजेडांत येतील व ह्या कुटिल कारस्थानाच्या गर्तेत पेशवे आणि त्यांच्या बरोबरच तुम्ही त्यांचे सारे निमकहराम अनुयायी एकजात गाडले जाल, तेव्हां तुमचे डोळे उघडतील. आम्हां राण्यांच्या विरुद्ध कारस्थानें करण्यासाठीं दीडदमडीच्या बाजारी बायकांना सामील होतां काय ? "

" राणीसाहेब ! मी कोणाला कधीं सामील झालों ? "

" तें तुला जसें कांहीं माहीतच नाहीं ! "

"खरेंच माहीत नाहीं. आपला हा माझ्याविषयीं केवळ गैरसमज झालेला आहे. माझ्या कोणा दुस्मनानें आपले कान फुंकून माझ्यावर हें कुभांड रचिलें आहे."

"काय ? तूं लक्ष्मीबाईला सामील नाहींस ?"

"नाहीं."

"काय ? तूं सरळपणानें ही फितुरी कबूल करीत नाहींस ? ठीक आहे. वेळ आली म्हणजे तुझ्या अन्यायाचें पुरेपूर माप तुझ्या पदरीं पडेल. मी आजच कशाला बोलूं ! एवढी मी मी म्हणणारी विरूबाई,* तिच्या देखोल नशिबाला चूड लावण्याला ज्या ह्या सकवारबाईनें कमी केलें नाहीं, ती तुझ्यासारख्या बथ्थड बुद्धीच्या थेरड्याला थोडीच बधणार आहे ! लक्ष्मी तर काय ! भाबडी अचरट पोर आहे. विरूबाईच्या मुत्सद्दीपणाचें जिथें मीं पायपुसणें केलें, तिथें ह्या लक्ष्मीला गाडायला मला कितीसा उशीर ? राणीवशांतील ह्या बेबनावाच्या शेकोटीवर पेशवे व त्यांचे तुम्ही दगलबाज साथीदार हात शेकीत बसलां आहां; पण हात भाजतील तेव्हां तुमचे डोळे उघडतील."

किल्लेदाराला सकवारबाईचे हे विजेच्या कडकडाटालाही सौम्य ठरविणारे ज्वलज्जहाल बोल ऐकून विचार पडला कीं, हिचें मन इतकें कलुषित होण्याचें कारण तरी काय! सकवारबाई व सगुणाबाई ह्या दोन्ही राण्या विरूबाईला, ती शाहूमहाराजांची जास्त आवडती म्हणून, पाण्यांत पहात असत हें त्याला माहीत होतें. तसेंच नुक्तेच

---

* विरूबाईचा वृत्तान्त 'कादंबरीमय पेशवाई'मधील दुसरी कादंबरी **'पेशवाईची प्राणप्रतिष्ठा'** व चौथी कादंबरी **'पेशवाईचा ध्रुव ढळला ?'** यांत आली आहे. तसेंच ह्या चौथ्या कादंबरींत विरूबाई व शाहूमहाराजांच्या राण्या यांच्यांत सवतीमत्सर कसा तीव्र होता याचेंही यथातथ्य वर्णन करण्यांत आलें आहे. विरूबाई व बसवंतराव यांच्या वर्तनाविषयीं महाराजांना संशय आला होता, याविषयीं मराठी दफ्तर—रुमाल १' (पृ. १२३) ह्या बखरींत पुढीलप्रमाणें दाखला सांपडतोः—'शाहू महाराज छत्रपति स्वामी यास विरूबाईने आर्ज केला की, मी समुद्रस्नानास जाऊन येते. मग 'उत्तम' असे म्हणून छत्रपति याणी आज्ञा दिली. मग बसवंतराव कासुर्डे यास समक्ष आज्ञा केली कीं, तुम्ही मर्जी बरोबर तुम्हास चाकरीस नेमिले आहे. तेव्हा बसवंतराव कासुर्डे याणी आपले मनात विच्यार केला की ही चाकरी कठिण नाजुक जनानखान्याची फार आवघड आहे. आपली हुरमत कसी वाचेल कोणी काही समजाविल आणि आपल्यावर येखादी बलाई

विरूबाईवर एक संकट कोसळून ती अलीकडे महाराजांच्या मर्जींतून बरीच उतरली असल्याचाही सर्व नगरभर बोभाटा झाला होता. तो बोभाटा असा कीं, " विरूबाई ही दुराचारी असल्यामुळें महाराजांनीं तिला टाकली. थोड्या दिवसांपूर्वीं विरूबाई महाराजांच्या परवानगीनें समुद्रस्नानाला गेली, तेव्हां बसवंतराव कासुर्डे नांवाचा तिचा अत्यंत विश्वासू सेवक तिच्याबरोबर होता. विरूबाईवर बसवंतरावाची निःसीम व निष्पाप भक्ति होती, व महाराजांनाही तो देवाच्या ठिकाणीं पूज्य मानी. म्हणूनच महाराजांनीं विरूबाईच्या रक्षणाचा भार त्याच्या शिरीं देऊन त्याला तिच्याबरोबर पाठविलें. हें आपलें कर्तव्य अत्यंत चोखपणें बजावलें जावें म्हणून बसवंतराव प्रवासांत आपल्या जिवापलीकडे विरूबाईला जपे. झोंपावयाचें झालें तरी तो तिच्या सन्निध त्याच पलंगावर झोंपे. पण त्या वेळीं त्या दोघांच्या मनाला पाप कसें तें शिवत देखील नसे. असा एकमेकांच्या जिव्हाळ्यानें त्या दोघांनीं समुद्रस्नानाचा प्रवास पार पाडला व दोघेंही माघारीं साताऱ्याला आलीं. तेव्हां बसवंतरावाच्या दुष्टाव्यावर टपून बसलेल्या कांहीं लोकांनीं महाराजांच्या कानांत विष ओतलें कीं, बसवंतराव व विरूबाई यांचा कांहीं वाईट संबंध आहे. झालें. शाहूमहाराजांना तें खरेंच वाटलें. विषयांधतेमुळें अनेक स्त्रियांना आपल्या प्रियतमा मानणारे पुरुष आपल्या स्त्रियांविषयीं साशंक असतात ते असे ! लगेच महाराजांनीं विरूबाईपाशीं तो संशय प्रकट केला व तिच्यावर उघड उघड आरोप ठेवला कीं, 'तूं भ्रष्ट आहेस'. त्याबरोबरच बसवंत-

---

येईल. नंतर स्वामी आज्ञा प्रमाण मानून मग बसवंतराव याणी......... येका डब्यांत घालून शाहूमहाराज छत्रपति यास येऊन आर्ज केला की मी सरकार-चाकरीवर जाणार माझी जिन्नस आपले जामदारखान्यात ठेवावी. मी कामगिरी करून आल्यावर माझी वस्त मजला द्यावी. नंतर शाहू महाराज छत्रपति याणी विरू-बाईची व बसवंतराव कासुरडे याची रवानगी करून दिल्ही...नंतर जेथे मुकामास विरूबाई व बसवंतराव हे येका पलंगावर निजत होते. तेव्हा मजले दरमजल घोटागरास दाखल जाहाले. येथे समुद्रस्नान करून...मग तेथून निघोन परत दररोज मुकामी उभयता यका पलंगावर निजत होती असी या रीतीने सातारा येथे दाखल जाहाली. तो शाहू महाराज छत्रपति यास समागमे लोक गेले होते, त्याणी येकांती महाराज यास जाहाला मजकूर उभयेताची खबर दिल्ही. त्याजवरून महाराज यास सौषय येऊन उगेच राहिले...' (बखरींतील मूळ भाषा कायम आहे.)

रावाच्या बाबतींतही महाराजांचा असा हुकूम सुटला कीं, 'बसवंतराव यास जन्मभर किल्ल्यावरील अंधारकोठडींत कोंडून ठेवावें'. बसवंतरावाच्या सुदैवानें त्या वेळीं तो आपल्या कोणा नातलगाला भेटण्यासाठीं कोठें बाहेर गांवीं गेला होता, म्हणून तेवढ्यापुरता बचावला होता. पण विरूबाईच्या कपाळीं मात्र वनवास कायमचा आला होता, व तिची जागा भरून काढण्यासाठीं कीं काय, श्रीपतराव प्रतिनिधीनें लक्ष्मीला महाराजांच्या सेवेंत सादर केली होती. प्रत्यक्ष महाराजांनींच आपल्या आवडत्या विरूबाईविषयीं संशय घेतांच इतर लोकही तसें बोलूं लागले यांत नवल नाहीं. किल्लेदारही इतरे जनांपैकींच एक होता, व त्याचीही या घटकेपर्यंत अशीच दृढ समजूत होऊन बसली होती कीं, विरूबाई व बसवंतराव यांचा असा काळाबेरा संबंध खास असला पाहिजे."

पण आतांच सकवारबाई जेव्हां विरूबाईच्या जन्माचें मातेरें करण्याचें श्रेय स्वतःकडे घेऊं लागली, व तसें करतांनादेखील प्रतिनिधींची उघड उघड तरफदारी करूं लागली, तेव्हां किल्लेदाराच्या अंतःकरणांत वस्तुस्थितीचा बराच प्रकाश पडला. विरूबाई ही जरी महाराजांची नाटकशाळा असली तरी ती खरी पतिव्रता आहे व जशी ती सदाचारी तशीच शहाणीही आहे असा त्याचा परवांपर्यंत—विरूबाईवर प्रत्यक्ष महाराजांच्याच तोंडून दुराचाराचा आरोप येईपर्यंत दृढ समज होता. तोच समज त्याला आतां पुन्हा खरासा वाटूं लागला, व सकवारबाईच्या एकंदर बोलण्याचा झोंकरोंख पाहून त्यानें ताडलें कीं, पेशव्यांच्या पक्षाला हाणून पाडण्याचीं जीं अनेक कारस्थानें प्रतिनिधिपक्षानें चालविलीं आहेत, त्या कारस्थानांच्या मुळाशीं महाराजांच्या सकवारबाई व सगुणाबाई ह्या राण्याही आहेत. इतकी आजूबाजूची माहिती कळल्यावर ह्या दोन राण्या तरी पेशव्यांच्या व विरूबाईच्या विरुद्ध आणि प्रतिनिधीच्या बाजूच्या कां, तसेंच सर्व मंडळीला पेशवे व विरूबाई हीं कां नकोत, हें तेव्हांच किल्लेदाराच्या ध्यानीं आलें. मराठशाहीच्या राजकारणांत शाहूमहाराज हे विरूबाई व पेशवे यांच्याच तंत्रानें बहुतांशीं वागतात व विरूबाई आणि पेशवे यांचें हरएक बाबींत एकमत असतें, त्यामुळें सकवारबाई व सगुणाबाई यांना पट्टराणीपणाचा तोरा मिरवावा तसा मिरवितां येत नाहीं, म्हणून त्या दोघींनाही पेशवे व विरूबाई हीं दोघेंही नको होतीं. प्रतिनिधीला पेशव्यांचा उत्कर्ष सहन होत नव्हता व पेशव्यांना हाणून पाडण्याच्या कामीं प्रतिनिधीनें महाराजांच्या ह्या दोन असंतुष्ट राण्यांचा उपयोग करून घेण्याचें ठरविलें होतें, ही गोष्ट तर

तेंव्हां सुविख्यातच होती. तेंव्हां राण्यांनीं पेशव्यांना हाणून पाडण्याच्या कामीं प्रतिनिधीला मदत करून सर्व सत्ता प्रतिनिधींच्या हातीं एकवटेल अशी खटपट करावयाची व त्या मोबदला प्रतिनिधींनें विरूबाईला हाणून पाडून महाराजांना तिच्याविषयीं तिरस्कार वाटूं लागेल अशी कांहीं तरी खटपट लटपट करून राणीवशांतून विरूबाईचें आसन ढळवून दोन्ही राण्यांचा मार्ग निष्कंटक करून द्यावयाचा, असा महाराजांच्या त्या दोन राण्या व प्रतिनिधि यांचा सिद्धसाधकपणाचा डाव होता. पेशवे व प्रतिनिधि तसेंच सगुणाबाई व सकवारबाई ह्या शाहूमहाराजांच्या दोन राण्या व विरूबाई यांच्यांत स्पर्धा असल्याचें साऱ्या जगाला माहींत होतें त्याप्रमाणेंच किल्लेदारालाही माहीत होतें. पण ह्या स्पर्धेचीं पाळेंमुळें इतक्या खोलवर पसरलीं गेलीं असतील, याची त्याला आजवर कल्पनाही नव्हती. तो सरळवृत्तीचा माणूस होता. पेशवे व प्रतिनिधि यांच्यांतील स्पर्धा ही निव्वळ राजकीय स्वरूपाची आहे, व महाराजांच्या दोन राण्या आणि विरूबाई यांच्यातील स्पर्धा हा जगांतील सवतीमत्सराचा एक सामान्य मासला आहे, ह्या दोन गोष्टींचा तादृश परस्परसंबंध कांहींच नाहीं, असेंच आजवर किल्लेदार जमेला धरून चालला होता. पण आज सकवारबाईची भाषा ऐकून त्याचा समज पालटला. ह्या दोन्ही गोष्टींचा पाया तत्त्वतः एकच व दृढद्वेषमूलक असून तो पाया रचण्याचें कटुतम श्रेय ह्या दोघीं ढालगज राण्यांच्या पदरीं पडतें हें त्याला आज पुरतेपणीं कळून चुकलें.

ह्या नव्या जाणिवेनें किल्लेदाराचा पेशव्यांच्या ठायीं असलेला विश्वास ढळणें तर शक्यच नव्हतें; उलट आतां त्याचें मन त्याच्या सभोंवारच्या मंडळींविषयीं मात्र जास्त साशंक झालें. बाजिरावाला पेशवाई मिळूं नये म्हणून प्रतिनिधिपक्षाची जी खटपट होतीच,त्या खटपटीला ह्या दोघी राण्यांचा उघड उघड भरभक्कम पाठिंबा असल्याचें त्याला आतां स्पष्ट कळून आलें, व ह्या राण्यांच्या ढालगजपणाला बिचाऱ्या विरूबाईचा निष्कारण बळी पडत आहे हें पाहून त्याला पराकाष्ठेचा खेद झाला. त्याला सकवारबाईविषयीं मनस्वी तिरस्कार वाटूं लागला. पण ती कशी झाली तरी राणी होती, तिची नाहीं तरी तिच्या राणीपदाची मुर्वत राखणें हें त्याचें कर्तव्य होतें. म्हणूनच सकवारबाईनें जरी त्याच्यावर एकदम आग पाखडण्याला सुरवात केली, तरी तो आपली पायरी ओळखून शांतपणानें उद्गारला, "राणीसाहेब! आपण माझ्याविषयीं हा वृथा गैरसमज करून घेतला आहे. मी महाराजांच्या पायांचा सेवक आहें. मी माझें काम माझ्या धन्याच्या चरणांना स्मरून व अल्लाला

साक्ष ठेवून चोखपणें बजावीत आहें. मी पेशव्यांच्याही बाजूचा नाहीं किंवा प्रतिनिधींच्याही बाजूचा नाहीं. वरिष्ठांचे रास्त हुकूम पाळून किल्लेदारीचा कारभार मी करीत असतों."

"तूं खोटें बोलतोस !" सकवारबाई म्हणाली.

"हें बोलणें आपणाला शोभत नाहीं." किल्लेदार म्हणाला.

"तूं पेशव्यांचा फितूर आहेस."

"अल्ला साक्ष आहे."

"मग काय, तूं फितूर नाहींस ?"

सकवारबाईच्या ह्या प्रश्नावर किल्लेदार कांहींच बोलला नाहीं. सकवारबाई थोडा वेळ थांबून म्हणाली, "तूं फितूर नाहींस, तर रात्रींबेरात्रीं राजवाड्यांत व बाहेर गुप्तहेर पाठवून आमच्या प्रतिस्पर्ध्यांना बातम्या पोंचविण्याचें तुला काय कारण पडलें होतें ? तुझीं कारस्थानें आम्हांला कळत नाहींत असें तूं समजूं नकोस."

"राणीसाहेब ! रात्रौ मी रंगमहालासमोर बाजिरावसाहेबांशीं येतां येतां बोलत उभा होतों व तेव्हां आपण आम्हांला पाहिलें, त्यावरून आपण हा तर्क करीत असाल."

"आणि त्यानंतरचा पुरावा दिला तर ?"

"शक्यच नाहीं."

"काय, शक्य नाहीं ? आतां थोड्या वेळापूर्वीं बाजीराव इथें येऊन गेला नाहीं ?"

"हो, आले होते. बाजीरावसाहेब आले होते. पण ते पिलाजीच्या तपासासाठीं आले होते," किल्लेदार म्हणाला. मात्र आतांच्या आतां ही बित्तंबातमी राजवाड्यांत कशी जाऊन पोंचली याबद्दल त्याला अत्यंत विस्मय वाटला.

"हें पहा शेख !" सकवारबाई जास्त गंभीर चर्या करून म्हणाली, "साताऱ्यांतील मनू आतां पालटला आहे, हें ध्यानीं घेऊन तूं वाग. मीं विरूबाईचें वाटोळें केलें व पेशव्यांचेंही करीन. अर्थात् आतां मराठशाहीची सर्व सत्ता प्रतिनिधि व ही राणी सकवारबाई यांच्या हातीं यायची आहे. शहाणें जग नेहमीं उगवत्या सूर्याला भजत असतें. पण मावळत्या सूर्याला भजण्याची तुझी व तुझ्यासारख्याच पेशव्यांच्या इतर साथीदारांची ही जगावेगळी रीत आहे. पण वेड्या ! पेशवे व विरूबाई अशा वाघवाघिणींना जमीनदोस्त करण्याचें बल व चातुर्य ज्यांच्या अंगीं आहे, त्यांना तुम्हांला-त्या वाघवाघिणींच्या मुखड्या समोर घोंगावणाऱ्या

घुंगुरट्यांना जमीनदोस्त करण्याला कितीसा उशीर लागणार ! परमेश्वराच्या कृपेनें तुम्हां सर्वांच्या फितुरीचा प्रत्यक्ष बोलता चालता पुरावा माझ्या हातीं सांपडला आहे. तो पुरावा मीं महाराजांपाशीं हजर केला, कीं तुमची दामटी वळविण्याला मुळींच वेळ लागायचा नाहीं."

"तो पुरावा कोणता ? "

"तो पुरावा कोणता ? बाजीराव आतां किल्ल्यावर येऊन गेल्याची खबर देण्यासाठीं तूं तुझा गुप्त हेर भुयाराच्या वाटेनें राजवाड्यांत पाठविला नाहींस ? "

"नाहीं. मुळींच नाहीं."

"नाहीं ? ठीक आहे. त्या हेराला कैद करून ठेवण्याची व्यवस्था मीं केली आहे, व त्याला जेव्हां महाराजांसमोर उभें करण्यांत येईल, तेव्हां तुझे डोळे उघडतील."

किल्लेदाराला या नव्या बातमीचा कांहींच उमज पडेना. त्यानें लगेच उस्मानकडे वळून विचारलें, "काय रे ? माझ्या परवानगीशिवाय कोणाला तूं आंत सोडलेंस का ? "

"असें कसें होईल किल्लेदारसाहेब ! " उस्मान गंभीर पण निर्दोष मुद्रेनें म्हणाला. "भुयाराच्या दरवाजाची किल्ली तर आपल्या स्वाधीन आहे."

उस्मानच्या ह्या उत्तरानें किल्लेदाराचें व्हावें तसें समाधान झालें नाहीं. पण राणीच्या देखत त्यानें हा प्रश्न जास्त झटाला लावला नाहीं. तो राणीला म्हणाला, "राणीसाहेब ! आपण म्हणतां त्या सर्व गोष्टी मला अगदीं नव्या आहेत. मीं असा कोणताही हेर कुठेंही पाठविलेला नाहीं कीं कांहीं नाहीं. आतां, माझा डोळा चुकवून कोणी बदमाष जर असा वावरत असला, तर त्याला माझा नाइलाज आहे. तरीही मी किल्ल्यावरच्या सर्व कामगारांची आतां हजेरी घेतों, म्हणजे खऱ्या-खोट्याचा तपास आपोआपच लागेल."

सकवारबाई हंसून म्हणाली, "शेख ! भोळा रे भोळा ! तूं अगदींच भोळा ! आपल्या घरच्या भटकत्या उनाड मैनेचे चाळे ज्याला कळत नाहींत, त्यानें इतक्या कडेकोट बंदोबस्ताच्या गप्पा कशाला माराव्या ! भोळ्या माणसा ! तुझ्या घरांतून— तुझ्या अंतःपुरांतूनच ह्या बातम्या बाहेर जातात, काय समजलास ! "

"काय ? माझी जुलिया असे लांडे कारभार करते ? " किल्लेदार विजेचा धक्का बसल्याप्रमाणें एकाएकीं चमकून म्हणाला, "राणीसाहेब ! आपला रोख माझ्या जुलियेवरच आहे का ? "

" माझा रोख कोणावर आहे व कोणावर नाहीं हें मी आतांच बोलत नाहीं. मी तूर्त एवढेंच सांगत्यें कीं, ह्या फंदफितुरींत तूं सामील आहेस असें भरभक्कम पुराव्यांनीं आतां सिद्ध झालें आहे, व तो पुरावा माझ्या हातीं आहे. कल्पना कर, असा एक पाजी मनुष्य तुझ्या सन्निध आहे—नव्हे होता—कीं जो तुझ्या जुलियेचाही प्यार आहे, तूं इतके दिवस जिची प्रणयाराधना केलीस त्या नूरनिहाराचाही प्यार आहे, व नूरनिहार आतां ज्या लक्ष्मीची दासी आहे त्या लक्ष्मीचाही प्यार आहे. त्या गुन्हेगाराला मीं आज लक्ष्मीच्या अंतःपुरांतून बाहेर पडतांना अचानक पकडला आहे व त्यानें हे सर्व अन्याय आपल्या तोंडानें कबूल केले आहेत. ह्या गुन्हेगाराला आम्हीं आतां महाराजांसमोर उभें केलें तर त्याच्या कबुलीजबाबानें काय काय अनर्थ ओढवतील याची तुला कल्पना तरी आहे का ? "

या प्रश्नावर किल्लेदाराकडून कांहीं तरी उत्तर मिळेल अशा अपेक्षेनें सकवारबाई थोडा वेळ स्तब्ध राहिली व कांहीं उत्तर मिळत नाहीं असें पाहून पुढें म्हणाली, " त्यामुळें तुझ्या बायकोच्या अब्रूचे उघड उघड धिंडवडे निघतील. लक्ष्मीबाईची व नूरनिहारची बद्वर्तणूक अशानें अनायासें सिद्ध होईल; आणि असल्या हलकट माणसाला तूं जवळ करून त्याच्यामार्फत फंदफितुरी चालविली आहेस हें महाराजांना कळून येतांच इतक्या सर्व माणसांबरोबर तुझेंही महाराजांच्या कोपानलांत कसें भस्म होईल, याची कल्पना कर. आतां तुझ्या लक्षांत आलेंच असेल कीं तुला ह्या अरिष्टांतून तारणें अथवा मारणें सर्वस्वीं माझ्या हातीं आहे."

किल्लेदाराला सकवारबाईचा खुनशी व आतताई स्वभाव पूर्णपणें माहीत होता व तिनें मनावर घेतल्यास नाहीं नाहीं त्या कलागती लावून आपला चेंदामेंदा करण्याला तिला मुळींच विलंब लागणार नाहीं अशी त्याची बालंबाल खात्री होती. त्याचा भरंवसा येऊन जाऊन पेशवे व शाहूमहाराज यांच्यावर ! पण पेशव्यांना नामोहरम करण्याच्या कामीं ह्या दोघी राण्या व प्रतिनिधि यांचें एकमत झालें असल्यानें यावेळीं सर्वस्वीं पेशव्यांवर भडिमार घालून राणीला झिडकारून त्याचेंच काय पण कोणाचेंच चालण्याजोगें नव्हतें. बरें; महाराजांचा भरंवसा धरावा तर तोही अशा वेळीं निष्फळ ठरला असता. याचा अर्थ असा नव्हे कीं, महाराजांनीं त्याच्या बाबतींत अन्याय केला असता. महाराज न्यायी होते, गुणी माणसाचे चहाते होते, त्यांना पदरच्या विश्वासू माणसांची कदर होती, सर्व कांहीं खरें. पण महाराजांच्या ठायीं जे दोन निसर्गदत्त दुर्गुण होते, ते दुर्गुण केव्हां कोणाला कसे मारक

होतील याचा नेम नव्हता. महाराज बरेच हलक्या कानांचे व अत्यंत विलास-लोलुप होते, हेच ते दुर्गुण होत. त्यांच्या ह्या दोन दुर्गुणांचा महाराजांसभोंवारच्या कुटिल वृत्तीच्या माणसांना नेहमीं फायदा मिळत असे. श्रीपतरावानें महाराजांपाशीं आपला जम बसविण्याच्या कामीं व पेशव्यांविरुद्ध महाराजांचें मन कलुषित करण्याच्या कामीं त्यांच्या ह्या दोन दुर्गुणांचाच उपयोग करून घेतला होता. तसेंच सकवार-बाईनेंही विरूबाईविषयीं महाराजांचें मन कलुषित करून स्वतःचें प्रस्थ माजविण्याचा जो उद्योग आरंभिला होता, त्याला आधार तरी महाराजांच्या उपरोक्त दुर्गुणांचाच होता. म्हणूनच किल्लेदाराला सकवारबाईची फार भीति वाटत असे.

इतक्या सर्व गोष्टींचा विचार करून किल्लेदारानें स्वतःच्या मनाशीं ठरविलें कीं, अशा आणीबाणीच्या वेळीं 'दुर्जनं प्रथमं वंदे' या न्यायानें सकवारबाईच्या कलानें घेतल्याशिवाय गत्यंतर नाहीं. वस्तुतः या वेळीं त्याच्या मनाला झोंबण्याजोगी महत्त्वाची गोष्ट जी त्याच्या निदर्शनाला आली होती, ती जुलियेच्या दुर्वर्तनाविषयीं होय. जुलिया आज रात्रीं त्याच्या घरांतून नाहींशी व्हावयाला व तिच्या दुराचारा-विषयींचा अप्रत्यक्ष पुरावा मिळावयाला आज एकच गांठ पडली होती. पण प्रत्यक्ष त्याचें भीषण भवितव्य सूचित करणारा नगारा सकवारबाईच्या धमकींतून त्याला जिथें ऐकूं येत होता, तिथें जुलियेच्या बद्वर्तनाविषयींची टिमकी त्याला कशी ऐकू यावी ! जुलिया त्याची आवडती होती—अत्यंत आवडती होती. पण तिच्यापेक्षांही त्याला स्वतःचे प्राण व स्वतःचा राजनिष्ठपणाचा लौकिक जास्त प्यार होता. एक जुलिया घरती कोणा उपटसुंभाच्या नादीं लागून निघून गेली तर त्याला तिच्या-ऐवजीं दुसरी सवाई जुलिया मिळवितां आली असती. सत्ता व संपत्ति हातीं मुबलक असल्यावर अशा सुंदर जुलियांना त्याला कसला दुष्काळ ! पण दौलत व प्राण गेल्यावर त्याला जुलिया कोठून मिळणार व मिळण्यासारखी असली तरी तिचा उपयोग तरी काय ? शीर सलामत तर पगडी पचास ! यास्तव त्याला आज प्रथम आपलें शीर सलामत राखणें अवश्य होतें, व तें सलामत राखतां यावें यासाठीं त्याला तें सकवारबाईसमोर नमविण्याशिवाय गत्यंतर नव्हतें.

"राणीसाहेब !" किल्लेदार अत्यंत नम्रभावानें सकवारबाईला हात जोडून म्हणाला, "ह्या एकंदर प्रकारांत खुदासाक्ष मी निर्दोषी आहें. पण माझी निर्दोषिता सिद्ध होण्याला आधार नाहीं, म्हणून मी लाचार झालों आहें. आतां मला तारणें अथवा मारणें सर्वस्वीं आपल्या हातीं आहे. आपण कांहींही करा; पण मला वांचवा."

"मी वांचवीन; पण मी सांगेन त्याप्रमाणें वागण्याला तूं तयार असशील तर."

"मी आपल्या सांगण्याप्रमाणें वागायला तयार आहें."

सकवारबाई जवळच्या पहारेकरी उस्मानाकडे पहात म्हणाली, "ह्या माणसाला एथून दूर जाऊं दे."

किल्लेदारानें उस्मानला दूर जावयाला सांगितलें.

नंतर सकवारबाई त्याला म्हणाली, "शेख! तूं माझ्या विश्वासांतील माणूस म्हणून तुझ्यापाशीं मी आतां कांहीं महत्त्वाच्या गोष्टी बोलणार आहें. त्यांचा कोठेंही बोभाटा होतां कामा नये. आहे कबूल?"

"आहे कबूल." किल्लेदार उत्तरला.

"आतां तूं मला सांग, तूं महाराजांच्या राणीला जास्त मानशील कीं महाराजांच्या यःकश्चित् नाटकशाळेला जास्त मानशील?"

"हें काय विचारावयाला हवें राणीसाहेब! राणी ती राणी!"

"होय ना? हें खरें ना?"

"हो!"

"तर मग तुझ्या राणीविरुद्ध कारस्थानें रचणाऱ्या नाटकशाळेचा पाडाव करण्याच्या न्याय्य गोष्टींत तूं मला मदत करणार नाहींस का?"

"अल्बत् मदत करीन."

"ठीक आहे तर. आतां मी जात्यें. तूं मात्र आतां एवढेंच कर, इतक्यांत ह्या भुयाराच्या वाटेनें जरी कोणीही मनुष्य आलें तरी त्याला तूं कैद करून ठेव. तसेंच ती नूरनिहार व तिचा साथीदार तो रहमान हीं दोघेंही कुठें आहेत?"

"तीं दोघेंही बाहेर गेलीं आहेत."

"तीं किल्ल्यांत आलीं तर त्यांना देखील ताबडतोब कैद करून ठेव."

"पण हें जरा भयंकरच नाहीं का? रहमान एक माझाच ताबेदार नोकर आहे, त्याला मीं कैद केलें तर शोभेल. पण नूरनिहार आतां माझी ताबेदार नाहीं. ती आतां राजदासी आहे. तिला मीं कैद केलें तर तो अन्याय नाहीं का होणार?"

"त्याचें तुला काय? तूं त्यांना माझ्या हुकुमावरून कैद कर म्हणत्यें ना? त्यांच्या अपराधांचा भरभक्कम पुरावा माझ्यापाशीं आहे. तूं त्या दोघांना आज फक्त कैद करावयाचें व महाराज राजधानींत आल्यावर त्यांचा हुकूम होईल तेव्हां हे सर्व आरोपी त्यांच्यासमोर उभे करावयाचे. लक्ष्मीबाई महाराजांची दिल्-

प्यारी होऊं पहात आहे, तिच्या गैरवर्तणुकीची शाबिती करण्याला मला ह्या सर्व गोष्टींचा फार उपयोग होईल."

" ठीक आहे. मी आपल्या आज्ञेप्रमाणें करतों. पण राणीसाहेब ! आतांच आपण जुलियेविषयीं बोललां तें काय ? "

" त्यांत विशेष कांहीं नाहीं."

" ती दुराचारी असल्याविषयींचा संशय आपण आतांच प्रगट केला ना ? "

" हो ! पण तो माझा केवळ तर्क आहे."

" तोच मला कळूं दे. आपणाला ज्या माणसाविषयीं संशय आला, त्या माणसाचें नांव मला पाहिजे आहे."

" त्या माणसाचें नांव कांहीं मला माहीत नाहीं; पण आतां जो मनुष्य गुप्त बातम्या लक्ष्मीबाईला पोंचविण्यासाठीं म्हणून तूं पाठविलास—"

" खुदासाक्ष, मीं कोणाला देखील पाठविला नाहीं."

किल्लेदाराचा ह्या शपथेवर सकवारबाईचा मुळींच विश्वास नव्हता. पण आपला कार्यभाग साधण्यासाठीं जरा नमतें घेण्याचें ठरवून ती म्हणाली, " बरें, तूं बातमीदार पाठविला नसशील; पण तुझ्या नकळत एक मनुष्य ह्या वाटेनें आतां राजवाड्यांत गेल्याचें मला नक्की माहीत आहे. तो मनुष्य मीं प्रत्यक्ष पाहिला आहे. तोच तुझ्या जुलियेचा प्यार आहे. पण असें पहा, असल्या गोष्टींचें जास्त चर्वितचर्वण करणें इष्ट नसतें. अशानें आपलीच अब्रू जायची कीं नाहीं ? तो गुन्हेगार आहे व आतां मीं तुला सांगितलें त्याप्रमाणें तो आपल्या कर्मानें मरणार आहे."

" सकवारबाईला किल्लेदाराच्या बायकोच्या पाक-नापाकपणाविषयीं काय करावयाचें होतें ! इतकेंच काय; पण ज्या मनुष्याविषयीं ती बोलत होती, त्या मनुष्याचा प्रत्यक्ष जुलियेशीं वाईट संबंध आहे किंवा कसें याविषयीं तिला कांहींच खरीखुरी माहिती नव्हती. तिनें कधीं ओझरतें ऐकलें असेल कीं जुलिया दुराचारी आहे, त्याचा तिनें असा फायदा घेतला होता. त्या मनुष्याचा प्रत्यक्ष जुलियेशीं संबंध आहे किंवा नाहीं ही तर दूरची गोष्ट ! त्याला आपण प्रत्यक्ष पाहिलें असें जें ती आतां म्हणाली, तें देखील शेंकडा शंभर टक्के खोटें होतें. एवढें मात्र खरें कीं, लक्ष्मीबाईच्या महालांत कोणीतरी तिच्याशीं गुजुगुजू गोष्टी बोलत बसलें होतें व सकवारबाईच्या दासी नेहमीं लक्ष्मीबाई व विरूबाई यांच्या पाळतीवर ज्या असत, त्यांनीं ही महत्त्वाची बातमी आपल्या धनिणीला तेव्हांच

जाऊन कळविली. सकवारबाईला जसा विरूबाई हा आपल्या वाटेंतील कांटा वाटे त्याप्रमाणेंच लक्ष्मी हा देखील कांटा वाटूं लागला होता. विरूबाईविषयीं महाराजांचें मन कलुषित केल्यावर तिला आशा वाटत होती, कीं आतां तरी आपण महाराजांना पूर्णपणें आपल्या मुठींत आणूं. पण तेवढ्यांत लक्ष्मी आली. ही बयादेखील विरूबाईप्रमाणेंच महाराजांवर आपली छाप ठेवूं शकते कीं काय, असें सकवारबाईला जबरदस्त भय वाटत होतें. हें भय इतकें तीव्र भासण्याचें कारण लक्ष्मी ही प्रतिनिधीकडून महाराजांकडे आली होती; व पेशवे आणि विरूबाई यांची जशी आजवर गट्टी जमली होती तशीच प्रतिनिधि व लक्ष्मी यांचीही गट्टी जमून प्रतिनिधि महाराजांपाशीं स्वतःचा यथास्थित जम बसविण्याच्या इरादानें लक्ष्मीला डोक्यावर चढवावयाला कमी करणार नाहींत; तसें झालें तर अखेर विरूबाईच्या बदली लक्ष्मीच्या मुठींत महाराज जाणार व महाराज पूर्वीप्रमाणेंच आपणाकडे दुर्लक्ष्य करणार याविषयीं सकवारबाईला शंका नव्हती. ह्या भावी संकटाचें वेळींच निराकरण करण्यासाठीं तिला लक्ष्मीच्या विरुद्ध महाराजांचे कान फुंकण्याला पुरावा पाहिजे होता. हा पुरावा लक्ष्मीच्या बदनेकीचा असल्याशिवाय तो परिणामकारक होणार नाहीं अशी सकवारबाईची खात्री होती. विरूबाईचा पाडाव करण्याच्या बाबतींत तिला आजवर जे श्रम करावे लागले होते, त्या अनुभवानें तिला महाराजांच्या प्रियतमा महाराजांना नावडत्या होण्याचें हें वर्म उमगून दिलें होतें. एखाद्या माणसाची अत्यंत प्रिय अशी वस्तु त्याच्या हातची गेल्या-शिवाय अथवा त्याला अत्यंत अप्रिय अशी गोष्ट त्याच्या प्रिय माणसाच्या हातून घडल्याशिवाय कोणाला खरी चीड येत नाहीं, किंवा आपल्या प्रिय माणसांविषयीं अप्रियता वाटूं लागत नाहीं. सकवारबाईनें सगुणाबाईच्या—आपल्या समदुःखी सवतीच्या साह्यानें आजवर महाराजांपाशीं विरूबाईविषयीं नानाप्रकारच्या चुगल्या करून पाहिल्या; पण महाराजांच्या मनावर त्यांचा काडी-इतकादेखील परिणाम झाला नाहीं. उलट ह्या दोन्ही राण्या मात्र महाराजांच्या दृष्टीनें चुगलखोर ठरल्या व त्या पूर्वीच्याहून जास्त अप्रिय वाटूं लागल्या. हा जो महाराजांचा त्या राण्यांच्या चुगलखोरीवर विश्वास बसला नाहीं, तो विरूबाईवर त्यांचा पूर्ण विश्वास होता म्हणून नाहीं. विरूबाई ही सर्वच बाबींत विश्वासार्ह साध्वी होती ही गोष्ट निराळी; पण महाराजांचा तिच्याठायींचा विश्वास हा तिच्या अंगच्या विश्वासूपणामुळें व राजकार्यधुरंधरतेमुळें उत्पन्न झालेला डोळस विश्वास

नसून तो अंधविश्वास कामुक विश्वास होता. विरूबाईच्या पवित्र प्रेमाची थोरवी कळण्याइतकी नैतिक थोरवी महाराजांच्या ठायीं नव्हती. ती एक विलासपारंगत मधु-भाषिणी सौंदर्यवती अशी आपली नाटकशाळा आहे म्हणूनच महाराज तिच्या ठायीं परमावधीचे आसक्त होते. ही त्यांची तिच्या ठायींची आसक्ति कमी होण्याला उपाय एकच; विरूबाई दुराचारी आहे असें खऱ्या किंवा खोट्या कारणांनीं महाराजांना पटवून देणें हाच तो उपाय. हें ओळखून सकवारबाईनें विरूबाई वसवंतरावाबरोबर समुद्रस्नाना-ला गेल्याची संधि साधून आपला कावा साधला होता, व तो यशस्वीही झाला होता. तेव्हांपासून तिनें महाराजांचें वर्म ओळखलें होतें कीं, आपल्या बरोबरीची कोणतीही राणी अथवा कोणतीही नाटकशाळा यांच्याविषयीं खराखुरा सवतीमत्सर साधण्याचा रामबाण उपाय हाच एक होय; कीं ती स्त्री महाराजांशीं विश्वासघात करते असें सिद्ध करावयाचें. इतर राण्यांचें भाग्य थोर कीं, त्यांपैकीं महाराजांना नादीं लावण्या-इतकें मोहकत्व त्यांच्यापैकीं एकीच्याही अंगीं नव्हतें. त्या सर्वच समदुःखी होत्या. त्यामुळें त्यांच्या शीलाची असल्या खोडसाळ उपायांनीं शेकोटी पेटविण्याचें सकवारबाईला तादृश प्रयोजन नव्हतें. तें मोहकत्व विरूबाईच्या ठायीं होतें, म्हणून तिचें बद्वर्तन प्रस्थापित करण्यासाठीं सकवारबाईनें इतके खटाटोप केले, व तिच्या मागाहून आलेल्या लक्ष्मीबाईचा उठावा करण्यासाठीं देखील तोच यशस्वी उपाय अमलांत आणला पाहिजे असें तिच्या मनानें घेतलें होतें.

हा उपाय अमलांत आणावयाचा असें ठरलें; पण त्याची सिद्धता तर झाली पाहिजे! विरूबाईच्या बाबतींत बळी देण्याला एक बसवंतराव सांपडला, तसा लक्ष्मीच्या बाबतींत तर कोणी सांपडला पाहिजे! तो आज तिला अनायासें सांपडला. तिच्या दासीनें तिला वर्दी दिली कीं, कोणी तरी मनुष्य लक्ष्मीबाईच्या महालांत बोलत आहे. त्याबरोबर सकवारबाईच्या आनंदाला पारावार उरला नाहीं. 'चोर पकडावा मोटे व जार पकडावा खाटे' या न्यायानें तिनें लक्ष्मीच्या त्या दोस्ताला पकडण्याचें तर ठरविलेंच; पण हें कार्यदेखील तिला अगदीं बिनबोभाटपणें या कानाचें त्या कानाला न कळतां पार पाडावयाचें होतें. विरूबाईवर दुराचाराचें किटाळ रचण्यांत ती जशी नामानिराळी होती, तशीच नामानिराळी ती ह्याही बाबतींत राहूं इच्छीत होती. तेवढ्यासाठीं ती तशीच रातोरात किल्ल्यावर गेली, किल्लेदाराला भेटली, त्याला तिनें त्या मनुष्याला पकडण्याला सांगितलें, व किल्लेदारानें ही गोष्ट मनःपूर्वक करावी म्हणून त्याच्या मनांत जुलियेविषयीं काळेंबेरें भरवून दिलें.

किल्लेदाराचें वर्मदेखील तिनें कसें बरोबर ओळखलें. म्हातारे किंवा बाहेरछंदी नवरे आपल्या स्त्रियांच्या चारित्र्याविषयीं संशयग्रस्त असतात ही मानवी स्वभावांतील गोम ओळखूनच सकवारबाई वागत होती. इतकेंही करून किल्लेदार वेळीं इरेला पेटला नाहीं तरी त्याला भिववितां यावें म्हणून तिनें त्याच्यावर पहिल्याच सपाट्याला फितुरीचा आरोप केला होता.

हा सकवारबाईचा डाव साधला. ज्या मनुष्याच्या नांवानें तिनें लक्ष्मीचें दुर्वर्तन सिद्ध करण्याचें ठरविलें होतें, तो मनुष्य आतां परस्पर किल्लेदाराच्या हातून कैद केला जाणार व आपण तळत्या कढईतील करंजी मांजराच्या पायानें ओढून खाण्याचें श्रेय—करंजी हातीं आली तर अनायासें आपल्या मुखांत पडली व पाय भाजला तर मांजराचा भाजला अशा थाटाचें निर्मळ श्रेय—साधणार, एवढी तिची खात्री झाल्यावर ती बाकीच्या गोष्टींची पर्वा कशाला करते ! ती किल्लेदाराच्या प्रश्नाला उडवाउडवीचीं उत्तरें देऊन लगबगीनें तेथून निघाली. कारण न जाणो, आपणाला कोणीं—विशेषतः त्या मनुष्यानें पाहिलें तर संशयाला नसते डेळेफांटे फुटावयाचे !

सकवारबाई आपला कार्यभाग होतांच निघून गेली. तिनें जातां जातां जुलियेच्या चारित्र्याविषयींचा प्रश्न नुसत्या उडत्या चौकशीनें दूर सारण्याचा किल्लेदाराला उपदेश केला खरा; पण किल्लेदाराला तो उपदेश कसा रुचणार ! ज्याचें जळतें त्याला कळतें. तिकडे लक्ष्मीबाई दुराचारी असो अथवा आणखी कोणी कांहीं असो, त्याला त्याचा विधिनिषेध थोडाच होता ! त्याला त्या प्रकाराची अत्यंत चीड आली होती ती जुलियेच्या दुर्वर्तनाविषयीं ! यावेळीं जर जुलिया अथवा तिचा तो दोस्त हातीं लागता तर त्याला तेथल्या तेथें कंठस्नान घालण्याइतका किल्लेदार चिडला होता. त्या चिरडीच्या भरांत काय करूं व काय न करूं असें त्याला होऊन गेलें होतें. त्याच्या क्रोधानलांत तेल ओतण्यासाठींच कीं काय, किल्ल्याच्या मुख्य दरवाजावरील रखवालदारानें तेथें येऊन वर्दी दिली, " किल्लेदारसाहेब ! भोजराजाला कैद करून आणण्यांत आलें आहे. ते लोक किल्ल्यांत येऊं इच्छीत आहेत. त्यांना आंत घ्यावयाचें का ?

" त्यांना आंत घेऊन माझ्यासमोर आणा." किल्लेदाराचा हुकूम झाला.

रखवालदार हुकमाची तामिली करण्यासाठीं निघून गेला. इतक्यांत किल्लेदाराला काय वाटलें कोण जाणे, तो भुयाराच्या दरवाजावरील पहारेकऱ्याला हांक मारून म्हणाला, " उस्मान ! तूं एथें पूर्ववत् पहारा करावयाचा. माझ्या हुकुमाशिवाय कोणाला आंत घ्यावयाचें नाहीं अथवा बाहेर सोडावयाचें नाहीं."

" जसा किल्लेदारसाहेबांचा हुकूम ! " उस्मान म्हणाला. किल्लेदाराची त्याच्याकडे पाठ फिरण्याचाच काय तो अवकाश; लगेच तो मागाहून किल्लेदाराला अनुलक्षून माकडचेष्टा करूं लागला. आतांच राणी व किल्लेदार यांचें संभाषण झालेलें त्यानें आडून ऐकलें होतें, व त्यावरून जुलियेच्या बाबतींत किल्लेदाराचा कसा फजीतवाडा झाला आहे हें त्याला कळून चुकलें होतें. त्याला अनुलक्षूनच आतां त्याला माकडचेष्टा आठवूं लागल्या होत्या.

इतक्यांत भुयारांतून एक बुरखेवाली व्यक्ति हलकेच वर आली व थेट किल्लेदाराच्या राहत्या घराकडे निघाली. ती व्यक्ति चार पावलें दूर जाते न जाते तोंच उस्मानचें तिकडे लक्ष गेलें. तो तेथूनच दरडावून ओरडला, " बदमाष ! खडे रहो ! "

## प्रकरण बारावें

# वादळाचीं पूर्वचिन्हें

बाजीराव राणोजीसह सुमंतांच्या भेटीसाठीं त्यांच्या वाड्यांत येऊन पहातो तों सुमंत वाड्यांत नाहींत! नोकरांचाकरांपाशीं तपास करतां कांहींच समाधानकारक उत्तर मिळेना. धनीसाहेब वाड्यांत नाहींत एवढें प्रत्येकानें सांगावें; पण ते कुठें गेले, हें सांगण्याला मात्र कोणीच तयार नाहीं. कोणीं म्हणावें, ते महाराजांच्या भेटीला गेले असतील. आणखी कोणीं कांहीं तर कोणीं कांहीं म्हणावें. थोड्या वेळापूर्वीं राणोजी तपास लावून गेला तेव्हां ज्या नोकरांनीं सुमंत औरंगाबादेकडे जाण्यासाठीं निघाले आहेत असें त्याला सांगितलें होतें, ते लोकदेखील आतां कानांवर हात ठेवूं लागले. प्रथम तरी त्यांनीं राणोजीला जी बातमी सांगितली, ती तो राणोजी हें ओळखून थोडीच सांगितली होती ! राणोजी तेव्हां बेमालूम वेषांतर करून निजामी पाहुण्यांच्या तैनातींतील एक सेवक बनला होता, म्हणून त्याला तेवढा भेद घेतां आला. पण आतां राणोजी खऱ्या स्वरूपांत प्रगट होतांच व बाजीराव त्याच्याबरोबर आलेला पहातांच सर्व पारडें फिरलें. बाजिरावानें त्या लोकांच्या मनांत विश्वास उत्पन्न करण्यासाठीं पुष्कळ लाडीगोडी केली; पण व्यर्थ !

पण सुमंत कोठें गेले तें बाजीराव व राणोजी यांना अगोदरच माहीत होतें, त्यामुळें त्यांचें कांहींच अडलें नाहीं. अडलें तें एवढेंच कीं, बाजिरावाची व सुमंतांची भेट झाली असती, तर त्यानें त्यांना चार समजुतीच्या गोष्टी सांगून त्यांना प्रतिनिधीच्या पापाचे भागीदार होण्यापासून परावृत्त करण्याचा प्रयत्न केला असता. अर्थात् तो प्रयत्न केला असता; पण तो म्हणजे यशस्वी झाला असताच असें नाहीं.

पण आतां तो प्रश्नच मिटला होता. सुमंतच भेटले नाहींत, मग ह्या विचाराचा काय उपयोग !

“ राणोजी ! आतां कसें करावयाचें ? ” बाजिरावानें आपल्या घोड्याच्या पाठीवर आपल्या डाव्या अंगाचा तोल टाकून उभा राहिल्या राहिल्या विचारलें.

“ धनीसाहेब ! हें काय विचारतां ? ” राणोजी उत्तरला, “ आपण जें काम हातीं घेतलें, तें तडीला लागेपर्यंत हा प्रश्न उत्पन्न होण्याचीच वास्तविक आवश्यकता नाहीं.”

" तें खरें; पण आपल्या ह्या पाठलागाला कदाचित् मोहिमेचें स्वरूप येण्याचा फार संभव आहे. तसें जर झालें, तर तेथें प्रतिपक्षासमोर आपला दोघांचा कसा टिकाव लागेल ? "

" हो ! तेंही खरेंच. आपणाला मनुष्यबळ पाहिजे."

" आतां कसें बोललास ! " क्षणभर विचार करून बाजीराव म्हणाला, " तेव्हां आपण असें करूं,—मी पुढें होतों. तूं माझ्या मागोमाग आपले निवडक पंचवीस लोक बरोबर घेऊन ये. आतां आपण कोणत्या मार्गानें जावयाचें हा एक प्रश्नच आहे; पण प्रथम आपण राजमार्गानें जाऊं तर खरे ! सुमंत काय अथवा इतर मंडळी काय, कोस दोन कोसांच्या टापूपलीकडे खास गेले नसतील. त्यांना आपण सहज गांठूं शकूं."

राणोजीला बाजिरावाचा हा सल्ला पटला. तो म्हणाला, " ठीक आहे. आपण पुढें व्हा; मी लौकरच आपल्या मागोमाग येतों. आपणाला काय किंवा मला काय, त्या मंडळींचा तपास करावयाला फारसा त्रास पडावयाचा नाहीं. आमचे हेर जागोजागीं विखुरलेले आहेत, त्यांतला कोणी ना कोणी आपणांला भेटेल."

" मग मी येऊं तर ? " बाजिरावानें घोड्यावर स्वार होतां होतां विचारलें.

" हो ! या." असें म्हणून राणोजीही आपल्या घोड्यावर स्वार झाला.

दोघेही दाने दिशांना आपापले घोडे दौडीत चालूं लागले. राणोजी प्रथम जो निघाला, तो आपल्या मकाणाकडे निघाला. आज रात्रभर त्याला घरीं जाण्याला सवड मिळाली नव्हती, ती आतां मिळाली. ही सवड त्यानें मुद्दाम घेतली अशांतला प्रकार नाहीं; सहज सवड मिळाली. त्याला शतवीरांच्या पथकांतील पंचवीस स्वार जे आपल्या बरोबर घ्यावयाचे होते, त्यांच्यांतल्या कांहींचीं घरें त्याच्या घराच्या आजूबाजूला होतीं, म्हणून तो तिकडे निघाला. आतां, हें कर्तव्य पार पाडीत असतां त्याला जर जातां जातां आपल्या घरच्या मंडळींचा समाचार घेण्याला सवड मिळाली, तर त्या संधीचा त्यानें कां उपयोग करून घेऊं नये !

ही राणोजीची इच्छा शुभ होती; पण ती शुभवेळीं झालेली इच्छा नव्हती. तो आपल्या घराकडच्या वाटेनें शेंपन्नास कदमें जातो न जातो तोंच एका घराच्या आडवशाला उभा असलेल्या रहमाननें अचानक पुढें येऊन त्याचा घोडा अडविला व अमंगलसूचक निवेदन केलें, " राणोजी ! घात झाला रे घात झाला ! "

" काय झालें ? " राणोजीनें घोडा थांबवून विचारलें.

" तुम्ही सर्व सारी रात्र कोठें होतां ? " रहमाननें संशयास्पद दृष्टीनें सभोंवार पहात विचारलें.

" कां ? आम्ही साताऱ्यांतच होतों." राणोजी उत्तरला.

राणोजीचें हें उत्तर कांहींसें आडमुठेपणाचें होतें. तसें उत्तर त्यानें दिलें याचें कारण रहमान हा किल्ल्यावरील माणूस आहे हें त्याला कळलें होतें, व किल्ल्यावरील बहुतेक लोकांना प्रतिनिधीनें फितूर केल्याचें त्याला माहीत होतें. त्याच्या उत्तरांतील आडमुठेपणा रहमाननें तेव्हांच ओळखला, व त्याला म्हटलें, " राणोजी ! तूं माझ्याशीं असा परक्यासारखा बोलूं नकोस. तूं असें उडवाउडवीचें उत्तर कां दिलेंस हें मी जाणतों. पण तुला वाटतें तसा मी फितूर नाहीं. मी जें बोलतों आहें, तें तुमचा कैवारी म्हणूनच बोलतों आहें."

रहमान बोलतां बोलतां प्रत्येक शब्दागणित भीतीनें थरथर कांपत सभोंवार पहात होता. तेवढ्या मुदतींत राणोजीनें त्याचें आपादमस्तक निरीक्षण केलें, तेव्हां त्याच्या अंगांवरील कपडे रक्तानें भिजलेले व जागोजागीं फाटलेले दिसले त्याच्या सर्वांगावर जखमाही झालेल्या दिसल्या. असें कां झालें, हा राणोजीला तरी प्रश्नच होता. त्यानें रहमानला विचारलें, " पण तूं असा रक्तानें न्हालास कशानें ? तुझी अशी दशा कां झाली ? "

रहमान पूर्ववत् संशयी मुद्रेनें सभोंवार पहात उत्तरला, " माझी अशी दशा तुमचा मी कैवार घेतल्यामुळें झाली. तुमच्या बायकामुलांना भयंकर छळांत जाळण्यासाठीं तुमच्या शत्रूंनीं जो वणवा पेटविला आहे, तो वणवा विझविण्यासाठीं मला ह्या घटकेपर्यंत त्यावर माझ्या रक्ताचें पाणी शिंपावें लागलें."

रहमानच्या ह्या कळवळ्याच्या बोलांवरून तो विश्वासार्ह माणूस असावा असें राणोजीला वाटूं लागलें. त्यानें मनमोकळ्या उतावळेपणानें विचारलें, " रहमान ! असें रे काय ? काय झालें तें नीट सांगशील कीं नाहीं ? "

रहमान म्हणाला, " अरे गड्या ! आतां बोलत व ऐकत बसावयाला वेळ नाहीं. असाच्या असा माझ्या मागोमाग चल, तरच कांहीं तरणोपाय आहे. वाटेनें मी तुला सर्व सांगतों."

" पण चल कुठें ? "

" माझ्या मागोमाग तूं चल ना ? "

राणोजी जास्त आढेवेढे न घेतां रहमानच्या मागोमाग हळूहळू आपला घोडा चालवीत चालूं लागला. वाटेनें जातां जातां रहमाननें त्याला क्रमानें सर्व हकीकत जशी घडली तशी निवेदन केली. ती ऐकून राणोजीच्या अंतःकारणाचें पाणी पाणी झालें. त्यानें विचारलें, " पण गौतमा, कमळा व नूरनिहार यांचें पुढें काय झालें ? "

" कमळा तेथेंच आपल्या घरासमोर बेशुद्ध पडली होती. तिचें काय झालें हें आम्हांला कांहीं कळलें नाहीं. मी मात्र तेवढ्यांत डोळा चुकवून निसटलों, व ते हैवान भोजराजाचा छळ करण्यांत रंगून राहिले होते ती संधि साधून प्रथम मागील दरवाजाची कडी काढून घरांत ज्या कोणी जिवंत सांपडतील त्यांना मार्ग मोकळा करून दिला. गौतमा व नूरनिहार माझ्या मागोमाग पळूं लागल्या. त्यांना शेजारच्या कोणाच्याशा घरांत तात्पुरता आश्रय मिळाला, व मी त्यांच्या बचावाची कांहीं तरी खटपट करण्यासाठीं तेथून जों पळालों, तों मी पुढें व माझें दुर्दैव हात धुवून माझ्यामागें, अशी पळापळ ह्या घटकेपर्यंत एकसारखी चालली आहे. किल्लेदाराच्या सांगण्यावरून मी व नूरनिहार अशीं दोघें पिलाजीच्या घरीं त्याच्या बायकोचा समाचार घेण्यासाठीं म्हणून प्रथम किल्ल्याबाहेर पडलों. पुढें अबुबकर वगैरे दुरात्म्यांनीं जो हा एवढा अत्याचार केला त्याबद्दल किल्लेदारापाशीं दाद मागतां येईल व त्याच्या साह्यानें नूरनिहार, गौतमा वगैरे मंडळींच्या रक्षणाची कांहींतरी तजवीज करतां येईल ह्या आशेनें मी प्रथम किल्ल्यावर गेलों, तों तेथें मला साराच उलटा जमाना आढळून आला. किल्लेदाराचा सक्त हुकूम कीं आपल्या परवानगी-शिवाय कोणाला किल्ल्यांत घ्यावयाचें नाहीं, व रहमान किंवा नूरनिहार हीं दोन्ही हातीं सांपडल्यास त्यांना तेथल्या तेथें कैद करावयाची ! माझी व पहारेकऱ्यांची ओळख होती, म्हणून त्यांनीं मला ह्या परिस्थितीची समज दिली व तेथून जावयाला सांगितलें. तेथून मी अदालतीच्या वाड्यांत गेलों. बाजीरावसाहेब तेथें भेटतील व कांहीं दाद लागेल अशी आशा होती; पण तीही व्यर्थ ठरली उलट तिकडून येतांना अशी अनिष्ट बातमी माझ्या कानांवर आली कीं, मी व नूरनिहार जिवंत हातीं लागलों तर जिवंत, नाहीं-पेक्षां आमचे मुड्दे पाडून किल्ल्यावर हजर करण्यासाठीं किल्लेदाराचे लोक पहांटे-पासून नगरभर हिंडत आहेत."

" पण किल्लेदाराला तुम्हां दोघांवर इतकें चिडण्याचें कारण काय ? "

" कारण काय म्हणजे ! कारण आहे. आणि तेंही लेचेंपेचें नाहीं; चांगलें भर-भक्कम कारण आहे."

" तें कोणतें पण ? "

" अरे बाबा ! अबुबकर व त्याचे साथीदार यांना आम्हीं दोघांनींच कंठस्नान घातलें असें मीं आतांच तुला सांगितलें ना ? "

" हो ! खरेंच ! "

" मग ? शिवाय त्यांत भर पडली असेल किल्लेदाराच्या बायकोच्या शिकवणीची ! ती पोरगी कांहीं कमी छटेल नाहीं ! प्रत्यक्ष किल्लेदाराचा कोणी मुड्दा पाडला असता तरी ती इतकी खवळली नसती. पण तिच्या दिल्प्याऱ्या अबुबकरवर संकट कोसळलेलें तिला कसें सहन होईल ! "

" अशी किल्लेदाराची बायको बद्नेकीची आहे तर एकूण ! "

" म्हणजे ! हें काय विचारतोस ? इतके दिवस साताऱ्यांत राहून तुला एवढें देखील माहीत नाहीं ? " इतक्यांत मागाहून कुणाचीशी चाहूल लागली म्हणून रहमाननें दचकत मागें वळून पाहिलें, तों दुरून कोणीतरी टेहळणी करीत येत असल्याचें त्याला आढळलें.

" तिकडे काय पहातोस ? " राणोजीनें विचारलें. त्याचें त्या टेहळणीवाल्या माणसाकडे लक्ष्य गेलें नव्हतें.

" तुझ्यापाशीं तिरकमठा आहे ? "

" नाहीं."

" बरें; बंदुक तरी ? "

" हो ! बंदूक आहे."

" भरलेली आहे ? "

" हो ! "

" मग ती जरा इकडे दे पाहूं ! "

" पण ती घेऊन तूं काय करणार ? "

" तें मग सांगतों. दे, ती इकडे दे." रहमान सभोंवार पहात म्हणाला. एवढे शब्द उच्चारतांना त्याला पूर्वी जो एकच मनुष्य टेहळणी करतांना दिसला होता, ते आतां चार दिशांना चार—नव्हे, दहा दिशांना दहा दिसूं लागले. त्यानें राणोजीच्या हातांतील बंदूक हिसकून घेतली व पहिल्या टेहळणीवाल्यावर नेम धरून आतां चाप ओढणार तोंच बाजूनें सूं सूं करीत एक तीर आला तो नेमका त्याच्या उजव्या हाताला चाटून गेला. बंदुकीचा चाप तेवढ्यांत ओढला जाऊन गोळी उडाली; पण हात

ढळल्यामुळें नेम चुकून ती वायां गेली. इतक्यांत एकामागून एक असे आणखी तीन तीर सूं सूं करीत आले. त्यांतले दोन राणोजीच्या मांडीखालील घोड्याला घायाळ करण्याच्या कामीं आले व तिसरा तीर राणोजीच्या डाव्या पोटरींत घुसला. घोडा घायाळ असल्यामुळें सैरावैरा उधळला व राणोजीचा डावा पाय असा जखमी झाला असल्यानें त्याला मांड बरोबर साधणें अवघड जाऊं लागलें. तरीही राणोजी कसलेला घोडेस्वार होता म्हणून बरें. त्या जागीं जर दुसरा कोणी असता, तर घोडा चौफेर उधळला आहे व स्वतःलाही जखम झाली आहे अशा स्थितींत धरणीवरच कोसळला असता; अथवा घोड्याच्या टापांखालीं त्याचा चेंदामेंदा झाला असता.

इतका अनर्थ होतो आहे, सभोंवार तीरांचा मारा सुरूच आहे, अशा स्थितींत राणोजीनें रहमानला विचारलें, "आतां काय करावें ?"

"घोडा पिसाळला आहे; तूं प्रथम खालीं उतर." रहमान म्हणाला, "शत्रूंनीं आपणाला घेरलें आहे हें तर खरेंच; पण त्यांतूनही आपणाला वाट काढून आमच्या बहिणींच्या अब्रूचें संरक्षण करण्यासाठीं गेलें पाहिजे."

राणोजी क्षणभर स्तब्ध होऊन एकंदर परिस्थितीचा विचार करूं लागला. तो जरी ह्या अरिष्टांत सांपडला होता, तरी बाजिरावानें त्याच्यावर सोंपविलेल्या कामगिरीचा त्याला विसर पडला नव्हता. आपण जर ह्या गोंधळांत वेळ गमावला, तर बाजिरावाच्या मदतीला जाण्याला आपणाला उशीर होईल, व तेवढ्यांत जर बाजिरावाला प्रतिपक्षाशीं सामना करणें प्राप्त झालें, तर मोठा अनर्थ गुदरेल; ही अडचण अर्थात् रहमानला किंवा दुसऱ्या कोणालाही सांगण्याजोगी नव्हती. तरीही त्यानें मोघम शब्दांत रहमानला सांगितलें, "रहमान! माझ्या मागें अत्यंत निकडीचें काम आहे. तें जर वेळींच झालें नाहीं, तर मोठा अनर्थ ओढवण्याचा संभव आहे. तेव्हां मी म्हणतों, आपण ऐथून पाय काढावा हें चांगलें. आपले शत्रु अजून दूर आहेत. त्यांचा डोळा चुकवून आपणाला वाट काढतां येण्याजोगी आहे. तूं पाहिजे तर असें कर, माझ्यामागें माझ्याच घोड्यावर बैस. आपण हां हां म्हणतां शत्रूंच्या डोळ्यांत धूळ फेंकून निघून जाऊं."

"अहारे रड्या! मी स्वतः मरणाला भितों असें का तुला वाटतें? मला माझाच जीव वांचवावयाचा असता तर मला अन्य मार्ग पुष्कळ होते.—"

"मला माहीत आहे; तूं त्या नूरनिहारसाठीं धडपड करीत आहेस. पण वेड्या! त्या पोरीलाच असें काय सोनें लागलें आहे! तूं आतां माझ्याबरोबर चल

मग मी बाजिरावसाहेबांना सांगून नूरनिहारपेक्षांही खुबसुरत अशी एक कुळंबीण तुला बक्षीस देववीन. म्हणजे तर झालें ना ? " राणोजींनें विचारलें.

राणोजीच्या ह्या बोलण्यांत कुत्सितपणाचा लवलेशही नव्हता. त्यानें फार दिवसांपासून रहमान व नूरनिहार यांची दोस्ती असल्याचें ऐकिलें होतें. नूरनिहार ही एक बेवारशी स्त्री व रहमान हा एक बिन् लग्नाचा उमदा मुसलमान जवान, तेव्हां तीं दोघें एकमेकांवर अनुरक्त असण्यांत राणोजीला वावगें असें कांहींच दिसलें नाहीं. त्यालाच काय पण दुसऱ्या कोणालाही त्यांत कांहीं वावगें दिसलें नसतें. वावगें दिसलेंच असतें तर एवढेंच वावगें दिसलें असतें किंवा दिसत होतें कीं नूरनिहार ही एक उनाड पोरटी, तिच्यासाठीं ह्या खुळा माणूस इतका जीव कां सांडतो ! नूरनिहार ही जगाच्या दृष्टीनें उनाड व उंडगी ठरलेली स्त्री ! नटव्या तिच्या नखरेलपणामुळें लोक तिच्यावर भाळतात व ती सर्वांना खेळवते, असाच सर्वांचा समज होता. परवां तिच्यावर किल्लेदाराचें मन बसलें, कांहीं दिवसांनीं तिनें किल्लेदाराला धुडकावून रहमानशीं दोस्ती केली, पिलाजी जाधवाशीं तिचा प्रथमपासूनच दोस्ती होती, अबुबकर तिच्या मागाहून लाळ घोटीतच होता, इतक्या सर्वांना झुलविणारी ती छटेल कार्टी ती काय, व तिच्या अब्रूसाठीं रहमान झटतो तो काय, असा राणोजींचा प्रामाणिक गैरसमज होता. राणोजीच्या मतानें नूरनिहारच्या बाबतींत अब्रू-बेअब्रूची गोष्टच काढावयाला नको होती. इतकेंच काय; पण रहमान जो तिच्या रक्षणासाठीं धडपड करतो तो तिच्या अब्रूचें संरक्षण व्हावें म्हणून करीत नसून तिच्यापुढें पुढें करून तिची मर्जी संपादन करतां आली तर पहावी असा त्याचा डाव असल्याचा राणोजीला जबर संशय होता. पिलाजीला नूरनिहारनेंच वांचविलें, हें कळल्यापासून तर नूरनिहारविषयीं त्याला आदर वाटण्याचें बाजूलाच राहून उलट तिचा जास्त तिरस्कार मात्र वाटूं लागला होता व तो कां, तर पिलाजीसारखा नरवीर ह्या कुलटेच्या मोहपाशांत आतां आणखी गुरफटला जाणार म्हणून !

हें राणोजीचें ठीक होतें. तो जें बोलला, तें रहमानच्या मनाला लागावें ह्या इराद्यानें मुळींच बोलला नाहीं. उलट त्याला सावध करण्याच्या इराद्यानें बोलला. पण रहमानच्या मनाला मात्र ते शब्द पराकाष्ठेचे झोंबले. त्याला जितका नूरनिहारच्या सद्वर्तनाविषयीं अभिमान होता, त्यापेक्षांही स्वतःच्या सद्वर्तनाविषयीं जास्त अभिमान होता. तो खवळून म्हणाला, " राणोजी ! असें बोलणाराच्या तोंडांत किडे पडतील !"

"तर काय! नूरनिहार मोठी पतिव्रताच असेल! ती आजवर काय काय खेळ खेळली तें मला माहीत नाहीं काय! आणि असल्या उठवळ पोरटीसाठीं तुझ्यासारखा मर्द आपलें जीवित धोक्यांत घालावयाला तयार होतो! वेडा रे वेडा! चल, लौकर माझ्या पाठीशीं घोड्यावर बैस ये."

रहमाननें यावर कठोर व सडेतोड शब्दांनीं राणोजीची खाशी कानउघाडणी केली असती. पण त्याला तसें करण्यापुरता वेळच मिळाला नाहीं. आणखी एक तीर सोंसावत जो आला तो राणोजींच्या घोड्याच्या बरगडींत अगदीं खोल घुसला व घोड्याला तें दुःख असह्य होऊन त्यानें एकदम अंग टाकलें. राणोजी तेवढ्यांत सावध होऊन खालीं उडी टाकतो न टाकतो, तोंच त्याला देखील घोड्याबरोबर एक कलाटणी खावी लागली. त्यांतून अंग सांवरून तो पळणार, तोंच चोहोंकडून चांगले पांच सहा सशस्त्र सैनिक त्यांचा पाठलाग करीत दौडत आले.

"राणोजी! आतां आपली सुटका नाहीं. तरी पण आपण आपलें कर्तव्य केलें पाहिजे. गौतमा, कमळा व नूरनिहार यांच्या साह्यासाठीं आपण धावून गेलें पाहिजे. चल, पळूं लाग. मरण हें तर ठेवलेलेंच आहे. पण तुझ्या बहिणींच्या अब्रूची तुला कांहीं चाड असेल तर त्यांच्या रक्षणासाठीं चल. नेम काय सांगावा, त्या तिघींबरोबर वेळीं तुझ्या बायकोच्याही अब्रूवर घोरपड आली नसेल कशावरून!"

रहमानच्या पांडित्याचा राणोजींच्या मनावर एरव्हीं फारसा परिणाम झाला नसता व झाला नव्हताही. पण त्यानें अखेरचे जे शब्द उच्चारले, ते मात्र त्याच्या जिव्हारीं जाऊन झोंबले. प्रतिनिधींशीं फितूर झालेले लोक आपल्यादेखील वाइटावर आहेत व ते वेळीं आपला राग आपल्या बायकोवर काढण्याला देखील कमी करणार नाहींत अशी जबर शंका त्याला आली, व तो तसाच पिलाजीच्या घराच्या अनुरोधानें पळत जातां जातां रहमानला म्हणाला, "तूं म्हणतोस तेंही खरें. चल आपण अगोदर तिकडेच जाऊं."

राणोजी पुढें व रहमान त्याच्या मागोमाग असे ते दोघेही पुढें पळत होते व टेहळणीवाले त्यांचा पाठलाग करीत होते. अशी ही शर्यत ते सर्व सदाशिवपुऱ्यांत जाईपर्यंत सारखी चालली होती. राणोजी तेथलाच रहिवासी होता. तो कण्हेरखेडचा वतनदार असला तरी अलीकडे नोकरीच्या निमित्तानें साताऱ्यांतच सदाशिवपुऱ्यांत पिलाजीच्या सोबतीनें रहात असल्यानें त्याला सदाशिवपुऱ्यांत जाण्याच्या दूरच्या व जवळच्या साऱ्या वाटा माहीत होत्या. त्या मधल्या टापूंत अशा वाटाही अनेक

होत्या. आजलाही त्या टापूंत—किंबहुना साऱ्या सातारा शहरभर अशा वाटांचें जाळें विणलें गेल्याचा भास होतो. त्यांपैकींच एका दूरच्या वाटेनें राणोजी मुद्दाम पळत सुटला. जवळची वाट सोडून मुद्दाम दूरच्या वाटेनें पळण्याचें—वाट सोडून आडरानांत जाण्याचें कारण असें कीं, शत्रूंनीं आपला पाठलाग केला तरी त्यांना आपला पत्ता लागूं नये. वस्तुतः राणोजीप्रमाणेंच त्याच्या शत्रूंनाही तेथल्या साऱ्या वाटा परिचित होत्या. पण अमक्या वाटेनें राणोजी पळाला असेल हें त्यांना कसें कळावें ! त्यांनीं स्वाभाविकपणेंच तर्क केला कीं, ज्या अर्थीं रहमान व राणोजी हे दोघे पळत आहेत, त्याअर्थीं ते प्रथम पिलाजीच्या मकाणाकडेच जाणार व तेथें शक्य तितक्या लौकर पोंचतां यावें म्हणून सर्वांत ज्यास्त जवळच्या वाटेनें जाणार. ह्या विचारानें ते जवळच्या वाटेनें दौडत चालले होते.

पण ह्या शर्यतींत दोन्ही पक्षांचा हेतु फसला. टेहळणीवाले राणोजी व रहमान यांच्या अगोदर तेथें जाऊन पोंहोचले; पण रहमान किंवा राणोजी यांपैकीं कोणीच त्यांच्या हातीं लागला नाहीं. बरें; राणोजी व रहमान प्रतिस्पर्ध्यांना चुकविण्यासाठीं जे दूरच्या वाटेनें पळत चालले, ते नेमके काळांच्या जबडयांत चालून गेले. महारदऱ्याकडून सदाशिवपुऱ्यांत येण्याच्या वाटेवर कृष्णेश्वराच्या सभोंवारच्या झाडींत त्यांची नेमकी मल्हारी, व पिराजी व नाथाजी यांना कैद करून बरोबर चालवीत आणणाऱ्या शिपायांशीं गांठ पडली. मल्हारी वगैरेंची ती दशा पाहून राणोजीचे हातपाय गळाल्यासारखे झाले.

"मल्हारी ! हें रे काय ?" राणोजीनें विचारलें.

"हें माझें कर्म ! पण तूं इकडे कुठें चाललास ?" मल्हारीनें विचारलें.

राणोजीला तर मल्हारीची ती दशा पाहून फार खेद झालाच; पण रहमानला देखील आकाश कोसळून आपल्या डोक्यावर पडल्यासारखें वाटूं लागलें. इतका वेळ त्याला आशा वाटत होती कीं, मल्हारी रात्रीं जो कुठें बाहेर गेला होता तो कदाचित् इतक्यांत घरीं आला असेल व गौतमेचें रक्षण करण्याच्या निमित्तानें तरी तो नूरनिहार व कमळा यांचें रक्षण करण्याच्या कामीं येईल. अजूनही आपण जर खरा प्रकार ह्या लोकांच्या कानांवर घातला तर ते आपल्या उपयोगीं पडतील अशा आशेनें त्यानें सर्वांना विनविलें, "बाबांनो ! मल्हारीनें तुमचा अथवा कोणाचा कांहीही गुन्हा केलेला असो, या वेळीं त्यांच्या बायकांच्या अब्रूवर दरोडा

पडत आहे. अशा प्रसंगीं तुम्ही त्याला बंधमुक्त करा व आमच्याबरोबर तुम्हीही त्या अबलांच्या रक्षणासाठीं चला."

"काय ? कोणाच्या अब्रूवर दरोडा पडला ? दरोडा कोणीं घातला ?" मल्हारीनें अत्यंत अस्वस्थ चित्तानें विचारलें.

"हा प्रतिनिधींचा कांहीं तरी कावा असेल !" पिराजी म्हणाला.

"होय. हा प्रतिनिधींचाच,—त्यांच्या पक्षाचाच कावा." राणोजी म्हणाला, "प्रतिनिधींच्या फुसलावणीनें कांहीं पिसाळलेल्या कुत्र्यांनीं पेशव्यांच्या नेकजात नोकरांचा नक्षा उतरविण्याचें हें अधमपणाचें कार्य हातीं घेतलें आहे."

"काय ? प्रतिनिधींचें यांत अंग आहे ?" मल्हारी वगैरेंना धरून आणणाऱ्या एका शिपायानें विचारलें.

"होय." राणोजी पुन्हा उत्तरला.

"तर मग आपणाला त्यांत पडावयाचें नाहीं. प्रतिनिधींच्याच हुकुमानें हे कैदी आमच्या हातीं आले आहेत व त्यांना थेट किल्ल्यावर किल्लेदाराच्या स्वाधीन करणें हें आमचें काम आहे."

"पण वेडयांनो ! तुम्हांला काळवेळेचा कांहीं सुमार आहे कीं नाहीं ? मी म्हणतों, होय; प्रतिनिधि व पेशवे यांच्यांत वैर आहे. पण म्हणून उभय पक्षांच्य नोकरांनींदेखील एकमेकांशीं तसेंच वैर केलें पाहिजे कीं काय ?" राणोजीनें विचारलें.

एक शिपाई म्हणाला, "ते सारें खरें, पण आम्ही आमच्या वरिष्ठांच्या हुकुमाचे ताबेदार आहोंत."

"मग काय ? तुमच्या डोळ्यांसमोर तुमच्या माय-बहिणींची विटंबना होत असली तर तिचादेखील तुम्हीं प्रतिकार करतां कामा नये असा प्रतिनिधींचा तुम्हांला हुकूम आहे ?" रहमाननें विचारलें.

"हो ! असाच हुकूम आहे" दुसरा शिपाई उत्तरला.

बाकीच्या शिपायांनीं त्या शिपायाच्या उत्तरला संमतिदर्शक मान तुकावून पुढें जाण्यासाठीं पाऊल उचललें. मल्हारी, पिराजी व नाथाजी यांनीं राणोजी व रहमान यांच्याकडे पाहिलें. त्यांनीं एकमेकांकडे पाहिलें, त्या वेळीं जर दुसऱ्या कोणीं त्यांच्या दृष्टीकडे पाहिलें असतें, तर ते जिवावर उदार झाल्याचें त्याला स्पष्ट दिसलें असतें. बरोबरच आहे. ते जिवावर उदार कां नाहींत होणार ! पाक रक्ताच्या कुलवंताला आपल्या बायका-बहिणींची अब्रू स्वतःच्या प्राणांहूनही प्रिय

वाटत असते. आतां, असें म्हणावयाचें तर मल्हारी वगैरे तिघांना कैद करून बरोबर चालविणारे शिपाई कुलवंत नव्हते अशांतला प्रकार नाहीं. ते चांगल्या नांवाजलेल्या कुळांत जन्म पावलेले अस्सल मराठे छत्रपति शिवाजीमहाराजांनीं ज्यांच्या बाहुबलाच्या जोरावर हिंदवीच्या हाडवैरी मुसलमानांच्या माना मोडून गोब्राह्मणांचा प्रतिपाल केला व हिंदवी स्वराज्याची स्थापना करून हिंदुस्तानाचें हिंदुस्थान हें नांव सार्थ केलें, इतकेंच काय, पण महाराष्ट्राचें महाराष्ट्र हें नांव देखील ज्या मराठ्यांनीं राखून मराठ्यांचा दरारा दरोबस्त जगाला दाखवून दिला, असे ते उत्तमकुलोत्पन्न मराठे होते. पण तेच मराठे या वेळीं कर्तव्यच्युत बनून भागूबाईसारखे तेथून पळूं लागले ! त्यांनीं पतिव्रतांच्या पातिव्रत्याचें रक्षण करण्या साठीं पंचप्राणांची पंचारती पाजळून आपल्या कर्तव्यदेवतेला प्रसन्न करण्याचें बाजूलाच राहिलें; अनायासें चालून आलेली पर्वणी साधून पावन होण्याच्या संधीची गंगा त्यांच्या-समोर वाहूं लागली तरी त्या वहात्या गंगेंत हात धुऊन घेण्याचीही बुद्धि त्यांना होईना ! याच्या उलट रहमानची गोष्ट होती. तो कांहीं जातकुळीनें त्या मराठ्यांइतका नांवाज लेला नव्हता. केवळ जन्मकुळावरूनच माणसाच्या उच्चनीचतेची कल्पना करावयाची झाली तर रहमान त्या मराठ्यांच्या पासंगालाही पुरला नसता. पण तो आपल्या देशभगिनींच्या बचावासाठीं मरणाच्या मोलानें झटत होता ! पण हें असें चालावयाचेंच ! गांव आहे तेथें म्हारवडा हा असावयाचाच ! 'यथा राजा तथा प्रजा' हा न्याय येथेंही प्रत्ययाला आला यांत नवल काय ! शिवाजीमहाराजांनीं एकीचें बळ अलम् महाराष्ट्रांत शिगेला पोंचवून समाजाचें, राष्ट्राचें व धर्माचें मंगल हेंच महाराष्ट्रांतील मानवमात्राचें एकमात्र पवित्र कर्तव्य होय असें आपल्या उज्ज्वल चारित्र्यानें तेव्हांच्या महाराष्ट्राच्या मनींमानसीं ठसविलें म्हणून तेव्हांचे मराठे तसे निपजले, व शाहूमहाराज असे विलासी आणि स्वाभिमानशून्य वृत्तीचे म्हणून त्यांच्या अमदानींत तेच असले शिळपट बनले. अत्याचारी अविंधांचें पारिपत्य करण्याइतका ज्वलज्जहाल स्वाभिमान जिथें राजाच्याच अंगीं नाहीं, तिथें तो रयतेच्या अंगीं कोठून येईल ? मराठशाहीमधील तेव्हांच्या दुफळीच्या दानवी लीलांना पायबंद लावण्याचें राजाच मनावर घेईना, मग रयतदेखील राजाच्या पावलावर पाऊल टाकून चालली तर नवल काय ! प्रत्यक्ष राजाला देखील जेथें आपल्याच* जातभाईंच्या खूबसुरत कन्यांनीं आपला जनानखाना

* चिटणीसविरचित 'थोरले शाहूमहाराज यांचें चरित्र' पृष्ठ ८८ पहा.

मंडित करून त्यांच्यांशीं विलासविहार करण्यांत धन्यता वाटे, तिथें रयतेला तरी आपल्या धर्मभगिनींच्या अब्रूची खरी किंमत कशी कळावी ! त्यांतल्या त्यांत महाराष्ट्राचें नशीब असें थोर कीं, तेव्हांदेखील सारेच मराठे अशा शिळपट वृत्तीचे नव्हते. प्रतिनिधींना तेव्हां वश झालेल्या लोकांत जरी स्वाभिमानाचा दुष्काळ व स्वार्थपरायणतेचा सुकाळ होता, तरी पेशव्यांच्या पदरीं असलेल्या त्यांच्या अनुचरांच्या अंगीं तो दोष तितकासा जडला नव्हता. जितकें प्रतिनिधि व पेशवे यांच्यांत स्वाभिमानाच्या व कार्यकर्तृत्वाच्या दृष्टीनें अंतर होतें, तितकेंच अंतर त्यांच्या अनुचरांतही होतें, त्यामुळेंच प्रतिनिधीच्या तर्फेचे लोक रहमान व राणोजी यांच्या विनंतीला मान न देतां प्रतिनिधि काय म्हणतील ह्या भयानें तेथून लगबगीनें निघून जाऊं लागले, तरी मल्हारी, पिराजी व नाथाजी यांना तें रुचलें नाहीं. ते पळपुट्यांप्रमाणें तेथून निघून जाण्याला तयार होईनात. मल्हारीनें तर स्पष्ट बोलून दाखविलें, " बस्स ! मी तुमच्याबरोबर येत नाहीं."

" आम्हीही येत नाहीं." पिराजी व नाथाजी एकदम उत्तरले.

" अशा पळपुटेगिरीनें आपला पल्ला येईल असें तुम्हांला वाटतें का ?" एका शिपायानें विचारलें.

" पळपुटेगिरी ? ही कसली पळपुटेगिरी ? आम्ही पळपुटे गडी नाहीं; मर्द मराठे आहों. पळपुटे तुम्ही. निरपराधी अबलांच्या अब्रूचें रक्षण करण्याचें कर्तव्य समोर उभें असतां त्याला लाथाडून पुढें जाणारे तुम्ही पळपुटे ! " मल्हारी त्या शिपायांच्या हातून आपली सुटका करून घेण्यासाठीं धडपड करीत म्हणाला.

" पण महाराजांच्या आज्ञेवरून प्रतिनिधींनीं तुम्हांला कैद करून किल्ल्यावर नेऊन गुदरण्यासाठीं आमच्या हातीं दिलें आहे; तो हुकूम आम्ही अमान्य करणार नाहीं. तुम्ही बऱ्या बोलानें आमच्याबरोबर चालूं लागा." एक शिपाई म्हणाला.

" बऱ्या बोलांनीं तुम्ही आम्हांला सोडा." मल्हारी एका जोराच्या हिसड्यासरसा बंधमुक्त होऊन पिराजी व नाथाजी यांनाही बंधमुक्त करण्यासाठीं झटतां झटतां म्हणाला, " मूर्खांनो ! वरिष्ठाचे हुकूम झाले तरी कोणते पाळावयाचे व कोणते पाळावयाचे नाहींत याचा वेळींवखतीं सारासार विचार करावा लागतो. प्रतिनिधींनीं किंवा महाराजांनीं तुम्हांला हुकूम दिला, तेव्हां त्यांना ह्या वाटेंतील अनपेक्षित अरिष्टाची काय कल्पना होती ? प्रतिनिधि किंवा महाराज तरी माणसेंच आहेत ना ? त्यांना स्त्रीची अब्रू ही काय चीज आहे हें कळतें."

बोलतां बोलतां मल्हारीनें राणोजी व रहमान यांच्या साह्यानें धिराजी व नाथाजी यांची मुक्तता केली. शिपायांनीं प्रथम प्रथम उसनें अवसान दाखविलें, ठार करण्याची धमकी देऊन पाहिली, मग प्रतिनिधि व महाराज ह्या अपराधाबद्दल संतापून शासन करतील असेंही भय घातलें, पण त्याचा कांहींच उपयोग झाला नाहीं. कैदी हातचे सुटले व त्यांना मात्र तेथून जीव घेऊन पळ काढावा लागला. मल्हारी, राणोजी, धिराजी, नाथाजी व रहमान एकजुटीनें पिलाजीच्या घराकडे चालले. तिकडील अनर्थाचा विषय राणोजी व रहमान यांच्या परिचयाचा होता; पण धिराजी, नाथाजी व मल्हारी यांना तो नवाच होता. तो त्यांनीं जातां जातां रहमान व राणोजी यांच्या तोंडून ऐकला व रहमान आणि राणोजी यांनीं महाराजांवर पहांटेच्या प्रहरीं मारेकरी पडलेला वृत्तान्त मल्हारीच्या तोंडून ऐकला. बाजिरावाला कैद करून आणण्याविषयीं प्रतिनिधि महाराजांच्या खास आज्ञेवरून मागाहून येत आहेत असें कळतांच राणोजीनें मात्र बाजीराव सुमंत व निजामाकडील पाहुणे यांच्या पाठलागावर गेल्याचें वर्तमान मुद्दाम कोणाला कळविलें नाहीं. तरीही मस्तानीला घेऊन खतीब कुठें गेला हें जाणण्याची मात्र त्याला उत्कंठा लागून राहिली होती. ती पूर्ण करून घेण्यासाठीं त्यानें मल्हारीपाशीं ती गोष्ट काढली. पण त्याला कांहींच तपास लागेना. त्यांपैकीं कोणीच खतीब अथवा मस्तानीचा मेणा महाराजांच्या छावणींत गेलेला किंवा जातांना पाहिला नव्हता.

"तर मग मला वाटतें, खतिबाच्या डोळ्यांत धूळ फेंकून त्या भामट्यांनीं मस्तानीला पळविली !" राणोजी म्हणाला.

या वार्तेनें सर्वांनाच आश्चर्यचकित करून सोडलें. पण त्या सर्वांसमोर याही-पेक्षां महत्त्वाचा—कमळा, गौतमा व नूरनिहार यांच्या अब्रूचा अवघड प्रश्न सोडव-वयाचा पडल्यामुळें खतीब किंवा मस्तानी यांच्याविषयीं जास्त विचार करण्याला त्यांना अवसर मिळाला नाहीं.

थोड्याच वेळांत ते सर्व पिलाजीच्या घरापाशीं जाऊन पोंचले. तेथें त्यांना जें भयाण दृश्य दिसलें, त्यामुळें सर्वांनाच दुःख वाटलें असेल यांत संशय नाहीं. पण त्यांतल्या-त्यांत मल्हारीला जें दुःख वाटलें, त्याच्या दारुणतेचें कोणीं कसें वर्णन करावें ! तें सर्व घर सताड उघडें पडलेलें, तेथें आंत व बाहेर अनेक मुड्दे पडलेले, त्यांच्या रक्ताची घरांत व आंगणांत सर्वत्र लालच लाल राड झालेली, व त्यांतच जिवाईचा—मल्हारीच्या जन्मदात्या आईचा—मुड्दा अस्ताव्यस्त पडलेला ! जिवाईची ती

दशा झालेली पाहून मल्हारी कितीतरी हळहळला ! त्यानें 'आई ! आई !' असा टाहो फोडून त्या प्रेताला आपल्या पोटाशीं कवटाळून तिचें कितीतरी वेळां चुंबन घेऊन शोक केला ! एखाद्या अजाण पोरासारखा तो आपल्या आईच्या आठवणी काढून ओक्साबोक्शी रडूं लागला. त्या दुःखावेगांत त्याला त्याच्या प्रियतमेची–गौतमेचीही आठवण झाली नाहीं. तरी बरें कीं, त्याचा पितृतुल्य सासरा भोजराज हा किल्लेदाराच्या हुकमावरून कैद झाल्याची बातमी त्याला तेव्हां कळली नाहीं.

मातृशोकाचा पहिला पूर ओसरतांच मल्हारी उठून उभा राहिला व त्यानें दोन्ही हातांनीं आपलीं आंसवें पुसून उद्गार काढले, "कोणत्या नामर्दानें हें नीच कर्म केलें ? अबलेवर आणि तेंही इतक्या वृद्ध अबलेवर शस्त्र उचलणारा हा चांडाळ पुरुष तर नाहींच, स्त्रीही नाहींच, तो कापुरुष असावा." मल्हारी पुन्हा एकवार जिवाईकडे आंसवांनीं डबडबलेल्या करुणपूर्ण दृष्टीनें पाहून लगेच राणोजीकडे वळून म्हणाला, "बस्स ! राणोजी ! माझ्या आईला ठार करणाऱ्या मानवी पशूंच्या रक्तानें मी माझे हात धुवून पवित्र करीन, तेव्हांच तिच्या प्रेताला स्पर्श करून तिचा अंत्यविधि पार पाडीन. चला, चला! आपण त्या चांडाळांना हुडकून काढूं. ते असलें नापाक कर्म करून नामर्दासारखे पळाले काय ?" मल्हारी रहमानकडे वळून म्हणाला, "चल, रहमान ! तीं दिवाभीतें कुठें लपून बसलीं आहेत तीं मला दाखव." त्यानें कृष्णेश्वराच्या बाजूला तोंड फिरवून दोन्ही हात जोडून प्रतिज्ञा केली, "परमेश्वरा ! तुला साक्ष ठेवून मी शपथ वाहतों कीं, माझ्या आईचा असा अमानुषपणें वध करणाऱ्या चांडाळांचीं मी पाळेंमुळें खणून काढीन."

इतक्यांत घराच्या मागील बाजूनें नूरनिहार धावत आली व क्षणभर तेथें जमलेल्या मंडळींकडे पाहून ते सर्व आपलेच लोक आहेत अशी खात्री झाल्यावर म्हणाली "मल्हारी ! मेल्या गेलेल्या माणसांचा सूड घेण्याची गोष्ट सध्यां दूर राहूं दे. जीं जिवंत आहेत, त्यांच्या तरी रक्षणासाठीं तुम्ही पुढें याल कीं नाहीं ?"

रहमाननें मागें वळून पाहून विचारलें, "कोण, नूर ! तूं अजून इथेंच आहेस ?"

"हो ! मी इथेंच आहे. पण आतां बोलत बसून उपयोग नाहीं." नूरनिहार मल्हारीकडे वळून म्हणाली, "मल्हारी ! तुझ्या बायकोला किल्ल्यावरचे नोकर किल्लेदाराच्या हुकुमावरून बळेंच पकडून नेण्याच्या खटपटींत आहेत."

"आणि ती कुठें आहे ?"

" इथेंच—डाव्या बाजूचीं पांच-सात घरें सोडून असलेल्या कोणा एका ओळखी-च्या शेजाऱ्याच्या घरांत आहे."

" आणि शेजारी कोणीही तिच्या साह्याला धावून गेले नाहींत ?"

" तुझ्या साऱ्या शेजाऱ्यांनीं बांगड्या भरल्या आहेत. त्यांच्यांत कांहींतरी राम आहे का? इकडे एवढा अनर्थ झाला, आमच्या साह्याला कोणी तरी धावून यावें म्हणून मीं व गौतमेनें आमच्या दांतांच्या कण्या केल्या; पण एक तरी शेजारी बाहेर येईल तर शपथ! जो तो आपापल्या घराला आंतून कड्या लावून भागूबाई-सारखा आंत दडून बसला, आणि जे थोडेसे बाहेर आले ते किल्ल्यावरचे नोकर आपल्या सोबत्यांना साह्य करण्यासाठीं आले, त्यांनींच तर आम्हांला फसविलें. त्यांतल्याच एकानें प्रथम गौतमेला व मला आश्रय दिला व त्यानेंच शेवटीं केंसानें गळा कापला! सज्जन समजून शेजाऱ्याच्या घरांत आम्ही आश्रयासाठीं विश्वासानें प्रवेश केला, तों ती दुर्जन वाघाची गुहा आहे असें आमच्या निदर्शनाला आलें. त्या संकटांतून मी कशीबशी सुटल्यें. महाराजांच्या आवडत्या लक्ष्मीबाईची मी दासी आहें असें सांगून मीं माझी सुटका करून घेतली. पण गौतमा मात्र तेथेंच अडकून पडली!"

" आणि कमळेचें काय झालें ?" रहमाननें विचारलें.

" कमळा कुठें आहे याचा पत्ता नाहीं." नूरनिहार उत्तरली.

" बरें; तिचा मुलगा ?" रहमाननें विचारलें.

" तिचा मुलगा—" एवढें नूरनिहार बोलते, तोंच त्या उघड्या घरांतून एकाएकीं लहान मुलाचें रडें ऐकूं आलें. नूरनिहार तशीच धावत आंत गेली व कोठून रडें ऐकूं आलें याचा बारकाईनें शोध करूं लागली. त्यांत वास्तविक बारकाईनें शोध करण्याजोगें कांहींच नव्हतें. तें घर म्हणजे कांहीं दससोपी किंवा चौसोपी वाडा नव्हता; साधें बैठें घर होतें. तेथेंच आंतल्या खोलींतून मुलाच्या रडयाचा आवाज येत होता. तो ओळखून नूरनिहार थेट आंत गेली. खोलीची खिडकी लावलेली असल्यानें तिला प्रथम आंत कांहींच दिसेना. लगेच तिनें प्रथम ती खिडकी उघडली व त्या उजेडांत खोलींत सर्वत्र नजर फेंकली, तेव्हां खोलींत एका बिछान्यावर कमळा आपल्या मुलाला कुशींत घेऊन झोंपी गेली आहे असें तिला दिसून आलें. तोच मुलगा कमळेच्या शेजारीं बिछान्यावर बसून रडत होता. नूरनिहारनें प्रथम त्याला उचलून घेतलें व मग कमळेला एक-दोन-तीन हांका मारल्या. पण कमळा उत्तर

देईना. तिला रात्रीच्या श्रमांनीं गाढ झोंप लागली असेल म्हणून नूरनिहारनें तिच्या दंडाला धरून हालवून पाहिलें; पण व्यर्थ ! तिचे दंड हाताला गार लागले म्हणून तिला अशुभ शंका आली. ती तिचें निरसन करून घेण्यासाठीं तिनें तिच्या गालांना हात लावून पाहिलें, तों ते थंडगार ! डोळ्यांचीं बुबुळें पाहिलीं तों तीं कांचेच्या खड्यांसारखीं किंवा कवड्यांसारखीं निर्जीव भासलीं. नूरनिहार तीं लक्षणें पाहून अगदीं भेदरून गेली व स्वतःशीं म्हणाली, "अरे देवा ! कमळा गेली !"

"काय ? कमळा गेली ?" मल्हारीनें पुढें होऊन विचारलें. नूरनिहार घरांत घुसली, तेव्हां मल्हारी व इतर मंडळीही तिच्या मागोमाग आंत घुसली होती. नूरनिहार खोलींत गेली तेव्हां ते सर्वजण घराच्या माजघरांत कोणाचें मूल रडलें याचा शोध करीत व तेथें मरून पडलेल्या लोकांत आपल्या परिचयाचे कोण कोण आहेत हें पहात उभे होते.

लगेच मल्हारीनें पुढें होऊन कमळेकडे बारकाईनें पाहिलें, राणोजीनेंही पाहिलें, पिराजी व नाथाजी यांनींही पाहिलें; पण काय ! सर्वांची खात्री होऊन चुकली कीं, नूरनिहारचा संशयच बरोबर आहे.

नूरनिहार सटवाजीला कडेवर घेऊन उगी करीत इतरांना म्हणाली, "कमळा गेली ती कांहीं आतां परत येत नाहीं. पण आतां आपणांला इथें वेळ गमावतां कामा नये. चला सारे माझ्या मागोमाग; मी तुम्हांला गौतमा ज्या घरीं वनवासी होऊन बसली आहे तें घर दाखवितें."

वेळेचें महत्त्व ओळखून सर्वजण नूरनिहारच्या मागोमाग चालू लागले. मल्हारीनें जातां जातां पुन्हा एकवार अश्रुपूर्ण दृष्टीनें आपल्या मृतमातेचें दर्शन घेतलें. तो वाटभर अश्रु ढाळीत चालला होता.

## प्रकरण तेरावें

# विळ्या-भोंपळ्याचें सख्य झालें !

श्रीपतराव प्रातीनिधि व मल्हारी, राणोजी वगैरे मंडळी यांची अगदीं थोडक्यांत चुकामूक झाली. ती देखील व्हावयाची नव्हे; राणोजी, मल्हारी, पिराजी व नाथाजी शिपायांशीं झगडून त्यांना पिटून लावीत होते, तेव्हांच श्रीपतराव तेथें हजर व्हावयाचा व त्याच्या येण्यानें मल्हारी वगैरे मंडळींच्या वाटेंत खो पडावयाचा; पण तेवढ्यांत श्रीपतरावाचें दुर्दैव त्याच्या वाटेंत आडवें आलें !

श्रीपतरावाबरोबर महारदऱ्याहून निघतांना कोणी साह्यकारी मंडळी नव्हती, नाहीं म्हणावयाला त्याचे दोघे नोकर घोड्यांवर स्वार होऊन मागाहून येत होते. पण ते फार मागें होते. किंवा ते मागें होते असें म्हणण्यापेक्षां श्रीपतरावच दुप्पट-दसपट—शतपट उत्साहानें व अवसानानें सडाच आपला घोडा दामटीत पुढें सटकला होता. आज त्याला इतका उत्साह वाटण्याचें कारण उघडच होतें. पेशव्यांना नामोहरम करण्याची त्याची कैक दिवसांपासूनची इच्छा आज कुठें फळाला याव-याची होती. अर्थात् ती अजून फळाला यावयाची होती; फळाला आली नव्हती. पण वर्तमानकाळच्या उपऱ्या विजयानेंच श्रीपतराव इतका बेहोष होऊन गेला होता कीं, भविष्यकाळ म्हणजे याहून कांहीं निराळा आहे याची जाणीव त्याला मुळींच उरली नव्हती.

आतां बाजिरावाला कैद करून महाराजांसमोर हजर करण्याचा अवकाश, कीं प्रतिनिधीचें काम झालें ! ह्या साऱ्या अर्थात् भविष्यकाळच्या गोष्टी होत्या. वर्तमान-काळ व भविष्यकाळ यांना उपमाच द्यावयाची तर ती खरें क्षितिज व दिसणारें क्षितिज यांचीच द्यावी लागेल. दिसणाऱ्या क्षितिजानें दिशाभूल झाल्यामुळें मनुष्य मोठ्या दिमाखानें आकाश व पृथिवि यांचा सांधा आपणाला उमगला म्हणून आनंदानें नाचूं लागला म्हणजे त्याची जशी फसगत होते, तशीच स्थिति आज श्रीपतरावाची झाली होती. बाजीराव अजून त्याच्या हातीं लागावयाचा होता, तो कैदी म्हणून महाराजांसमोर उभा राहावयाचा होता, त्यानंतर त्याची चौकशी व्हावयाची होती व त्या चौकशींत तो दोषी ठरल्यास मग पुढच्या गोष्टी ! पण श्रीपतरावाला ह्या भविष्यकाळांतील घटनेचें विशेष महत्त्व मुळींच वाटलें नाहीं. बाजीराव व

महाराजावर पडलेले मारेकरी यांचा संबंध त्या मारेकऱ्यांपाशीं सांपडलेल्या बाजि-रावाच्या शालीवरून निश्चित झाला होता. आतां बाजीराव आपली निर्दोषता तरी कोणत्या तोंडानें सिद्ध करणार ! आणि त्यानें ती सिद्ध करण्याचे कितीही आटो-काट प्रयत्न केले तरी त्याच्यावर विश्वास कोणाचा बसणार ! आतां, त्या मारेकऱ्यांनींच जर बाजिरावाचा ह्या गोष्टीशीं कांहीं संबंध नाहीं असें सांगितलें असतें, व आपण असलें निंद्य कर्म करण्याला कां उद्युक्त झालों याचें अन्य कारण सांगून तें सप्रमाण सिद्ध करून दाखविलें असतें, तर मात्र गोष्ट जरा निराळी होती. पण ही शंकाही प्रथमच श्रीपतरावाच्या ध्यानीं आली होती व त्या शंकेचें स्वतःला पोषक असें बिन्बोभाट निराकरण करण्याचा उपायही त्यानें स्वतःच्या मनाशीं योजून ठेविला होता. पिराजी, नाथाजी, मल्हारी वगैरे गुन्हेगारांचा तसेंच बेपत्ता मारेकऱ्यांना शोधून त्यांचाही तपास करण्याची कामगिरी जी त्यानें आपण होऊन आपल्या शिरावर घेतली होती, त्यांतील इंगित तरी हेंच होतें. त्या चौकशींत महाराजांना ठार मारण्याच्या कटाच्या मुळाशीं बाजिरावाची चिथावणी असल्याचें आपोआप बाहेर येईल अशी श्रीपतरावाला फार आशा होती. आपणावरून जगा-ची पारख करण्याची जी जगाची सामुली वहिवाट आहे, त्या वहिवाटीला श्रीपत-रावही अपवाद नव्हता. आपणाप्रमाणेंच बाजीरावही स्वार्थैकतत्पर असेल, त्याच्या ठायीं राष्ट्रहितैकतत्परतेचें पाणी मुळींच नसेल, असें तो धरून चालला होता; व तीच कबुली त्याला मल्हारी, पिराजी व राणोजी यांच्या व साधल्यास त्या मारे-कऱ्यांच्याही तोंडून पाहिजे होती. ती कबुली मिळविण्यासाठींच त्यानें मोठ्या मानभावीपणानें ह्या गुन्ह्याबाबत चौकशी करण्याचें कार्य आपण होऊन हौसेनें पत्करिलें होतें. ही कबुली जर सरळ उपायांनीं मिळाली नाहीं तर ती गुन्हे-गारांना मानमान्यतेची व वतनदारीची लालूच दाखवून मिळवायाची, व ती मिळ-विण्यासाठीं जरूर तेवढा त्यांचा छळची करावयाचा, असा त्याचा बेत होता. ह्या सर्व गोष्टी महाराजांनीं ह्या गुन्ह्याचा तपास करण्याचें कार्य सर्वस्वी त्याच्यावर सोंपविल्यामुळें त्याच्या हाताच्या मळासारख्या होत्या. इतक्या आनंदातिशयानें बेहोष झालेल्या प्रतिनिधीला आज आकाश ठेंगणें होऊन स्वर्ग दोन बोटें उरला असल्यास नवल काय !

पण श्रीपतरावाच्या ह्या साऱ्या मनोगताची अवस्था 'मनांत येती हत्ती घोडे पालखींत बैसावें; परि देवाच्या मनांत आलें पायीं चालवावें' अशी झाली. प्रथम त्याचा

घोडा वाटेंत एक मस्त डुकर समोर धावत आला, त्याला पाहून एकदम बुजाला. सुदैवानें डुकरमुसंडी थोडी चुकली, नाहींतर तेथेंच श्रीपतरावाचा ग्रंथ आटोपावयाचा ! त्या संकटांतून श्रीपतरावानें धैर्यानें व चिकाटीनें कशीबशी वाट काढली. पण तसें करून त्या मांडीखालच्या जनावराला ताळ्यावर आणण्यांत त्याचा बराच वेळ मोडला. तें झालें तें एका अर्थी बरेंच झालें. त्यामुळें श्रीपतरावाच्या दोघां अनुचरांना त्याला गांठतां तरी आलें व त्यामुळें पुढील वाटचालींत तेवढेंच भय कमी झालें. पण तेवढ्यानें संकटपरंपरा पुरी झाली, असें मात्र नाहीं; एक संकट पार पडलें तों त्याच्या मागोमाग दुसरें संकट दत्त म्हणून समोर येऊन उभें राहिलें ! श्रीपतराव व त्याचे दोघे अनुचर दौडत चालले असतां जे मारेकरी गोंधळी कधीं एकदां आपल्या हातीं लागतील अशी त्या तिघांच्याही मनाला हुरहुर लागून राहिली होती, ते चौघेहीजण दूर एका घनदाट झाडीआड लपून बसलेले त्यांना आढळून आले. मात्र मौज ही कीं, हे मारेकरी आपणाला जे भेटले, ते आपणाला अपशकुन करण्यासाठीं भेटले असें श्रीपतरावाला मुळींच वाटलें नाहीं; उलट त्याला वाटलें, 'आपलें भाग्य जोरावर आहे म्हणून आपण आज ज्या ज्या गोष्टीची अपेक्षा करीत आहों, ती ती गोष्ट कल्पतरूच्या अथवा कामधेनूच्या दैवी देणगीसारखी सरकारस्वारीच्या सेवेला दोन्ही हात जोडून हजर !'

मात्र त्या गोंधळ्यांना पाहून श्रीपतरावाच्या अंतःकरणांत अशा आनंदोर्मि उसळत असतां भवितव्यता त्याच्या पाठीशीं अदृश्य रूपानें उभी राहून उपहासपूर्वक हंसून बोलत होती, "हतभागी दुरात्म्या ! तूं विजयश्रीचें ओझरतें प्रसन्नवदन पाहून 'ही आतां आपणालाच वरणार' असे मारे मनांत मांडे चुरीत आहेस ! पण हे तुझे मनांतले मांडे मनांतच जिरावयाचे आहेत. ही विजयश्री जी तुला मधून मधून ओझरतें दर्शन देऊन तुला भ्रमांत पाडून आपल्या मागें तुला नाचवीत आहे, ती तुला वरण्यासाठीं नसून तुला वारण्यासाठीं—तुला विन्मुख करून फजीत करण्यासाठीं नाचवीत आहे. तिचे नेत्रकटाक्ष जे तुला प्रेमाचे व अनुरागाचे वाटतात, ते खरोखर तसे नसून ते त्वेषाचे व तिरस्काराचे द्योतक आहेत. पण तुझ्यासारख्या मूर्ख अंधाला त्याची प्रचीति इतक्यांत कशी येईल ! असत्याचा जय ह्या जगांत कधीं तरी झाला आहे ! कुचल्याच्या विषारी वृक्षाला अमृताचीं मधुर फळें कधीं तरी आलीं आहेत ? उपकारांची फेड देखील उपकारांनीं होणें जेथें अवघड जातें, तेथें अपकारांची फेड कधीं उपकारांनीं झाली आहे ! तुझ्यासारखे

कुटिल बुद्धीचे महत्त्वाकांक्षी लोक म्हणजे भुकेनें व्याकूळ झाल्यामुळें पिसाळलेले कुत्रे होत ! अशा भुकाळू कुत्र्याला रस्त्यांत एखादें कैक दिवसांचें व सडलेलें हाडूक सांपडलें तरी त्याला वाटतें कीं, आपणाला आज ही केवढी मेजवानी मिळाली ! लगेच तो कुत्रा तें हाडूक अधाशीपणाच्या बेसुमार अवसानानें चघळूं लागतो. तो तें इतकें चघळतो व चावतो, तरी बोलून चालून तें कठिण व कोरडें हाडूक ! त्यांतून रुचकर रक्तमांस कसें निष्पन्न व्हावें ! पण त्या कुत्र्याची भूक कांहीं शमत नाहीं व आशा कांहीं सुटत नाहीं. तो तें कडकडां चावून फोडण्यासाठीं जिवापाड धडपड करीतच असतो. अखेर तें हाडूक फुटण्याचें बाजूलाच राहून त्या कुत्र्याची एखादी दाढ मात्र पडते व तिच्यांतून भळाभळां रक्त वाहूं लागतें तेव्हां त्या मूर्ख कुत्र्याला वाटूं लागतें कीं, आपले प्रयत्न सफल झाले; आपण हें हाड आपल्या बळकट दाढांनीं फोडूं शकलों व त्यांतून स्रवूं लागलेलें रुचकर रक्तच आपण आतां चाखीत आहों. अशा मोहमय अवस्थेंत तो कुत्रा स्वतःचेंच रक्त स्वतः पीत असतो; पण मनांत मात्र लटकी धन्यता पावत असतो कीं, आपली आज चंगळ झाली ! ”

भवितव्यतेचे हे न्यायनिष्ठुर बोल श्रीपतरावाला अर्थातच ऐकूं गेले नाहींत. ते गोंधळी झाडीच्या आश्रयाला लपून बसलेले पाहून त्यानें आपल्या अनुचरांना आज्ञा केली, “ ते पहा आपणाला पाहिजेत ते मारेकरी त्या तेथें झाडीआड लपून बसले आहेत. तिकडे आपणाला प्रथम जावयाचें.”

अनुचरांनीं श्रीपतरावाची समजूत घातली, “ सरकार ! ते जिवावर उदार झालेले लोक आहेत. शिवाय ते चौघे आहेत व आपण पडलों अवघे तिघे ! त्यांनीं जर आपणाशीं हुजत मांडली तर त्यांच्यासमोर आपला पल्ला यावयाचा नाहीं.”

“ अहाहा ! अहाहा ! काय तुमची अक्कल ! काय तुमचा मर्दपणा ! शरीर-रक्षक म्हणून मीं तुम्हांला बरोबर घेतलें; पण माझ्या शरीराचें रक्षण होण्याऐवजीं तुमच्याच शरीराचें रक्षण आतां मीं केलें पाहिजे ! मूर्खांनो ! जगांत शक्तीपेक्षां युक्तिच जास्त काम करते, समजलें का ? एक राजा आपल्या कोटमाप रयतेवर जो राज्य करतो, तो कशाच्या जिवावर ? ”

“ आपल्यासारख्या कर्तबगार कारभाऱ्यांच्या जिवावर सरकार ! ” दुसरा अनुचर म्हणाला. वस्तुतः श्रीपतरावाचा कांहीं तो प्रश्न नव्हता; बोलण्याच्या ओघांत त्यानें ते शब्द प्रश्नार्थासारखे उच्चारले इतकेंच. पण त्याच्या लाळघोटया अनुचरांनीं त्याची स्तुति करण्याचा तेवढाच मोका साधला !

" मूर्ख नाहीं तर! मध्येंच कांहीं तरी आचरटांसारखें बोलतां. मुकाट्यानें माझ्या-बरोबर त्या तेथवर चला. आणि तेवढा धीर होत नसेल तर असेच पळत घरीं जाऊन भागूबाईसारखे बांगड्या भरून लपून बसा." असें म्हणून श्रीपतराव पुढें चालू लागला. आतां त्याच्या अनुचरांचा नाइलाजच झाला, म्हणून त्यांनाही त्याच्या मागोमाग जावें लागलें. ते म्हणजे अगदीं भित्र्या भागूबाई होते अशांतली गोष्ट नाहीं. पण पहांटेच्या प्रकारावरून त्या मारेकऱ्यांविषयीं तेथल्या सर्वांचाच असा ग्रह झालेला होता कीं, त्या व्यक्ति कांहीं सामान्य नाहींत! प्रत्यक्ष महाराजांच्या जिवावर इतक्या भर छावणींत तुटून पडावयाला जे डगमगले नाहींत, त्यांच्या धैर्याची काय तारीफ करावी!

श्रीपतराव व त्याचे साथीदार यांनीं त्या मारेकरी गोंधळ्यांना हेरलें, तेव्हां वस्तुतः आपल्या पाठीमागून पाळतीवर कोण येत आहे इकडे त्यांचें लक्ष नव्हतें. याचा अर्थ ते स्वतःच्या बाबतींत गाफीलपणें वागत होते असा नव्हे; त्यांनीं ही एकांताची जागा मोठ्या प्रयासांनीं शोधून काढली होती. जंगल म्हटल्या एखाद्या वाघडुकरानें भुसकन् एखाद्या जाळींतून पुढें येऊन पहातां पहातां झडप घालावी इतकें घनदाट जंगलही नाहीं व रहादरीची जागा म्हणावी तर तेथें सहसा कोणींच कधीं येऊं नये, अशी ती जागा त्यांनीं मुद्दाम शोधून काढली होती. दुसरें असें कीं, ते मारेकरी इतक्या तरी मोकळ्या जागेंत निर्वेधपणें बसले होते याचें कारण त्यांना आतां केल्या गुन्ह्याचें भय उरलें नव्हतें. शाहूमहाराजांनीं आपणांला क्षमा केली आहे, आतां आपणांला कोणाचें भय बाळगण्याचें काय कारण, अशा विचारानें ते निश्चिंत झाले होते. अशा निर्भय स्थितींत देखील ते अशा आडवशाला मुद्दाम जाऊन बसले याचें कारण त्यांना कांहीं महत्त्वाच्या खासगी गोष्टी आपसांत बोलावयाच्या होत्या. श्रीपतरावाला तरी त्यांचा पत्ता लागला तो केवळ योगायोगच म्हणावयाचा. त्याचा घोडा बुजून जर भलतीकडेच उधळला नसता, तर श्रीपतराव तरी थेट साताऱ्याला जाण्याचा हमरस्ता सोडून ह्या अवघड गावेंड्या वाटेनें कशाला झुकला असता!

श्रीपतरावाच्या दोघां साथीदारांना जरी त्या मारेकऱ्यांवर चालून जाणें धोक्याचें वाटत होतें, तरी श्रीपतरावाच्या हुकुमाप्रमाणें त्यांना चालून जाणें प्राप्तच झाल्यावर ही कामगिरी आपल्या हातून यशस्वी रीतीनें कशी पार पडेल याविषयीं शक्य तितकी खबरदारी घेणें हें त्यांचें काम होतें; व त्याप्रमाणें त्यांनीं खबरदारी घेतलीही.

त्यांनीं जवळच्या वाटेनें जाण्याचें टाळून मुद्दाम वळणांवळणांचा दूरचा रस्ता तेथल्या घनदाट झाडींतून रोंखला व त्यांच्या सुदैवानें त्यांना तसा रस्ता सांपडलाही. सावधगिरीनें त्या रस्त्यानें गेल्यास थेट त्या मारेकऱ्यांच्या पाठीशीं जाऊन पोंचेपर्यंत त्यांना दाद लागूं नये असा मजेचा तो रस्ता होता. त्या रस्त्यानें जाण्याची मनीषा त्या दोघां अनुचरांनीं दर्शवितांच श्रीपतरावालाही त्यांचा बेत मान्य झाला. ते आपापले घोडे अंमळ अलीकडेच एका झाडाच्या बुंध्याशीं बांधून ठेवून पायींच त्या मारेकऱ्यांच्या अनुरोधानें लपत छपत चालले. थोड्याच वेळांत ते मारेकऱ्यांच्या अगदीं जवळ एका घनदाट जाळीच्या आड जाऊन पोंचले, तरी मारेकऱ्यांचें तिकडे मुळींच लक्ष्य गेलें नाहीं. त्यांचें सारें लक्ष्य कसल्या तरी महत्त्वाच्या गोष्टीबाबत भवति न भवति करण्यांत गढून गेलें होतें. श्रीपतराव वगैरे तिघांना तेथल्या आडवशाला त्या मारेकऱ्यांच्या संभाषणांतील कांहीं विस्कळित दुवे सांपडले.

"तें कांहीं नाहीं. तूंच आमच्या साऱ्या बेताची माती माती केलीस." एकजण त्या शाहिराला म्हणाला.

"ती कशी ?" शाहिरानें विचारलें.

"तूं आमचा अवसानघात केलास." दुसरा म्हणाला.

"म्हणून काय झालें ? तुम्हीं तुमचें अवसान कामीं आणावयाचें होतें !" शाहिरानें पुन्हा सवाल केला.

पण आपलें आगाऊच असें ठरलें होतें कीं, प्रथम तूं शस्त्र उचलावयाचें व मग आम्हीं तुझें अनुकरण करावयाचें. हं ! आतां फार तर तूं असें म्हण, कीं आम्ही तुला आमच्या टोळीचा नाईक समजून वागलों ती आमची चूक झाली. शहाण्याचा चाकरदेखील व्हावें पण मूर्खाचा धनीदेखील होऊं नये असें शहाणे लोक आजवर सांगत आले; पण इथें आम्हीं तर मूर्खाचे चाकर झालों !" पूर्वीचा दुसरा गोंधळी आपल्या इतर दोघां साथीदारांकडे पाहून म्हणाला, "खरें कीं खोटें ?"

"अक्षरशः खरें !" तिसरा म्हणाला.

चौथ्यानेंही लगेच त्या दोघां साथीदारांच्या मताला आपल्या अनुमतीची विवरणपूर्वक पुस्ती जोडली. "ह्या मूर्खाच्या नादीं लागून आम्ही आमचें सर्वस्व गमावून बसलों. आतां आम्हीं कोल्हापुरीं जाऊन संभाजीराजांना तोंड तरी कसें दाखवावें ?"

तिसरा पुन्हा म्हणाला, " हो ! आम्हीं जर राजांसमोर विडा उचलल्याप्रमाणें आज शाहूमहाराजांना ठार केलें असतें, तर मग आमची कोल्हापुरांत किती वाहवा झाली असती ! संभाजीराजांनीं मग आम्हांला मोठीं इनामें देऊन आमचें जन्माचें दारिद्र्य दूर केलें असतें."

दुसरा मध्येंच म्हणाला, " बरें; तें साधलें नाहीं तर नाहीं; शाहूमहाराज जेव्हां आमच्यावर प्रसन्न होऊन आम्हांला इनामें देण्याला तयार होते तेव्हां तरी आम्हीं त्यांना आमच्या कटांतील गुपित समजावून सांगावयाचें कीं नाहीं ! आम्हांला काय, संभाजीराजांचा आश्रय सुटता तर शाहूमहाराजांचा आश्रय मिळाला असता."

" एकूण केवळ लहानशा बक्षिसासाठींच तुम्ही हा अन्याय करण्याला तयार झालां होतां म्हणावयाचें !" शाहीर म्हणाला.

" लहानशा कां ? आम्हांला चांगलें मोठें बक्षीस मिळालें असतें. शाहूमहाराजांना जर आम्हीं ठार केलें असतें, तर संभाजीराजांकडून आम्हांला वेळीं एकेक गांव देखील इनाम मिळाला असता. शिवाय मानमान्यतेची नोकरीही मिळाली असती." पहिला म्हणाला.

" कबूल ! तूं म्हणतोस तें कबूल ! " शाहीर शांतपणानें पण कांहींशा उद्विग्नतेनें हंसत म्हणाला, " मी म्हणतों, तुम्हांला एक सोडून पांच पांच गांव प्रत्येकाला मिळाले असते. पण असला स्वार्थ कितीही मोठा असला तरी तो कमालीचा हीन नाहीं का ? "

" आणि मग तूं तरी ह्या कटांत कां सामील झालास ? तुझादेखील त्यांत स्वार्थ नव्हता का ? " दुसऱ्यानें विचारलें.

" माझा स्वार्थ काय होता तें माझें मला माहीत ! माझा स्वार्थ जर आर्थिक असता, तर तो साधण्याला मला गोंधळ्याचा व मारेकऱ्याचा पेशा पत्करावाच लागला नसता. तसें पाहूं जातां परमेश्वराच्या कृपेनें मला कांहींदेखील कमी नव्हतें." शाहीर म्हणाला.

" म्हणजे ? " तिसऱ्यानें मध्येंच त्या शाहिराच्या तोंडाकडे निरखून पाहात संशय प्रगट केला, " एकूण तूं खरा शाहीर नव्हेस कीं काय ? "

" मी कोणीही असलों तरी त्याच्याशीं तुम्हांला काय करावयाचें आहे ? " शाहिरानें विचारलें.

" तिघेही गोंधळी संशयग्रस्त होऊन शाहिराकडे पाहूं लागले. पहिला इतर दोघांना उद्देशून म्हणाला, " हा कोणी तरी बहुरूपी दिसतो ! "

" हो ! " दुसरा म्हणाला, " याचा कावा कांहीं निराळाच असला पाहिजे असें दिसतें. "

तिसऱ्यानें मांडीचा पवित्रा ठोकून मुठी आंवळीत शाहिराला दरडावून विचारलें, " तूं खरा कोण आहेस तें सांगतोस कीं नाहीं ? "

शाहीर ह्या धमकावणीला न डरतां निधड्या छातीनें म्हणाला, " मीं कोणीही असलों तरी मीं आजवर तुमच्याशीं प्रतारणा तर केली नाहीं ना ? "

" नाहीं कशी ? तूं आमच्याशीं प्रतारणाच केलीस. संभाजीराजांसमोर शाहूमहाराजांचा वध करण्याचा विडा प्रथम तूं उचललास, तेव्हां मग आम्हीं उचलला. आणि अखेर तूंच शस्त्र खालीं ठेवून आम्हांला तोंडघशीं पाडलेंस. तूं आमच्याशीं प्रतारणाच केलीस."

" नाहीं, मीं प्रतारणा केली नाहीं." शाहीर म्हणाला, " आपण शाहूमहाराजांना ठार करण्याचा बेत प्रथम आपसांत ठरविला, तेव्हां तो कोणत्या उद्देशानें ठरविला याची जर तुम्हांला आठवण असेल, तर मीं प्रतारणा केली असें तुम्ही म्हणणार नाहीं. शाहूमहाराजांनीं आपणां चौघांच्याही बाबतींत घोर अन्याय केले होते; त्याबद्दल त्यांच्यावर सूड घ्यावयाचा, त्यांना देहान्तप्रायश्चित द्यावयाचें, असा आपला सर्वांचा बेत ठरला होता, म्हणूनच मीं ह्या बाबतींत पुढाकार घेतला."

" मग ऐन वेळीं तूं माघार कां घेतलीस ? " सर्वांनीं मिळून विचारलें.

" मीं माघार कां घेतली ! मीं माघार घेतली याचें कारण महाराज साधुपुरुष आहेत अशी माझी त्यांच्याशीं दृष्टादृष्ट होतांच खात्री पटली. आणि माझी ती समजूत सकारण होती असें तुम्हीं समक्ष पाहिलेंतच. आपण ह्या कामगिरिवर निघाल्यापासून जेव्हां जेव्हां महाराजांविषयींच्या गोष्टी आम्हांला ऐकावयाला मिळाल्या, तेव्हां तेव्हां त्या चांगल्याच ऐकावयाला मिळाल्या. तेव्हांच क्षणोक्षणीं माझी खात्री पटत होती कीं, महाराज साधुपुरुष आहेत; त्यांचा असा आडून घात करणें अधमपणाचें ठरेल व तशा प्रयत्नांत कधीं कुणाला यशही यावयाचें नाहीं. असें माझें मन मला माझ्या अधमपणाच्या प्रतिज्ञेबद्दल पावलोपावलीं लाजवीत होतें, त्याला मी काय करूं ! महाराजांची नंतरची आमच्याशीं जी वर्तणूक झाली, त्यावरून तुमचीदेखील त्यांच्या साधुत्वाबद्दल

खात्री झाली नाहीं का ? " आपल्या प्रश्नाला आपल्या साथीदारांकडून होकारार्थी उत्तर मिळेल अशा अपेक्षेनें शाहीर थोडा वेळ थांबला. पण कोणीच कांहीं बोलत नाहीं असें पाहून तो पुन्हा म्हणाला, " गड्यांनो ! असे एकदम उतावळेपणानें शेंडीत राख घालूं नका, शांत मनानें एकंदर परिस्थितीचा विचार करा. आपला सर्वांचा महाराजांवर जो रोष होता, तो ते अन्यायी आहेत अशा समजुतीनें होता. पण आपण आज इतके दिवस ह्या गोंधळ्यांच्या वेषांत महाराजांच्या राज्यांत हिंडत आहों; इतक्या दिवसांत महाराजांच्या अशा अन्याय्य वर्तनाबद्दल महाराजांना दोष देणारा एकही माणूस आम्हांला भेटूं नये ? ज्यानें त्यानें महाराजांची स्तुति करून त्यांना धन्यवाद द्यावे ! इतकी ज्या महाभागाची पुण्याई थोर, त्यानें तुमच्या किंवा माझ्या भाऊबंदांना प्रसंगीं शासन केलें असलें तरी तें अन्यायानें केलें असें आपणाला कसें म्हणतां येईल ? प्रत्यक्ष आम्ही मारेकरी त्यांना ठार मारण्याला उठलेले त्यांच्यासमोर उभे होतों, तेव्हां ते आम्हांला एका क्षणांत कैद करून आम्हांला आमच्या अपराधाबद्दल देहान्तशासनदेखील करूं शकले असते. पण त्यांनीं तसें केलें नाहीं. त्यांनीं अपकारांची फेड उपकारांनीं केली. " शाहीर म्हणाला.

" तें सारें खरें; पण आतां आमची वाट काय ? आम्हांला आतां कोल्हापुरांत जाण्याला तोंड नाहीं. बरें; इकडे महाराज प्रसन्न झाले होते,—"

" नीच ! हरामखोर ! " शाहीर त्या गोंधळ्याचें बोलणें पुरतेपणीं ऐकून न घेतां एकदम आवेशानें म्हणाला, " तुम्ही सारे मेलेल्या मढ्याच्या टाळूवरचें लोणी चाटून खाणारे आहां. तुमच्या बापजाद्यांना किंवा भाऊबंदांना शाहूमहाराजांनीं शासन केलें, तें यथायोग्यच केलें. तुमच्यासारखेच ते ! महाराजांच्या जागीं जर मी असतों, तर, असल्या बद्नेकीच्या, क्षुल्लक स्वार्थासाठीं एवढा मोठा अनर्थ करावयाला तयार होणाऱ्या देशद्रोह्यांचे एकजात निर्वंश करून सोडले असते ! "

" आणि मग आम्हीं तरी तुला—असल्या राजाला जिवंत ठेवलें असतें असें तुला वाटतें का ? " तो गोंधळी चिडून वर्दळीवर येऊन म्हणाला.

इतक्यांत इकडे मोठाच विस्मयजनक चमत्कार झाला. श्रीपतरावाच्या पायाला एक विंचू असा अवचित डसला कीं, त्यासरसा श्रीपतराव मोठ्यानें विव्हळूं लागला. तें ऐकून गोंधळी सावध होऊन एकदम मागें वळून पहातात तों एक सोडून तिघे त्यांच्या पाळतीवर एका जाळीच्या आडोशाला उभे ! शाहीर तें पाहून आपल्या

साथीदारांना म्हणाला, "गड्यांनो ! हा प्रतिनिधि आपला पाठलाग करण्याला आलेला दिसतो. आतां कसें करावयाचें ?"

एक गोंधळी म्हणाला, "आल्या संकटाला तोंड द्यावयाचें अन् काय ! चला उठा. ते तिघे असले तर आपण चौघेजण आहों."

"उठा !" असें म्हणून ते चौघेही गोंधळी आपसांतील मतभेद विसरून तेव्हांच उठले व एकजुटीनें शत्रूशीं सामना द्यावयाला सज्ज झाले.

"विंचवाच्या विषावरील उताऱ्याचें एखादें औषध तुमच्यापाशीं आहे का ?" श्रीपतरावानें ज्या पायाला विंचू डसला होता, तो डावा पाय उचलून दोन्ही हातांनीं घट्ट धरीत विचारलें.

"औषध का ? आहे. पण तुम्ही इकडे कशासाठीं आलां आहां तें अगोदर सांगा." एक गोंधळी–शंभुसिंग म्हणाला.

"आम्ही तुमच्याच तपासासाठीं आलों होतों. 'त्या शूर गोंधळ्यांना योग्य बक्षिसें देऊन त्यांचा गौरव करा' अशी महाराजांची मला आज्ञा झाली आहे. महाराज तुमच्या शौर्यावर बेहाय खूष आहेत. पण अगोदर कांहीं औषध सांगा ना ! ह्या वेदना मला सहन होत नाहींत." श्रीपतराव अधिकाधिक विव्हळत म्हणाला.

"तुम्ही हें परमेश्वराला स्मरून खरें सांगतां ?" शंभुसिंगानें आपल्या इतर साथीदारांकडे वळून पहातां पहातां श्रीपतरावाला विचारलें.

"हो ! परमेश्वराला स्मरून–पण अगोदर कांहीं औषध सांगा ना !" श्रीपतराव रडकुंडीला येऊन म्हणाला.

"ठीक आहे." असें म्हणून शंभुसिंगानें चटकन् पुढें होऊन श्रीपतरावाच्या पायाला जेथें विंचवानें नांगी मारली होती तेथें तोंड लावून बरेंच रक्त दोन-तीनवार शोषण करून थुंकून टाकलें, व तेवढ्यांत शाहिराकडे वळून म्हटलें, "तिंबाजी ! तुला तें झाडपाल्याचें औषध माहीत आहे. जवळपास कुठें तरी तें झाड तुला आढळेल. अंमळ जाऊन तेवढें शोधून आण जा बरें !"

शाहीर–पण आतां त्याला शंभुसिंगानें ज्या नांवानें संबोधिलें त्याच नांवानें आपणही संबोधूं.–तिंबाजी कांहीं आपल्या जागेवरून हलला नाहीं. श्रीपतरावांना व इतर सर्वांना तें जरा चमत्कारिक वाटलें. अप्पाजी नांवाचा दुसरा गोंधळी शंभुसिंगाला म्हणाला, "शंभुसिंग ! मला सांग ना तें झाड कुठेंसें आहे तें ! मी जाऊन आणतों."

" कां ? तिंबाजी आणीत नाहीं वाटतें ? " शंभुसिंग जरा कुऱ्यानें तिंबाजीकडे पहात म्हणाला.

" मला तें झाड सांपडणार नाहीं." तिंबाजी म्हणाला.

" ठीक आहे. मीच तें शोधून आणतों." असें म्हणून शंभुसिंग पुन्हा एकवार शोषण केलेल्या रक्ताची चूळ टाकून तेथून दूर निघून गेला.

शंभुसिंग चार पावलें दूर जातो न जातो तोंच तिंबाजी मुकाटयानें तेथून काढता पाय घेऊं लागला. तें पाहून श्रीपतरावाच्या अनुचरांपैकीं एक श्रीपत-रावाला म्हणाला, "सरकार ! तो पहा एक गोंधळी आपला डोळा चुकवून पळत आहे."

श्रीपतराव म्हणाला, " तो मोठा दगलबाज माणूस दिसतो. त्याला पकडा पाहूं ! "

तिंबाजीच्या कानीं हे शब्द पडले मात्र, त्या सरसा तो तेथून वाऱ्यासारखा पळाला. श्रीपतरावाच्या एका अनुचरानें आपल्या दुसऱ्या सोबत्याला तेथल्या इतर तिघां गोंधळ्यांवर नजर ठेवावयाला सांगून तिंबाजीचा पाठलाग केला. पण तिंबाजी पळण्यांत इतका चपळ होता कीं, तो त्या पाठलाग करणाऱ्या माणसाच्या टप्प्यांत येण्याच्या पूर्वीच जेथें श्रीपतराव व त्याचे ते साथीदार यांचे घोडे बांधलेले होते तिकडे पळत जाऊन दिसेनासा झाला.

इकडे श्रीपतरावापाशीं उभे असलेल्या दोघां गोंधळ्यांना आधींच तिंबाजीचा राग आला होता, तशांत श्रीपतरावानेंही सहानुभूतीच्या बोलांनीं त्यांना भारलें होतें. त्यांना तिंबाजीचें हें कृत्य मुळींच आवडलें नाहीं. त्यांना असें भय वाटूं लागलें कीं, तिंबाजी जर घरभेद्या निपजून भलत्याच ठिकाणीं जाऊन भलतेंच कांहीं तरी बोलला, तर आपणां तिघांवरही मोठा कठिण प्रसंग ओढवेल. तसें त्यांना नको होतें. त्यांना श्रीपतरावाकडून पारितोषिक तर मिळवावयाचें होतेंच, पण त्यांत तिंबाजीला भागीदार करून त्याचेंही तोंड बंद करावयाचें होतें. म्हणून त्यांपैकीं तिसरा–शहाजी श्रीपतरावाला म्हणाला, " सरकार ! तो दगलबाज आमचा केव्हां कसा घात करील याचा कांहीं नेम नाहीं. तेव्हां आपण त्याला पकडण्याची कांहीं व्यवस्था कराल तर फार बरें होईल. आपला एक माणूस त्याच्या मागावर गेला आहे, तो पुरा पडेल असें मला वाटत नाहीं."

श्रीपतराव वृश्चिकदंशाच्या वेदनांनीं विव्हळत असल्यानें त्याचें शहाजीच्या बोलण्याकडे लक्ष्य यथातथाच होतें. त्याचा अनुचर मात्र तें सारें लक्षपूर्वक ऐकत

होता. शहाजीचें बोलणें ऐकून त्याला संशय आला कीं, हे लबाड लोक अचानक आपल्या हातावर तुरी देण्यासाठीं तर ही लटपटपंची करीत नसतील ! पण शाहीरही पळाला व त्याचा पाठलाग करणारा माणूसही बराच वेळ चांगला पाव घटकाभर माघारा आला नाहीं, तेव्हां त्यालाही चिंता पडली कीं आतां कसें करावें ?

शंभुसिंगानें तितक्यांत अंमळ दुरून कसलासा झाडपाला शोधून आणला व तो हातावर चोळून श्रीपतरावाच्या पायाला जिथें विंचू डसला होता तिथें कांहीं वेळ दाबून धरला. ती अशी कोणती दिव्य वनस्पति होती न कळे, तिच्यानें श्रीपतरावाला त्याच क्षणीं बराचसा उतार पडला. शंभुसिंगानेंही थोडा पाला स्वतः चावून थुंकून टाकला. असें त्यानें दोन तीन वेळां केलें. हें करतांना त्यानें एका हातानें श्रीपतरावाच्या जखमेवर पाला दाबून धरला होताच. लगेच त्यानें अप्पाजीला सांगितलें, " अप्पाजी ! माझ्या डोक्याचें पागोटें फाडून एक चिंधी काढून माझ्यापाशीं दे."

आप्पाजीनें ओळखलें कीं, शंभुसिंगाला चिंधी श्रीपतरावाच्या पायाला बांधण्यासाठींच पाहिजे आहे. प्रतिनिधींच्या ठायीं भक्ति दाखविण्याची ही संधि शंभुसिंगानें साधली असें पाहून आप्पाजी व शहाजी यांच्या मनांत साहजिकपणेंच असूया उत्पन्न झाली. त्यांना वाटलें, 'शंभुसिंगानें ज्याअर्थीं प्रतिनिधींच्या सेवेंत तत्परता दाखविली, तेव्हां त्याला आतां मोठें इनाम मिळणार यांत संशयच नाहीं. तसेंच आपणही जर थोडेंफार केलें तर ती खटपट अन्यथा व्हावयाची नाहीं' ह्या भावनेनें अप्पाजीनें शंभुसिंगाच्या पागोट्याचा पदर फाडण्याऐवजीं आपल्या स्वतःच्याच पागोट्याचा पदर फाडून चिंधी पुढें केली व आपण तुमच्यासाठीं एवढें केलें हें प्रतिनिधींच्या निदर्शनाला आणून देण्यासाठीं तो वर म्हणालाही, 'सरकारांच्या जिवापुढें ह्या पागोट्याची किंमत ती काय ! शीर सलामत तर पगडी पचास !' ह्या वाहात्या गंगेंत हात धुवून घेण्यासाठीं शहाजीनेंही तेवढ्यांत आपल्या डोकीचें पागोटें काढून त्याची एक चिंधी फाडून ती शंभुसिंगाच्या हातीं दिली. पण चिंधी एकच पाहिजे होती व आप्पाजीनें दिलेल्या एका चिंधीवर कार्यभाग उरकण्याजोगा होता, त्यामुळें शहाजीची चिंधी उपयोगाला आली नाहीं. तेवढ्यांत प्रतिनिधींच्या पायाला आणखी एखादा विंचू डसला असता तर कदाचित् त्या चिंधीचाही उपयोग झाला असता. पण तसें कांहींच झालें नाहीं.

श्रीपतरावाचा तेथें उभा असलेला अनुचर हें सर्व पहात होता. त्याच वेळीं तिकडे

आपल्या सोबत्याला शाहीर पकडतां आला असेल किंवा नाहीं याविषयींही त्याच्या मनाला चिंतेचे विंचू डसत होते. त्या गोंधळ्याच्या एकंदर वर्तणुकीवरून ते आतां पळून जाणार नाहींत याविषयीं त्याची खात्री पटली होती. अशा स्थितींत आपण त्या शाहिराचा पाठलाग करण्याला जावें असें त्याला वाटत होतेंच; त्यांत 'सरकार! धावा हो धावा! ह्या दगलबाजानें मला मारलें!' ह्या आरोळीची भर पडली. ती आरोळी सुदैवानें असो कीं दुर्दैवानें असो पण श्रीपतरावाला किंवा त्या तिघांही गोंधळ्यांना ऐकूं गेली नाहीं. कारण त्यांचें तिकडे लक्ष्यच नव्हतें. पण आरोळी ऐकतांच कुठचें काय व कुठचें काय, तो अनुचर मात्र 'सरकार मी येसाजीच्या मदतीला जातों. तो अजून कां आला नाहीं नकळे' असें म्हणून तेथून थेट त्यांचे घोडे जेथें बांधलेले होते त्या अनुरोधानें पळाला.

इकडे शंभुसिंगानें श्रीपतरावाच्या पायाची जखम नीट बांधली. त्याच्या दिव्यौषधीनें श्रीपतरावाला चांगलाच गुण आला. त्यानें शंभुसिंगाला मनापासून शाबासकी देऊन सांगितलें, "तुम्ही तिघेही माझ्याबरोबर साताऱ्याला चला. तेथून मग सायंकाळीं आपण महाराजांकडे जाऊं. मी महाराजांपाशीं तुमची शिफारस करून तुम्हां प्रत्येकाला चांगलें इनाम मिळेल असें करीन. मात्र तुमचा तो साथीदार शाहीर मोठा विक्षिप्त व संशयी माणूस दिसतो! त्याला एथून पळण्याचें काय कारण होतें? त्याचें व तुमचें आतां जें भांडण चाललें होतें तें त्याच बाबतींत ना?"

"सरकारांनीं आमचें संभाषण ऐकलें का?" शंभुसिंगानें विचारलें.

"हो, मीं तुमचें सारें संभाषण ऐकलें." श्रीपतराव म्हणाला.

"तर मग आम्हांला कांहींच बोलावयाचें नाहीं." शंभुसिंग म्हणाला, "तो खरोखरच एक विक्षिप्त प्राणी दिसतो."

"त्याला काय वाटलें? आम्ही आलों ते तुम्हांला पकडावयाला आलों असें?" श्रीपतरावानें विचारलें.

"होय." शंभुसिंग म्हणाला, "सरकार! त्यालाच काय पण मलाही प्रथम तसेंच भय होतें. कारण, दुधानें तोंड भाजलें कीं ताकदेखील फुंकून प्यावेंसें वाटतें."

"पण तुमचें दुधानें तोंड भाजलें केव्हां?" श्रीपतरावानें प्रश्न केला.

आतां आपण किल्ल्यावर रात्रौ घडलेला प्रकार इथें सांगावा कीं सांगूं नये असा त्या तिघांही गोंधळ्यांना पेंच पडला. त्यांनीं क्षणभर साशंक मुद्रेनें एकमेकांकडे पाहिलें; पण कोणी कांहीं बोलेना. श्रीपतरावाची कल्पना होती कीं, शाहूमहाराजांवर

हल्ला करण्याचें कारण काय वगैरे गोष्टींबाबत त्यांना कांहीं वाईट अनुभव आला असेल, म्हणून ते भीत आहेत. तें त्यांचें भय दूर करण्याच्या इरादानें तो म्हणाला, " तुम्हांला जें काय बोलावयाचें असेल तें मनमोकळेपणानें बोला. मला भिऊं नका. तुमच्या हातून एखादी चूक कळून न कळून झाली असली तरी ती मी पोटांत घालीन."

श्रीपतरावाच्या ह्या बोलण्यानें गोंधळ्यांना बराच धीर आला. शंभुसिंग त्यांतल्या त्यांत सर्वांत जास्त धीरवान् होता. या क्षणाला तरी तो श्रीपतरावाचा उपकारकर्ता असल्यानें त्याला एक विशिष्ट नैतिक अधिकार प्राप्त झाला होता; त्या अधिकाराच्या जोरावर त्यानें रात्रौ किल्ल्यावर घडलेला सर्व प्रकार श्रीपतरावाला निवेदन केला. मात्र तें निवेदनदेखील त्यानें कांहीं हातचे राखून केलें. तिंबाजीनें स्वकपोलकल्पित पोवाडा तेथें गाइला असें न सांगतां कोणा शाहिराचा पोवाडा त्याला तोंडपाठ येत होता तो त्यानें म्हणून दाखविला अशी त्यानें एकंदर प्रकाराची संपादणी केली.

श्रीपतरावाला त्यांतलें कांहींच माहीत नसल्यानें त्याला तें सर्व खरेंच वाटलें. त्यानें त्या गोंधळ्यांना अभय दिलें, " एवढेंच ना ? मग त्यांत एवढें भिण्याजोगें काय आहे ! आणि गमाजीला तरी तुम्हांला त्याबद्दल इतकी मारझोड करण्याचें काय कारण होतें ? ह्याच भयानें जर तो तुमचा साथीदार पळाला असेल तर तो वेडाच आहे म्हणावयाचा ! बरें, झालें तें होऊन गेलें. आतां तुम्हांला मुळींच भ्यावयाला नको. मी तुमचा पाठीराखा आहें. मात्र आतां स्वतःचें कल्याण करून घेणें सर्वस्वीं तुमच्यावर अवलंबून आहे."

" पण सरकार ! आपले लोक जे तिंबाजीचा पाठलाग करण्यासाठीं म्हणून गेले, ते अजून कसे परत आले नाहींत ? " अप्पाजीनें मध्येंच विचारलें.

" हो ! खरेंच. ते एकामागून एक दोघे त्याच्या पाठलागावर गेले, म्हणून त्याला अधिकच भय वाटलें असेल. चला तर खरे, आपण मोठ्या रस्त्यापर्यंत जाऊन काय प्रकार आहे तो पाहूं." श्रीपतराव कांहींसा भानावर येऊन म्हणाला. इतका वेळ म्हणजे तो भानावर नव्हता असें नाहीं; पण एकतर त्याला वृश्चिक-दंशाच्या वेदनांमुळें चालतां येणें अशक्य होतें तें आतां बरेंच शक्य झालें होतें, व दुसरें, ते गोंधळी जरी इतके गोड बोलत होते, तरी त्यांच्यावर कितपत विश्वास टाकावा हा त्याला एक प्रश्नच होता. 'न जाणो, हे लोक भयामुळें आपणाशीं इतका वेळ नमून वागत असतील; पण आतां आपण एकटेच हातीं सांपडल्यावर

ते उलटणार नाहींत कशावरून' अशी शंका त्याच्या मनांत आली. तसा प्रसंग तर श्रीपतरावाला यावयाला नकोच होता; पण त्याहींपेक्षां आणखी एका निराळ्या गोष्टीची अपेक्षा त्याला होती. शाहूमहाराजांचा खून करण्याच्या कटाच्या मुळाशीं बाजीराव आहे असा त्याला जबर संशय होता, व तो संशय खरा किंवा खोटा ठरता तरी त्याला तशा प्रकारच्या पुराव्याची सिद्धता करावयाची होती. गोंधळ्यांनीं आपण होऊन तशी कबुली दिली असती तर ती त्याला हवीच होती; नाहींपेक्षां त्यांना आमिष दाखवून त्यांजपासून तशा प्रकारची कबुली घेण्याचीही तयारी त्यानें प्रथमपासूनच चालविली. पण ह्या गोष्टी अशा उघड्या रानांत बोलून साधण्याजोग्या नव्हत्या. त्यासाठीं एकांत पाहिजे होता, तो सातार्‍यांत गेल्याशिवाय मिळण्याजोगा नव्हता. सर्वांत जास्त महत्त्वाची अशी जर कोणती गोष्ट प्रतिनिधीला तेव्हां जाणवली असेल तर ती हीच कीं, ह्या तिघां मारेकर्‍यांच्या हातीं आपण एकटेच सांपडलों आहों हें कांहीं बरें नाहीं.

श्रीपतरावाला स्वसंरक्षणासाठीं तेथून पाय काढावयाचा होता, व गोंधळ्यांनाही स्वसंरक्षणासाठींच त्यांचा म्होरक्या तिंबाजी त्यांच्यांतून फुटून जावयाला नको होता. असा उभयपक्षांचा हेतु एक जमला. त्यांचा अंतिम हेतुदेखील तत्कालीन घडामोडींच्या वर्तुळाकार रेषेंतून फिरतां फिरतां असाच मध्यबिंदूवर येणें बरेंच शक्य होतें, व ह्या शक्यतेवर उभय पक्षांचा बराचसा भरंवसाही होता. त्या ध्येय-सिद्धीच्या पूर्वतयारीसाठीं उभयपक्षांनीं मुळींच आढेवेढे न घेतां एकमतानें वागण्याला सुरवात केली. श्रीपतराव पुढें व तिघे गोंधळी मागें असे चौघेही ती आडवशाची जागा सोडून जेथें श्रीपतराव व त्याचे दोघे अनुचर यांचे घोडे बांधून ठेवण्यांत आले होते तेथें येऊन पोंचले.

पण तिथें श्रीपतराव पहातो तों काय ! तेथला एकंदर प्रकार फारच भयंकर ! त्यांच्या तीन घोड्यांपैकीं दोन घोडे तेथें मरून पडलेले आढळले, व तेथून कांहीं अंतरावर त्या अनुचरांचीं प्रेतें आढळून आलीं. तिसरा घोडाही तेथें दिसेना !

" तुमच्या त्या म्होरक्यानेंच हा अनर्थ केला असावा ! " श्रीपतराव तिघांही गोंधळ्यांना उद्देशून चिंतायुक्त संतापानें म्हणाला.

"हो ! सरकार ! असें दिसतें खरें. पण त्या मूर्खाच्या अपराधाबद्दल आपण आम्हांला जबाबदार धरणार नाहीं अशी आशा आहे." शंभुसिंग म्हणाला.

गोंधळ्यांच्या ह्या आशावादीपणानें श्रीपतरावाच्या अंतःकरणांत त्याच्या कारस्थानी आशेच्या सूर्यावर तात्कालिक भयसूचकतेचीं जीं अभ्रें आलीं होतीं तीं दूर झालीं. तो अंगीं होता नव्हता तेवढा सारा धीर आपल्या वाणींत एकवटून शंभुसिंगाला म्हणाला, "तूं माझा उपकारकर्ता आहेस; तुमच्या हातून कितीही घोर अन्याय झाले तरी ते पोटांत घालणें हें माझें कर्तव्य आहे. मात्र चिंता वाटते ती एवढीच कीं, हे मेलेले दोघेही मनुष्य महाराजांच्या खास तैनातींतील होते. त्यांना तुमच्यांतल्याच एका मारेकऱ्यानें अपघातानें ठार मारलें असें जर महाराजांना कळलें, तर मात्र तुम्हां सर्वांवर देखील महाराजांचा रोष होणें शक्य आहे. आतां, ह्याही संकटांतून मी तुमचा बचाव करूं शकेन; पण तुम्ही माझ्या सांगण्याप्रमाणें वागाल तर मला तुमची तरफदारी करून हा अपराध तुमच्यावर शेकणार नाहीं अशी योजना करतां येईल व महाराजांच्या पूर्वीच्या इच्छेप्रमाणें तुमचा यथोचित गौरवही करतां येईल."

या वेळीं ते तिघेही गोंधळी परिस्थितीमुळें 'अडले नारायण' बनलेले होते. आपल्यांतीलच एकानें हा रक्तपात केला आहे व याचा दोष आपणां सर्वांवर येऊं शकेल हें त्यांना पूर्णपणें माहीत होतें. अशा परिस्थितींत श्रीपतरावानें त्यांना नुसतें जीवदान दिलें असतें तरी देखील ते त्याला धन्यवाद देत तेथून निघून गेले असते. त्यांना जर 'आंधळा मागतो एक डोळा; देव देतो दोन' असा अनुभव येऊं लागला तर त्यांना तो सम्मत कसा होणार नाहीं ! त्यांनीं ताबडतोब श्रीपतरावाच्या शब्दाला मान डोलविली व ते त्याच्याबरोबर साताऱ्यास जावयाला तयार झाले. आतां त्या तिघांनाही अर्थात् पार्यांच तंगड्या तोंडीत जाणें प्राप्त होतें.

ह्या आकस्मिक संकटांतून निभावून साताऱ्यांत जाण्याला श्रीपतरावाला अर्थातच फार वेळ लागला.

# प्रकरण चौदावें

# आपत्तींच्या फेऱ्यांत !

नूरनिहार, राणोजी, मल्हारी, पिराजी, रहमान व नाथाजी ही मंडळी पिलाजी-च्या घराकडून गौतमेच्या शोधासाठीं निघाली हें वाचकांना माहीत आहेच. त्यासाठीं त्यांना कांहीं फार दूर जावें लागलें नाहीं. एक तर तें घर नूरनिहारला माहीतच होतें व दुसरें, तें कांहीं तेथून फार लांब नव्हतें. मात्र एवढें खरें कीं, संकटकाळीं मनुष्याची स्थिति पाऱ्यासारखी होते. उष्णता लागतांच पारा प्रथम जरा गोठल्यासारखा होतो व लगेच प्रसरण पावूं लागतो. मनुष्याच्या मनाला संकटाच्या कल्पनेची जबरदस्त आंच बसलेली असली, कीं त्या आंचेनें त्यांचे पायही दुबळे होऊन आंखडूं लागतात. पण प्रत्यक्ष संकटाला तोंड देण्याची पाळी आली कीं तेच पाय सावध होतात, इतकेंच काय पण स्फुरण पावूं लागतात. शूर वीरांची गोष्टच निराळी, जीं दुबळीं व भित्रीं माणसें आहेत, त्यांना देखील प्रत्यक्ष संकटाच्या वेळीं अवसान चढतेंच चढतें. नूरनिहार वगैरे मंडळींच्या बाबतींत थेट तसेंच झालें. ती एकूण एक मंडळी शूर व धैर्यशाली होती. पण त्या प्रत्यक्ष जागीं नूरनिहार त्यांना नेऊन सोडीपर्यंत त्यांच्या अंतःकरणांत संकटाच्या कल्पनेनें एकसारखी कालवाकालव होत होती. प्रत्येकाला भय हें कीं, आपण गेल्याचा कांहीं उपयोग होतो कीं नाहीं? गौतमा आपल्या हातीं सांपडते कीं नाहीं ?

त्यांची ती शंकाच अखेर खरी झाली. नूरनिहार जों त्या इष्ट स्थळीं जाऊन पोंचते, तों तेथें सर्व शांत ! दोघे टोळभैरव मात्र तेथें आपसांत एकमेकांकडे पाहून खीः खीः करून हंसत बसले होते ! नूरनिहारला पाहातांच त्या टोळभैरवांच्या कुचेष्टांना जास्त ऊत आला. पण तिच्या पाठोपाठ राणोजी, मल्हारी, पिराजी व नाथाजी हे चौघे शतवीर आहेत असें दिसतांच ते जरासे ताळ्यावर आले.

"याच घरांत गौतमा होती." नूरनिहार म्हणाली.

राणोजी म्हणाला, "वाः ! हें तर आमच्या दोस्ताचें घर. ह्या आळींतील सारे लोक आमचे दोस्तच आहेत. ह्या घरांत गौतमा आहे असें आम्हांला कळतें तर तिच्या रक्षणासाठीं एथवर येण्याची तसदी घेण्याचें आम्हांला कांहींच कारण नव्हतें. ती इथें आहे म्हणजे आपल्या घरींच आहे."

" कोण, गौतमा ! " त्या घराच्या मालकानें—त्या टोळभैरवांतीलच एकानें विचारलें.

" होय." मल्हारी व राणोजी एकदम उत्तरले.

" छे ! ती इथें नाहीं." तो घरधनी उत्तरला.

" तर मग ती कुठें गेली ? " मल्हारीनें पुढें होऊन रागारागानें विचारलें.

" तिला गमाजीराव व किल्ल्यावरील आणखी कांहीं लोक यांनीं पकडून कैद करून नेलें." दुसरा टोळभैरव उत्तरला.

नूरनिहार व रहमान हीं दोघेंही हा वेळपर्यंत कांहींच न बोलतां नुसतीं सावधगिरीनें बाजूला उभीं होतीं. त्यांना त्या सर्व लोकांच्या नीच मनोवृत्तीची यथायोग्य कल्पना होती. ज्या घरधन्यावर राणोजीनें इतका विश्वास खरेपणानें किंवा बळेंच दाखविला, त्यानेंच नूरनिहारला ती पळून जात असतां अडविण्याचा प्रयत्न केला होता. प्रथम जेव्हां ती गौतमेला घेऊन पिलाजीच्या घराच्या मागच्या दरवाजानें बाहेर पडली, तेव्हां त्या दोघींना जो पहिला शेजारी भेटला, तो हाच ! घरांतील समई पडून विझली ही संधि साधून नूरनिहार जेव्हां अत्यंत सावधगिरीनें घराच्या पुढच्या दरवाजांतून बाहेर पडून मागच्या दरवाजाची कडी काढावयाला गेली, तेव्हांच तिची व त्या घरधन्याची प्रथम गांठ पडली, व 'भिऊं नका, मी तुमचा पाठिराखा आहें' असें तिला त्याचें पहिलें आश्वासन मिळालें. रहमाननें अगोदर वेळ साधून कडी काढलीच होती. तेव्हां त्या घरधन्याच्या धीरावर तिनें मागील दरवाजांतून गौतमेला बाहेर घेतलें. गौतमेला त्यानें व त्याला गौतमेनें तेव्हांच ओळखलें. कारण, गौतमा साताऱ्याला आल्यापासून तो बहुधा रोज पिलाजीच्या घरीं येऊन कधीं पिलाजीशीं तर कधीं मल्हारीशीं तर कधीं भोजराजाशीं गोष्टी करीत बसे. पिलाजी, मल्हारी व राणोजी यांच्याशीं त्याची दोस्ती फार दिवसांची होती. शिवाय तो किल्ल्यावरच नोकर असल्यानें नूरनिहार व रहमान यांच्याशीं देखील त्याची ओळख होती. इतका घरोब्याचा व माहितींतील शेजारी आपण होऊन अशा संकटकाळीं आपणाला हातभार लावण्याला पुढें आलेला पहातांच त्याच्या हेतूविषयीं नूरनिहार व गौतमा यांना कसा संशय यावा ! त्या बिन्धोकपणानें त्याच्यावर विश्वासून त्याच्या घरीं गेल्या. पण तेथें जातांच 'ओळखीचा चोर जिवें मारी' असा अनुभव त्यांना आला. तो घरधनी त्या दोघींना आपल्या घरांत ठेवून कमळेचा बचाव करण्यासाठीं म्हणून जो घराबाहेर पडला, तो तिकडे जातांच अबुबकरच्या साथीदारांशीं फितूर झाला. तोच फितूर झाला असें नाहीं, आणखी जे पांच चार शेजारी त्याच्याबरोबर

केवळ गम्मत पहाण्याच्या इराद्यानें तिकडे गेले, तेही फितूर झाले. त्यांचें अबुबकरच्या साथीदारांशीं काय हितगुज झालें असेल तें त्यांचें ते जाणोत. मात्र हितगुज झालें खरें, हें आपणांला मागेंच माहीत झालें आहे. तेथून जो हा वीर आपल्या इतर सोबत्यांसह घरीं आला, तो कमळेची विचारपूसदेखील न करतां उलट नूरनिहार व गौतमा यांनाच सामोपचाराच्या गोष्टी सांगूं लागला, "तुम्हांला गुन्हेगार म्हणून कैद करून किल्ल्यावर पोंचविणें आम्हांला भाग आहे."

नूरनिहार व गौतमा यांनीं त्या आपमतलबी लोकांची परोपरीनें मनधरणी करून पाहिली, उजाडतांच आपले पुरुष येतील व ते किल्लेदाराला परस्पर काय तो जबाब देतील असें गौतमेनें सांगितलें; पण सारें फुकट ! तेथला एकंदर रागरंग ओळखून नूरनिहारनें गौतमेला त्या लोकांशीं हुजत न घालण्याला हळूच सांगितलें, व गौतमेच्या मुक्ततेची शक्य ती तजवीज करण्याचें कबूल करून ती सर्वांचा डोळा चुकवून बाहेर पडली. गौतमेच्या मनांतूनही तसाच तेथून पाय काढावयाचा होता. पण "तूं बाहेर येऊं नकोस; तुझी गोष्ट निराळी आहे आणि माझी गोष्ट निराळी आहे. मी कशी झाल्यें तरी शाहूमहाराजांच्या मर्जीतील लक्ष्मीबाईसाहेबांची दासी आहें. माझ्याविरुद्ध हे लोक फारसें कांहीं करायला भितील. पण तूं चाळवाचाळव केलीस तर तुला मात्र आतांच्या आतां पकडून नेतील. तेव्हां दगडाखालीं सांपडलेला हात हळुहळू मोकळा करून घ्यावयाला हवा' अशी नूरनिहारनें तिची समजूत घातली होती.

तोच हा घरधनी सदोबा व तोच हा त्याचा साथीदार, आणि तीच ही नूरनिहार त्यांच्या हातावर तुरी देऊन रात्रौ जी तेथून पळाली ती आतां सूर्याबरोबर तेथें उगवली होती ! तिची व त्या दोघांची दृष्टादृष्ट होतांच अहि–नकुलांप्रमाणें त्यांच्या मनाची अवस्था होणें क्रमप्राप्तच होतें. आतां तर काय, नूरनिहारला इतके पाठीराखे होते. ती आतां कशाला भिते ! त्या घरधन्यानें गौतमेला किल्लेदाराच्या लोकांनीं पकडून नेली असें सांगितलेलें ऐकतांच ती मल्हारी व रहमान यांच्याकडे वळून म्हणाली, " हे लोक खोटें बोलत असले पाहिजेत. गौतमेला पकडून किल्ल्यावर पाठविण्याचा त्यांचा प्रथमपासूनचाच डाव आहे. पण गौतमा खास गेली नसेल. ती घरांत असेल, किंवा तिला यांनीं अशाच कांहीं तरी थापा देऊन दुसऱ्या एखाद्या घरांत लपवून ठेविली असेल. तुम्ही या गोष्टीचा जरा कसून तपास करा. "

" जा. पाहिजे तर घरांत जाऊन पहा." सदोबा म्हणाला.

" पण तुम्हीं तिला कशी जाऊं दिली ? तिच्या रक्षणाची हमी तुम्हीं घेतली होती ना ? " मल्हारीनें विचारलें.

" हो ! पण म्हणजे आम्हीं ती हरामखोरी केली कीं काय ? जोंपर्यंत आम्हांला तिचें रक्षण करतां आलें तोंपर्यंत आम्हीं तें केलें. पण—"

" खबरदार ! एक अक्षर देखील पुढें बोलूं नका." नूरनिहार संतापून अंमळ उतावळेपणानें म्हणाली, " तुम्ही दगलबाज आहां. तुम्ही शत्रूंना सामील आहां-रात्रींच तुमचा रागरंग मला कळून चुकला होता. मर्दांसारखे मर्द तुम्हीं असून एका अबलेचें रक्षण तुम्हांला करतां आलें नाहीं ना ? थूः ! तुमच्या मर्दपणावर ! हाच जर तुमच्या बायको-बहिणीच्या अब्रूवर दरोडा पडला असता, तर तुम्हांला कसें बरें वाटलें असतें ? " नूरनिहार रहमानकडे वळून म्हणाली, " रहमान ! चल पाहूं माझ्याबरोबर ! गौतमा आंत आहेशी पाहूं."

सदोबा इतका वेळ गप्प होता. तो आतां म्हणाला, " हं ! तुम्हीं मुसलमानांनीं आमच्या घरांत जावयाचें नाहीं."

" तीं नाहीं तर आम्ही जातों " असें म्हणून मल्हारी आंत घुसला. त्याच्या मागोमाग राणोजी, पिराजी व नाथाजीही आंत घुसले.

" पहा ! पहा ! खुशाल आंत जाऊन पहा जा ! " सदोबा व त्याचा साथीदार असे दोघेही आपसांत फिदिफिदि हंसत म्हणाले.

मल्हारी वगैरे मंडळींचे ते प्रयत्न व्यर्थ होते. त्यांना त्या घरांत गौतमा कांहीं कोठें आढळेना. आतां आणखी कोठें तिचा शोध करावयाचा, कीं तिला खरोखरच किल्ल्यावरील लोकांनीं पकडून नेली, अशी चिंता करीत मल्हारी जो बाहेर आला तो सदोबाला म्हणाला, " सदोबा ! तूं आमचा शेजारी इष्ट असून आमचा असा केंसानें गळा कापलास ! एका बायकोमाणसाचेंही रक्षण तुझ्या हातून झालें नाहीं ! "

" तें खरें; पण आम्हांला किल्लेदाराचा तसा हुकूम होता; तेथें आमचा तरी काय इलाज ! " सदोबा म्हणाला.

सदोबाच्या सबबींवर कोणाचाच विश्वास बसण्याजोगा नव्हता. आणि त्यांतून रहमान व नूरनिहार यांचा तर मुळींच बसण्याजोगा नव्हता. तेव्हां सर्वांची खात्री होऊन चुकली कीं, या वेळीं यांच्याशीं वाद खेळण्यांत कांहीं देखील निष्पन्न व्हावयाचें नाहीं. नूरनिहार मल्हारीला मात्र म्हणाली, " त्याला विचारा, गौतमेला इथून केव्हांसें नेण्यांत आलें ? "

मल्हारीनें तो प्रश्न विचारण्याची वाट न पहातां सदोबा उत्तरला, "चांगला अर्धा प्रहर झाला."

"तूं हें खरें बोलतोस ?" राणोजीनें विचारलें.

"होय, होय, होय !" सदोबा त्रासिक आवाजांत उद्गारला, "आणखी कितीदा सांगूं ?"

इतक्यांत सदोबाची बायको आपल्या पांच वर्षांच्या मुलाला हाताशीं धरून दुसऱ्या हातानें आपले विखुरलेले केंस सांवरीत व डोळे चोळीत बाहेर आली. नूरनिहारला रात्रौ ती भेटलीच होती; तिनें तिला तेव्हांच ओळखलें व विचारलें, "साजूबाई ! गौतमा कुठें गेली तें तुला माहीत आहे का ?"

साजूबाईनें प्रथम आपल्या पतीच्या—सदोबाच्या तोंडाकडे पाहिलें. त्यानें डोळ्यांनीं तिला दटावलें. ती तेवढ्यावरून काय धडा घ्यावयाचा तो घेऊन 'मला बाई माहीत नाहीं. मी झोंपी गेल्यें होतें' अशी नूरनिहारच्या प्रश्नाची टाळाटाळ करीत पलीकडे एका मोठ्या आंब्याच्या झाडाखालीं न्हाणीघर होतें तेथें तोंड धुण्याकरितां निघाली. मल्हारी, राणोजी, नूरनिहार वगैरे सर्वांनाच सदोबाच्या त्या नेत्रपल्लवी-मुळें जास्त संशय आला. नूरनिहारनें तर धीटपणानें पुढें होऊन विचारलें देखील, "सदोबा ! तूं तुझ्या मुलाच्या डोकीवर हात ठेवून शपथ घे कीं गौतमा खरोखरच किल्ल्यावर गेली."

नूरनिहारच्या तोंडचे शब्द ऐकून साजूबाई कांहींशी चमकल्यासारखी होऊन तेथल्या तेथेंच थबकली. सदोबा मल्हारीकडे वळून म्हणाला, "मल्हारी ! म्हणजे मी तुमचा शेजारी इतकें जें बोललों, याच्यावर तुमचा विश्वास बसत नाहीं ना ?" तो आपल्या साथीदाराकडे वळून विषादपूर्ण हास्य करीत म्हणाला, "आमचेंच चुकलें. रात्रौ यांना पाठीशीं घालण्याचें आमचें तरी काय नडलें होतें ! तिकडे महाराची बायको चांभार का पळवीना होता ! मला तिच्याशीं काय करावयाचें होतें !"

"पण तूं म्हणतोस हें जर खरें, तर तूं तशी आपल्या मुलावरून शपथ कां घेईनास ?" नूरनिहार म्हणाली.

"हो ! मी तरी तेंच म्हणतों." राणोजी म्हणाला.

"आणि मी शपथ घेत नाहीं असें म्हटलें तर तुम्ही माझें काय कराल ?" सदोबा म्हणाला.

" काय करीन ? " मल्हारी अस्तन्या वर सारीत पवित्रा टाकून म्हणाला, " दाखवूं का तुला चौदावें रत्न ? "

" सदोबा ! ती मल्हारीच्या भोळ्या जिवाची समजूत आहे. तूं शपथ कां घेईनास धरता ? " नूरनिहार मल्हारीला हातानें शांत करीत म्हणाली.

सदोबानें ओळखलें कीं आतां इथें जास्त ओढून धरण्यांत कांहीं अर्थ नाहीं. कारण, त्याच्या पक्षाचे असे तेथें सारे दोघेजण होते व विरुद्ध पक्षांत पडले एकाहून एक पांच मर्द ! शिवाय चतुर नूरनिहार त्यांची मार्गदर्शक होती ! तो मुकाट्यानें रागारागानें उठला व आपल्या मुलाकडे जातां जातां म्हणाला, " ही पहा शपथ घेतों कीं—"

" हां ! " साजूबाई सदोबाचा हात दूर लोटून आपल्या मुलाला हाताशीं धरून घरांत नेतां नेतां म्हणाली, " मरेना कां ती गौतमा तिकडे ! सारें जग तिकडे उलथेना कां ! पण सकाळच्या रामपाहाऱ्यांत मी माझ्या मुलावरून शपथ घेऊं द्यायची नाहीं. आणि तुमचा तरी एवढा हट्ट कशाला हो ! प्रतिनिधींच्या लोकांची तरी एवढी भीड तुम्हांला कशाला हवी ? म्हणे प्रतिनिधींकडून इनाम मिळणार आहे त्यासाठीं एवढी घडपड ! आग कां लागेना त्या इनामाला ! आपली वतनवाडी आपणाला काय कमी आहे ! त्यांना सांगून सोडा गौतमा कुठें आहे तें. मी माझ्या बाळावरून खोटी शपथ घ्यायला कधीं कद्धीं द्यायची नाहीं, सांगून ठेवत्यें."

साजूबाईच्या ह्या अपत्यवात्सल्यानें तिच्या नवऱ्याच्या व त्याच्या इतर साथीदारांच्या कृष्णकृत्यांवर लख्ख प्रकाश पडला. सदोबा आपल्या मुलावरून धडधडीत खोटी शपथ घ्यावयाला तयार झाला होता. त्याला शपथेचें कांहींच महत्त्व वाटत नव्हतें. भोळ्या भाबड्या जीवाची शपथेच्या साह्यानें जर फसवणूक करतां आली व त्यांत जर आपला स्वार्थ साधला तर तो खुशाल साधावा अशा मताचा सदोबा होता. याचा अर्थ शपथेचा फोलपणा त्याच्या मनाला पटला होता असा नव्हे; पण त्याचें मनच तितक्या हलक्या प्रतीचें होतें. त्यामुळें या वेळीं साजूबाई त्याच्या शपथनाटकाच्या आड आली. म्हणून त्याला राग आला. पण त्या रागांतही साजूबाईच्या अपत्यवात्सल्यानें त्याच्या मनाला जो चिमटा घेतला तो त्याला वर्मीं झोंबला होता. आपली खोटी शपथ आपल्या मुलाचें बरेंवाईट करण्याला कारण होईल या भीतीनें त्याचे हात आंखडले गेले होते. वास्तविक हा प्रसंग 'बाप दाखव नाहीं तर श्राद्ध कर'

असाच होता. गौतमेला किल्ल्यावरील लोकांनीं पकडून नेलें ही सदोबाची सबब लंगडी असल्याचें आतां सर्वांच्या निदर्शनाला येऊन चुकलें होतें. बाप दाखविण्याच्या कामीं सदोबा दुबळा ठरला होता. अर्थात् आतां त्याला श्राद्ध करणें प्राप्तच होतें. गौतमेचा पत्ता त्यानें सीध्या रीतीनें सांगितला नसता तर तेथल्या तेथें मल्हारी, राणोजी वगैरे मंडळींच्या लाथांखालीं त्याचा चेंदामेंदा झाला असता.

पण इतका सदोबाच्या पापाचा घडा अजून पूर्ण भरला नव्हता; म्हणूनच महार तळ्याहून येतांना राणोजी, रहमान व नूरनिहार यांनीं महाराजांच्या ज्या शिपायांना फजीत करून मल्हारी, पिलाजी व नाथाजी यांची मुक्तता केली होती तेच लोक पण ताज्या दमानें व वाढत्या मनुष्यबळानें सूड घेण्यासाठीं तेवढ्यांतल्या तेवढ्यांत दत्त म्हणून समोर येऊन उभे राहिले. त्या लोकांचा जमाव एवढा मोठा होता कीं, त्यासमोर मल्हारी, राणोजी वगैरे तुटपुंज्या लोकांची कांहींच मात्रा चालण्यासारखी नव्हती. प्रतिनिधींचा कैवारी यमाजी व त्याचा मुलगा गमाजी ह्या दोघांनीं आतां तेथें आलेल्या टोळीचें आधिपत्य स्वीकारलें होतें. गमाजीनें रात्रौ जो मार खाल्ला होता व यमाजीचाही मल्हारी आणि राणोजी यांनीं जो फजितवाडा केला होता, त्याची आठवण यमाजी व गमाजी यांच्या मनांत आणि त्याप्रमाणेंच राणोजी, मल्हारी वगैरे लोकांच्याही मनांत अगदीं ताजी होती. आणि यामुळेंच ह्या तंटयाचा निकाल सान्या न्यायनिर्बंधांना बाजूला सारून केवळ 'बळी तो कान पिळी' ह्या म्हणीप्रमाणेंच व्हावयाचा हेंही सर्वांना माहीत होतें.

यमाजी पुढें होऊन अधिकारयुक्त वाणीनें म्हणाला, "राणोजी! मल्हारी! तुम्ही सर्व अपराधी आहां. तुम्हांला मीं या घटकेला कैद केलें आहे. तुमचा न्यायनिवाडा करणें प्रतिनिधींच्या हातीं आहे. आमचें काम फक्त गुन्हेगारांना कैद करण्याचें आहे. या वेळीं जर तुम्ही यापूर्वींच्याप्रमाणें दंगा कराल तर हकनाहक प्राणाला मुकाल. बऱ्या बोलानें आमच्या स्वाधीन व्हा."

राणोजी, मल्हारी वगैरे सर्वांना कळून चुकलें कीं, येथें आतां कांहीं उपाय नाहीं. महाराजांच्या शिपायांशीं मारपीट करून व कैद्यांना सोडवून त्यांनीं राजाज्ञेचा भंग केला होता खरा, व त्या अपराधाबद्दल शासन व्हावयाचें हेंही ठरल्यासारखेंच होतें. बरें, तें शासन त्यांना टाळून टळतां येण्यासारखेंही नव्हतें. या वेळीं कदाचित् त्यांनीं तेवढ्या मोठ्या प्रतिस्पर्ध्यांच्या जमावाशींही दोन हात करून

त्यांचा पाडाव केला असता. तें म्हणजे त्यांना केवळ अशक्य होतें असें नाहीं. पण पुढें काय ? बाजीराव त्यांचा धनी खरा; पण त्यानें तरी प्रत्यक्ष राजद्रोहाच्या बाबतींत त्यांचा बचाव कसा केला असता ? शिवाय बाजीरावाचें आसनच जेथें डळमळीत होतें तेथें त्याच्या आसऱ्याचा त्याच्या आश्रितांना फारसा उपयोग होणें अशक्य होतें. रात्रौ मारेकरी महाराजांना ठार करण्याचा प्रयत्न करून पळाले ती त्यांची गोष्ट निराळी होती. ते कोल्हापूरच्या संभाजीराजांचे आश्रित होते. त्या राज्यांत ते आतांही सुखासमाधानानें जाऊन राहिले असते. पण राणोजी काय, मल्हारी काय, धिराजी काय, नाथाजी काय किंवा रहमान काय, या सर्वांना मरेतों येथेंच दिवस काढावयाचे असल्यानें जलांत राहून माशांशीं वैर करून त्यांचें चालण्याजोगें नव्हतें. त्यामुळें ते मुकाट्यानें यमाजीच्या स्वाधीन झाले. मात्र तशाही परिस्थितींत मल्हारीनें यमाजीची विनवणी केली, " यमाजीराव! आमच्या हातून जरी वेळीं महाराजांचा किंवा प्रतिनिधींचा गुन्हा घडला असला तरी तो गुन्हा कां घडला याचा जर तुम्ही स्वतःशीं विचार कराल तर तुम्हांला आमची कींव येईल. मला सांगा, माझ्या परिस्थितींत तुम्ही असतां तर या वेळीं तुम्हीं काय केलें असतें ? प्रत्यक्ष माझ्या बायकोची अब्रू धोक्यांत आहे असें मला कळतांच मी प्रतिनिधींची कैद झुगारून देऊन व धिराजी आणि नाथाजी यांनाही बळेंच बंधमुक्त करून माझ्याबरोबर घेऊन येथवर धांवत आलों. राजाज्ञेच्या दृष्टीनें हा अन्याय खरा, पण अशा प्रसंगीं असा अन्याय कोण करणार नाहीं ? अशा वेळीं तुमच्या माणसांवर जर असा प्रसंग आला असता तर तो तुम्हीं राजाज्ञेच्या पालनासाठीं डोळ्याआड केला असता का ? "

यमाजी पूर्ववत् तोऱ्यानें किंबहुना आतांच्या तात्कालिक विजयानें किंचित् जास्त शेफारून उत्तरला, " तुझ्या बायकोच्या अब्रूशीं मला कांहींही कर्तव्य नाहीं. मला फक्त माझी कामगिरी बजावावयाची आहे."

मल्हारीनें केविलवाण्या स्वरानें यमाजीला विचारलें, " बरें, तुम्ही माझ्यावर थोडी कृपा कराल का ? "

" कसली कृपा ? " यमाजीनें बापसे बेटा सवाई अशा मगरुरीनें विचारलें.

" येथल्या ह्या लोकांनीं माझ्या घराण्याचा सत्यनाश केला आहे. रात्रौ किल्लेदाराच्या लोकांनीं माझ्या घराचें वाटोळें केलें ! माझ्या आईला जिवें मारलें व माझ्या मामांचेंही त्यांनीं कांहीं बरें वाईट केलें असलें पाहिजे. कमळा त्या अत्याचाराला बिचारी बळी पडली—"

" काय ? कमळा बळी पडली ? खासें झालें. तिच्या कर्मांचें फळ तिला मिळालें." गमाजी म्हणाला.

नूरनिहार दूर उभी राहून हें सारें नाटक पहात होती. ती गमाजीच्या तोंडून कमळेविषयीं अनुदारपणाचे उद्गार निघालेले ऐकून वाघिणीसारखी चवताळून पुढें धावली आणि खडाड्कन् गमाजीच्या एक श्रीमुखांत भडकावून म्हणाली, " कसलीं रे हरामखोरा ! कमळेचीं कर्में आणि कसलें त्यांचें फळ ? बेशरम ! यःकश्चित् एका औरतीवर हात टाकायला तुम्हांला लाज वाटायला पाहिजे होती ! "

नूरनिहारचा तो चंडिकेचा अवतार पाहून सर्वच लोक क्षणभर स्तिमित झाले. गमाजीच्या कांहीं लोकांनीं तेव्हां तिच्यावर हात टाकण्याचा प्रयत्न केला; पण तेवढ्यांत राणोजी, मल्हारी, पिलाजी, नाथाजी व रहमान पुढें आडवे आले. मल्हारी म्हणाला, " हं ! ह्या स्त्रीवर हात टाकाल तर खबरदार ! हात जिथल्या तिथें कलम केला जाईल."

गमाजी एका हातानें गाल चोळीत व दुसऱ्या हातानें हातवारे करीत म्हणाला, " आम्ही प्रतिनिधींचे—महाराजांच्या तर्फेचे लोक आहों."

" असाल ! " राणोजी म्हणाला.

" आम्हांला प्रतिबंध करण्याची साक्षात् परमेश्वराचीही माय व्यायलेली नाहीं." गमाजी पुन्हा म्हणाला.

मल्हारीनें तितक्याच ठणठणीत भाषेंत प्रत्युत्तर दिलें, " पण माझी माय व्यायलेली आहे. एखाद्या निरपराधी स्त्रीवर अत्याचार होतो आहे असें दिसतांच ते गुन्हेगार प्रतिनिधींचे किंवा महाराजांचे लोकच काय पण प्रत्यक्ष प्रतिनिधि किंवा महाराज असले तरी त्यांचें देखील शीर धडावेगळें करण्याला मी कचरणार नाहीं. आणि गमाजीराव ! तुम्ही—जातीचे ब्राह्मण—तुम्ही असून असले नामर्दपणाचे बोल बोलतां ? थूः थूः तुमच्या ब्राह्मणपणावर ! अब्रूदार माता पितरांच्या पोटीं जन्म घेतलेला खानदानीचा पुरुषच काय, पण एखादा अक्करमाशी माणूसदेखील स्त्रीच्या बाबतींत असे अनुदारपणाचे उद्गार काढण्याला धजणार नाहीं. मी तुम्हां सर्वांना पुन्हा बजावून ठेवतों कीं, तुम्हांला रीतीच्या रीतीनें वागावयाचें असेल तर तुम्ही महाराजांच्या किंवा प्रतिनिधींच्या हुकमाची तामिली करणारे लोक म्हणून तुम्हांपुढं आमचीं सर्वांचीं मस्तकें नम्र आहेत. पण तुम्ही थोरांमोठ्यांचे आश्रित म्हणून जर

शेफारून जाऊन भलतेंच कांहीं करूं म्हणाल तर तुमचा दरएकाचा या ठिकाणीं मुद्दा पडेल; याद राखून ठेवा ! ”

यमाजी व गमाजी यांचा आवेश मल्हारीच्या ह्या मेघगर्जनेप्रमाणें गंभीर अशा सडेतोड व वीरश्रीप्रधान भाषणाच्या अखंड प्रवाहांत कोठच्या कोठें विरून गेला. पण ‘पडलों तरी माझेंच नाक वर’ या न्यायानें मल्हारी वगैरे मंडळींसमोर त्यांची एवढी फजीती झाली, नूरनिहारसारख्या एका यःकश्चित् सामान्य स्त्रीनें गमाजीच्या थोबाडींत भडकावण्याला कमी केलें नाहीं, तरी ‘अखेर ह्या मंडळीला मीं कैद केलेंच कीं नाहीं !’ ह्या पुळचट विजयानें देखील ते कांहीं कमी शेफारून गेले नव्हते. त्यांच्या दृष्टीनें त्यांचा हा मोठा विजयच होता. प्रतिनिधीनें त्यांच्यावर जी कामगिरी सोंपविली, ती कोणत्याही स्वरूपांत कां असेना पण पूंण झाली होतीच. आतां प्रतिनिधींच्या वतीनें महाराजांपाशीं आपली शिफारस होणार व आपणाला मोठमोठ्या जहागिरी, मोठमोठे मानमरातब मिळणार, याविषयीं त्यांना किंवा त्यांच्या इतर साथीदारांना शंका नव्हती. नाहीं म्हणावयाला त्यांच्या विजयांत निदान यमाजी व गमाजी ह्या बापलेकांच्या दृष्टीनें तरी एक उणीव मात्र होती. त्यांचा गेल्या रात्रीं इतका पाणउतारा करणारी गौतमा अजून त्यांच्या हातीं सांपडली नव्हती. मल्हारी तिच्या शोधासाठीं त्या लोकांना विनवीत होता म्हणून नव्हे; पण तिला खरोखरच हस्तगत करण्याच्या इरायानें यमाजीनें सदोबाला विचारलें, “ गौतमा कुठें आहे ! ”

“ तिला किल्लेदाराच्या लोकांनीं कैद करून नेली.” सदोबा हंसत हंसत उत्तरला.

ह्या हास्यांत फारसा खरेपणा आहे असें कोणालाच वाटेना. मल्हारी वगैरे गौतमेच्या कैवारी लोकांना वाटलें कीं, त्या अनाथ अबलेच्या अब्रूचें रक्षण करण्याइतकी तरी माणुसकी ह्या चांडाळांच्या अंगीं आहे; म्हणूनच मल्हारीनें थोड्या वेळापूर्वीच्या खोट्या शपथेचा प्रकार गमाजी व यमाजी यांच्या कानांवर घातला. त्याबरोबर यमाजीला संशय येऊन त्यानें सदोबाला विचारलें, “ सदोबा ! गौतमेचा खरा प्रकार काय आहे तो सांग.”

सदोबा हंसून म्हणाला, “ मी सांगतों हें अक्षरशः खरें आहे. मात्र त्यांत एक गोम आहे, ती तुम्ही जरा बाजूला या म्हणजे मी तुम्हांला सांगतों.”

मल्हारी, राणोजी वगैरे सर्व गुन्हेगारांच्या सभोंवार शिपायांचा पक्का बंदोबस्त असल्यामुळें ते पुन्हा उलटतील असें यमाजीच्या पक्षाला मुळींच भय उरलें नव्हतें.

त्यामुळें सदोबाचा कानमंत्र ऐकण्याला त्यांना निर्धास्तपणें बाजूला जातां आलें. सदोबानें त्यांना आपल्या न्हाणीघराच्या पलीकडे नेऊन सांगितलें, "गौतमेला रात्रौ आम्हीं येथें अडकवून ठेविली होती. तिला पहांटेच्या प्रहरीं कांहीं दगा होईल ह्या भयानें मुद्दाम आम्हीं होऊन किल्लयावर पाठवून दिली. तिला कैद करावी असा किल्लेदाराचाही हुकूम होताच. तेव्हां आपणांला ती आतां किल्ल्यावर किल्लेदाराच्या कैदेंत असल्याचें आढळून येईल."

"ठीक आहे." यमाजी व गमाजी एकदम उत्तरले. स्वतः गौतमेला कैद करण्याची त्यांची हौस जरी भागली नाहीं तरी गौतमा कैद झाली असें ऐकून त्यांनीं आपली दुधाची तहान ताकावर भागवून घेतली.

"गौतमेचा तपास लागला का?" मल्हारीनें यमाजी व गमाजी या दोघांनाही ते पुढें येतांच विचारलें.

गमाजी मगरूरपणें उत्तरला, "तुझी गौतमा किल्लेदाराची कुळंबीण बनण्यासाठीं किल्लयावर गेली आहे, व तुलाही आतां प्रतिनिधींचा गोठा झाडण्यासाठीं तिकडेच जावयाचें आहे."

मल्हारीनें हे शब्द ऐकतांच कपाळाला हात लावले. गौतमेविषयींची त्याची ओझरती आशाही आतां नामशेष झाली. बरें; तो स्वतः व त्याचे राणोजी, नाथाजी, रहमान वगैरे इतर साथीदार जेरबंद कैदी झाले होते, त्यांना गौतमेसाठीं अगर दुसऱ्या कोणासाठीं निदान या प्रसंगीं तरी कांहींच करतां येण्याजोगें नव्हतें. सदोबासारख्या नादान् नामर्दानें त्यांच्या तशा परस्वाधीन स्थितींत त्यांना हंसून त्यांचा उपमर्द करण्याला कमी केलें नाहीं! साजूबाईही आपल्या नवऱ्याचें हें कुटिलनीतिकौशल्य व मल्हारी वगैरे लोकांचा पडता काळ पाहून त्यांना हंसली. पण तिचा देखील मल्हारीला किंवा त्याच्या साथीदारांना मुळींच प्रतिकार करतां येण्यासारखा नव्हता. नूरनिहारनें मात्र साजूबाईच्या त्या नीचपणाच्या हंसण्याला अनुसरून बजावलें, "साजूबाई! आज गौतमेची अशी विटंबना झाल्यामुळें तूं निलाजरेपणानें दांत काढून फिदिफिदी हंसतेस; पण तुझ्यावरच जर असा प्रसंग आला व त्या वेळीं लोक तुला असेच हंसले तर त्या वेळीं तुझ्या मनाला काय वाटेल?"

साजूबाई यावर बेफिकीरपणें उत्तरली, "त्या वेळीं माझें मी पाहून घेईन. तूर्त तुझें तूं तर पहा!"

तो प्रश्न त्या वेळीं तरी तेवढ्यावरच मिटला. यमाजी व गमाजी सर्व कैद्यांना

घेऊन किल्ल्याकडे चालले. त्यांनीं जातां जातां नूरनिहारलाही मुकाटपणें त्या कैद्यांबरोबर चलावयाला सांगितलें. पण नूरनिहार कसली वस्ताद! ती विरुद्ध दिशेनें आपल्या वाटेनें जातां जातां म्हणाली, "मी तुमच्या प्रतिनिधीलाही ओळखीत नाहीं आणि किल्लेदारालाही ओळखीत नाहीं. मी लक्ष्मीबाईसाहेबांची दासी आहें. मला कैद करणारे तुम्ही रे कोण ! निमूटपणें आल्या वाटेनें चालते व्हा नाहींतर बाईसाहेबांच्यामार्फत महाराजांना सांगून तुमच्या तोंडांत माती कालवीन."

नूरनिहारच्या ह्या वेद्धुट भाषणानें कोणालाही चीडच आली असती. यमाजी व गमाजी यांचा तर तिनें यापूर्वी व या घटकेलाही उघडउघड पाणउतारा केला होता. त्यांनीं हा वेळपर्यंत ती स्त्री व तशांत लक्ष्मीबाईसाहेबांची दासी म्हणून तिची गय केली होती; पण आतां त्यांनीं चिडून तिलाही तेथल्या तेथें आपल्या चौघां शिपायांकडून कैद केलें. नूरनिहारचा तेथें कांहींच इलाज चालला नाहीं !

# प्रकरण पंधरावें

# पंतांच्या गोटांत



शामाजी व गमाजी वगैरे मंडळीला मल्हारी वगैरे लोकांना कैद करण्याच्या कामगिरीवर पाठविल्यानंतर प्रतिनिधीच्या मागें निकडीचें काम बाजीरावाला हुडकून काढून व जरूर तर कैद करून महाराजांसमोर न्यावयाचें होतें; आणि तसेंच किंवा किंबहुना त्याहूनही महत्त्वाचें असें एक काम त्याला करावयाचें होतें तें 'बाजिरावाविरुद्ध त्यानेंच महाराजांवर मारेकरी घातले' अशा स्वरूपाचा प्रत्यक्ष पुरावा गोळा करण्याचें होय. ह्या पुराव्याला मुद्देमाल म्हणून उपयोगी पडणारी मारेकऱ्यांपाशीं असलेली बाजिरावाची शाल यापूर्वींच महारदऱ्याला प्रतिनिधीच्या हातीं आली होती हें आपणाला माहीत आहेच. तसेंच त्या चौघां मारेकऱ्यांपैकीं तिघेजण महारदऱ्याहून साताऱ्यांत येतांना त्यानें आपणाबरोबर बोलावून आणले होते हेंही आपणाला यापूर्वींच कळून चुकलें आहे. त्या मारेकऱ्यांकडून स्वतःच्या हेतूला पोषक अशा प्रकारची कबुली मिळवून त्या कबुलीच्या जोरावर बाजिरावाला महाराजांच्या विरुद्ध कटाचा नायक ठरवावयाचें असा प्रतिनिधीचा डाव होता. तिघेही मारेकरी इनामतीच्या आशेनें खऱ्या अथवा खोट्या कारणांसाठीं बाजिरावाचें नांव खास घेऊं शकतील याविषयीं त्याला शंका नव्हती. आणि म्हणूनच बाजिरावाच्या शोधाला स्वतः निघण्यापूर्वीं त्यानें आपल्या विश्वासांतील नागोजीभटाला त्या कामगिरीवर पाठवून स्वतः त्या मारेकऱ्यांना मथविण्याचें कार्य हातीं घेतलें.

" तुम्ही महाराजांच्या जिवावर उठलां हा अक्षम्य गुन्हा केला किंवा नाहीं ! " प्रतिनिधीनें तिघांही मारेकऱ्यांना एकदम विचारलें.

शंभुसिंग उत्तरला, " होय सरकार ! गुन्हा आमच्या हातून झाला खरा."

" त्या गुन्ह्याचा तपास करण्याचें व जे गुन्हेगार ठरतील त्यांना शासन करण्याचें काम महाराजांनीं मजवर सोंपविलें आहे हें तुम्हांला माहीत आहेच. मीं गुन्ह्याचा बहुतेक तपास लाविला आहे. बाजीरावसाहेबांनीं महाराजांना ठार मारण्याचा कट केला असून त्या कटांत तुम्ही चौघे सामील होतां याची साक्ष ही बाजिरावाची शालच देते." असें म्हणून प्रतिनिधीनें आपल्याजवळची शाल त्या गोंधळ्यांना

दाखविली, व विचारलें, "ही शाल बाजीरावसाहेबांनीं तुम्हांला बक्षीस दिली होती किंवा नाहीं ?"

त्या शालीकडे पहातांच पराचा पारवा व ठिणगीचा वणवा ह्या बाबतींत कसा झाला आहे हें शंभुसिंग, आप्पाजी व शहाजी ह्या तिघांनाही स्पष्टपणें कळून चुकलें. या पूर्वीच्या एकंदर परिस्थितीचें चित्र त्यांच्या डोळ्यांसमोर मूर्तिमंत उभें राहिलें.बाजिरावावर हकनाहक हा आरोप येत आहे असें पाहून त्यांचीं मनें पराकाष्ठेचीं अस्वस्थ झालीं. शंभुसिंगानें आपणांला शाल कशी मिळाली वगैरे सर्व खराखुरा वृत्तांत प्रतिनिधीला निवेदन केला, व बाजिरावाचें ह्या कटांत काडीइतकें देखील अंग नाहीं असें पुनःपुन्हा बजावून सांगितलें. शंभुसिंगाचें तें आत्मनिवेदन इतकें खरें व सुसंगत होतें कीं, त्यावरून कोणाचीही बाजिरावाच्या निर्दोषतेबद्दल खात्री पटली असती. फार काय, बाजिरावाचा कट्टा शत्रु जरी असता व त्यानें बाजिरावाशीं मर्दानी शत्रुत्व साधण्याचें ठरविलें असतें, तरी त्याला देखील ह्या संशयाचा फायदा घेऊन बाजिरावाला नामोहरम करण्याचा प्रयत्न करण्याचें नीच कर्म सुचलें व रुचलें नसतें. पण प्रतिनिधि तसा नव्हता. तो पेशव्याचा व म्हणूनच बाजिरावाचा कट्टा शत्रु होता; पण मर्दानी शत्रु नव्हता. मर्दुमकीच्या जोरावर बाजिरावाला निस्तेज करण्याची कुवत त्याच्या अंगीं नव्हती. सिंहाचा छावा हत्तीवर समोरासमोर उडी घालून त्याचें गंडस्थळ फोडतो व उंदीर हत्ती बेसावध आहे असें पाहून मागाहून चोरटेपणानें त्याची शेपटी कुरतडण्यांतच धन्यता मानतो ! हत्तीशीं उंदराचें ज्या प्रकारचें वैमनस्य त्याच प्रकारचें वैमनस्य प्रतिनिधीचें बाजिरावाशीं होतें. बाजीराव ह्या कटांत सामील नाहीं अशी जरी प्रतिनिधीची आतां खात्री होऊन चुकली तरी त्यानें मनांत बाजिरावाला निर्दोषी म्हणण्याचें नाकारण्याचा निश्चय केला व आपल्या मनाप्रमाणें कबुलीजबाब त्या गोंधळ्यांपासून मिळविण्यासाठीं त्यांना धमकावणीच्या भाषेंत सांगितलें, "तुम्ही हें निव्वळ खोटें बोलत आहां. एकंदर खरा प्रकार मला कळून चुकला आहे व त्याप्रमाणें जर तुम्हीं स्पष्ट कबुली दिली तरच तुम्हांला मी क्षमा करीन. इतकेंच काय पण कबूल केल्याप्रमाणें महाराजांकडून तुम्हांला चांगलीं इनामेंही देववीन. पण तुम्ही जर खोटें बोललां तर मात्र त्याचे परिणाम फार वाईट होतील. ह्याचा पूर्ण विचार करून मला सांगा कीं, तुम्ही हा गुन्हा आतां माझ्यासमोर व सायंकाळीं किंवा उदयीक मी तुम्हांला महाराजांसमोर उभे करीन त्या वेळीं त्यांच्यासमोर कबूल करून आपल्या जन्माचें कल्याण करून घेणार, कीं हातून घडल्या गुन्ह्याबद्दल देहान्त शासन भोगणार ?"

गोंधळ्यांना कळून चुकलें कीं, श्रीपतरावानें आपणाला जें इतक्या गौरवानें बोलावून आणलें तें केवळ आपलें कल्याण करण्यासाठीं आणलें नसून बाजिरावाविरुद्ध स्वतःच्या कारस्थानांना बळकटी आणण्यासाठीं आणलें. ते जरी मोहवश झाले होते तर बाजिरावासारख्या दिलदार सज्जनाविरुद्ध असले आरोप घेणें त्यांना मुळींच रुचलें नाहीं. मनुष्य मोहाला बळी पडून कोणकोणते अन्याय करूं शकेल यालादेखील त्या त्या माणसापुरती स्वतंत्र मर्यादा असते. ह्या गोंधळ्यांची मर्यादा बक्षीस मिळवावयाचें व त्यासाठीं शक्य तेवढी प्रतिनिधीची खुषमस्करी करावयाची येथवरच संपली होती. तेवढ्यासाठीं फार तर त्यांनीं आपणांला असल्या दुष्ट कर्माला प्रोत्साहन देणाऱ्या कोल्हापूरकर संभाजीमहाराजांचें नांव सांगितलें असतें. पण बाजिरावाचें नांव व तें निव्वळ बनावट रीतीनें घेण्याचें त्यांच्या जिवावर आलें होतें. तो अन्याय करण्यापेक्षां आपण इनामाची आशा सोडून निघून जावें असेंही त्यांना त्या वेळीं वाटलें. पण तशी कबुली दिल्याशिवाय प्रतिनिधीच्या मगरमिठींतून त्यांची मुळींच सुटका होण्यासारखी नव्हती. इतकेंच काय पण त्यांचे जीवही एरव्हीं बचावणें शक्य नव्हतें.

"मग काय ! मी सांगतों हें तुम्हांला कबूल आहे किंवा नाहीं ? बोला.तुम्हांला काय पाहिजे ?" प्रतिनिधि आपल्या दोन्ही मुठी त्या गोंधळ्यांसमोर करून म्हणाला, "ह्या एका मुठींत मरण आहे आणि दुसऱ्या मुठींत इनाम व मानसन्मान आहे. यांतील कोणती ती मूठ आतां उघडा व आपल्या नशिबाचा वांटा उचलून घ्या."

त्या गोंधळ्यांनीं अगदीं थोडा वेळ आपसांत कांहीं खलबत केलें व अखेर प्रतिनिधीला येऊन सांगितलें, "सरकार ! आपण आम्हांला क्षमा कराल तर आम्ही खरें बोलतों. मात्र या वेळीं आम्हांला तारणें किंवा मारणें आपल्या हातीं आहे. आम्हीं बाजीरावसाहेबांच्या सांगण्यावरूनच शाहूमहाराजांना दगा देण्याचा प्रयत्न केला."

श्रीपतरावाला गोंधळ्यांचा हा कबुलीजबाब ऐकून स्वतःच्या अंगावर मूठभर मांस चढल्यासारखें वाटूं लागलें. हा त्यांचा जबाब जुलमाचा रामराम नसून खुषीचा रामराम आहे असेंच त्यानें गृहीत धरलें व त्याची अधिक छाननी करण्याच्या भानगडींत न पडतां त्यांना विचारलें, "तुम्ही हें खरें बोलतां ना ? कीं इनामाच्या आशेनें भलतेंच कांहीं बोलतां ?"

त्या गोंधळ्यांपैकीं शंभुसिंग उत्तरला, "सरकार ! आम्ही हें खरें बोलतों !"

आप्पाजी म्हणाला, "सरकार ! देवासाक्ष आम्ही बोलतों हें अक्षरशः खरें आहे."

शहाजी म्हणाला, "सरकार ! इनामाच्या आशेनें आम्ही खऱ्या रक्ताच्या मराठ्यांनीं आपली जीभ अशी नरकांत घालूं कीं काय ? आम्ही खरें बोलावयाला कोणालाही भिणार नाहीं."

"प्रत्यक्ष शाहूमहाराजांसमोर बाजिरावाच्या तोंडावर तुम्हांला या गोष्टी कबूल कराव्या लागतील. इतकें धैर्य तुमच्या अंगीं आहेना ? अर्थात् नंतर तुम्हांला इनामें खास मिळतील. पण तुम्ही जर बाजिरावाचे मिंधे असाल तर आपलें आधीं सांगून ठेवतों." प्रतिनिधि म्हणाला.

"काय रे ! तुम्हांला हें आहे कबूल ?" शहाजीनें शंभुसिंग व आप्पाजी यांच्याकडे वळून विचारलें. क्षणभर तिघांचा कांहीं नेत्रसंकेत झाला व त्यांनीं प्रतिनिधीपाशीं त्याच्या अपेक्षेप्रमाणें सरास कबुली देऊन टाकली.

"ठीक आहे. आतां मी तुम्हांला महाराजांसमोर हजर करीन; तोंपर्यंत मात्र तुम्हांला माझे नजरकैदी म्हणून राहावें लागेल." प्रतिनिधि म्हणाला.

या सर्व गोष्टी बिनतक्रार मान्य करणें गोंधळ्यांना तेव्हां प्राप्तच होतें व त्यांनीं तें मान्य केलेंही. प्रतिनिधीला त्यामुळें अत्यंत समाधान वाटलें. आतां यापुढें बाजिरावावर कटाचा आरोप शाबीद करण्यासाठीं आणखी काय काय तयारी केली पाहिजे या विचारांत गढून जाऊन तो सदरेवर येरझारा घालीत होता; इतक्यांत यमाजी व गमाजी किल्ल्यावरून तेथें येऊन पोंचले. त्यांच्याकडून या घटकेपर्यंतची सर्व हकीगत प्रतिनिधीला समजून चुकली. ती वाचकांना या पूर्वींच माहीत असल्याकारणानें या ठिकाणीं तिची द्विरुक्ति करण्याचें कारण नाहीं. मात्र त्या एकंदर प्रकाराच्या पोटीं दोन निराळ्याच अकल्पित गोष्टी जन्माला आल्या होत्या व त्यांनीं एकंदर कारस्थानाचा रंग पुरा पालटून टाकला होता. त्या दोन गोष्टी प्रतिनिधीच्या कानावर घालणें यमाजी व गमाजी या दोघांनाही अपरिहार्य होतें. पण तितकेंच त्यांना तें नामुष्कीचेंही होतें. त्या दोन गोष्टींमुळें आपणावर येणारा नाकर्तेपणाचा आरोप आधींपासूनच धुऊन काढण्याच्या इराद्यानें यमाजी म्हणाला, "दादासाहेब ! ह्या कारस्थानांत किल्लेदार मात्र बाजिरावाशीं फितुर झाला आहे. हें फार वाईट झालें."

"काय किल्लेदार फितुर झाला आहे ?" श्रीपतरावानें भुंवया वर चढवीत विचारलें.

"होय." यमाजी उत्तरला.

" तो कसा काय ? " श्रीपतरावानें विचारलें.

" तो कसा तें काय सांगूं ? दरएक गोष्टींत तो आमचा अवसानघात करतो आहे. आतां मल्हारी वगैरेंना घेऊन आम्ही किल्ल्यावर जातों तों रात्रौ कैद झालेल्या भोजराजाला किल्लेदारानें त्या पूर्वीच बंधुमुक्त केलें होतें. पिलाजी जाधव स्वतःच्या कर्मांनीं गोत्यांत आला, तरी त्याची सेवाशुश्रूषा किल्लेदाराच्या घरांत मारे इतमामानें चालली आहे ! पिलाजीची बायको आपल्या कर्मांनीं मेली, तिच्यासाठीं किल्लेदार किती हळहळला व आपल्याच लोकांना त्यानें त्याबद्दल किती दोष दिला ! अरे राम ! तो मल्हारी, राणोजी वगैरे मंडळींलाही आतांच्या आतां बंधमुक्त करण्याला हुरळला होता. पण त्याला जेव्हां आम्ही अशानें महाराजांच्या आज्ञेचा भंग होतो असें बजावलें, तेव्हां तो जरा वरमला. तात्पर्य काय, किल्ला हें आज शत्रूच्या सुरक्षितपणाचें मकाण होऊन बसलें आहे."

" किल्लेदार इतका बहकला काय ? ठीक आहे. मी स्वतः जाऊन त्याचा बंदोबस्त करतों." प्रतिनिधि किल्ल्यावर जाण्यासाठीं उठतां उठतां म्हणाला, " पण तुम्ही बाजीराव कुठें आहे याचा कांहीं तपास लावला का ? "

" नाहीं, दादासाहेब ! आम्हांला तेवढा वेळच मिळाला नाहीं." यमाजी म्हणाला.

" मग आतांच्या आतां जा पाहूं ! एकजण चिटणिसांच्या घरीं जा, एकजण पुरंदऱ्यांच्या घरीं जा, व बाजीराव कुठें आहे एवढें नुसतें मला येऊन सांगा."

" तें काम आम्ही करतों. पण दादासाहेब ! बाजीराव या कटांत सामील होता ही गोष्ट खरी ना ? " यमाजीनें विचारलें.

" म्हणजे हें कांहीं सांगायला पाहिजे."

" एकूण हें प्रकरण बाजिरावावर शेकणार म्हणावयाचें." यमाजी म्हणाला.

तेवढ्यांत गमाजी उद्गारला, " हो ! स्वारी जी पेशवाईचीं वस्त्रें घेण्यासाठीं म्हणून सासवडाहून येथवर धावत आली, ती आतां पुरंदरच्या किल्ल्यावर कैदी म्हणून खितपत पडणार ! "

प्रतिनिधि यावर नुसता समाधानपूर्वक हंसला व किल्ल्यावरचा बंदोबस्त करण्यासाठीं तिकडे जावयाला निघून गेला. थोड्या वेळानें यमाजी व गमाजी हेही आपल्या कामगिरीवर निघाले. गमाजी पुरंदऱ्यांच्या वाड्याकडे निघून गेला व यमाजी चिटणिसाच्या वाड्याकडे जावयाचा होता, इतक्यांत राधाबाई जी ह्या वेळ-



यमाजींनें भविष्य वर्तविलें, "वाः ! किती छान राजयोग आहे हा !"

पर्यंत माजघरांत बसून बाहेरचें सारें संभाषण ऐकत होती ती सदरेवर येऊन म्हणाली, " यमाजीआप्पा ! तुम्हीं सर्वांनीं हें काय आरंभिलें आहे ? "

यमाजीनें आपल्या धनिणीच्या तोंडचे शब्द कानांनीं ऐकले, ते त्याला कांहींसे नापसंतीचे वाटले. पण त्यानें तिच्या डोळ्यांकडे व तोंडाकडे पाहिलें तों तेथें मात्र त्याला तिची पूर्ण पसंती दिसून आली. तो खुलत्या दिलानें म्हणाला, " वहिनी ! हे सारे खटाटोप केवळ तुमच्यासाठीं चालले आहेत. शाहूमहाराजांच्या राजवटीला दादासाहेबांनीं पेशवे व प्रतिनिधि या संयुक्त पदाचे एकटे सर्वाधिकारी व्हावें व महाराजांच्या पट्टराणीच्या तोलाचा मान तुम्हांला मिळावा, म्हणून ही सारी यातायात चालली आहे. परमेश्वर तरी पहा तुमचा कसा पाठिराखा आहे तो ! याच वेळीं बाजिरावाला स्वतःचा सर्वनाश करून घेण्याची दुर्बुद्धि कां सुचावी ? "

" पण तुम्ही म्हणतां याप्रमाणें सारें खरोखरीच होणार का ? " राधाबाईनें विचारलें.

" होणार म्हणजे? एकदां सोडून हजारदां सांगतों, त्याप्रमाणें होणार! " यमाजी आपल्या जन्मजात तोंडपुजेपणाला अनुसरून म्हणाला, " तें कांहीं नाहीं, वहिनी! तुमचे सध्यांचे ग्रह फार उच्चीचे असले पाहिजेत. प्रत्यक्ष राजचिन्हांची रेषा तुमच्या हातावर तुमच्या जन्मापासून असावी व ती आजकाल उजळूं लागली असली पाहिजे. पाहूं, तुमचा हात पाहूं ! "

यमाजीला थोडेंसें सामुद्रिक येतें किंवा तो निदान तें ज्ञान आपणाला असल्याचा बहाणा तरी करतो हें राधाबाईला माहीत होतें. तिचा स्वतःच्या असल्या भविष्यावर भोळा विश्वासही होता. ती लगेच जिज्ञासापूर्ण भावनेनें सदरेवरील एका नक्षीदार उच्चासनावर बसून आपला हात यमाजी पुढें करून म्हणाली, " पहा पाहूं ! "

यमाजीनें थोडा वेळ राधाबाईच्या हातावरील सर्व रेषा निरखून पाहिल्या व भविष्य वर्तवलें, " वाः! किती छान राजयोग आहे हा ! वहिनी ! तुम्ही मराठशाहीच्या सर्वाधिकारी खास होणार ! "

राधाबाईची एक आवडती कुळंबीण तिच्यामागें उभी राहून सारें ऐकत होती; ती आनंदित मनानें उद्गारली, " मीही बाईसाहेबांना कालपासून पुनः पुन्हा तेंच सांगतें आहें. "

राधाबाईनें आनंदित मनानें अंमळ मागें वळून हंसत हंसत त्या कुळंबिणीकडे पाहिलें. यमाजी व ती कुळंबीण यांच्याही दृष्टीचें तेव्हांच मीलन झालें, व तीं दोघेंही एकमेकांकडे पाहून समाधानपूर्वक हंसलीं. राधाबाई आतां मराठशाहीची सर्वाधिकारी होणार हें त्या बैठकीपुरतें तरी खास ठरलें व त्याच कार्याची सिद्धता करण्यासाठीं अर्थात् बाजिरावाचा तपास करून त्याला गोत्यांत आणण्यासाठीं यमाजी आपल्या कामगिरीवर निघून गेला.

थोड्या वेळानें नागोजीभट्ट बाहेरून आला, तो बातमी घेऊन आला कीं बाजीराव कुठें गेला त्याचा पत्ताच लागत नाहीं! त्याला ह्या आपल्या कमकुवतपणाबद्दल विषाद वाटत होता. पण आणखी थोड्या वेळानें यमाजी व गमाजी आले ते देखील जेव्हां बाजिरावाच्या तपासासाठीं जसे गेले तसेच हात हलवीत आलेले त्यानें पाहिले, तेव्हां त्याला समाधान वाटलें कीं, आतां आपणाला एकट्यालाच कोणी रडतराऊत म्हणणार नाहीं!

प्रकरण सोळावें

# सुमंत सांपडले !

प्रतिनिधींच्या घरून मोठ्या पहांटेला रामदासपंत व हकीम महंमदअल्ली हे निजामाकडून आलेले पाहुणे निजामाकडे जावयाला निघाल्यावर त्यांच्या पाठलागावर बाजीराव जो निघाला, तो प्रथम सुमंतांच्या वाड्यांत आला व सुमंतही नुक्तेच वाड्याबाहेर पडून गेल्याचें कळतांच तसाच त्यांच्या मागोमाग त्यानें आपला घोडा पिटाळला, हें वाचकांना माहीत आहेच. सुमंत नुक्तेच वाटेला लागले असल्यानें व सर्व मंडळी हैद्राबादेकडे जावयाची हेंही बाजिरावाला माहीत असल्यानें त्यानें क्षणभर चालतां चालतां ही मंडळी कोणत्या रस्त्यानें गेली असावी याविषयीं विचार केला. इतक्या दूरवरच्या अंतरावर ही मंडळी जावयाची, अर्थात् त्यांच्याबरोबर कांहीं तरी लवाजमा असणार हें उघड होतें. आणि साताऱ्यांतून निघतांना असा लवाजमा त्यांनीं बरोबर घेतला होता कीं काय, याचा बाजिरावानें कसून तपास केला तरी त्याला तसें मुळींच कळेना. नाहीं म्हणावयाला त्याला एवढें मात्र कळलें कीं, मेणा नेण्यासाठीं जे भोई बोलावण्यांत आले होते, ते कोरेगांवापर्यंतच बोलावण्यांत आले होते. कोरेगांव ही प्रतिनिधींच्या पंखांखालील जागा असल्यानें व निजामाच्या मुलुखांत जावयाचा राजमार्ग कोरेगांवावरून* वर्धाघांट महिमानगडघांट अशा घांटांतून जात असल्यानें प्रतिनिधिपक्षाच्या ह्या मंडळीचा पहिला तळ कोरेगांवालाच पडणार व त्यांची बाकीची सर्व तयारी तेथें वर्धनगडावर अथवा महिमानगडावर असणार, हें हेरून तेथल्याच एका हरकाऱ्याबरोबर राणोजीला तसा निरोप पाठवून बाजीराव थेट त्या अनुरोधानें निघाला.

थोड्याच वेळांत बाजिरावाच्या अटकळीप्रमाणें त्याला सुमंतदेखील त्याच रस्त्यानें घोडा फेंकीत जातांना दिसले. सुमंतांबरोबर आणखी कोणी दोघे स्वार होते; त्यामुळें बाजिरावानें आपला घोडा तितका पुढें घुसविला नाहीं. तो सावकाशपणें

---

* साताऱ्याहून सध्यांच्या सातारा-पंढरपूर रस्त्यानें जातांना हे दोन घांट लागतात. वर्धनगड व महिमानगड ह्या किल्ल्यांच्या नांवांवरून ह्या घांटांना हीं नांवें मिळालेलीं आहेत. हे किल्लेही ह्या मार्गावरच जरा बाजूला आहेत.

सुमंतांच्या नजरेला येऊं नये अशा बेतानें त्यांच्या मागोमाग आपला घोडा चालवीत होता. मध्येंच सरळ रस्ता दिसूं लागला कीं, त्यानें अंमळ आडोशाला थांबावें व सुमंत रस्त्याच्या वळणाला लागतांच तेवढेंच पुढें जावें, असा त्याचा क्रम बराच वेळपर्यंत चालला होता. तो राणोजीची वाट पहात होता. राणोजी माणसें घेऊन येतांच आपण सर्वांनीं मिळून दुप्पट दौडीनें पुढें जाऊन सुमंतांना गांठावयाचें असा त्याचा बेत होता. पण चांगला घटकाभर दिवस येईतों त्याचा हा बेत कांहीं तडीला गेला नाहीं. कारण राणोजी कांहीं पूर्वयोजनेप्रमाणें त्याच्या साह्याला आला नाहीं. तो कसा येणार ! तो तर तिकडे निराळ्याच फेऱ्यांत सांपडला होता.

अशा स्थितींत बाजीराव साताऱ्यापासून कोरेगांवपर्यंतच्या अर्ध्या वाटेवर जाऊन पोंचतो न पोंचतो तोंच रस्त्याच्या उजव्या बाजूनें जरंड्याच्या* डोंगरांतून कांहीं लोक भराभर डोंगर उतरून येतांना त्याला दिसले. त्याबरोबर त्याला प्रथम दुग्धा पडली कीं, हे लोक कोणाचे ? आपण पाठलाग केल्यास आपला प्रतिकार करण्या-साठीं शत्रूनें ही टोळी एथल्या डोंगरांत लपवून ठेविली होती किंवा कसें ? तसें जर असलें तर आतां आपल्या एकट्याचें ह्या एवढ्या जमावासमोर काय चालणार !

अशा आणीबाणीच्या वेळीं चोहोंकडून संकटांचा अग्निवर्षाव आपणावर होऊं लागला असें पहातांच हातपाय गाळण्याइतका बाजीराव लेंचापेंचा गडी नव्हता. उलट अशा संकटसमयीं त्याला जास्त स्फुरण चढे व जास्त नेटानें तो श्रीगजाननाचें व आपल्या गुरुदेवांचें—ब्रह्मेंद्रस्वामींचें† स्मरण करून संकटांत उडी घाली. आपल्या कुळदैवतावर व गुरूवर बाजिरावाची निःसीम श्रद्धा होती व 'देव भावाचा भुकेला' या न्यायानें ती श्रद्धा त्याला अशा आणीबाणींच्या वेळीं उपयुक्तही होई. आजही तसेंच झालें. त्याला श्रीगजाननाचें व गुरुदेवांचें स्मरण व्हावयाला व गुरु-कृपेची खूण असें भगवें निशाण त्या डोंगरांतून खालीं उतरणाऱ्या लोकांपैकीं कोणाच्या तरी हातीं दिसावयाला एक गांठ पडली. त्यावरून त्यानें हे लोक आपले-च साह्यकर्ते असावे असें ओळखलें व उत्साहपूर्वक त्या निशाणाला वंदन केलें.

---

* जरंड्याच्या डोंगरावर रामदासस्वामींनीं स्थापन केलेल्या मारुतीचें प्रसिद्ध स्थान आहे.

† ब्रह्मेंद्रस्वामींचा पहिल्या उल्लेख 'कादंबरीमय पेशवाई' मधील चारही कादंबऱ्यांत प्रामुख्यानें आलेला आहे. हे पेशव्यांचे गुरु होत.

थोड्याच वेळांत ते लोक आणखी थोडे पुढें आले तेव्हां बाजिरावाला तें निशाण हातीं धरणारे*माधवस्वामी आहेत असें आढळून आलें. तात्काळ तो आपला घोडा उभा करून त्या मंडळींची वाट पहात थांबला.

थोड्या वेळानें माधवस्वामी आपल्याबरोबरच्या त्या वीस भालाइतांसह बाजीराव जेथें उभा होता तेथें येऊन पोंचले.

बाजिरावानें माधवस्वामींच्या चरणांना वंदन करून विचारलें, " स्वामी ! आपण इकडे कुठें ! "

माधवस्वामी हंसून म्हणाले, " पण तुम्ही इकडे कुठें ! "

बाजिरावानें शक्य तितक्या मोजक्या शब्दांत एकंदर वृत्तांत माधवस्वामींना निवेदन केला.

माधवस्वामी म्हणाले, " तर मग तुम्ही व आम्ही एकाच कार्यासाठीं बाहेर पडलों आहों. कदाचित् गुरुजींनीं अंतर्ज्ञानानें ही सर्व परिस्थिति ओळखून तुमच्या साह्यार्थच आम्हांला पाठविलें असेल."

" म्हणजे काय ? गुरुदेव सध्यां कुठें आहेत ? " बाजिरावानें विचारलें.

माधवस्वामी उत्तरले, " गुरुजी जरंड्यावर आहेत. आज सुमारें एक पंधरवडा ते तेथें अनुष्ठान करण्यांत गुंतले आहेत. "

" एकूण परमेश्वराची लीला अगाध आहे ! माझीं जन्मदातीं आईबापेंही जपलीं नाहींत इतके माझे गुरुदेव माझ्या कल्याणास्तव जपत आहेत ! " बाजीराव गहिंवरलेल्या कंठानें म्हणाला, " स्वामी ! मी गुरुदेवांचें दर्शन घेऊन येऊं का ? "

" तुम्ही वेडे तर नाहीं ? " माधवस्वामी म्हणाले, " वेळा कोणती आणीबाणीची आहे हें तुम्ही जाणतां. या वेळीं अशी दिरंगाई करून कसें चालेल ? "

" हो ! तेंही खरेंच. " बाजीराव भानावर येऊन म्हणाला, " आपणाला आतां प्रथम शत्रूचा पाठलाग केला पाहिजे." बाजिरावानें समोरच्या त्या वीस भालाइतांकडे पाहून विचारलें, " पण हे लोक तुम्हांला इथें कोठून भेटले ? "

" हा सारा गुरुजींच्या सामर्थ्याचा प्रभाव ! " माधवस्वामी म्हणाले, " गुरुजींना प्रहरभर रात्रीला जेव्हां ही खबर कळली, तेव्हां ते जे उठले ते प्रथम

---

* 'पेशवाईचें पुण्याहवाचन' ह्या कादंबरींत माधव नांवाचा पतितपावन ब्राह्मण ब्रह्मेंद्रस्वामींचा शिष्य झाल्याचा उल्लेख आहे. तेच हे माधवस्वामी होत.

जवळच्या गांवीं गेले, व एका हांकेसरसे त्यांनीं हे लोक त्यांच्या त्यांच्या आंथरुणां-तून ओढून आणले ! ”

“ याला म्हणतात सामर्थ्य! राज्यकारभार महाराज करतात, त्यांचे आम्ही सेवक-ही तेंच करतों; पण आमच्या बाहूंत जें बळ असेल किंवा नसेल याची आम्हांला वानवा आहे तें बळ गुरुजींच्या नुसत्या वाणींत आहे. भगवंताची कृपा आमच्यावर असल्यावर व त्या महात्म्याचें कृपाछत्र आमच्या मस्तकीं रुळत असल्यावर ह्या भूतलावर अशी कोणती गोष्ट आहे कीं, जी आम्हांला साध्य होणार नाहीं ! चला. आपण आतां आपल्या कार्याला लागूं. सुमंत तेथून फार दूर गेलेले नाहींत, ते आपल्या नजरेच्या टप्प्यांत आहेत. त्यांच्या पाठोपाठ आपण लपतछपत जाऊं, म्हणजे आपणांला शत्रूच्या तळाचा नेमका पत्ता लागेल. तोंवर राणोजीही कांहीं लोक घेऊन आमच्या मदतीला येईलच. ” असें म्हणून बाजीराव आपल्या घोड्यावर स्वार होऊन पुढें चालला. माधवस्वामी व ते वीस भालाईत त्याच्या मागोमाग चालूं लागले.

ही सर्व मंडळी कोरेगांवाजवळ येते, न येते तोंच समोरून चार माणसें येतांना त्यांना दिसलीं. वास्तविक तो रहदारीचा रस्ता, त्या रस्त्यानें माणसांची येजा सारखी सुरू असावयाची. पण त्यांपैकीं ह्या चारच माणसांचा प्रामुख्यानें उल्लेख करण्याचें कारण ते चौघेहीजण बाजिरावाच्या माहितींतील होते. ते बाजिरावाला पाहातांच गांगरल्यासारखे होऊन जरा बाजूला सरून दडण्याचा प्रयत्न करूं लागले; त्यावरून बाजिरावाला त्यांच्याविषयीं जास्त संशय आला. त्यानें लगबगीनें पुढें होऊन त्यांना गांठलें व विचारलें, “ असे लपतां कां रे ? ”

“ कां नाहीं; उगीच सरकार ! ” एक जण भीत भीत उत्तरला.

“ तुम्ही इकडे कुठें गेलां होतां ? ” बाजिरावानें विचारलें.

त्या माणसानें ह्या प्रश्नाचें उत्तर न देतां फक्त आपल्या इतर चौघां सोबत्यांकडे घाबरटपणानें पाहिलें. त्याच्या त्या घाबरटपणामुळें बाजिरावाचा संशय दृढावला. त्यानें त्या सर्वांना दरडावणीच्या आवाजांत विचारलें, “ मुकाट्यानें खरें सांगा.”

तो माणूस बाजिरावाच्या दरडावणीनें फारच घाबरला व घोंगडी सांवरीत कांपऱ्या आवाजांत म्हणाला, “ सरकार ! मी सांगतों. पण आम्हां गरिबांच्या पोटावर पाय येतील त्याची वाट काय ? ”

“ तुमच्या पोटावर पाय काय म्हणून येतील ? ” बाजिरावानें विचारलें.

" सरकार ! ही बातमी गुप्त राखण्याबद्दल आम्हांला सुमंतांकडून बक्षीस मिळावयाचें आहे."

" तुम्हांला काय बक्षीस मिळावयाचें आहे ? " बाजिरावानें प्रश्न केला.

" आम्हांला प्रत्येकाला पांच पांच होन मिळावयाचे आहेत." तो माणूस म्हणाला.

" शिवाय आम्हां सर्वांना सुमंतांच्या पदरीं बारगिरांची नोकरी मिळावयाची आहे." दुसरा म्हणाला.

बाजीराव म्हणाला, " तुमची नोकरी करण्याची इच्छा व लायकी असेल तर नोकरी मी देखील देईन. मला तुम्ही ओळखतां ना ? "

" हें काय विचारावें सरकार ! " पहिला म्हणाला.

माधवस्वामी तेवढ्यांत पुढें होऊन म्हणाले, " ही बातमी गुप्त ठेवल्यानें तुम्हांला नोकरी मिळेल तेव्हां मिळेल; पण आतां इथल्या इथें आसुडाखालीं तुमच्या पाठीची चांबडी लोंबेल याचा विचार तुम्हीं केला आहे का ? "

चौदावें रत्न हें नेहमींच प्रभावशाली असतें.बाजिरावाच्या सामोपचारांच्या बोलांनीं कदाचित् त्या चौघांची खात्री पटण्याला थोडासा अवधि लागला असता; पण माधवस्वामींनीं चौदावें रत्न दाखवितांच त्यांची तेव्हांच खात्री पटली. ते बाजिरावाच्या पायां पडून क्षमा मागूं लागले. बाजिरावानें त्यांना अभय देऊन त्यांचें शांतवन केलें व सांगितलें, " तुम्ही खरें बोललां तर इथें तुमच्या केंसालाही धक्का लागावयाचा नाहीं."

तो पहिला माणूस भीतीनें कांपत म्हणाला, " सरकार ! आम्ही खतिबांच्या वेंठीला गेलों होतों. "

" ही वेंठ कसली ? " बाजिरावानें विचारलें. खतिबांचें नांव निघतांच त्याच्या मनांत सबळ शंका आली कीं, 'मस्तानी जी मेण्यांतून रवाना झाली, तीच तर ही वेंठ नसेल ना ?'

बाजिरावाची शंका बरोबर होती. त्या लोकांच्या सांगण्यावरून त्याला कळून चुकलें कीं, ते चौघेही भोईपणासाठींच गेले होते व त्या मेण्यांत मस्तानी होती.

" आणि मेणा तुम्हीं कोठवर पोंचवून आलां ? " बाजिरावानें विचारलें.

" आम्हीं मेणा वर्धनगडापर्यंत पोंचविला." एक भोई उत्तरला.

" आणि पुढें ? " बाजिरावानें विचारलें.

" तेथून पुढें खतिबांच्या माहितीचे महिमानगडावरील लोक मस्तानीला नेण्यासाठीं आले होते. "

" त्यांच्याबरोबर मस्तानीचा मेणा रवाना झाला देखील?"

" हो ! आणखी अंमळशानें ते गडावर जाऊन पोंचतील सुद्धां."

" आणि खतीब कुठें आहे ?"

" खतीब आणि त्याचे दोघे पाहुणे कोरेगांवीं सुमंतांची वाट पहात बसले आहेत. सुमंत तेथें जाऊन पोंचतांच सर्व मिळून आज वस्तीला गडावर जावयाचे होते."

" अर्थात् हा बेत खतिबाच्या अनुमतीनेंच झाला असला पाहिजे." बाजीराव माधवस्वामींकडे वळून म्हणाला, " स्वामी ! पहा ! शेवटीं खतीब असा खाल्ल्या घराचे वांसे मोजूं लागला ! "

माधवस्वामींना मस्तानीविषयीं कांहींच माहिती नव्हती. त्यांना बाजिरावाच्या बोलण्याचें कोडें उलगडेना. त्यांनीं बाजिरावाला विचारलें, " तुम्ही काय म्हणतां याचा अर्थ मला समजला नाहीं. मस्तानी ही कोण ? "

बाजीराव उत्तरला, " तें एक फार मोठें रहस्य आहे. आपणांला मी तें सवडी-नुसार समजावून सांगेन. सध्यां आपण चपळाई करून आपल्या शत्रूंचा पाठलाग केला पाहिजे."

" तर मग चला." माधवस्वामी म्हणाले.

सर्व मंडळी पुढील पल्ला गांठण्याच्या तयारीला लागली असें पहातांच भोई म्हणाले, " सरकार ! आम्ही आतां साताऱ्याकडे जातों."

बाजिराव प्रथम 'बरें' म्हणाला; पण माधवस्वामींनीं तेवढ्यांत त्याला सुचविलें कीं 'हे लोक जर असेच माघारे गेले, तर यांच्या तोंडून ह्या गोष्टीचा अवेळीं भेद होण्याचा संभव आहे. त्यापेक्षां त्यांना देखील आपण बरोबरच घेऊं. म्हणजे खतीब वगैरे मंडळींचा तळ कोठें आहे याचा आपणांला अनायासें तपास लावतां येईल.' ही सूचना बाजिरावालाही मान्य झाली व त्यानें त्या चौघांही लोकांना आपणांबरोबर घेण्याचें ठरविलें. इतक्या वेळांत सुमंत बरेच पुढें गेले असतील, त्यांच्यावर सतत नजर ठेवतां यावी म्हणून तो त्या लोकांसह माधवस्वामींना मागें ठेवून स्वतः घोडा दौडीत जरा पुढें सटकला. त्याच्यामागें त्या चौघांनीं भावी अनर्थाला भिऊन माधवस्वामींबरोबर जाण्याला नाखुषी दाखविली. त्यांना वाटलें, हा स्वामी आपणां-

वर दया करून आपणांला सोडील. पण त्यांना प्रत्यक्ष परिचय वेगळाच आला. माधवस्वामींनीं आपल्या बरोबरच्या लोकांपैकीं एकाला नुसती डोळ्यानें खूण करतांच त्यानें त्या चौघांवर आपल्या हातांतील भाल्याचा दांडा उगारून दरडावून म्हटलें, " मुकाट्यानें वाटेला लागतां कीं घालूं टाळक्यांत ? "

इतकी त्या लढवय्या मंडळींची तयारी पाहतांच त्या भोयांना 'भीक नको पण कुत्रें आवर' असें होऊन गेलें. त्यांनीं स्वामींच्या पायांवर लोटांगणें घालून मुकाट्यानें त्यांच्याबरोबर चालण्याचें कबूल केलें.

*　　　*　　　*

इकडे सुमंत आपल्याच रंगांत चालले होते. ते कोरेगांवीं जाऊन पोंचेपर्यंत त्यांचें मागें मुळींच लक्ष्य गेलें नाहीं. तें बाजिरावाच्या पथ्यावरच पडलें. त्यानें सुमंत आतां आपल्या नजरेच्या टापूंत आहेत असें पाहून स्वामी वगैरे मागचे लोक जवळ येईतों आपला घोडा उभा केला. थोड्याच वेळांत ते सर्व लोक तेथें येऊन पोंचले.

बाजीराव स्वामींना म्हणाला, " स्वामी ! खरा आणीबाणीचा प्रसंग आतांच आहे. सुमंत आतां आपल्या हातीं सांपडण्याजोगे आहेत. प्रतिनिधींनीं गफलतीनें तयार करून निजामाला देण्यासाठीं दिलेला खलिता यांच्याचपाशीं असला पाहिजे. सुदैवानें त्यांच्यापाशीं मनुष्यबळ मुळींच नाहीं; त्याचा फायदा घेऊन आपणांला त्यांना चोहोंकडून घेरतां येऊन त्यांची झडती घेतां येईल. मात्र सर्वांनीं एक गोष्ट ध्यानीं ठेवावयाची कीं, सुमंतांच्या केसालाही होतां होईतों धक्का लावावयाचा नाहीं. मी आतां प्रथम पुढें होऊन त्यांच्याशीं बोलणें काढून त्यांना गुंतवून ठेवतों. तेवढ्यांत सर्वांनीं सभोंवारून येऊन आम्हां दोघांनाही गराडा घालावा."

बाजिरावाचा हा बेत सर्वांना मान्य झाला. त्याप्रमाणें प्रथम बाजीराव पुढें सरकला. सुमंत आपल्या भावी यशस्वितेच्या सुखस्वप्नांत इतके गढून गेले होते कीं, बाजीराव त्यांच्या मागोमाग त्यांच्या अगदीं जवळ जाऊन पोंचला तरी त्यांना त्याचा पत्ता नव्हता ! अखेर बाजिरावानेंच त्यांना हांक मारली, " आनंदराव ! "

सुमंतांनीं अकस्मात् चमकून मागें वळून पाहिलें, तेव्हां बाजिरावाशीं त्यांची दृष्टादृष्ट होतांच ते अगदीं थिजल्यासारखे झाले. पण ती मनांतली अस्वस्थता मनांत दडवून ते आपला घोडा उभा करून म्हणाले, " हें काय ? बाजीरावसाहेब ! आपण इकडे कुठें ? "

" मी तुमच्या भेटीला आलों. " बाजीराव म्हणाला.

" माझ्या भेटीला ?. हें आपलें कांहींतरीच ! " सुमंत कुत्सितपणें आपल्या प्रौढ वयाला न शोभणाऱ्या लडिवाळपणानें हंसत हंसत म्हणाले.

" खरेंच, तुमच्या भेटीसाठींच मी मुद्दाम साताऱ्याहून एथवर आलों. प्रथम मी तुमच्या वाड्यांत गेलों होतों; पण तुम्ही वाड्यांत भेटलां नाहीं. बाहेर गेलां असें कळलें."

" हें बरें आपणांला कळलें ? "

" बरें कळलें म्हणजे ? परमेश्वरानें तुम्हांला जशी माझ्या अपरोक्ष कारस्थानें करण्याची बुद्धि दिली, तशीच तीं कारस्थानें ओळखण्याची अक्कल आम्हांला दिली."

" कसलीं कारस्थानें आपण म्हणतां ? "

" तेंच मी आतां तुम्हांला विचारतों आहें. तेंच विचारण्यासाठीं मी तुमच्या वाड्यावर गेलों होतों. मीं असें ऐकलें आहे कीं, तुमच्या व प्रतिनिधींच्या मार्फत निजामानें शाहूमहाराजांशीं कांहीं कारस्थानें चालविलीं आहेत व त्यासंबंधीं एक महत्त्वाचा खलिता घेऊन तुम्ही निजामाच्या दोघां वकिलांसमवेत निजामाकडे जाण्यासाठीं निघालां आहां. हें खरें काय ? "

" छे ! यांतलें कांहींदेखील खरें नाहीं."

" काय ? हें सर्व खोटें ? " बाजिरावानें आश्चर्ययुक्त चर्या करून विचारलें, " तर मग तुमची स्वारी आतां कुठें चालली आहे ? "

" वर्धनगडावर माझें कांहीं सरकारी काम आहे, त्यासाठीं मी तिकडे चाललों आहें."

इतक्यांत पूर्वसंकेतानुरूप माधवस्वामी, त्यांचे वीस लढवय्ये व ते चौघे भोई ही सर्व मंडळी सभोंवारून तेथें येऊन पोंचली. त्यांना—विशेषतः त्या चौघां भोयांना पाहून सुमंत उमजून चुकले कीं, आपण ह्या फेऱ्यांत सांपडलों. त्यांनीं भोयांना विचारलें, " काय रे ! तुम्ही साताऱ्याला गेलां होतां ना ? "

" होय. पण सरकार ! ह्या साधुजींनीं आम्हांला अर्ध्या वाटेंतून वेंठीला धरून एथवर आणलें ! " एक भोई काकुळतीला येऊन म्हणाला.

आतां आपला पक्ष भरभक्कम आहे व सुमंत एकटेच हातीं सांपडले आहेत असें पाहून बाजीराव त्यांना म्हणाला, " आनंदराव ! मला तुमचीं एकूण एक कारस्थानें पक्कीं माहीत झालीं आहेत. तुम्हांला आतां माझें असें समजुतीचें सांगणें आहे कीं, मुकाट्यानें तुमच्याजवळचा तो खलिता मला दाखवा; नाहींपेक्षां मला ह्या लोकांच्या साह्यानें तुमची बळेंच झडती घ्यावी लागेल."

" पण माझी झडती घेणारे तुम्ही कोण हो ? " सुमंतांनीं एकदम वर्दळीवर येऊन विचारलें.

" मी कोण ? " बाजिरावानें स्वाभिमानपूर्वक हंसत विचारलें, " आनंदराव ! इतक्यांतच तुम्हांला माझी ओळख नाहींशी झाली अं ? "

सुमंत म्हणाले, " बाजीरावसाहेब ! मी आज सरकारी कामाला निघालों आहें. अशा वेळीं खासगी नातीं विचारांत घ्यावयाचीं नसतात. मी महाराजांच्या अष्ट-प्रधानांतील एक प्रधान महाराजांच्या कामगिरीवर निघालों आहें, अशा वेळीं तुमच्यासारख्या फालतू माणसानें माझ्या मार्गांत अडथळा आणणें हा निव्वळ राजद्रोह आहे "

सुमंतांचे हे शब्द बाजिरावाच्या मनाला फार झोंबले. पण तो मनांतला अपमान बाहेर न दाखवितां शक्य तेवढ्या सौम्यपणानें म्हणाला, " आनंदराव ! मी कोणी फालतू माणूस म्हणून तुमच्या मार्गांत अडथळा आणीत नाहीं; मी उद्यांचा पेशवा आज तुम्हांला तुमच्या कुकर्मांचा जाब विचारण्यासाठीं इथें आलों आहें."

" तुम्ही उद्यां पेशवे व्हाल तेव्हां उद्यांचें उद्यां पहातां येईल. आणि पेशवे-देखील जर अशी अकारण अस्मानी सुलतानी गाजवूं लागले, तर तें कोण सहन करील ? "

" बरें; मी उद्यां पेशवा होईन किंवा न होईन, तो प्रश्न अगदींच वेगळा. पण आनंदराव ! कोणी देशबुडवा महाराजांच्या डोळ्यांत धूळ फेंकून स्वतःचा हीन कावा साधण्यासाठीं महाराजांच्या व महाराजांच्या मराठशाहीच्या मानेला तांत लावीत असतांना आढळला तर त्याच्या त्या कारस्थानांना पायबंद लावण्याचा अधिकार महाराजांच्या प्रत्येक सामान्य प्रजाजनालासुद्धां आहे. पण तो वाद आतांच कशाला ? कोणाचा काय अधिकार आहे हें आपण मागाहून पाहूं. तूर्त या घडीला माझें तुम्हांला एवढेंच सांगणें आहे कीं, तुमच्यापाशीं ज्या काय चिठ्याचपाट्या किंवा खलिते असतील ते आतांच्या आतां मला दाखवा."

" आणि नाहीं दाखविले तर ? "

" तर ? तर मग मला करूं नये तें करावें लागेल. मला तुमची झडती घ्यावी लागेल किंवा तुम्हांला कैद करून महाराजांसमोर न्यावें लागेल. बोला, यांतली कोणती गोष्ट तुम्हांला मान्य आहे ? "

" मी असाच्या असा पाहिजे तर महाराजांच्यासमोर यावयाला तयार आहें. मात्र मीं तुम्हांला पुनः पुन्हां बजावून सांगतों, याचे परिणाम फार वाईट होतील."

" ते भोगण्याला माझी तयारी आहे. " असें म्हणून बाजिरावानें माधवस्वामी-कडे वळून सूचना केली, " स्वामी ! आनंदराव आपल्या स्वाधीन आहेत. आपण महिमानगडावर जाऊन येईतों, यांना आपल्या स्वाधीन असूं द्या."

सुमंतांची अटकळ होती कीं, आपण इतका त्रागा केल्यावर तरी एथून आपली मोकळीक होईल. पण त्यांची ती अटकळ फसली. आतां दरवेशाच्या अस्वलाप्रमाणें यांच्याबरोबर लोंबत राहून देखील अखेर आपणाला आपल्याजवळचा खलिता महाराजांसमोर हजर करावा लागणारच, त्यापेक्षां आपण याचवेळीं तो बाजिरावाच्या स्वाधीन करून आपली बाजू सांवरण्यासाठीं अगोदर साताऱ्याला जाणेंच उचित होय, असा पोक्त विचार त्यांनीं केला. त्यांना अजूनही आशा होती कीं, आपण प्रतिनिधीला भेटून त्याच्या मार्फतीनें महाराजांपाशीं बाजिरावाच्या अरेरावीबद्दल दाद मागूं शकूं. इतकें करून सवरून देखील सुमंतांना आपण अन्यायी आहों अथवा आपल्या-वर अन्यायाची शाबिती होईल असें वाटत नव्हतें. याचें कारण, निजामाला देण्या-साठीं म्हणून जो खलिता प्रतिनिधीनें त्यांच्या हातीं दिला होता, तो गफलतीनें तयार केलेला असेल अशी त्यांची मुळींच कल्पना नव्हती. कदाचित् प्रतिनिधीनें महाराजांना भुरळ पाडून तशा प्रकारच्या कराराला मान्यता मिळविली असावी असा त्यांचा अंदाज होता. पण हा शाहूमहाराजांच्या अदूरदृष्टीचा परिणाम फार तर ठरला असता. त्याबद्दल प्रतिनिधि अथवा आपण दोषी ठरूं असें त्यांना मुळींच भय नव्हतें; म्हणून तो खलिता साळसूदपणें बाजिरावाच्या स्वाधीन करण्याला त्यांना मुळींच प्रत्यवाय नव्हता. मात्र त्या खलित्याच्याच जोडीला प्रतिनिधीनें निजामाला देण्यासाठीं एक अलाहिदा पत्र दिलें होतें, तेंही त्याच लिफाफ्यांत बंद करण्यांत आलें होतें. त्यांत काय लिहिलें असेल व काय नाहीं, याविषयीं त्यांचें मन द्विधा होत होतें. पण एरव्हीं तरी त्या खलित्याबरोबरच तें पत्रदेखील ज्या अर्थी महाराजांच्या हातीं जावयाचेंच होतें, त्या अर्थी त्याविषयीं विषाद मानणेंही निरर्थक होतें. उलटपक्षीं हीं पत्रें या वेळीं बाजिरावाच्या स्वाधीन करण्यांत त्यांना असा फायदा दिसून आला कीं, निजामाकडील राजकारण बिघडविण्याला बाजीराव कारण झाला इतकेंच नव्हे, तर त्यानें आपणाशीं निष्कारण दावेदारी मांडली आहे, त्यानें आपणाला कैद करण्याचाही घाट घातला होता, अशी

साधार तक्रार महाराजांपाशीं करावयाला सांपडून बाजिरावाला पेशवाईपदाचीं वस्त्रें न मिळण्याविषयींच्या खटपटींतील बरेंचसें श्रेय ह्या एका गोष्टीनें आपणाला आपल्या पदरीं पाडून घेतां येईल.

इतका सारासार विचार करून सुमंतांनीं रागारागानें आपल्या आंगरख्याच्या खिशांतून एक मोहोरबंद लखोटा काढून तो बाजिरावाच्या हातीं दिला व त्याला बजावलें, " हा घ्या खलिता. मात्र ह्या अरेरावीबद्दल तुम्हांला महाराजांसमोर जाब द्यावा लागेल, याची याद राखा ! "

" हो ! हो ! त्याची मी खूप याद राखतों." असें म्हणत बाजिरावानें तो लखोटा आपल्या आंगरख्याच्या खिशांत ठेवून दिला.

" आतां तरी मला जाण्याला मोकळीक आहे, कीं अजूनही मला कैद करण्याचा तुमचा मानस आहे ? " सुमंतांनीं त्रागा करीत विचारलें.

माधवस्वामींचें मत पडलें कीं, सुमंत जर आपणापूर्वीं महाराजांना अथवा प्रतिनिधींना जाऊन भेटले, तर काय काय खोट्यानाट्या चुगल्या करतील याचा कांहीं नेम नाहीं; त्यापेक्षां ते आपल्या बरोबरच असलेले बरे. पण बाजिरावाला तसें करणें रुचेना. त्यानें माधवस्वामींची समजूत घालून सुमंतांना साताऱ्याला माघारे जाऊं दिलें.

सुमंत आपल्या घोड्यावर स्वार होऊन यापुढें बाजिरावावर सूड कसा घेतां येईल याचा विचार करींत निघून जातांच बाजीराव आपल्या घोड्यावर स्वार होतां होतां माधवस्वामी व इतर मंडळी यांना अनुलक्षून म्हणाला, " चला. आतां आपणाला महिमानगडावर जावयाचें."

" तें कशासाठीं ? " माधवस्वामींनीं विचारलें, " आपला मुख्य हेतु तर साध्य झाला. आतां त्या दोघां पाहुण्यांना कैद करण्याचा तुमचा मानस आहे किंवा कसें?"

यावर बाजीराव इतकेंच म्हणाला, " तुम्ही सर्व माझ्या मागोमाग या तर खरे ! मग सारें तुम्हांला आपोआपच कळेल."

" हा आपण व्यर्थ कालक्षेप करतों आहों असें मला वाटतें." माधवस्वामी पुन्हा म्हणाले.

" नाहीं; स्वामी ! तसें नव्हे तें." बाजीराव म्हणाला, " त्या दोघां पाहुण्यांकडे आपणाला वेळीं दुर्लक्ष करतां येईल, पण आमचे खतीब जे आपल्या कन्येसह त्यांच्याबरोबर जात आहेत, ते कशासाठीं जात आहेत याविषयीं मला तपास केला

पाहिजे. ते जर आपखुषीनें केवळ मजेखातर तिकडे जात असतील, तर आपणाला त्यांच्याशीं कांहींच कर्तव्य नाहीं. पण जर त्यांना ते पाहुणे फसवून नेत असतील किंवा ते स्वतः जर कोणत्या ना कोणत्या मिषानें फितूर होऊन तिकडे जात असतील, तर मात्र मला त्याचा कसून तपास केला पाहिजे. आपण आपल्या मुलीसह शाहू-महाराजांकडे जातों असा बाहणा करून ज्या अर्थी खतिबांची स्वारी इकडे झुकली आहे, त्याअर्थी त्यांचा हेतु सरळ नसावा असा मला जबर संशय येत आहे."

माधवस्वामींना बाजिरावाचें म्हणणें पटलें. ते खुषीनें महिमानगडावर जाण्याला तयार झाले. बाजिरावापाशीं घोडा होता व इतर मंडळीला पायीं चालत जावयाचें होतें, तेव्हां सर्वांची सांगड कशी जुळावी हा प्रश्न इथेंही उत्पन्न झाला. पण त्याचें निराकरण म्हणून सर्वानुमतें असें ठरलें कीं, बाजिरावानें गडाच्या पायथ्याशीं जाऊन बाकीच्या मंडळींची वाट पहात उभें रहावें व सर्वजण एकत्र जमल्यावर मग एक-जुटीनें गडावर चालून जावें.

"मात्र तुम्ही सुद्धां शक्य तितक्या चपळाईनें या. कारण त्या मंडळीला आपण वाटेंत गांठू शकलों तर फारच छान होईल. गडावर त्यांनीं कितपत फितूर केला आहे याचा आपल्याला कांहींच अंदाज नाहीं. जर का तेथें त्यांच्या पक्षाच्या लोकांचा जमाव असला, तर तें आपणाला फार जड जाईल." असें म्हणून बाजीराव आपला घोडा दौडीत महिमानगडाच्या अनुरोधानें निघाला.

## प्रकरण सतरावें

# पुन्हा एकदां किल्ल्यावर

उजाडेपर्यंत किल्ल्यावर काय काय घडामोडी झाल्या हें आपण मागें पाहिलेंच आहे. पण दरम्यान भोजराजाला अबुवकरच्या तर्फेच्या गुंडांनीं कैद करून किल्ल्यावर आणलें त्याचें पुढें काय झालें, तसेंच जुलिया जी अपरात्रीं किल्ल्यावरून कोठें बेपत्ता झाली ती कोठें गेली होती, वगैरे रहस्यें समजावून घेण्यासाठीं आपणाला आतां बाजीराव व माधवस्वामी वगैरे मंडळीला महिमानगडाच्या वाटेवर सोडून पुन्हा एकवार साताऱ्यांतील किल्ल्यावर जाऊन तेथें रात्रौ पूर्वी पाहिल्या त्यापेक्षां आणखी काय काय घडामोडी झाल्या याचें अवलोकन करावयाचें आहे.

उस्मान किल्ल्यांतून रंगमहालांत जाण्याच्या भुयाराच्या तोंडाशीं पहारा करीत उभा असतां कोणी तरी एक बुरखेवाली व्यक्ति त्याचा डोळा चुकवून भुयारांतून वर येऊन किल्लेदाराच्या मकाणाकडे जाऊं लागली, व उस्मानने त्या व्यक्तीला 'बदमाष' अशी शिवी हांसडून उभें रहाण्याला सांगितलें तें आपणाला माहीतच आहे पण त्या व्यक्तीनें कांहीं उस्मानच्या त्या धमकावणीला जुमानलें नाहीं. तिनें एकवार किंचित् मागें वळून मात्र पाहिलें व लगेच पूर्ववत् आपला रस्ता सुधारला. उस्मानला तें कसें सहन व्हावें ! त्यानें घाईघाईनें भुयाराचा दरवाजा बंद करून त्या व्यक्तीच्या मागोमाग धावत जाऊन उजव्या हातानें त्या व्यक्तीचें मनगट पकडलें व डाव्या हातानें तिच्या पाठीवर एक जोराचा गुद्दा चढवून विचारलें, " हरामखोर ! तूं कोण आहेस रे ! "

पण त्या व्यक्तीनें जेव्हां आपल्या तोंडावरील बुरखा दूर सारून उस्मानाकडे पाहिलें, तेव्हां तिचा हात तर उस्मानच्या हातून सुटलाच; पण स्वतः तो इतका घाबरून गेला कीं, त्याची पांचावर धारण बसण्याची वेळ आली. याचें कारण ती व्यक्ति जुलिया—किल्लेदाराची जिवलग जुलिया बेगम होती !

उस्मानची ओरड ऐकून किल्लेदारही तेवढ्यांत तेथें धावून आला होता. धावत येतांना त्याची अटकळ होती कीं सकवारबाईनें आतांच ज्याविषयीं एक भयंकर वार्ता आपल्या कानांवर घातली, तोच हा माणूस—लक्ष्मीबाई व जुलिया यांचा प्यारा

सैतान तो हाच ! त्याला आतांच्या आतां पकडावयाचा ह्या उत्कट इच्छेनें मनांतल्या मनांत संतापानें पिचत किल्लेदार तेथें आला होता. पण पहातो तों ती त्याची जुलिया !

उस्मानला वाटलें कीं, आपण हा केवढा मोठा अपराध केला ! त्याला जुलिया व किल्लेदार ह्या दोघांचेही पाय धरधरून माफी मागतांना अगदीं पुरे पुरेसें होऊन गेलें. त्याच्या हातून ही जी आगळीक झाली ती गैरसमजामुळें झाली, इतकें कळण्याइतका समजूतदारपणा जुलिया व किल्लेदार ह्या दोघांच्याही अंगीं असल्यानें त्यांनीं त्याला क्षमा केली व आपल्या कामगिरीवर जाऊं दिलें.

आतां तेथें जुलिया व किल्लेदार हीं दोघेंच राहिलीं. किल्लेदाराच्या मनांतील त्या दगलबाज माणसाविषयींचा राग जरी बराच कमी झाला होता, तरी 'जुलिया इतक्या रात्रौ आपणाला न सांगतां कुठें गेली होती ? ती त्या कोणा बदमाषाशीं संगनमत करून तर कोठें बाहेर उंडगेपणा किंवा लावालावी करण्याला गेली नसेल ना' असा त्याचा संशय अजून कायम होता.

पण तेवढ्यांत जुलियेनें मोहक असें स्मित हास्य करून किल्लेदाराला हांक मारली, "प्यारे !"

ती हांक ऐकतांच जादूचा चमत्कार व्हावा त्याप्रमाणें किल्लेदाराच्या मनांतील संशय एका क्षणांत कुठल्या कुठें पार नाहींसा झाला. सकवारबाईच्या बोलण्यानें जितक्या वेगानें त्याचें मन जुलियेविषयीं कलुषित झालें होतें, तितक्या वेगानें तें शुद्ध कसें झालें हें एक गूढ तर खरेंच; पण तें गूढ उकलण्याला आपण त्याच्याच मनोवृत्तीचा आधार घेतला पाहिजे. त्याला वाटलें कीं, 'जर राणी म्हणाली त्याप्रमाणें जुलियेच्या आचरणांत कांहीं काळेंबेरें असतें, निदान तिच्या मनांत तरी जर तसें पाप असतें, तर आपणाला पाहातांच तिची तारांबळ उडाली असती; तिचें मन तिला खाऊं लागलें असतें. मग तिच्या चेहऱ्यावर इतकें निष्पाप हास्य कोठून चमकलें असतें ! पण ज्या अर्थीं तसला विचार अथवा संशय तिच्या ध्यानीं-मनींही नाहीं, त्या अर्थीं ती अगदीं निष्पाप—धुतल्या तांदळाप्रमाणें निर्मळ असली पाहिजे. अर्थात् राणीनें तिच्याविरुद्ध गैरसमजानें किंवा तिला कोणत्यातरी निमित्तानें गोत्यांत आणण्याच्या आसुरी इच्छेनें हें किटाळ रचलें असलें पाहिजे.'

किल्लेदार बिचारा भोळा !—हो ! भोळाच तो. तो एरव्हीं कितीही चतुर व पराक्रमी असला तरी चौथ्या लग्नाच्या तरणा बांड, सुंदर व चतुर बायकोचा म्हातारा पति या नात्यानें तो भोळाच होता. जगाच्या सामान्य रीतीप्रमाणें जुलियेनें त्याला आपल्या नटव्या प्रेमानें प्रथमपासूनच पुरेपूर भारून टाकलें होतें; त्याला तिचें अंतस्थ कावे काय माहीत !

" प्यारी ! इतक्या अपरात्रीं तूं कुठें गेली होतीस ! " किल्लेदारानें शांतपणानें विचारलें.

" मी कुठें गेल्यें होत्यें अशी आपली कल्पना आहे ? राणीसाहेबांनीं आपणापाशीं काय चुगली केली तें मला अगोदर सांगा." जुलिया हंसत हंसत म्हणाली.

वाचकांना आतां कल्पना झालीच असेल कीं कांहीं वेळापूर्वीं जुलिया जी कोणाला नकळत आपल्या घरांतून बाहेर पडली, ती भुयाराच्या वाटेनें रंगमहालांत गेली. तेथें जातांच तिचा उद्देश होता एक व त्यांतून निष्पन्न झालें तें भलतेंच ! जुलिया नूरनिहारशीं आजवर आपलेपणानें जी बोलत आली, ती तिला आपली मैत्रीण समजून बोलत आली. पण तिनें जेव्हां रात्रौ नूरनिहार व आपला जिवलग दोस्त अबुबकर यांचें एकमेकांशीं वितुष्ट असलेलें पाहिलें, तेव्हां मात्र तिला फार राग येऊन नूरनिहारच्या ह्या ढालगजपणाबद्दल लक्ष्मीबाईपाशीं चुगली करण्यासाठीं म्हणून ती चोरून रंगमहालांत गेली. तेथें तिनें लक्ष्मीबाईची भेट घेतली व किल्ल्यावर घडलेला सर्व प्रकार तिला निवेदन केला. लक्ष्मीबाईचा नूरनिहारवर पूर्ण विश्वास असल्यानें व आपण जुलियेपासून कसकशा बित्तंबातम्या काढतों हें नूरनिहारनें तिला अगोदरच सांगून ठेविलें असल्यानें जुलिया तिचें मन तर कलुषित करूं शकली नाहींच; पण उलट लक्ष्मीबाईनें मात्र वर वर नूरनिहारच्या खूप विरुद्ध बोलून जुलियेकडून त्या क्षणापर्यंत घडलेल्या सर्व लहानमोठ्या घडामोडींची माहिती मिळविली. तेवढ्यानेंच जुलियेचें समाधान झालें व ती प्रसन्न चित्तानें माघारी फिरली. ती भुयारांतून पुन्हा किल्ल्यावर येऊं लागली तेव्हां सकवारबाईच्या कांहीं दासी आपल्या पाळतीवर असल्याचें तिनें पाहिलें होतें; व भुयारांतून येतांना अर्ध्या वाटेवर तिला सकवारबाईही भेटली. पण जुलियेनें बुरखा घेऊन मोठ्या शिताफीनें प्रथमपासूनच आपलें खरें स्वरूप गुप्त ठेवण्याची खबरदारी घेतली असल्याकारणानें सकवारबाई तिला ओळखूं शकली नाहीं. उलटपक्षीं सकवारबाईला बुरखेवाल्या जुलियेकडे पाहून अत्यानंद झाला. ही व्यक्ति जरी अशी लपत छपत किल्ल्यावर गेली तरी ती तेथें

कैद होऊन पडणार व लक्ष्मीबाईवर दुराचाराची शाबिती करण्याच्या कामीं आपणाला त्याचा उपयोग होणार याविषयीं सकवारबाईला आतां मुळींच शंका नव्हती. म्हणूनच ती त्या बुरखेवाल्या व्यक्तीला पाहिलें न पाहिलेंसें करून तेथून आपल्या वाटेनें थेट निघून गेली. सकवारबाईला जुलियेनें ओळखलें पण जुलियेला कांहीं सकवारबाई ओळखूं शकली नाहीं. इकडे सकवारबाईनें किल्ल्यावर जाऊन काय काय लावालावी केली असेल याची जरी जुलियेला कल्पना नव्हती; तरी पण ती भुयारांतून वर येतांच उस्माननें तिला जो कर्डेपणा दाखविला, त्यावरून तिनें अंदाज केला होता कीं, इथें कांहींतरी लावालावीचा प्रकार खास झाला असावा आणि किल्लेदार आला तो देखील घुश्यांत आलेला पहातांच तर तिला एकंदर प्रकाराबद्दल जास्तच संशय उत्पन्न झाला होता.

पण इतकें सारें करून सवरून वर 'चोराची उलटी बोंब' या न्यायानें जुलिया जणुं कांहीं आपण त्या गांवचीच नाहीं असें भासविण्यासाठीं निव्वळ मायावीपणानें हंसली, व त्या हास्यानें किल्लेदार जेव्हां पुरा मोहून गेला तेव्हां तिला आत्मविश्वास उत्पन्न झाला कीं, आपण आतांची वेळ सहज साजरी करून नेऊं. तिनें 'राणीसाहेबांनीं आपणांपाशीं काय चुगली केली' असें जें किल्लेदाराला विचारलें, तें केवळ अनुमानधक्क्यानें विचारलें होतें. त्यावर किल्लेदाराकडून जें उत्तर मिळेल, त्यावरून तिला आपल्या पुढच्या थापांची योजना करावयाची होती. तिच्या अपेक्षेप्रमाणें तिच्या प्रश्नावर किल्लेदार उत्तरला, " राणीसाहेबांनीं पुष्कळच गोष्टी सांगितल्या."

" पण माझ्याविषयीं त्यांनीं काय सांगितलें ! "

" तुझ्याविषयीं त्यांचा बराच गैरसमज झाला आहे. तुझ्याविषयींच काय पण लक्ष्मीबाईसाहेबांविषयींही ती बरेंच भयंकर विरुद्ध बोलली."

जुलियेनें यावरून 'ता' म्हणजे 'ताक भात' असें ओळखलें, व आपण ओळखलें तें बरोबर आहे किंवा नाहीं, तसेंच राणीच्या सांगण्यावर आपल्या पतीचा कितपत विश्वास आहे, हें अजमावून पहाण्यासाठीं म्हटलें, " राणीसाहेब माझ्या विरुद्ध बोलायच्याच. तसेंच त्या लक्ष्मीबाईसाहेबांविरुद्धही बोलायच्याच."

" पण आपण असें बाहेर बोलत किती वेळ उभें रहावयाचें ! आंत चल ना ! " किल्लेदार म्हणाला.

जुलिया किल्लेदारासह घरांत गेली. लगेच जुलियेनें लाडांत येऊन विचारलें,

" पण राणीसाहेब काय म्हणाल्या तें मला सांगा ना ? मग मीही आपणांला कांहीं महत्त्वाच्या गोष्टी सांगणार आहें."

किल्लेदार भोळा ! त्यानें एखाद्या प्रतिध्वनिदर्शक यंत्राप्रमाणें सकवारबाई त्याच्यापाशीं जें जें बोलली होती तें तें सर्व जुलियेला सांगून टाकलें.

जुलियेला आपली बाजू सजवावयाला त्या माहितीचा चांगलाच उपयोग झाला. आपल्या संबंधाचा कोणी पुरुष लक्ष्मीबाईपाशीं चुगली करीत आहे असें राणीनें किल्लेदाराला सांगितलेलें कळतांच तिला राणीचा ह्या खोडसाळपणाबद्दल संताप आला होता, व त्याच पुरुषाशीं लक्ष्मीबाईचा संबंध जोडून देण्यांत तर राणीनें भयंकर अपराध केला आहे अशी तिची खात्री होऊन चुकली होती. त्या माणसाविषयीं राणीनें लक्ष्मीबाईचा संशय घेतला होता, तो केवळ आकसाचा होता, हें तिच्या ध्यानीं येण्याला मुळींच अवकाश लागला नाहीं. कारण तीच स्वतः लक्ष्मीबाईशीं बोलत होती. शिवाय लक्ष्मीबाईनें तिला आपल्या मधुर भाषणानें इतकें भारून टाकलें होतें व त्यामुळें तिच्या मनांत लक्ष्मीबाईविषयीं इतका आदर उत्पन्न झाला होता कीं, लक्ष्मीबाईच्या बाबतींत जरी एखादे वेळीं खरोखरच तसा प्रकार घडता व तो तिच्या कानांवर आला असता, तरीदेखील तो तिनें खरा मानला नसता. नाहीं म्हणावयाला तिला राणीच्या साऱ्या चुगलबाजपणांत एकच गोष्ट रुचली, ती रहमान व नूरनिहार यांच्यासंबंधाची होय. पण नूरनिहारचा तिनें आपल्या मतें परस्पर लक्ष्मीबाईला सांगून बंदोबस्त केला असल्यामुळें तें प्रकरण तेवढ्यावरच मिटलें होतें. राहतां राहिला राणीचा तिच्या स्वतःच्या व लक्ष्मीबाईच्या बाबतींतील खोडसाळपणा; त्या खोडसाळपणाचाही स्वतःची निर्दोषता सिद्ध करण्याच्या कामीं उपयोग करून घेण्याचें ठरवून मोरे मानभावीपणाचा आव आणून ती म्हणाली, " प्यारे ! मला हें सारें अगोदरच माहीत होतें. आपणाला जें राणीसाहेबांनीं सांगितलें, तें केवळ खोटें सांगितलें. त्यांचीं कारस्थानें मला बिनचूक ओळखतां आलीं म्हणून माझ्यावर चिडूनच त्यांनीं ह्या मार्गाचा अवलंब केला."

" म्हणजे ? तूंच रंगमहालांत गेली होतीस का ? "

" होय. मीच तिकडे गेलें होतें."

" आणि आतां तूंच तिकडून माघारी आलीस ? "

" होय." जुलिया हंसून म्हणाली, " आपण आतां मला कां गेली होतीस असें विचाराल; तर सांगतें, अशा प्रकारचें कारस्थान रचून त्यांत आपणांला इरेला

धरून आपल्या हस्तें लक्ष्मीबाईसाहेबांना गाडण्यासाठीं खड्डा खणावयाचा राणी-साहेबांचा बेत नक्की झाला होता. त्या बाबतींत मीं त्यांना साह्य करावें असे त्यांचे केव्हांपासूनचे प्रयत्न चालले होते ! पण मी त्यांच्या पचनीं पडलें नाहीं, म्हणून त्यांनीं ही एवढी खोटी सृष्टि उभारली आहे. ह्या कारस्थानाच्या बाबतींत रंग-महालांतून किल्ल्यावर येऊन एथल्या कोणा एकदोघां माणसांशीं कुजबुजतांना मीं ऐकलें व संशयावरून त्यांच्या मागोमाग रंगमहालापर्यंत जाऊन तपास केला."

"पण तुला कोणीं ओळखलें नाहीं !"

"छे ! मला कोणींसुद्धां ओळखलें नाहीं. मी जी प्रथम गेल्यें ती लक्ष्मीबाई-साहेबांच्या महालांत गेल्यें. राणीसाहेबांचा आम्हां दोघींना गोत्यांत आणण्याचा असा असा बेत चालला आहे, हें मीं त्यांच्या कानांवर घालून ठेवलें."

"तर मग तूं लक्ष्मीबाईसाहेबांशीं बोलतांना राणीसाहेबांनीं ऐकलें असेल व त्यावरूनच हा पराचा पारवा केला असेल !"

"होयच मुळीं ! दुसरें काय ?"

किल्लेदाराला सकवारबाईच्या आगलावेपणाविषयीं आगाऊ अटकळ होतीच; त्यांत आणखी ही भर पडली व जुलियेच्या निर्दोषतेबद्दल त्याची वालंबाल खात्री होऊन चुकली. इतका अचूक भेद जुलिया आणूं शकली म्हणून त्यानें तिला शाबासकीही दिली. एका सकवारबाईच्या खोडसाळपणाविषयीं त्याची खात्री होतांच प्रतिनिधि वगैरे मंडळींची त्याला पुन्हा आठवण झाली, व आपण बाजिरावाच्या बाजूचे आहों असें समजून आपणाला गोत्यांत आणण्यासाठीं ज्या अर्थीं हीं कारस्थानें रचून आपणाला इरेला धरलें जात आहे, त्या अर्थीं अशा खोडसाळपणाच्या कटांत आपण सामील होणें हें पाप होय असें त्याच्या मनानें पक्कें घेतलें. बाजिरावाचा सत्पक्ष आहे हें त्याला प्रथमपासून माहीत होतेंच. तसेंच त्याच्या आवडत्या जुलियेवर व लक्ष्मीबाईवर दुराचाराचा आरोप आणि आपणावर फितुरीचा आरोप शाबीत करण्यासाठीं आपणाला राणीनें निष्कारण भिवविलें हेंही त्याला आतां कळून चुकलें होतें. त्याची भीतिपरी भीति नष्ट झाली, व त्याचा ओढा मूळपासून प्रतिनिधि वगैरे मंडळीकडे नसल्यानें त्यानें तेव्हांच्या तेव्हां जुलियेसमोर बोलून दाखविलें, "बस्स ! यापुढें राणीसाहेब किंवा प्रतिनिधि यांच्या शब्दावर माझा मुळींच विश्वास बसणार नाहीं. बाजिरावसाहेबांचा सत्पक्ष आहे व त्या पक्षाला यशस्वी करण्यासाठीं झटणें हें माझें काम आहे."

एवढी किल्लेदाराच्या मनाची तयारी व्हावयाला व भोजराजाला कैद करून आणणारे गुंड किल्ल्यावर येऊन पोंचावयाला जवळ जवळ एक गांठ पडली. त्या वेळीं गुंडांच्या आनंदोत्साहाला पारावार नव्हता. त्यांना वाटत होतें कीं, आपण जेव्हां पिलाजीच्या घरांत झालेल्या तुंबळ रणयुद्धाची कहाणी सांगून भोजराजाला किती सायासांनीं पकडलें याचें रसभरित वर्णन किल्लेदारापाशीं करूं, तेव्हां किल्लेदार एकदम खूष होऊन आपणाला शाबासकी देईल. तेव्हां मग पिलाजीच्या घरांत रक्तपात केल्याच्या आरोपांतून आपण सहज मुक्त होऊं, व प्रतिनिधींकडून बक्षिसी मिळविण्याचा आपला अधिकार शाबीत होईल. त्यांनीं जिवाईला ठार मारलें व भोजराजास कैद केलें, यांत वरवर पाहूं गेल्या मर्दुमकीपेक्षां नामर्दपणाच होता, व कोणताही शहाणा असली गुंडगिरी त्या गुंडांनीं केलेली पाहून त्यांचा निषेधच करता असें असतां त्या गुंडांनीं त्या कृत्याबद्दल प्रतिनिधीकडून पारितोषिकाची अपेक्षा करावी हें सकृद्दर्शनीं विचित्र दिसतें. पण वस्तुस्थिति ध्यानीं घेतां त्यांत विचित्रपणा असा कांहींच नव्हता. जिवाई व भोजराज हीं दोघेंही तसें पाहूं जातां जरी सामान्य माणसें होतीं, तरी जिवाई ही मल्हारीची आई होती, भोजराज हा त्याचा सासरा होता, व मल्हारी हा बाजिरावाचा सच्चा अनुयायी असल्यानें प्रतिनिधिपक्ष त्याला तर आपला शत्रु समजे. त्या गुंडांना जें आपल्या आडदांडपणाच्या वर्तनाला प्रतिनिधीपाशीं चांगला बाजारभाव येईल असें वाटे, तें यामुळेंच.

पण त्या गुंडांची ती मनीषा फलद्रूप झाली नाहीं; इतकेंच काय पण ती त्यांच्या कल्पनेबाहेर फसली. त्यांनीं मारे मोठ्या दिमाखानें भोजराजाला किल्लेदारासमोर आणून गुदरलें. तेव्हां इकडे किल्लेदार जुलियेशीं गुजगोष्टी करण्यांत गढून गेला होता. तेथून तो जो बाहेर आला, तो पूर्वीचा किल्लेदार—भोजराजाला पकडण्याची आज्ञा देतांनाच किल्लेदार नव्हेसा होऊन बाहेर आला. त्यानें त्या गुंडांना विचारलें, "तुम्हीं याला कोठें कैद केलें ?"

गुंडांनीं आपला वृत्तांत, त्यांत आपणाला पोषक अशी छाटाछाट करून व पदरची भर घालून किल्लेदाराला सांगितला. अबुबकर व आणखी दोन लोक गौतमा, नूरनिहार, रहमान व कमळा यांच्या हातून मारले गेले हें त्यांनीं खुलवून सांगितलें पण आपण त्या अबलांना कसें छळलें हें सांगावयाचें मात्र नेमकें टाळलें. त्यांतूनही किल्लेदार खुललेला दिसला तर ती आपली बहादुरी देखील त्याच्या कानांवर घालावयाची असा त्यांचा बेत होता.

पण तसें लक्षण कांहीं दिसेना. उलट भोजराजानें जेव्हां किल्लेदाराला आपली बाजू ऐकून घेण्याविषयीं विनविलें, तेव्हां किल्लेदारानें आस्थापूर्वक त्याचें म्हणणें ऐकून घेतलें. त्यावरून किल्लेदाराला त्या अत्याचारांचें खरें स्वरूप कळलें, व त्यानें भोजराजाला शासन करावयाच्या ऐवजीं त्याला बंधमुक्त करून आपल्या घरांत पिलाजीच्या भेटीला पाठवून दिलें, व त्या गुंडांना मात्र त्यांच्या अघोर अपराधांबद्दल असें छेडलें कीं, 'भीक नको पण कुत्रा आवर' अशी त्यांची त्रेधातिरपीट उडून गेली! त्या वेळीं आपणाला जुलियेकडून तरी कांहीं प्रोत्साहन मिळेल अशी त्यांची अपेक्षा होती, म्हणून किल्लेदार भोजराजाच्या मागोमाग आंत पिलाजीपाशीं गेल्याची संधि साधून त्यांनीं तिला गांठलें व तिच्यापाशीं आपलें रडगाणें गाइलें.

जुलियेला एरव्हीं ती गोष्ट मनावर घेण्याचें कांहीं कारण नव्हतें. पण तिचा दिल्दोस्त अबुबकर त्या झटापटींत मारला गेला होता, तें तिला कसें सहन व्हावें? त्या गुंडांनींही जुलियेचा व अबुबकरचा पूर्वसंबंध ध्यानीं घेऊन त्या प्रसंगाचें— तेव्हां अबुबकरनें कसें अप्रतिम शौर्य दाखविलें व कमळा, गौतमा, नूरनिहार आणि रहमान ह्या चौकडीनें त्याला कसें दगलबाजपणानें ठार मारलें यांचें अत्यंत रसभरित पण अत्यंत दगलबाजपणाचें वर्णन करून तिला असें भासविलें कीं, 'अबुबकर हा कोण गझनीचा महमूद होता, कीं शिकंदर होता, कीं होता तरी कोण' असा तिला भ्रम पडावा. एवढ्यानेंही तिचें अंतःकरण विरघळून न गेल्यास त्यांनीं आणखी एक रामबाण उपाय पूर्वींच नियोजून ठेविला होता, तोही त्यांनीं तेव्हांच उपयोगांत आणला. जुलिया अबुबकरसाठीं हळहळूं लागली तेव्हां त्या गुंडांपैकीं प्रत्येकानें हळहळण्याला सुरवात केली; तिच्या डोळ्यांना पाणी आलें तेव्हां त्यांच्या डोळ्यांना पाणी आलें; व ती संधि साधून त्यांतल्या एका बिलंदरानें तिच्यापाशीं निव्वळ लोणकढी थाप मारली, "बेगमसाहेबा! अबुबकर मरतांना देखील आपणांला विसरला नाहीं."

"खरेंच!" जुलियेनें आपल्या अंगावरील झिरझिरीत ओढणीनें डोळे पुशीत विचारलें.

"खरेंच!" तो लफंगा म्हणाला, "प्राण सोडतांना त्यानें एकसारखा आपल्या नांवाचा ध्यास घेतलेला होता. आणि मरतां मरतां त्यानें आपणांला एक निरोपही सांगितला आहे."

" काय निरोप सांगितला आहे ? काय निरोप सांगितला आहे त्यानें ? " जुलिया अत्यंत आतुरतेनें विचारूं लागली.

" निरोप असा आहे कीं, 'मल्हारी व पिलाजी यांच्या बायकांनीं व नूरनिहार आणि रहमान यांनीं आपला जीव घेतला, त्यांच्यावर तूं जर सूड घेतलास, तरच तूं माझ्याशीं खरी मैत्री पाळलीस असें होईल' आणि असे अखेरचे शब्द उच्चारून त्यानें प्राण सोडला."

जुलियेनें हें ऐकून एक दीर्घ उसासा सोडला. आपला उपाय बराच परिणामकारक झाला असें पाहून त्या गुंडानें आणखी एक पाऊल पुढें टाकलें, " त्यानें आम्हांला देखील तशीच अल्लाची कसम खावयाला लावली आहे."

जुलिया म्हणाली, " तुम्ही खरे मुसलमान आहां; तुम्ही आपल्या वचनाला जागाल अशी माझी खात्री आहे."

" तें खरें; पण बेगमसाहेबा ! किल्लेदारसाहेबांच्या दिलांत एकाएकीं किती फरक पडला आहे हें आपण आतां पाहिलेंच आहे." एकजण म्हणाला.

जुलिया एकदां दरवाजापर्यंत जाऊन किल्लेदार आंत पिलाजीचा समाचार घेण्यांत गढून गेला आहे असें पाहून पुन्हा बाहेर येऊन म्हणाली, " त्याला कांहीं इलाज नाहीं."

" इलाज नाहीं खरा; पण आम्हांला मात्र किल्लेदारसाहेबांनीं निष्कारण तोंडघशीं तर पाडलें खरें ! आमच्यापैकीं प्रत्येकाचें अंग कसें रक्तानें माखलें आहे तें पहा! इतक्या यातना आम्हीं कां भोगल्या ? अबुबकर व आमचे आणखी दोघे साथीदार कां मेले ? किल्लेदारसाहेबांच्या हुकुमाची तामिली करण्यांत आम्हीं आमच्या प्राणांचीही पर्वा केली नाहीं, म्हणूनच आमची ही दशा झाली ना ? किल्लेदारसाहेबांनीं भोजराजाला पकडण्याची कामगिरी आमच्यावर सोंपविली म्हणून हें असें झालें. ती कामगिरी आम्हीं पार पाडली, त्याचें हें चीज ! तो थेरडा भोजराज चोर तो चोर आणि पुन्हा शिरजोर होऊन बसला, आणि आमची मात्र अशी शोभा झाली ! " तो गुंड म्हणाला.

आणखी एकजण म्हणाला, " बेगमसाहेबा ! आपण जर किल्लेदारसाहेबांची समजूत घालाल तर सर्व कांहीं नीट होईल."

" हा तुम्हांला केवळ भ्रम आहे." जुलिया म्हणाली, " किल्लेदारसाहेबांचें डोकें ठिकाणावर असतें तर मी त्यांच्यापाशीं कांहींतरी बोलूं शकलें असतें. पण

आज तशी स्थिति नाहीं. उलट ह्या धकाधकीच्या मामल्यांत तरी माझा कसा पल्ला येईल याचीच मला चिंता आहे."

"मग आम्हीं आतां काय करावें ?" त्या गुंडानें विचारलें.

"तुम्ही असें करा, आतां किल्लेदारसाहेबांच्या हुकुमाची वाट मुळींच पाहूं नका. पाहिजे तर तुम्ही जाऊन यमाजी व गमाजी यांना भेटा व त्यांच्या मदतीनें तुमची दुष्मनगिरी करणाऱ्या साऱ्या माणसांना कैद करून ठेवा. प्रतिनिधींच्या मार्फत त्यांना योग्य शासन होईल असें मी करीन." बोलतां बोलतां जुलियेच्या कंठीं गहिंवर दाटून आला. ती अंमळ थांबून पुन्हा घोगऱ्या आवाजानें म्हणाली, "अबु-बकरचा त्या चांडाळणींनीं असा घात केला काय ?"

"बेगमसाहेबा ! हें काम कमळा व गौतमा ह्या दोघींचेंच केवळ नाहीं; खरें पाहूं गेलें असतां रहमान व नूरनिहार हीं दोघें याच्या मुळाशीं आहेत." एकजण पुन्हा म्हणाला. त्याला वाटलें, जुलिया त्या दोघांना विसरली, म्हणून त्यानें आठवण केली. त्यांचा दांत खरा त्या दोघांवरच होता. कमळेचें व गौतमेचें केवळ निमित्त होतें. रहमान व नूरनिहार यांना पकडण्याच्या कामीं तरी त्यांना जुलियेचा पाठिंबा पाहिजे होता याचें कारण तीं दोघेंही घरचीं माणसें होतीं. रहमान तर किल्ल्यावरील नोकर होता, व नूरनिहार पूर्वी एक सामान्य कुळंबीण असली तरी आतां ती लक्ष्मी-बाईची दासी झाल्यानें बडी झाली होती. त्या दोघांविरुद्ध शस्त्र उगारण्यांत आपण प्रथमपासूनच गुन्हा केला असें त्यांना वाटत होतें. न जाणो, त्या दोघांनीं जर तक्रार केली असती, तर मग केलया गोष्टी निस्तरण्याला त्या गुंडांना फार जड गेलें असतें. अशी संधी त्या दोघांनाही मिळूं नये म्हणून त्यांची प्रथमपासूनच खबरदारी घेण्याची ही शक्कल होती. जर आपला डाव साधला तर सर्व गोष्टी बिनबोभाट पार पडतच आहेत; पण जर का डाव उलटून बाजू अंगावर आली, तर 'बेगमसाहेबां-च्या आज्ञेवरून आपण हें केलें' असें सांगण्याला त्यांना रस्ता मोकळा पाहिजे होता. यमाजी व गमाजी यांच्याकडे जाऊन मदत मागण्याची युक्ति त्यांना जुलियेनें सुचविण्याच्या पूर्वीच सुचली होती. पण ते बापलेक तरी रहमान व नूरनिहार यांना गोत्यांत आणण्याच्या कामीं मदत करतीलच असा त्यांना भरंवसा नव्हता. त्यांच्यावर वजन पाडण्यासाठीं किल्लेदारला इरेला घालण्याचा त्या गुंडांचा पहिला बेत होता. पण तो बेत फसला, तेव्हां त्यांना जुलियेची खुषामत करण्याशिवाय गत्यंतर नव्हतें.

त्या गुंडांनीं पुन्हा रहमान व नूरनिहार यांचा विशेष उल्लेख केलेला ऐकतांच जुलिया म्हणाली, "तें मला माहीत आहे. म्हणूनच मी म्हणत्यें, गौतमा व कमळा यांचें तिकडे कांहीं कां होईना; प्रथम रहमान व नूरनिहार यांनाच कैद करा."

"जसा आपला हुकूम !" जुलिया एवढी आपल्या कह्यांत आलेली पाहून एक गुंड हलकेंच म्हणाला, "आतां आम्ही आपल्या हुकुमाप्रमाणें कामगिरीवर जातों. पण बेगमसाहेबा ! किल्ल्याबाहेर आम्हांला कसें जातां येईल ?"

"कां ?" जुलियेनें विचारलें.

"किल्ल्यांतील कोणाही माणसाला बाहेर जावयाचें झालें किंवा बाहेरच्या कोणाही माणसाला किल्ल्यांत यावयाचें झालें तरी आपल्या परवानगीशिवाय दरवाजा उघडावयाचा नाहीं असा किल्लेदारसाहेबांचा दरवाजावरील पहारेकऱ्याला सक्त हुकूम आहे."

जुलियेनें पुन्हा एकवार आंत डोकावून किल्लेदार भोजराजापाशीं बोलण्यांत रंगून गेला आहे असें पाहिलें व बाहेर येऊन म्हटलें, "चला. मी पहारेकऱ्याला सांगून दरवाजा उघडावयाला लावत्यें."

लगेच जुलिया त्या गुंडांमागोमाग दरवाजापर्यंत गेली व पहारेकऱ्याला दरडावून म्हणाली, "यांना बाहेर जाऊं द्या."

"बेगमसाहेबा !......"

पहारेकऱ्याच्या मनांतून किल्लेदाराच्या सक्त हुकमाविषयीं वगैरे कांहीं तरी बोलावयाचें होतें. पण जुलियेनें त्याला तेवढी संधीच न देतां पुन्हा दरडावून सांगितलें, "अगोदर दरवाजा उघड त्यांना कांहीं जरूरीच्या कामासाठीं बाहेर जावयाचें आहे. नाहीं तर किल्लेदारसाहेब तुझ्यावर गुस्सा करतील."

पहारेकऱ्याला तरी किल्लेदाराचा त्या लोकांना बाहेर जाऊं देण्याविषयींचा हुकूम असल्याचा दुसरा कोणता पुरावा पाहिजे ! त्यानें तेव्हांच देवडी उघडून त्या गुंडांना बाहेर जाऊं दिलें. जुलिया लगेच माघारी आपल्या घरांत आली व 'जर का ह्या गोष्टी भलत्या थराला गेल्या व किल्लेदार रागावलाच तर त्याची समजूत कशी करावी' याचा आगाऊ विचार करीत आपल्या बिछान्यावर पडली. अंमळशानें किल्लेदारही भोजराजाला पिलाजीच्या सोबतीला बसवून आपल्या शयनमंदिरांत आला. त्याला आपल्या वर्तनाचा जरादेखील संशय येऊं नये म्हणून जुलियेनें झोंपेचें सोंग घेतलें.

" जुलिया ! प्यारी जुलिया ! " किल्लेदारानें जुलिया डाव्या कुशीवर झोंपी गेली होती तिचा उजवा हात आपल्या हातीं घेऊन तिला हांक मारली.

जुलिया जणुं काय खडबडून जागी झाल्यासारखें करून म्हणाली, " प्यारे ! हें काय ? आपण अजून जागेच आहां काय ? "

" होय." असें म्हणून किल्लेदारानें भोजराजाशीं त्याचें आतां जें संभाषण झालें होतें, तें जुलियेला सांगितलें. तें जुलियेनें लक्षपूर्वक ऐकून घेतलें याचें कारण त्यांत इथून तिथून सारा अबुबकरच्या अरेरावीचा इतिहासच भरलेला होता. जुलियेला अबुबकरच्या पश्चात् देखील त्याच्या अत्याचारांची हकीकत ऐकून त्याच्याविषयीं तिरस्कार वाटला नाहीं, उलट किल्लेदारानें अबुबकर मेला हें त्याला त्याच्या अपराधांचें यथायोग्य प्रायश्चित्त मिळालें असें आपलें स्पष्ट मत दिलें. तें ऐकून तिला किल्लेदाराविषयींच तिरस्कार वाटूं लागला होता. पण आपल्या वर्तनाविषयीं त्याला संशय येऊं नये म्हणून तिलाही बाह्यात्कारीं त्याच्या होला हो देणें प्राप्त होतें.

* * *

किल्लेदार व जुलिया ह्या दोघांनाही रात्रभर बरीच दगदग व जागरण झाल्यामुळें लौकरच झोंप लागली, व उजाडेपर्यंत किल्ल्यावर आणखी कांहीं भानगडी न घडल्यामुळें तेवढीच विश्रांति त्यांच्या पदरीं पडली. आणि चार घटका दिवसाला किल्ल्याच्या मुख्य दरवाजाच्या पहारेकऱ्यानें येऊन जर हांक मारली नसती, तर आणखी बराच वेळपर्यंत त्या दोघांचीही झोंप पुरी झाली नसती.

किल्लेदाराला आपली झोंपमोड झाली म्हणून राग आला, व तो त्या पहारेकऱ्याला रागेंदेखील भरला. पण पहारेकरी तो घुस्सा मुकाट्यानें सहन करून म्हणाला, " किल्लेदारसाहेब ! मी तरी काय करूं ! गमाजीराव व आपलेच किल्ल्यावरचे लोक राणोजी, मल्हारी, रहमान व नूरनिहार यांना कैद करून घेऊन बाहेर आलेले आहेत. त्यांना आतांच्या आतां आपली गांठ घ्यावयाची आहे."

" हें काय ! ह्या मंडळीला हे उपद्व्याप कोणीं सांगितलें होतें ? " किल्लेदार संतापून डोळे चोळीत म्हणाला.

" तें मला कांहींच माहीत नाहीं किल्लेदारसाहेब ! " पहारेकरी म्हणाला.

" जा पाहूं ! त्यांना आंत घेऊन ये." किल्लेदार म्हणाला.

पहारेकरी निघून गेला,व किल्लेदारही डोळे चोळीत चोळीत चडफडत उठून कपडे करण्याच्या तयारीला लागला. जुलियेला मात्र तेव्हां धास्ती पडली कीं आतां कसें होणार !

# प्रकरण अठरावें

# कैदी रवाना झाले



श्रीपतराव प्रतिनिधि जों किल्लेदाराला भेटून तेथला बंदोबस्त करण्यासाठीं म्हणून किल्ल्यावर जातो, तों तेथें सर्वच सृष्टि पालटलेली होती. पण त्याला मात्र त्याची कल्पना नव्हती. त्यानें किल्ल्याच्या दरवाजांत पाय ठेवतांच प्रथम त्याला पहारेकरी भेटला. आतां ही दिवसाची वेळ असल्यानें वस्तुतः किल्ल्यावर जाण्याला किंवा किल्ल्यावरून बाहेर येण्याला कोणाला फारसा प्रत्यवाय नव्हता व त्यांत आणखी प्रतिनिधीसारख्या मोठ्या माणसाची गोष्ट सर्वस्वीं निराळी होती, आणि त्यांतही किल्ल्यावरच्या ज्या बहुतेकांना प्रतिनिधीच्या वतीनें यसाजी गमाजींनीं फितूर केलेल्या लोकांपैकींच पहारेकरी हा एक होता, तरीही त्यानें श्रीपतरावाला पाहून मुजरा करून हलकेंच त्याला म्हटलें, " सरकार ! माफ करा; पण आपणांला खास परवानगीशिवाय किल्ल्यांत येऊं द्यावयाचें नाहीं असा किल्लेदारसाहेबांचा हुकूम आहे."

श्रीपतराव तात्कालिक यशाच्या कैफानें इतका बेभान होऊन गेला होता कीं, पहारेकऱ्यांच्या शब्दांवर त्याचा मुळींच विश्वास बसेना. तो तसाच पाऊल उचलीत पहारेकऱ्याला म्हणाला, " अरे ! हा हुकूम फक्त बाजीराव व त्याच्या पक्षाचे इतर लोक यांच्या बाबतींत पाळावयाचा असेल."

" नाहीं सरकार ! " पहारेकरी म्हणाला.

" नाहीं कसें ? तूं मूर्ख आहेस. तुला कांहींच कळत नाहीं. बाजिरावानें महाराजांना ठार मारण्याचा कट केला असून तो कट मीं उघडकीलाही आणला आहे, व त्या बाबतींत बंदोबस्त करण्याच्या कामीं ढिलाई होऊं नये म्हणून मींच माझ्या माणसांच्या हातीं किल्लेदाराला एवढी खबरदारी घेण्यासाठीं हुकूम केला होता. " असें म्हणून श्रीपतराव पहारेकऱ्याला न जुमानतां आंत घुसला देखील !

गरीब बिचारा पहारेकरी ! तो श्रीपतरावाच्या बाजूचा जरी होता, तरी तो किल्लेदाराचा नोकर होता व त्यानें श्रीपतरावाला निवेदन केलें त्याप्रमाणें त्याला खरोखरच किल्लेदाराचा हुकूम झालेला होता, 'जर का श्रीपतराव किंवा त्याचे कोणी

साथीदार गुप्त रीतीनें किल्ल्यावर आले, तर तुला भयंकर शासन होईल'. इतकी तिखट किल्लेदाराची ताकीद असल्यानें तेथें पहारेकऱ्याचा देखील इलाज नव्हता. श्रीपतराव बळेंच आंत गेला तेव्हां त्याच्या दंडाला धरून मागें खेंचण्याइतकें धैर्य जरी त्याच्या अंगीं नव्हतें, तरी असा प्रकार झाला असें वेळींच किल्लेदाराला कळविण्याइतकी समयसूचकता त्याच्या अंगीं होती. त्यामुळें तो लगेच देवडी तात्पुरती बंद करून श्रीपतरावाच्या मागोमाग पण श्रीपतराव तेथें जाऊन पोंचण्याच्या अगोदर किल्लेदारापाशीं गेला व म्हणाला, " किल्लेदारसाहेब ! प्रतिनिधि मला न जुमानतां देवडींतून आंत घुसले."

" तूं त्यांना प्रतिबंध केला नाहींस ! " किल्लेदारानें मागें वळून पहात विचारलें.

किल्ल्यावरचे लोक यमाजी—गमाजींच्या साह्यानें राणोजी, मल्हारी, पिराजी नाथाजी, रहमान व नूरनिहार यांना कैद करून किल्ल्यावर घेऊन आल्यावेळीं ह्याच पहारेकऱ्यानें वर्दी पोंचविण्याच्या निमित्तानें किल्लेदाराची झोंपमोड केली होती, व तेव्हां किल्लेदाराला त्याचा रागही आला होता. तेव्हांपासून हा वेळपर्यंत किल्लेदार त्या प्रकरणाची कसून चौकशी करण्यांत गढून गेला होता. पंतांच्या गोटांत श्रीपतराव त्या चौघां गोंधळ्यांना धाकदपटशा देऊन आपल्या तर्फेचे साक्षीदार म्हणून घडवून मोकळा होतो न होतो, तोंच यमाजी व गमाजी जे किल्लेदाराविरुद्ध कागाळी करण्यासाठीं तेथें गेले, ते किल्ल्यावरूनच गेले होते. त्यांनी जी कागाळी नेली, ती अक्षरशः खरी होती. राणोजी, मल्हारी वगैरे मंडळींच्या गुन्ह्याची चौकशी करून त्यांना दोषी किंवा निर्दोषी ठरविण्यांत किल्लेदार अधिकारातिक्रम करीत होता किंवा नाहीं हा प्रश्न बाजूला ठेवतां प्रथमपासूनच म्हणजे जुलियेनें पहांटेच्या प्रहरीं त्याला मोहनी घातल्या वेळेपासून त्याचा ग्रह श्रीपतराव व त्याच्या पक्षाचे इतर लोक यांच्याविषयीं अगदीं प्रतिकूल झाला होता, व पिलाजीच्या घराकडील अत्याचारांत सर्वस्वी दोष किल्ल्यावरील मंडळींचाच होता याविषयीं त्याची खात्री होऊन चुकली होती. त्याच बाबतींत नूरनिहार, रहमान, राणोजी, मल्हारी वगैरे मंडळींचा किल्लेदारानें कसून तपास चालविला होता. त्या तपासांत ती मंडळी सर्वस्वी निर्दोष असल्याचें किल्लेदाराच्या निदर्शनाला येऊन चुकलें होतें व प्रतिनिधीच्या कारस्थानाचीं पाळेंमुळें किती खोल गेलेलीं आहेत याचीत्याला कांहींशी कल्पना आलेली होती. त्याच्या कोपानलांत पहारेकऱ्यानें आणलेल्या बातमीमुळें जणूं काय तेलाचा शिडकाव झाला.

प्रतिनिधींविषयीं किल्लेदाराच्या मनांत आतां जरा देखील आदर उरलेला नाहीं हें पहारेकऱ्यानें किल्लेदाराच्या बेपर्वाईच्या प्रश्नावरून तेव्हांच ताडलें. तो म्हणाला, " किल्लेदारसाहेब ! मीं प्रतिनिधींना आपला हुकूम काय आहे तें सांगितलें; पण ते मला न जुमानतां आंत घुसले तेथें माझा काय इलाज ! "

" आंत घुसले म्हणजे ? तूं त्यांना दंडाला धरून बाहेर लोटावयाचें होतेंस. तुझें काय, तूं हुकमाचा ताबेदार. शेळपट कुठचा ! चल चालता हो येथून." किल्लेदार म्हणाला.

इतक्यांत श्रीपतराव स्वतः तिथें येऊन पोंचला. बिचारा पहारेकरी किल्लेदाराकडून निघालेल्या खरडपट्टीमुळें रंजीस न येतां 'प्राणावर आलें होतें पण बोटावर निभावलें' असा आपल्या मनाचा विरंगुळा करून आपल्या कामगिरीवर निघून गेला. जातां जातां त्यानें स्वतःच्या मनाशीं एवढी मात्र कल्पना केली कीं, 'मी माझें कर्तव्य चोख बजावलें असतांही किल्लेदार जर इतका रागावला' तर मीं प्रतिनिधींची मुर्वत राखून त्यांना विरोध केला नसता किंवा झाला तो प्रकार ताबडतोब किल्लेदाराच्या कानावर घातला नसता म्हणजे किल्लेदार मला कच्चा खाता कीं भाजून खाता अल्ला जाणे !' असो.

प्रतिनिधि जों तेथें येऊन पाहतो तों तेथल्या एकंदर प्रकारावरून त्याला स्पष्टपणें कळून चुकलें कीं, किल्ल्यावरील फितुरीच्या बाबतींत 'विनायकं प्रकुर्वाणो रचयामास वानरं' अशी आपल्या कारस्थानाची अवस्था झाली आहे. तरीही त्यानें न डगमगतां किल्लेदाराला कांहींशा जोरानें विचारलें, " शेख ! हा काय प्रकार आहे?"

किल्लेदार मनांतून जरी प्रतिनिधीला पुरा ओळखीत होता तरी त्याच्या तोंडावर बरोबरीच्या नात्यानें अथवा अधिकाराच्या जाणिवेनें बोलणें त्याला अशक्य होतें. कारण प्रतिनिधि कसा झाला तरी महाराजांच्या अष्टप्रधानांचा अग्रगण्य होता. इतरांनीं त्याच्याशीं आपली पायरी ओळखून वागणेंच योग्य होतें. किल्लेदारदेखील आपली पायरी ओळखून म्हणाला, " सरकार ! मी हुकमाचा बंदा आहें. आपल्या हुकुमाप्रमाणें हे सारे कैदी माझ्या ताब्यांत आहेत. पण खरें म्हणाल, तर यांना कैद होण्याजोगा यांच्या हातून कांहीं गुन्हा घडला आहे असें मला कांहीं वाटत नाहीं."

श्रीपतराव त्या सर्व मंडळींकडे एकवार पाहून किल्लेदाराला म्हणाला, " शेख ! ज्यानें त्यानें आपापलें काम करावें. पकडून पाठविलेले कैदी पुन्हा दुसरा हुकूम

होईतों बंदोबस्तानें किल्ल्यावर ठेवावे एवढेंच तुझें काम. त्या लोकांचा न्याय-निवाडा व्हावयाचा तो योग्य वेळीं होईल."

" जसा हुकूम, सरकार ! " किल्लेदार म्हणाला.

" मग तूं रात्रौ भोजराजाला कैद कां केलें नाहींस ? " श्रीपतरावानें विचारलें.

किल्लेदार उत्तरला, " सरकार ! तो माझ्या अधिकारांतील प्रश्न होता. तसाच रहमान व नूरनिहार यांच्या कैदेचा प्रश्नही माझ्या अधिकारांतील आहे. आत त्यांना आपल्या यमाजीरावांनीं पकडून आणलें आहे ही गोष्ट खरी; पण हें कांहीं एकंदरींत बरें नाहीं."

" तें कांहीं असलें तरी तूं त्यांनादेखील आतां मुक्त करतां कामा नये. सातार्‍यांतील एक भयंकर कट आम्हीं जो नुकताच उघडकीला आणला आहे. त्या कटाशीं या सर्व मंडळींचे धागेदोरे पोंचतात. तेव्हां तूं असें करावयाचें कीं, ही सर्व मंडळी नीट बंदोबस्तानें आजच्या आज महाराजांचा मुक्काम मसूरला व्हावयाचा आहे तेथें रवाना करावयाची मग महाराज त्यांचा काय तो न्यायनिवाडा करतील." श्रीपतराव म्हणाले.

" जसा हुकूम, सरकार ! " किल्लेदार म्हणाला.

इतकें झाल्यावर श्रीपतराव माघारा जाणार तोंच मल्हारीनें त्यांना दीनवाणीनें हांक मारून विचारलें, " सरकार ! आपण आमची कांहींच दाद घेणार नाहीं का?"

" तुमची दाद महाराजांपाशीं लागेल." श्रीपतराव मागें वळून म्हणाला.

" पण सरकार! आमच्या बायकांची अब्रू धोक्यांत आहे. आपण आमची दाद घेतली नाहीं, तर त्यांची काय वाट ? " मल्हारीनें विचारलें.

" आणि तिकडे तुमच्या कारस्थानांमुळें महाराजांचा जीव धोक्यांत आहे, त्याची काय वाट ? " श्रीपतरावानें उद्दामपणानें विचारलें.

" मल्हारी यावर कांहीं बोलणार होता तों मध्येंच श्रीपतराव म्हणाला, " तुम्हीं तुमचा सारा साक्षीपुरावा योग्य वेळीं महाराजांसमोर हजर करा. तुमची कोणतीच तक्रार ऐकून घेण्याची माझी इच्छा नाहीं."

श्रीपतराव एवढें बोलून निघून गेला. किल्लेदाराला जरी ही प्रत्येक गोष्ट अप्रिय होती तरी 'सत्तेपुढें शहाणपण नाहीं' हें ओळखून प्रतिनिधीच्या आज्ञेप्रमाणें त्यानें वागण्याचें ठरविलें होतें. त्याच्यासमोर आणखी एक भानगडीचा प्रश्न थोड्या वेळापूर्वीपासून अकस्मात् उभा राहिला होता. त्याचा निकाल त्याला आतां लावून

घ्यावयाचा होता. किल्ल्यावरच्या ज्या लोकांनीं रहमान, नूरनिहार वगैरे मंडळींना पकडून आणलें त्यांनीं आपलें हें कृत्य किल्लेदाराला आवडलें नाहीं असें पाहतांच त्याबद्दलची जबाबदारी शक्य तों आपल्या अंगाबाहेर टाकण्याचें ठरविलें होतें. आतां 'पहिल्यानें ह्या मंडळींना किल्ल्याबाहेर जातां आलें कसें !' हा प्रश्न जेव्हां उपस्थित झाला, तेव्हां ओघानेंच जुलियेचें नांव पुढें आलें. नूरनिहार व रहमान ह्यांनीं दिलेल्या माहितींतूनही जुलियेविषयीं संशय उत्पन्न करण्याजोग्या बऱ्याच गोष्टी किल्लेदाराला कळून चुकल्या. त्यावरून त्याला पुन्हा संशय येऊं लागला कीं, 'आपली जुलियादेखील प्रतिनिधीच्या या कारस्थानांत सामील आहे किंवा कसें ?' पण हा फार नाजूक प्रश्न पडल्यानें किल्लेदारानें त्या सर्व मंडळींच्या देखत त्यांची फारशी छाननी केली नाहीं. जुलिया आपल्या घरांतून हा सारा प्रकार लक्षपूर्वक पहात होती. आतां किल्लेदार आपणांला एकटी गांठून ह्या गोष्टीचा जाब विचारील, तेव्हां त्याच्या डोळ्यांत धूळ फेकण्यासाठीं आपण काय काय केलें पाहिजे ह्याविषयींचे विचार तिच्या डोक्यांत त्या वेळीं घोळत होते. तिला फक्त त्या मंडळींच्या देखत ही चौकशी व्हावयाला नको होती, व तो प्रसंग आतां ओघानेंच टळला होता.

श्रीपतराव जो निघून गेला तो पुन्हा किल्ल्याच्या दरवाजांतून मागें परतला व किल्लेदारापाशीं येऊन म्हणाला, "शेख ! मघां जातांना एक महत्त्वाची गोष्ट तुला सांगण्याची राहून गेली. बाजीरावसाहेब जर चुकून किल्ल्यावर आले तर त्यांना देखील मसूरला पाठवून देण्याची जबाबदारी तुझ्यावर आहे."

"कां म्हणून !" किल्लेदारानें विचारलें.

"मी सांगतों म्हणून." श्रीपतराव उत्तरला.

किल्लेदाराला हें उत्तर अर्थातच सहन झालें नाहीं. तो म्हणाला, "या ठिकाणीं मी महाराजांचा नोकर आहें; तुमचा नोकर नाहीं."

इतका वेळ प्रतिनिधीला स्वर्ग दोन बोटें उरला होता. पण किल्लेदारानें आपल्या रोखठोक जबाबासरसें त्याला एकदम बरेंचसें खालीं उतरून ठेवलें. तेव्हां कुठें तो जरा ताळ्यावर येऊन म्हणाला, "मी महाराजांच्या हुकमावरून तुला ही कामगिरी सांगत आहें."

किल्लेदार पुन्हा मुद्दाम श्रीपतरावाला खिजविण्याच्या हेतूनेंच कीं काय म्हणाला, "आतां यांतलें खरें काय ? हा हुकूम तुमचा कीं महाराजांचा ?"

श्रीपतराव म्हणाला, "अर्थात् हा महाराजांचा हुकूम."

किल्लेदार नकारदर्शक मान तुकावीत म्हणाला, “ छे ! माफ करा. इतरांची गोष्ट निराळी, आणि तुम्ही काय—बाजीरावसाहेब काय—अशा थोरांची गोष्ट निराळी. आपणांपाशीं महाराजांचा तसा लेखी हुकूम आहे का ? ”

“ लेखी हुकूम कशाला हवा ? माझ्या शब्दावर तुझा विश्वास नाहीं का ? ”

“ सरकार ! नुसत्या शब्दाच्या विश्वासावर जर दुनिया चालली असती तर ह्या गोष्टी कशाला हव्या होत्या ? कल्पना करा, आतां एखादा लफंगा बाहेरून आला व प्रतिनिधींना कैद करण्याला महाराजांचा हुकूम आहे असें सांगूं लागला, तर त्याचा शब्द मला मानतां येईल का?”

किल्लेदाराचा ह्या मुद्देशीर प्रश्न श्रीपतरावाला उत्तरण्याला अवघड जाऊं लागला. ह्या प्रश्नाच्या निमित्तानें किल्लेदारानें श्रीपतरावाचे दांत त्याच्याच घशांत खासे कोंबले. श्रीपतरावाचें मुद्द्याचें भाषण इथेंच संपलें. असा एखादा मनुष्य मुद्द्यानें बोलतांना निरुत्तर झाला, कीं तो स्वाभाविकपणेंच ‘शेषं कोपेन पूरयेत्’ ह्या तत्त्वाचा अंगीकार करतो. श्रीपतरावानेंही तेंच केलें. तो रागानें फणफणत म्हणाला, “ शेख! तूं शत्रूला फितुर आहेस.”

किल्लेदारानें न डगमगतां विचारलें, “ सरकार ! शत्रु कोण, कुणाचा, आणि आपण हें काय बोलतां ? ”

“ शत्रु माझा ! शत्रु महाराजांचा ! शत्रु अलम्‌मराठी दुनियेचा ! ” श्रीपतराव रागाच्या भरांत आपल्या मिशीवर पीळ देत म्हणाला, “ बाजिरावानें आपल्या फितुरीचें जाळें येथवर पसरलें आहे काय ? ठीक आहे, पाहून घेईन. पण शेख ! याद राखून ठेव, ह्या शत्रुत्वाबद्दल बाजीराव तर गाडला जाईलच पण ‘सुक्यावरोबर ओलें जळतें’ या न्यायानें तुझ्यासारख्या फसगतीनें किंवा फुसलावणीनें फितुर झालेल्या साऱ्यांना देखील आपल्या घरादारावर, वतनवाडीवर, मानमरातबावर, इहसर्वस्वावर पाणी सोडून फकिरी पत्करावी लागेल ! ”

श्रीपतराव मारे शिरा ताणताणून इतकें बोलला तरी किल्लेदार जरा सुद्धां डगमगला नाहीं. त्याला मनांतून श्रीपतरावाचा संताप आला होता; पण तो मनांतल्या मनांत होता. पाण्याच्या पोटीं अग्नि वास करीत असतो पण लौकिकदृष्ट्या पाणी हें अग्नीचें मारक असतें’ त्याप्रमाणेंच मनांतून संतप्त झालेला किल्लेदार बाह्यतः अत्यंत गंभीरतेचा बेमालूम बहाणा करून उद्गारला, “ सरकार ! आपण जरी कितीही संतापलां तरी मला माझी पायरी सोडतां येत नाहीं. बाजीरावसाहेब तुमचे,

महाराजांचे व राजवटीचे शत्रु असतील किंवा मित्र असतील. ते थोर; आपण थोर. माझ्यासारख्या गरीबाला त्यांत मन घालतां यावयाचें नाहीं. झुंज रेड्यांची होईल, पण सालें झाडाचीं निघतील. तेव्हां आपण म्हणतां त्याप्रमाणें मला महाराजांच्या हुकमाशिवाय कांहींच करतां यावयाचें नाहीं."

थोड्या वेळापूर्वीं किल्लेदारानें अप्रत्यक्षपणें श्रीपतरावाला लफंगा म्हटलें तेव्हांच तो शब्द श्रीपतरावाच्या मनाला झोंबला होता. त्यांतच पुन्हा किल्लेदारानें आतां श्रीपतरावाला रेड्याची उपमा दिली, त्यामुळें तर जखमेवर मिठाचें पाणी शिंपडल्या-प्रमाणें श्रीपतरावाच्या मनाची अवस्था झाली. तो म्हणाला, "शेख! तूं पायरी सोडून बोलूं लागलास!"

"सरकार! पायरी सोडून बोलण्याची किंवा वागण्याची खोड जर मला असती तर महाराजांचे पाय यापूर्वींच मला अंतरले असते. आतां वेळच आली म्हणून बोलतों, मी माझ्या पायरीला स्मरून वागलों म्हणूनच महाराज आज राज्यावर टिकले आहेत, नाहींपेक्षां परशरामपंत सरकारांच्या कारस्थानाखालीं महाराजांच्या केव्हांच ठिकऱ्या ठिकऱ्या उडाल्या असत्या. आपण माझ्या-वर फितुरीचा आरोप केला; पण ही गोष्ट कांहीं आजकालची नाहीं. परशराम-पंतांना पकडून मीं महाराजांच्या हवालीं केलें त्याच वेळीं प्रतिनिधींच्या घराण्यानें मला फितुरीचा ताम्रपट देऊन ठेविलेला आहे. पण फितुर कोण आणि नेकजात कोण याचा इन्साफ आपल्यासारख्या समंजसांना स्वतःच्या मनाशीं करतां येण्यासारखा आहे. बस्स! मी फितूर असेन तर माझ्या कर्मांचीं फळें मी भोगीन. त्या वेळीं मला मदत करा म्हणून मी आपल्या पायापाशीं कधींच धावून येणार नाहीं. रागाच्या भरांत मी अधिकउणें कांहीं बोललों असेन तर आपण माफ करा व ज्या अर्थीं आपल्या माझ्यांतला हा प्रसंग इतक्या वर्दळीवर आला आहे, त्या अर्थीं ह्या किल्ल्याचा महाराजांच्या तर्फेचा किल्ल्याचा जबाबदार रक्षणकर्ता म्हणून मी आपणांला सांगतों कीं, आपण आतांच्या आतां किल्ला सोडून निघून जा."

"पण शेख!—"

"पण बीण कांहीं नाहीं. आपण मुकाट्यानें किल्ला सोडून निघून जा. नाहीं-पेक्षां मला माझ्या अधिकारांत आपणांला कैद करावें लागेल."

श्रीपतरावानें मनांत विचार केला कीं, 'किल्लेदार हा बोलून चालून मुसलमान-भाई! 'सरळ आहे तोंवर सूत नाहींतर तिठयावरचें भूत! याच्या तोंडाला तोंड द्यावें

तर ह्या खरोखरच बोललेला शब्द खरा करावयाचा! त्यापेक्षां आपण ह्या वेळीं येथून काढता पाय घ्यावा व महाराजांपाशीं जाऊन तेथेंच खुंटी पिरगळावी, कीं सर्व यथास्थित होईल. हा कुटिल नीतीचा मार्ग पत्करून तो तेथून मुकाट्यानें चालूं लागला. जातां जातां त्यानें किल्लेदाराला एवढें मात्र विचारलें, "बरें, तूं ह्या इतर कैद्यांना तरी महाराजांसमोर हजर करणार कीं नाहीं!"

"अर्थात् हजर करणार. तेवढ्यापुरता मी आपल्या शब्दावर विश्वास ठेवूं शकतों.

'चोराची लंगोटी हातीं सांपडली तेवढचि सई'. असें म्हणून श्रीपतरावानें तेथून तांतडीनें पाय काढला. लगेच थोड्या वेळानें किल्लेदारानें किल्ल्यावरच्या निवडक वीस शिपायांना बोलावून राणोजी, मल्हारी, पिराजी, नाथाजी, रहमान व नूरनिहार अशा सहाजणांना महाराजांकडे मसूरला रवाना केलें. भोजराजाला मात्र त्यानें पाठविलें नाहीं. कारण त्याचा महाराजांच्या हुकमाशीं कांहींच संबंध नव्हता. राणोजी वगैरे मंडळींचीही अशी खात्री होती कीं, आपणांला कैद झाली या बाबतींतही महाराजांचा अर्थाअर्थी कांहींच संबंध नसावा. पण या वेळीं किल्लेदार फारच संतापला आहे, तो कोणाचेंच सामोपचाराचें बोलणें ऐकून घ्यावयाचा नाहीं, असें पाहून, त्या मंडळींपैकीं कोणीच कांहीं बोललें नाहीं. सर्वजण दैवावर व आपल्या इमानतीवर हवाला ठेवून महाराजांसमोर देखील आपणांला न्यायच मिळेल अशा भरंवशानें शिपायांच्या कडेकोट बंदोबस्तांत महाराजांकडे जावयाला निघाले. आतां किल्ल्यावर टांगणीला लागलेला जीव अशी एकटी जुलियाच काय ती होती. पण ती देखील आपणांविरुद्ध बोलण्याला आतां येथें कोणीच उरलें नाहीं व आपण आतां आपल्या नेहमींच्या पद्धतीप्रमाणें किल्लेदाराला हां हां म्हणतां गुंगवून डोलावयाला लावूं अशा भरंवशानें बरीच निश्चिंत झाली होती.



नदीच्या कांठीं दोघी स्त्रिया एका वृक्षाखालीं बसून आपसांत कांहीं बोलण्यांत गढून गेल्या होत्या.

## प्रकरण एकोणिसावें
# कैद कीं पेशवाई ?

माधवस्वामी वगैरे मंडळींना मागें ठेवून बाजीराव मस्तानी व खतीब, रामदास-पंत आणि हकीम महंमदअल्ली यांच्या शोधार्थ जो एकटाच पुढें निघाला तो वर्धा घाटाच्या पार वेरळा* नदीच्या तीरीं वसलेल्या मुसगांव नांवाच्या खेड्यांत जाऊन पोंचतो न पोंचतो तोंच नदीच्या कांठीं दोघी स्त्रिया एका वृक्षाखालीं बसून आपसांत कांहीं बोलण्यांत गढून गेल्या होत्या. त्या एकमेकींशीं बोलण्यांत इतक्या गढून गेल्या होत्या कीं, आपल्यामागें कोणी येऊन उभें राहिलें आहे, याची त्यांना दादच नव्हती. त्या दोघींच्या संभाषणावरून बाजिरावाला असें कळून आलें कीं, मस्तानींचा मेणा याच गांवीं थांबला असून खतीब तेथेंच आहे. मात्र रामदास-पंत आणि हकीम महंमदअल्ली हे दोघे ही पुढें माहिमानगडावर निघून गेले. त्या स्त्रिया कोण असाव्या याविषयीं जरी बाजिरावाला नक्की अंदाज कांहींच करतां आला नाहीं तरी त्यानें त्या दोघींच्या पेहरावावरून हेरलें कीं, त्यांतली एक जी जरा उंचवटयावर बसून बोलत होती ती कोणा मोठ्याची बायको असावी व तिच्या समोर जरा सखल जागीं बसून बोलणारी तिची कोणी गरीबशी शेजारीण असावी.

" हें सारें खरें, पण आतां मस्तानी आहे कुठें ? तूं जी तिच्या सौंदर्याची इतकी तारीफ करतेस तें माझ्या मनांतून तिला एकदां पहावयाचें आहे," ती शेजारीण म्हणाली.

" खरें सांगूं, हें कुठंही बोलायचें नाहीं. कबूल असेल तर सांगतें." पहिली स्त्री म्हणाली.

" कबूल. मी कुठं कुणापाशीं बोलायला जातें आहें !" शेजारीण म्हणाली.

" तर मग सांगतें, मस्तानी आमच्याच वाड्यांत आहे."

" पण तुमच्याकडे ती कशी आली ?"

---

* वेरळा नदी सातारा जिल्ह्यांत उत्तर-दक्षिण वहाते. सातारा-पंढरपूर रस्ता जेथें वेरळेला ओलांडून जातो, तेथेंच मुसगांव नांवाचें खेडें आहे. वर्धनगड त्याच्या जरा अलीकडे व महिमानगड त्याहून अंमळ दूर पण पलीकडे आहे.

" वांईकडील आमच्या ओळखीचा हसन महात नांवाचा एक मुसलमान माझ्या सासरीं नोकरीला होता तो आजच आमच्यावरोवर इकडे आला. त्यानें कसें न कळे, मस्तानीला ओळखलें. त्याच्या सांगण्यावरून आम्हांला तरी कळलें कीं, मस्तानी ज्याच्या घरीं वाढून लहानाची मोठी झाली तो खतीबच तिला तिचें निजामाच्या मुलाशीं लग्न लावून देण्यासाठीं चालला होता."

" मग तिला न आवडण्यासारखें त्यांत काय होतें? गरिबाची पोर ती! अनायासें निजामाच्या मुलाची वेगम व्हायची यांत तिला वावगें तें काय वाटलें? मला वाटतें, मस्तानी वेडीच आहे. 'देव देतो आणि कर्म नेतें' तें हें असें!"

" अग! पण—हसन म्हणत होता, कीं मस्तानी ही मुसलमानाची मुलगी नसून ब्राह्मणाची मुलगी आहे! शाहूमहाराजांना व त्यांच्या राजवर्टीच्या इतर सर्व कारभाऱ्यांना हें माहीत आहे म्हणे. तें कां आणि कसें तें मात्र हसनाला माहीत नाहीं. तो तरी तिला भेटला म्हणजे काय, आमच्या वाड्यासमोर मेणा येऊन थांबला त्या वेळीं हसन तेथें उभा होता व मस्तानीचा खतीब का कोण तो मागाहून यावयाचा होता. इतक्यांत मस्तानी घाबरीघुबरी होऊन मेण्याबाहेर आली व हसनला ओळखून तिनें खतिबाचा कावा त्याला सांगितला. हसन एरव्हीं त्या फंदांत पडला नसता; पण मस्तानीनें जेव्हां 'जीव देईन पण त्या मुसंड्याच्या नांवानें बाटण्यासाठीं निजामशाहींत जाणार नाहीं' असा निर्धार दाखविला व तेथून खतीब येण्यापूर्वीं निघून जाण्याला स्वतःला मदत करण्यासाठीं हसनची मनोभावानें पायधरणी केली, तेव्हां हसनला तिची दया आली. त्यांतूनही हसन कदाचित् वळला नसता; कारण तो तसें पाहूं जातां फार आडमुठा व बेपर्वा मनुष्य आहे पण मस्तानीनें जेव्हां त्याच्या बायकोविषयीं चांगल्या गोष्टी काढल्या व ती सध्यां आपणाला माहीत असून ती कोणत्या परीनें छळ सोशीत आहे हें सांगितलें, तेव्हां त्याचें साहजिकपणेंच तिकडे लक्ष्य वेधलें. आपल्यामागें नूरनिहारच्या जन्माचे असे धिंडवडे निघालेले ऐकून हसनला फार खेद झाला. पण नूरनिहार आजवर अखंड पतिव्रताधर्मानें वागत आली आहे व आपण बाजीरावसाहेबांपाशीं प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष भीड खर्च करून तिला बंधमुक्त करूं शकूं, असें मस्तानीनें आश्वासन देतांच हसनला तिच्याविषयीं जिव्हाळा उत्पन्न झाला व त्यानें तिला तिच्या इच्छेप्रमाणें कोणाला न कळत तेथून पळवून आमच्या वाड्यांत आणून ठेवलें."

" आणि आतां पुढें ती काय करणार?"

" ती आतां हसनच्या ओळखीनें माघारी साताऱ्याला जाणार म्हणे ! आणि तिथें जाऊन महाराजांपाशीं दाद मागणार."

इतकी हकीकत बाजिरावाला तेथें एका मोठया झाडाच्या आडवशाला उभें राहून ऐकावयाला मिळाली, त्यावरून त्याचा कार्यभाग झाला. आतां त्याला फक्त एकाच गोष्टीची माहिती पाहिजे होती, ती मस्तानीच्या सध्यांच्या वास्तव्याविषयींची होय. त्या एका बाईच्या वाड्यांत मस्तानी सध्यां आहे हें त्याला कळलें. पण त्या बाईचा वाडा म्हणजे कोणाचा वाडा समजावयाचा ? अखेर बाजिरावानें आपल्या मनाशीं असा विचार केला होता कीं, ती बाई जेव्हां आपल्या वाड्याकडे जाईल तेव्हां तिच्या मागोमाग जावयाचें व अशा रीतीनें तपास लावावयाचा.

थोडया वेळानें त्या स्त्रियांचें संभाषण आटोपलें व दोघीही वाटेला लागल्या. त्यांच्यांपैकीं एक आपल्या वाडयांत जाणार हें तर उघडच होतें; व दुसरी मस्तानीला पहाण्यासाठीं म्हणून तिच्या मागोमाग तिच्या वाडयाकडे चालली होती. त्या दोघी वाटेला लागलेल्या पाहून त्यांना आपला संशय येऊं नये म्हणून बाजीराव जणुं काय आपल्या घोड्याला पाणी पाजण्यासाठीं म्हणून नदीच्या कांठानें उतरूं लागला. त्या दोघीही स्त्रियांनीं त्याला पाहिलें, पण बाजिरावानें तिकडे पाहिलें न पाहिलेंसें केलें, त्यामुळें त्या दोघींचे तिकडे विशेष लक्ष गेलें नाहीं. पण त्या दोघी थोड्या वेळानें चढणीला लागल्या तेव्हां मात्र बाजीराव त्यांची नजर चुकवून त्यांच्या मागोमाग चालू लागला. सुदैवानें माधवस्वामी आपल्या इतर अनुचरांना घेऊन तेवढ्यांत तेथें हजर झाले, त्यामुळें बाजिरावाला जास्त हुरूप आला. बाजिरावानें यांना आतां ऐकलेली सर्व कच्ची हकीकत निवेदन केली. इतकी सर्व मंडळी एकदम पुढें गेल्यास त्या बायांना नसता संशय येईल, म्हणून कोणीतरी एकानें प्रथम पुढें जावें व त्या बाया कुठें जातात हें पाहून यावें, असें ठरलें. त्याप्रमाणें कोणीं जावें याविषयीं थोडासा विचार होऊन अखेर माधवस्वामींनीं ती कामगिरी आपल्या शिरावर घेतली. तोंवर बाजीराव व ते सर्व लोक तेथेंच उभे होते.

थोड्याच वेळांत माधवस्वामी माघारे आले. त्यांनीं बातमी आणली कीं, त्या बाया जवळच्याच एका वाडयांत गेल्या. त्यांनीं आणखी असेंही सांगितलें कीं, त्या वाडयासमोर चांगले पांच–पंचवीस लोक कोणाशींतरी भांडत होते.

" हें भांडण मस्तानीच्या बाबतींतील तर नसेल ! " बाजीराव आपल्या घोडयावर स्वार होतां होतां म्हणाला, " चला पाहूं."

बाजीराव व माधवस्वामी पुढें आणि ते लोक त्यांच्या मागून असे ते थोड्याच वेळांत त्या पूर्वोक्त वाड्यापाशीं जाऊन पोंचले. अगदीं जवळ जाण्यापूर्वींच त्यांनीं वाड्या-समोर कांहीं लोकांचा घोळका जमलेला जेव्हां पाहिला तेव्हां त्यांच्या पूर्वसंशया-ला दुजोरा मिळाला. बाजिरावानें आपल्याबरोबरच्या इतर लोकांना जवळ हांक-मारून आपुलकीनें पण निक्षून सांगितलें. "हें पहा, आतांची वेळ मोठी खडाजंगी-ची आहे. या ठिकाणीं रक्तपात करावा लागला तरी बेहेतर; पण आपणांला त्या निरपराधी मुलीची सुटका करावयाची आहे एवढें लक्षांत ठेवा."

इतक्या कडेकोट पूर्वतयारीनें बाजीराव त्या वाड्यापाशीं जाऊन पोंचला तों पहिल्यानेंच खतीबाची आणि त्याची दृष्टादृष्ट झाल्यामुळें प्रतिपक्षाचा निम्मा जोर मावळला. 'पापी मन ज्याचें त्याला खात असतें' या न्यायानें खतिबाला आपल्या एकंदर कृतीची तेव्हां लाज वाटली असली पाहिजे एरव्हीं बाजिरावाला पाहतांच तो इतका नरम आला नसता.

आतां खतीब कांहींतरी विचारणार तोंच बाजिरावानें पुढें होऊन प्रश्न केला, "हें काय, मौलानाजी! तुम्ही इकडे कुठें?"

खतिबाचें मन पाण्यांत टाकलेल्या ढेकळाप्रमाणें विरघळलें. आपण निजामाशीं फितुर होऊन आपल्या धर्मकन्येला निजामाच्या मुलाच्या जनानखान्यांत लोटण्या-साठीं हैद्राबादेकडे घेऊन चाललों होतों असें तो कोणत्या तोंडानें म्हणेल? पण बाजिरावाच्या प्रश्नाला कांहींतरी उत्तर देणें त्याला प्राप्तच होतें. तो आपले पूर्व-संकल्पित टाळाटाळीचे बेत आठवून म्हणाला, "रावसाहेब! मी काय बोलूं? भलत्या लोकांच्या नादीं लागून मी इकडे आलों व आतां असा हा गोत्यांत पडलों."

बाजिरावाला त्या दोन स्त्रियांचें संभाषण ऐकून व त्यापूर्वीं साताऱ्यांतल्या हकीकती ऐकून एकंदर खरा प्रकार पूर्णपणें माहीत झाला होता. खतीब बोलतो ही लबाडीची भाषा आहे हेंही त्यानें त्याच क्षणीं ओळखलें, पण जणुं काय यांतला कांहींच प्रकार आपणाला माहीत नाहीं असा बहाणा करून तो म्हणाला; "मौलानाजी! असे घाबरूं नका, नीट खरें काय तें सांगा."

खतिबाला बाजिरावाशीं बोलण्यापूर्वीं त्याच्या स्वतःच्या तर्फेनें मस्तानीची सोडवणूक करण्याच्या कामीं तेथें हमरातुमरीवर आलेल्या लोकांना आवरणें प्राप्त झालें. त्या लोकांचें काय, मजुरी ठरवून गांवांतून बोलावून आणलेलें भाडोत्री भांडखोर

ते, त्यांची मजुरी त्यांना पूर्वींच मिळाली असल्यानें 'काम झालें, आतां तुम्ही जा' असें खतिबानें म्हणतांच ते मुकाट्यानें निघून गेले. बाजिरावाची जी कल्पना होती कीं, या ठिकाणीं रक्तपात होईल, ती खोटी ठरली, व त्यामुळें सर्वांना आनंद वाटला. खतिबानें ते लोक जातांच आपलें गाऱ्हाणें बाजिरावाच्या कानांवर घातलें, तें एकंदर साधक बाधक विचार करून केवळ बनावट बनवून घातलें. हकीम महंमदअली व रामदासपंत हे दोघेही अगोदरच पुढें निघून गेल्यामुळें 'त्यांनीं आपल्याला आपल्या मस्तानीसह फसवून या वाटेला आणलें' अशी खोटी बतावणी करण्याला खतिबाला फावलें. इतकेंच काय पण खतिबानें या खोडसाळ-पणाच्या बाबतींत आणखी एक पाऊल पुढें जाऊन आपल्या वर्तनाविषयीं बाजि-रावाला जरा देखील संशय येऊं नये ह्या हेतूनें असें सपशेल खोटें विधान केलें, "रावसाहेब! माझ्या दुर्दैवाची कहाणी आपणांला सांगावयाची माझीच मला लाज वाटते. रामदासपंत काय किंवा महंमदअली काय, बोलून चालून परक्यांचे परके. एखाद्या क्षुल्लक स्वार्थासाठीं त्यांनीं माझ्या डोळ्यांत धूळ फेंकण्याचा प्रयत्न केला असेल तर त्यांत जगावेगळें कांहींच नाहीं. पण ही पोरटी—जिला मीं लहानाची मोठी केली ती स्वतः माझ्याशीं बेइमान होऊन त्या दोघांशीं फितुर होऊन निजामाच्या मुलाची बेगम व्हायला चालली होती; ह्या कर्माला मी काय रडूं ! "

खतिबाच्या तोंडचे शब्द पुरे होतात न होतात तोंच आंतून एक अत्यंत लावण्यवती कुमारिका संतापानें लाल होऊन डिवचलेल्या नागिणीसारखी सोंसावत बाहेर आली व बाजीरावासमोर उभी राहून रोखठोक म्हणाली, "हे बोलतात हें सारें खोटें आहे. माझी साताऱ्यांतून बाहेर पडण्याची देखील इच्छा नव्हती; कारण त्या दोघां चांडाळांचा कोणत्याही हेतूनें कां होईना पण माझ्यावर डोळा आहे हें माहीत होतें. पण मला यांनीं सुरक्षितपणासाठीं म्हणून शाहूमहाराजांच्या छावणींत जाण्याचें निमित्त करून घराबाहेर काढली. चांगली वर्धनगडाजवळ येई-पर्यंत मला याची दाद नव्हती. पण ह्या गांवीं जेव्हां मीं सहज मेण्याबाहेर आलें आणि यांची कुजबूज चाललेली ऐकली, तेव्हां माझ्या डोक्यांत वस्तुस्थिती-चा प्रकाश पडला. त्या वेळीं हसन जर मला इथें भेटला नसता तर माझा मोठा कठीण पल्ला होता. "

"हा हसन कोण ? " बाजिरावानें विचारलें.

"सरकार ! मी आपला बंदा सेवक." एक तरुण मुसलमान पुढें येऊन बाजिरावाला मुजरा करून म्हणाला.

प्रत्यक्ष त्या माणसाला पाहतांच बाजिरावाला तेव्हांच त्याची ओळख पटली. तो या हसनला पिलाजी जाधवाचा मित्र म्हणून फार दिवसांपासून ओळखीत होता. बाळाजी विश्वनाथ पेशवे स्वराज्याच्या सनदा आणण्यासाठीं दिल्लीला* गेले व मेवाड–मारवाडांतील रजपूत राजांना त्या कामीं वश करण्यासाठीं बाजीराव तिकडे गेला, तेव्हां त्याच्याबरोबर असलेल्या अत्यंत विश्वासाच्या शतवीरांत हसन हा एक होता. बाजीराव मारवाडांतून दिल्लीला जाईपर्यंत हसन त्याच्याबरोबर होता. पण दिल्लीहून माघारा सातार्‍यांत येतांना तो मागेंच कुठेंतरी राहिला. तो कुठें व कां राहिला याचा कोणालाही पत्ता नसल्यामुळें बहुतेकांची कल्पना झाली कीं, पेशवे स्वराज्याच्या सनदा घेऊन राजवाड्यांतून आपल्या छावणींत येतांना राजरस्त्यांत जी मोठी दंगल झाली, त्याच दंगलींत इतर अनेक लोकांबरोबर बिचारा हसनही मारला गेला असेल. पण हसन तेव्हां मारला गेला नव्हता हें आतां उघड झालें. तो दिल्लीला कोणा एका स्त्रीच्या नादीं लागून तेथेंच रमला. ती बाईच पुढें त्याला सोडून गेली, म्हणून तरी तो तिच्या पाशांतून मोकळा झाला. तेथून मग त्याला सातार्‍यांत येण्याला तोंड नसल्यामुळें व एकट्याला इतकें दूरवर येणें तितकें सोपेंही नसल्यामुळें तो दिल्लींतीलच कांहीं ओळखीनें निजामाच्या पदरीं येऊन राहिला. योगायोगच तसा होता, म्हणून मुसगांवच्या इनामदाराची एक मुलगी हैद्राबादेला दिलेली होती तिच्या सासरीं हसनला नोकरी मिळाली, व म्हणूनच आज ती इनामदारांची मुलगी माहेरीं आली तेव्हां सासरच्या तर्फेचा तिचा संरक्षक म्हणून तो तिच्याबरोबर इकडे आला होता. मस्तानीची आणि त्याची कशी अचानक गांठ पडली हें आपणांला यापूर्वीच माहीत झालें आहे.

हसनला पहातांच बाजिरावाला मनापासून आनंद झाला. हसन हा एक कसलेला माहूत व पहिल्या प्रतीचा लढवय्या म्हणून तर बाजिरावाला माहीत होताच; पण तो नूरनिहारचा नवरा या नात्यानें त्याची बाजिरावाला आज जरा जास्त किंमत वाटत होती.

बाजिरावानें हसनला विचारलें, "हसन ! इतके दिवस तूं कुठें होतास रे ?"

हसन हात जोडून उद्गारला, "सरकार ! मी माझ्या ग्रहदशेच्या फेर्‍यांत

---

* 'पेशवाईचा ध्रुव ढळला !' पहा.

सांपडलों होतों. आपण कृपा करून माझ्या त्या आयुष्याविषयीं कांहीं देखील विचारूं नका. तो पूर्वीचा हसन केव्हांच मेला व आज हा नवीन हसन निर्माण होऊन आपल्या पायांपाशीं उभा आहे."

बाजिरावानें तर्कानें ओळखलें कीं, हसनच्या हातून यापूर्वींच कांहीं अक्षम्य अशा घोडचुका झालेल्या असाव्या व त्या चुकांबद्दल त्याला मनःपूर्वक पश्चात्ताप वाटत असावा, म्हणूनच तो तें सांगण्याची टाळाटाळ करतो आहे. बाजिरावानेंही मग तो प्रश्न तसाच सोडला व विषय बदलून हसनला विचारलें, "बरें, मस्तानी-विषयीं एकंदर खरा प्रकार काय आहे ?"

"सरकार ! यांच्या पूर्वीच्या भानगडी मला कांहीं माहीत नाहींत; पण एकंदरींत मस्तानी म्हणते तेंच खरें असें मला वाटतें."

"आणि मी मात्र खोटा ?" खतीब पुढें येऊन आपल्या दाढीवरून हात फिरवीत म्हणाला.

खतिबाच्या या मानभावी बोलण्यानें कोणाचेंच समाधान होण्यासारखें नव्हतें, एकट्या हसनचीच गोष्ट कशाला, त्या वाड्यांतील सर्व मंडळीदेखील मस्तानीच्याच बाजूनें बोलत होती. खतीब खोटें बोलतो आहे हें बाजिरावानें तेव्हांच ओळखलें, पण त्याचें मन तर दुखवावयाचें नाहीं व आपला तर कार्यभाग साधावयाचा अशा बेतानें तो म्हणाला, "बरें आहे; खतीब ! तूं म्हणतोस तें खरें धरून चाललें किंवा खोटें धरून चाललें तरी तात्पर्य एकच. निजामाच्या पाहुण्यांनीं फसविलें असें मस्तानी म्हणते व तूं देखील तसेंच म्हणतोस; तेव्हां आमच्या साह्याचा उपयोग तुम्हां दोघांनाही सारखाच झाला म्हणावयाचा ! आतां आपण माघारे साताऱ्यांत जाऊं म्हणजे झालें."

खतीब यावर नाहीं तरी कोणत्या तोंडानें म्हणेल ! बोलूं नये तें बोलून तो अगोदरच तेथल्या परिस्थितीच्या जाळ्यांत पुरा पुरा गुरफटला गेला होता. मस्तानी-सह आपण हैद्राबादेला आपल्या वगीच्या माणसाकडे चाललों होतों असें म्हणण्याची-ही त्याला आतां सोय उरली नव्हती. तेव्हां आपली फितुरी उजेडांत आली नाहीं हीच आपल्या नशिबानें खैर केली असें आपल्या स्वतःचें समाधान करून घेऊन तो बाजिरावाबरोबर साताऱ्याला जावयाला तयार झाला. मस्तानीचा मेणा तेथें तयार होता व जे भोई साताऱ्यांतून कोरेगांवपर्यंत मेणा घेऊन आले तेही बाजीरावाबरोबर आले असल्यामुळें तीही अडचण भासली नाहीं. भोयांकडून मेणा

जवळ आणवून बाजिरावानें मस्तानीला त्यांत बसावयाला सांगितलें. आपल्या ह्या उपकारकर्त्या राजबिंड्याचें अनुपम सौंदर्य मस्तानी यापूर्वी किती वेळां गहिंऱ्या नजरेनें चोरून पहात होती याविषयीं तर बोलावयालाच नको. पण ती मेण्यांत बसावयाला निघाली तेव्हां व मेण्यांत बसल्यावर देखील मेण्याचे पडदे दूर सारून त्यांतून बाजिरावाकडे चोरून पहात होती. मस्तानीच्या रक्षणासाठीं आपल्या बरोबरीच्या वीस लोकांना मेण्याबरोबर देऊन बाजीराव व माधवस्वामी जरा मागें राहिले; तेव्हां आपण बाजिरावाच्या दर्शनसुखाला अंतरतों असें मस्तानीला वाटून तिचा जीव जणुं काय मागें रेंगाळत होता !

अशा प्रकारें सर्व स्थिरस्थावर झाल्यावर बाजिरावानें त्या वाड्यांतील ज्या माहेरवाशिणीकडून त्याला नदीच्या कांठीं मस्तानीविषयींची माहिती कळली होती. तिचे गोड शब्दांनीं मनःपूर्वक आभार मानले. हा बाजीराव आहे असें तेथल्या मंडळीला हा वेळपर्यंत कळलें नव्हतें. हसन त्याला 'सरकार ! सरकार !' अशी हांक मारी व खतीब वगैरे सर्व मंडळी त्याच्याशीं अत्यंत अदबीनें बोलत, त्यावरून तो महाराजांच्या पदरचा कोणीतरी मोठा माणूस असावा अशी त्या मंडळीनें अटकळ केली होती. पण तो उद्यांचा पेशवा बाजीराव असेल हें कांहीं त्यांना माहीत नव्हतें. तें त्यांनीं हसनला बाजूला घेऊन चौकशी केली तेव्हां त्यांना कळलें. मग मात्र त्या मंडळींच्या आनंदाला पारावार उरला नाहीं ! उद्यांच्या पेशव्याचे पाय आपल्या घराला लागले म्हणजे साक्षात् परमेश्वरानेंच आपल्या घरीं पायधूळ झाडली असें त्या मंडळीला वाटलें. माधवस्वामींच्या आगमनानेंही त्यांना तसाच आनंद झाला. त्या दोघांच्या मोठेपणाला साजेसा तेथल्या मंडळीनें त्यांचा सत्कार केला. नंतर बाजीराव, माधवस्वामी, खतीब व हसन हे चौघेही मेण्याच्या मागोमाग सातान्याच्या अनुरोधानें चालूं लागले. जरंड्याच्या जवळ येतांच माधवस्वामींनीं आपलें काम आतां संपलें असें पाहून बाजिरावाचा निरोप घेतला. ते रक्षणकर्तेही स्वामींबरोबरच माघारे गेले.

बाजीराव सातान्यांत जाऊन पोंचेतों विशेष कांहीं घडलें नाहीं. तेथें जातांच त्यानें प्रथम खतीब व मस्तानी यांना त्यांच्या घरीं पोंचविलें व आतां दोन प्रहरचें भोजन उरकून मग महाराजांकडे जावयाचें असा बेत करून ते आपल्या अदलातीच्या वाड्यांत आले, तों तेथें चिटणीस व पुरंदरे सचिंतपणें विचार करीत बसलेले दिसले.

बाजिरावाला वाटलें कीं, प्रतिनिधीनें गफलत करून निजामाकडे जो खलिता

पाठविला होता, तो हस्तगत होतो किंवा नाहीं याविषयीं त्या दोघांना चिंता पडली असावी; म्हणून त्यानें आपल्या घोड्यावरून खालीं उतरतांच प्रथम अत्यानंदानें आपण खलिता कसा हस्तगत केला तें त्यांना निवेदन केलें.

पुरंदरे म्हणाले, " रावसाहेब ! आपण ही फार छान गोष्ट केली. याचा आपणांला आपल्यावर सध्यां येऊं पहाणाऱ्या भयंकर आळाचें निराकरण करण्याच्या कामीं चांगला उपयोग होईल."

बाजिरावाला आपल्या मागें इकडे काय काय घडामोडी घडल्या तें मुळींच माहीत नसल्यानें पुरंदरे काय म्हणाले त्याचा अर्थ त्याला मुळींच समजला नाहीं. त्यानें विचारलें, " हा आळ कसला ?"

" आपण महाराजांचा खून करण्याचा प्रयत्न केला असा आळ आपणांवर आला आहे." पुरंदरे म्हणाले.

" म्हणजे ! " बाजिरावानें एकदम विस्मयचकित होऊन विचारलें, " ही तुम्हीं माझी थट्टा चालविली आहे कीं काय ? "

" थट्टा नाहीं; खरेंच." चिटणीस म्हणाले.

चिटणीस व पुरंदरे यांना हा प्रकार खुद्द श्रीपतरावाच्या तोंडून कळला होता. श्रीपतराव जो किल्ल्यावरून उतरला, तो प्रथम त्या दोघांच्या घरीं गेला, व 'असा असा कट आहे; असा असा त्याचा सुगावा लागला आहे; या वेळीं आपण सर्वांनीं मिळून बाजिरावाला वांचविलें पाहिजे' अशी मानभावीपणाची शिष्टाई त्यानें त्यांच्यापाशीं केली होती. तो सर्व वृत्तांत त्यांनीं आतां बाजिरावाला निवेदन केला.

चिटणीस म्हणाले, " आतां पुढें कसें करावयाचें याचा विचार करण्यासाठींच आम्ही केव्हांचे एथें येऊन बसलों आहों."

" एकूण हें आश्चर्य आहे म्हणावयाचें ! " बाजीराव म्हणाला, " प्रतिनिधींना शालीचा जो मुद्देमाल माझ्यावर कटाची शाबिती करण्यासाठीं मिळाला, ती शाल मीं रात्रौ तुमच्या देखत त्या गोंधळ्यांना बक्षीस दिली होती हें तुम्हांला माहीत आहेच."

" होय. पण तेच गोंधळी आतां आपणावर उलटले आहेत, त्याला कोण काय करणार ! " पुरंदरे म्हणाले.

" ते लोक इतके दगलबाज असतील असें मला वाटलें नव्हतें." बाजीराव म्हणाला.

" ते दगलबाज होते हें तर खरेंच; कारण एरव्हीं त्यांनीं महाराजांवर शस्त्र

उचललेंच नसतें. पण आपणांवर आळ घेण्यांत त्यांचें अंग कितपत आहे याचा मात्र आम्हांला अजून संशय आहे. प्रतिनिधींनीं त्यांना लालूच दाखवून किंवा धाकदपटशा दाखवून त्यांना मारूनमुटकून कबूल केलें असेल." पुरंदरे चिटणिसां-कडे वळून म्हणाले, "तुम्हांला नाहीं असें वाटत बाबा ?"

"अर्थात् !" चिटणीस म्हणाले, "एरव्हीं त्या गोंधळ्यांचा जर प्रथमपासून रावसाहेबांवर किंवा पेशव्यांच्या घराण्यावर दांत असता, तर काल रात्रौ किल्ल्यावर पोवाडे गातांना पेशव्यांची स्तुति करून त्यांनीं प्रतिनिधींच्या पक्षाच्या लोकांकडून मार कां खाल्ला असता ?"

"हो ! तेंही खरेंच. हा प्रतिनिधींचाच डाव दिसतो. एरव्हीं त्यांनीं नेमकीं जेवढीं माझीं कैवारी माणसें तेवढ्यांच्याच गळ्याला ह्या कटाची तांत लावली नसती. पिराजी व नाथाजी यांच्या गाफीलपणानें ते मारेकरी आंत गेले असतील, हीं त्या दोघांची चूक झाली यांत संशय नाहीं. पण म्हणून तेही कटांत सामील असतील, असें प्रतिनिधींनीं कोणत्या आधारावर ठरविलें ?" बाजीराव म्हणाला.

पुरंदरे म्हणाले, "रावसाहेब ! तुम्ही पिराजी व नाथाजी यांची काय गोष्ट घेऊन बसलां ! मल्हारी आपल्या आगमनाची वार्ता महाराजांपाशीं घेऊन गेला, त्याच्यावर देखील प्रतिनिधींनीं ह्या कटाचा आरोप ठेविला आहे."

चिटणीस म्हणाले, "आणि राणोजी ? त्याला जें प्रतिनिधींच्या हस्तकांनीं कैद केलें आहे, तें का म्हणून ?"

"त्यांच्यावरदेखील प्रतिनिधींच्या मनांतून कट केल्याचा आरोप शाबीत करावया-चा असेल ?" बाजीराव म्हणाला.

इतक्यांत गोविंदा बाहेरून आला. त्याला बाजिरावानें विचारलें, "काय रे ! माहुलीहून तूं आतांच येत आहेस वाटतें."

"नाहीं. तो मघांच आला. त्याला मीं किल्ल्यावरची बातमी आणण्यासाठीं पाठविला होता." असें म्हणून पुरंदऱ्यांनीं गोविंदाकडे वळून विचारलें, "तूं रे काय खबर आणलीस ?"

गोविंदा उत्तरला, "राणोजी वगैरे जी मंडळी कैद झाली होती, ती मसूरला महाराजांकडे रवाना झाली."

"बरें, गौतमेचा कांहीं तपास ?" बाजिरावानें विचारलें.

चिटणीस व पुरंदरे यांना हात जोडून गोविंदा म्हणाला, "मघाशीं मी गौतमे-

च्या बाबतींत आपणांपाशीं खोटें बोललों याविषयीं मला क्षमा करा. आपण येण्याच्यापूर्वींच मी इथें आलों, तेव्हांच गौतमा सुरक्षित असल्याचें मला कळलें."

"पण ती कुठें आहे ?" बाजिरावानें विचारलें.

"ती इथेंच आपल्या वाड्यांत आहे." गोविंदा उत्तरला.

"ती इथें कशी आली ! किल्ल्यावरच्या शिपायांनीं तिला कैद केलें होतें ना ?" पुरंदऱ्यांनीं विचारलें.

"होय. पण ती जशी मर्दाची स्त्री तशीच मर्दाची कन्या पडली,* तिनें त्या दोघां शिपायांना वाटेंतच कृष्णेश्वराखालच्या ओढ्यांत ढकलून देऊन तेथून जो पळ काढला, ती या कानाचें त्या कानाला न कळतां इथें येऊन पोंचली. मी इथें येतांच मला तें कळलें. पण पुन्हा तिच्यावर शत्रूंची केव्हां धाड पडेल याचा नियम नसल्यानें मीं ती बातमी इतका वेळ गुप्त ठेविली होती."

"गौतमेची एकूण शाबास आहे. तिनें बापाचें व नवऱ्याचें नांव राखलें." बाजीराव आठवल्यासारखें करून म्हणाला, "खरें, पण भोजराज व पिलाजी यांची गत काय ?"

"ते दोघेही किल्ल्यावर सुरक्षित आहेत. कमळा मात्र रात्रींच त्या सैतानांच्या दंगलींत ठार झाली. पण ईश्वरकृपेनें तिचा सटवाजी मात्र सुरक्षित आहे."

"तो आतां कुठें आहे ?"

"तो सध्यां किल्ल्यावरच भोजराजापाशीं आहे."

"आणि पिलाजीचें कसें आहे ?"

"त्याचें आतां बरें आहे."

"बरें; आणखी कांहीं खबर ?"

"आणखी खबर.—सुमंत आणि प्रतिनिधि आतांच मसूरकडे रवाना झाले असें

---

* या प्रसंगीं गौतमाबाईचें जरी पोरवयच होतें, तरी ती वीरकन्या व वीरपत्नी तशीच वीरललना होती हें निर्विवाद आहे. पुढें इ. सन १७६० मध्यें पानिपतच्या लढाईच्या पूर्वरंगांत दिल्लीजवळ बदाऊंच्या घाटांत अबदाली व शिंदे यांच्यांत लढाई होऊन दत्ताजी शिंदे पडला व जनकोजी शिंदे जखमी झाला; तो घोर प्रसंग पाहून मल्हारराव होळकर फार शोक करूं लागला असतां गौतमाबाईनें त्याचा त्या कमकुवतपणाबद्दल निषेध करून धीर दिला. तो प्रसंग तिच्या शौर्य-वीर्य-चातुर्याची साक्ष पटण्याला पुरेसा आहे. (भाऊसाहेबांची बखर.)

मला किल्ल्यावर कळलें. तसेंच प्रतिनिधींनीं किल्लेदाराला आपणांला कैद करण्याला सांगितलें; पण तें किल्लेदारानें नाकारलें असेंही मला कळलें."

" असें ? "

" होय. शिवाय तेथल्या लोकांचा असाही तर्क आहे कीं, प्रतिनिधींनीं आपणांला कैद करून आणण्यासाठीं एथल्या एथें कांहीं तरी तजवीज करून ठेवली असावी."

बाजिरावानें क्षणभर विचार करून चिटणिसांना विचारलें, " बाबा ! आतां कसें करावयाचें ? प्रसंग तर हा असा आहे. प्रतिनिधींनीं तर मला नामोहरम करण्याची कंबर कसलेली दिसते. या वेळीं मला वाटतें, यापुढें ओढवणारे अतिप्रसंग टाळण्यासाठीं मीं आपण होऊन महाराजांसमोर रुजू व्हावें व एकंदर खरा प्रकार त्यांना समजावून सांगावा हें चांगलें."

पुरंदरे म्हणाले, " माझें देखील तसेंच मत आहे. प्रतिनिधींनीं आम्हां दोघांनाही मुद्दाम तिकडे बोलावलेंच आहे, तेव्हां आम्हीही आपल्याबरोबर येतों."

" हा प्रतिनिधींचा एक डाव आहे." चिटणीस म्हणाले, " त्यांनीं तुम्हांला व मलाच काय पण प्रधानमंडळांतील इतर सर्वांनाही तिकडे बोलाविलें आहे. या बोलावण्यांत त्यांनीं वरकरणीं 'आपण सर्वांनीं मिळून महाराजांची समजूत घालून बाजीरावसाहेबांच्या सुटकेची शक्य ती खटपट करूं' असें दाखविलें, त्यावरून ते बाजिरावसाहेबांवर कटाचा आरोप शाबीत करणार हें तर सिद्धच झालें. पण त्यांत त्यांचा आणखी असाही हेतु असला पाहिजे कीं, सर्व खाशा मंडळींच्या देखत बाजीरावसाहेब एकदां अपराधी ठरले, कीं स्वतःला मराठशाहीच्या राजवटींत मनसोक्त चरावयाला रान मोकळें सांपडेल."

" तें कांहीं असलें तरी मला महाराजांसमोर तर गेलेंच पाहिजे. प्रतिनिधींनीं मला गोत्यांत आणण्यासाठीं याहूनही सृष्टि उलथी पालथी केली तरी माझा पक्ष ज्या अर्थीं सत्याचा आहे, त्या अर्थीं परमेश्वर माझा वाली आहे. उलट मी तर म्हणतों कीं, " पेशवे व प्रतिनिधि यांतील खरें नाणें कोणतें व खोटें नाणें कोणतें याचा निवाडा होण्यासाठींच परमेश्वरानें हा अपूर्व योग जुळवून आणला आहे. मनुष्याच्या उभ्या आयुष्यांत त्याला वैभवशिखराचा राजमार्ग मोकळा करून देणारी अशी अपूर्व संधि एखादे वेळींच येत असते. त्या संधीचा त्यानें समयसूचकतेनें उपयोग मात्र करून घेतला पाहिजे." बाजीराव म्हणाला.

बाजिरावाचा विचार सर्वांना पटला. चिटणीस व पुरंदरे बाजिरावाबरोबर मसूरला

जावयाला निघाले. बाजिरावाच्या वर्तीनें महाराजांपाशीं जाणतेपणानें दोन शब्द बोलण्यासाठीं जाणें हें त्यांचें कर्तव्यच होतें; शिवाय त्यांना प्रतिनिधींकडून तसें औपचारिक निमंत्रणही मिळालें होतें. त्यामुळें त्यांच्या जाण्यानें प्रतिनिधींच्या मनांत सकृद्दर्शनीं तरी कांहीं विकल्प उत्पन्न होण्याजोगा नव्हता. गोविंदा तर बाजिरावाचा एकनिष्ठ सेवक म्हणून त्याच्याबरोबर कोठेंही जावयाचाच. राहातां राहिला एकटा हसन. त्यानें जेव्हां आपली बायको-नूरनिहार निष्कारण कैद होऊन मसूरला गेली आहे असें ऐकिलें, तेव्हां त्याचा जीव कसा शांत रहावा ! त्यानेंही बाजिरावाबरोबर जाण्याची इच्छा दर्शविली, व बाजिरावालाही परिस्थिति ध्यानीं घेऊन त्याची ती विनंति मान्य करावी लागली.

## प्रकरण विसावें

# मसूर मुक्कामीं

बाजीराव, चिटणीस, पुरंदरे वगैरे मंडळी मसूरला जाऊन पोंचण्याच्या पूर्वींच श्रीपतरावाचे कैदी व स्वतः श्रीपतरावदेखील त्याच दिवशीं संध्याकाळीं सूर्यास्ताच्या सुमारें तेथें जाऊन पोंचला होता. तेथें जातांच श्रीपतरावाचें पहिलें महत्त्वाचें आणि आवडतें काम त्या तिघां गोंधळ्यांना महाराजांसमोर उभे करून त्यांचा त्या कटांत बाजीराव सामील असल्याविषयीं कबुलीजबाब घेणें हें होतें. त्या प्रसंगाचें कल्पनाचित्र श्रीपतरावानें स्वतःच्या मनाशीं जसें रंगविलें होतें तसेंच प्रत्यक्ष चित्र महाराजांसमोर रंगविण्यापूर्वीं त्या चित्राचा पार्श्वभाग उठावदार करण्यासाठीं पूर्वरात्रीं सातार्‍यांत घडलेल्या दंगलीची त्रोटक हकीगत तिखटमीठ लावून त्यानें त्यांच्य कानांवर घातली. महाराजांचें मन आधींच बाजीरावाविषयीं व त्याच्या पक्षाच्या इतर मंडळीविषयीं कलुषित झालें होतें, त्यांत आणखी ही गैरसमजाची नवी भर पडली. ह्या योगानें राणोजी, रहमान, व नूरनिहार यांना गुन्हेगार ठरविण्याचें श्रेय श्रीपतरावानें संपादन केलें. आतां त्या गोंधळ्यांनीं पूर्वीं कबूल केल्याप्रमाणें कबुलीजबाब महाराजांसमोर दिला कीं, बाजीरावाला नेस्तनाबूद करण्याचा आपला कावा पूर्णपणें साधला असे श्रीपतराव मनांत मांडे चुरीत होता. पण त्याच्या दृष्टीआड निराळीच सृष्टि त्याच्या अन्यायांचें व खोडसाळपणाचें माप त्याच्या पदरांत पुरेपूर मोजून घालण्यासाठीं उभी होती याची त्याला दादही नव्हती. महाराजांचा खंड्या *कुत्रा इतका इमानी व शहाणा कीं तो कधीं ओळखीच्या मोठया माणसावर भुंकावयाचा नाहीं. पण आज श्रीपतराव महाराजांसमोर येतांच तो त्यांच्यावर गुरगुरूं लागला, व महाराजांना त्याला आंजारून गोंजारून शांत करावें लागलें. मग त्या मुक्या जनावरालादेखील श्रीपतराव हाच मोठ्यांतला मोठा गुन्हेगार व या कुटिल-कारस्थानाचा खलनायक आहे हें कळून चुकलें होतें कीं काय परमेश्वर जाणे !

---

* हा खंडया कुत्रा शाहूमहाराजांचा अत्यंत आवडता होता. खंडयाचे गुण व महाराजांचें त्याच्यावरील अलौकिक प्रेम यांचा पडताळा 'पेशवाईची प्राणप्रतिष्ठा' ह्या कादंबरींत व "मराठी दप्तर रुमाल" ह्या बखरींत पहावयाला सांपडतो. संगममाहुली येथें महाराजांच्या समाधीजवळ ह्या खंडयाचें थडगें आहे.

महाराजांनीं आपल्या समोरच्या गुन्हेगारांची चौकशी करण्यापूर्वी श्रीपतरावाला विचारलें, " प्रतिनिधि ! अखेर बाजीराव तुम्हांला भेटलेच नाहींत का ? "

श्रीपतराव उत्तरला, " नाहीं महाराज ! मला वाटतें, बाजीरावसाहेब आतां आपणांसमोर तोंड लपविण्याचा प्रयत्न करीत असावे. तरीही मी ह्या गोष्टी मुद्दाम चिटणीस व पुरंदरे ह्या दोघांच्याही कानांवर घालून त्यांना जाणतेपणानें बाजीरावसाहेबांसह आपल्या पायांपाशीं येण्याला सांगितलें आहे. ते आतां येतात किंवा कसें तें पहावें. ते तरी बोलून चालून पेशव्यांचेच पक्षपाती पडले; त्यांना म्हणजे माझ्या शब्दाची किंमत वाटेलच अशी मला खात्री नाहीं."

" ठीक आहे. बरें, तुम्हीं कटाचा तपास लावला का ? " महाराजांनीं विचारलें.

" होय महाराज ! " श्रीपतराव बाहेर उभे असलेल्या गोंधळ्यांना आंत हांक मारून म्हणाला, " हे पहा ते मारेकरी. यांनाच आपण काय विचारावयाचें तें विचारा."

इतक्यांत एक मनुष्य घाईघाईनें पुढें येऊन महाराजांसमोर उभा राहिला व आपला कृत्रिम मुसलमानी वेष फेंकून देत महाराजांना म्हणाला, " महाराज ! ह्या कटाचा सूत्रधार मी आहें. आणि माझ्या अपराधाची कबुली देण्यासाठीं मी इतक्या तांतडीनें सर्वांना चुकवीत आपणांसमोर आलों आहें. आपले शिपाई माझा पाठलाग करीत होते व त्यांतल्या कांहींची माझ्या हातून हत्याही झाली आहे; हा गुन्हा मी प्रथमच कबूल करून ठेवतों म्हणजे प्रतिनिधींचा तेवढाच त्रास वांचेल. आतां आपणांला कटाविषयीं मला काय विचारावयाचें असेल तें विचारावें. "

महाराज, श्रीपतराव व इतर सर्व लोक त्या विचित्र मनुष्याच्या तोंडाकडे टकमक पाहूं लागले, तों बहुतेकांना त्याची ओळख पटली कीं, कटवाल्यांचा पुढारी जो शाहीर होता तो हाच. त्याला पाहतांच श्रीपतरावाचें धाबें दणाणून गेलें. पण त्या तिघां गोंधळ्यांना मात्र मनापासून आनंद झाला. त्यांना आनंद होण्याचें कारण, आतां त्यांची खरी बाजू त्या शाहिरानें; महाराजांसमोर मांडली असती.

महाराजांनीं त्या शाहीर—तिंबाजीच्या तोंडाकडे पहात श्रीपतरावाला विचारलें, " प्रतिनिधि ! इतका वेळ हा मारेकरी कुठें होता ? "

श्रीपतराव उत्तरला, " महाराज ! आम्हीं जेव्हां ह्या मारेकऱ्यांना महारदऱ्याच्या पुढें गांठलें तेव्हां हा एकटा आम्हांला दगा देऊन पळाला होता."

तिंबाजी गंभीर व निर्विकार मनानें समोर उभा होता, तो जरादेखील न

डगमगतां म्हणाला, " हो, मी पळालों. मी प्रतिनिधींच्या दोघां साथीदारांना ठार मारून खुद्द प्रतिनिधींचा घोडा घेऊन तेथून पळालों. इतकेंच काय, पण आमचा पाठलाग करणाऱ्या शिपायांपैकीं आणखी कितीएक माझ्या हातून घायाळही झाले असतील. हे सर्व अन्याय व प्रतिनिधींना आणखी कांहीं माझ्यावर लादायचे असले तरी ते देखील मला सर्वस्वीं मान्य आहेत."

" बरें, तुझें काय म्हणणें आहे ?" महाराजांनीं तिंबाजीला विचारलें.

श्रीपतराव उतावळेपणानें तिंबाजीला बोलूं देण्यापूर्वी म्हणाला, " अगोदर महाराजांनीं ह्या तिघां मारेकऱ्यांचा कबुलीजबाब घ्यावा अशी माझी विनंति आहे. कारण हे तिघे सच्चे माणूस दिसतात."

श्रीपतराव महाराजांशीं बोलत होता तेव्हां त्यानें जर त्या तिघां गोंधळ्यांच्या चेहऱ्याकडे पाहिलें असतें, तर त्यांच्या सच्चेपणाचें शिफारसपत्र त्याच्या तोंडून जितक्या स्फूर्तीनें बाहेर पडलें तितक्या स्फूर्तीनें तें खास बाहेर पडलें नसतें.

महाराजांनीं त्या तिघां गोंधळ्यांकडे वळून विचारलें, " काय रे ! तुमच्या ह्या कटांत बाजीरावसाहेब प्रमुख आहेत किंवा नाहींत ? "

तिघांही गोंधळ्यांनीं विनम्रपणें लवून महाराजांना मुजरा केला. त्यांतला एक— शंभुसिंग हात जोडून म्हणाला, " महाराज ! आमचा पुढारी हा तिंबाजी. हा आपल्याला सर्व खरा प्रकार सांगूं शकेल."

" नाहीं, नाहीं. तुमचा तिंबाजी मग काय बोलावयाचें तें बोलेलच; पण तुम्ही माझ्यासमोर साताऱ्यांत ज्या गोष्टी कबूल केल्या आहेत, त्या महाराजांसमोर बोला." श्रीपतराव म्हणाला.

शंभुसिंग श्रीपतरावाच्या पायाला हात लावून साळसूदपणानें म्हणाला, " सरकार ! त्या वेळीं आम्ही जें बोललों तें आपल्या भयानें बोललों. तें निव्वळ खोटें होतें. आपण त्या खोटें बोलण्याबद्दल आम्हांला इनामें व वतनें देऊं केलीं होतीं हा आपला थोरपणा आहे. पण अशा खोट्या करणीनें हातीं आलेली जिंदगी फार दिवस हातीं टिकत नसते व खोटें हें परिणामीं मारकच होतें असें आम्हांला वाटल्यामुळें मी आम्हां तिघांतर्फे आपणांला दोन्ही हात जोडून सांगतों कीं, आम्हांला तीं इनामें–वतनेंही नकोत आणि आम्ही त्यासाठीं खोटें बोलायलाही तयार नाहीं." शंभुसिंग महाराजांकडे वळून म्हणाला, " महाराज ! साताऱ्यांत प्रतिनिधि सरकारां-

पाशीं आम्हीं जें आमच्या कटांत बाजीरावसाहेब सामील असल्याचें सांगितलें तें केवळ प्राणभयानें खोटें सांगितलें त्याबद्दल आपण आम्हांला क्षमा करा.”

“अरे हरामखोरांनो! आतां पुन्हा असा उलटा पेंच टाकतां काय?” श्रीपतराव दांतओंठ खात रागारागानें म्हणाला.

तिंबाजी इतका वेळ स्वस्थ होता. आपले साथीदार श्रीपतरावाला कोणत्या मर्यादेपर्यंत फितुर झाले आहेत याची त्याला ह्या वेळपर्यंत कल्पना नव्हती; ती आतां कल्पना आली, त्यामुळें त्याला दुप्पट जोर चढला. तो आपल्या साथीदारांतर्फे आपण होऊनच बोलूं लागला. “प्रतिनिधिसरकार! समोर खेळणारा मनुष्य डाव उलटा खेळूं लागला, कीं त्यांत जय मिळविण्यासाठीं खेळणाराला दानही उलटेंच द्यावें लागतें. वांकड्या मेढीला वांकडा चर खणल्याशिवाय गत्यंतर नसतें. कोणालाही खूष ठेवून प्रामाणिकपणें उदरंभरण करण्याचा आमचा धंदा. आपणापाशीं खोटें बोलल्यानें आपण खूष होणार हें ओळखूनच माझे साथीदार आपणापाशीं खोटें बोलले असतील. पण महाराज तसे नाहींत; ते सत्याचे कैवारी आहेत. महाराजांची पुण्याई एवढी थोर आहे कीं, पशूंप्रमाणें त्यांच्यावर झडप घालण्याला टपून बसलेल्या आमच्याशीं महाराजांची दृष्टादृष्ट होतांच आमच्या हातांतील तलवारी गळून पडल्या व आमच्या अंगीं माणुसकी आली. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं रेड्याच्या तोंडून माणसाप्रमाणें वेद वदविले; पण आमच्या ह्या महाराजांनीं रेड्यांना माणसें बनवून सोडलें. निर्जीव शिळेची सजीव अहिल्या होण्याला दाशरथी रामाच्या पवित्र चरणाचा पुण्य स्पर्श तरी त्या शिळेला व्हावा लागला; पण ह्या धर्मावतारांनीं आपल्या नुसत्या दृष्टिक्षेपानें दुष्टांचे सुष्ट आणि दगडांचे देव आम्हांला बनवून सोडलें. अशा ईश्वरी अवतारासमोर खोटें बोलून आमचा पल्ला कसा येईल? या ठिकाणीं आम्हांला खरें तेंच बोललें पाहिजे.” तिंबाजी महाराजांकडे वळून हात जोडून म्हणाला, “महाराज! आम्ही मूळ कोल्हापूर प्रांतींचे कोल्हापूरच्या महाराजांचे आश्रित. आम्ही महाराजांच्या वतीनें मारेकरी बनून आपणांवर चालून आलों होतों. बाजीरावसाहेबांचा ह्या कटाशीं कांहींदेखील संबंध नव्हता व नाहीं. प्रतिनिधिसरकारांनीं ज्या शालीचा आधार घेऊन बाजीरावसाहेबांवर हा भयंकर आरोप लादण्याचा उद्योग आरंभिला आहे ती शाल काल रात्रौ बाजीरावसाहेबांनीं आम्हीं पोवाडे गाइले त्या वेळीं आम्हांला बक्षीस दिलेली होती.”

महाराजांनीं विचारलें, “ पण ह्या दरम्यानच्या भानगडी तुला काय माहीत ?”

“ तेंच मी तरी म्हणतों.” श्रीपतराव म्हणाला. महाराज अजूनही आपल्या चतीनेंच बोलत आहेत असा त्याचा समज झाल्यामुळें त्याला परत खोटयावर खोटयाचा उजळा देण्याला स्फुरण चढलें.

तिंबाजी पूर्ववत् गंभीरपणें उद्गारला, “ आणि तेंच मीही आतां सांगतों आहें. महाराज ! महारदऱ्याहून आम्ही चौघे पळून जाऊन आडोशाला एका झाडाखालीं बसून ह्याच प्रकाराविषयीं बोलत असतां प्रतिनिधिसरकारांनीं पाळत ठेवून तें ऐकलें. प्रतिनिधिसरकारांना मी आज नव्यानें ओळखतों असें नाहीं. शिवाय काल आम्ही साताऱ्यांत होतों तेव्हां पेशव्यांविषयीं चार भलेपणाचे शब्द उच्चारल्या-बद्दल प्रतिनिधिसरकारांच्या पक्षांतील लोकांकडून आम्हीं मरेमरेतों मारही खाल्लेला आहे. त्यावरून व अशींच आणखी कांहीं उदाहरणें पाहावयाला सांपडलीं त्यावरून आजकाल प्रतिनिधिसरकार पेशव्यांना कसे पाण्यांत पाहातात हें मला पक्कें कळून चुकलें आहे. त्यांची व आमची जंगलांत गांठ पडली तेव्हां माझे साथीदार त्यांच्याशीं फितुर होतील असा मला जबरा संशय आल्यामुळें तेथला हातघाईचा प्रसंग टाळण्यासाठीं मी तेथून पळालों. तरीही हे लोक काय करतात यावर माझें लक्ष होतेंच. मी त्याच जंगलांत वाटेवर दडून उभा होतों, तेव्हां मीं एकव्या प्रतिनिधिसरकारांबरोबर माझे तिघे साथीदार गप्पा मारीत जातांना पाहिलें. त्यावरून मी कल्पना केली कीं हे फितुर झाले ! यांच्या फितुरीचा महा-राजांवर, पेशवेसरकारांवर किंवा आणखी कोणावरही अनिष्ट परिणाम होऊं नये याविषयीं खबरदारी घेणें हें मीं ह्या कटाचा पुढारी या दृष्टीनें माझें काम होतें. तें कर्तव्य बजावण्यासाठीं मी तसाच्यातसाच वेष पालटून त्या चौघांमागोमाग साताऱ्यांत गेलों. तेथें ठायींठायीं हिंडून मीं परिस्थितीचा कसून ठाव घेतला. प्रति-निधिसरकार काय किंवा त्यांचे इतर साथीदार काय, हरएक ठिकाणीं हरएक वेळीं त्यांच्या तोंडाशीं माझे कान भिडलेले होते; पण त्यांना मात्र त्याची जाणीव नव्हती. आतां प्रतिनिधिसरकार ह्या खोट्या पुराव्याची सिद्धता करून बाजीराव-साहेबांना गोत्यांत आणणार व खरा प्रकार महाराजांसमोर येण्याला दुसरा कांहींच मार्ग नाहीं म्हणूनच केवळ प्रतिनिधिसरकारांच्या मागोमाग मला येथें यावें लागलें”

महाराजांनीं श्रीपतरावाकडे वळून विचारलें, “ प्रतिनिधि ! ही काय भानगड आहे ? ”

" महाराज ! आतां यांत मी तरी काय बोलूं ! माझ्या तोंडावर हे लोक धडधडीत खोटें बोलूं शकतात, तिथें माझा नाइलाज आहे. हा गोंधळी ज्या तोंडानें आपण कोल्हापुरांकडील मारेकरी असें सांगतो, त्याच तोंडानें साताऱ्यांतील वित्तंबातमीदाराचा आव आणून बाजिरावाची तरफदारी करणारे व माझ्याविषयीं महाराजांचें मन कलुषित करणारे बोल बोलतो, यांतच महाराजांनीं काय तें समजावें. माझ्याशीं बाजिरावानें दावेदारी केली, यांत मला कांहींच आश्चर्य वाटत नाहीं. बाळाजीपंतनानांच्या पश्चात् बाजिरावालाच पेशवाई मिळावी म्हणून मी प्रथमपासून कशी खटपट करीत आहें हें आपण पाहिलेंच आहे. तरी हे लोक बाजिरावाच्या शिकवणीनें म्हणतात कीं, मी त्याच्याशीं दावेदारी करतों ! त्याबद्दलही मला वाईट वाटत नाहीं; पण आपणांविरुद्ध एवढा कट करून सवरून वर आणखी साळसूदपणानें मिरविण्याचें धाडस बाजिरावानें करावें, याचा माझ्या मनाला फार खेद होतो ! आतां याउपर आपल्या मनाला काय पटेल तें खरें." श्रीपतराव बापुडवाणा बनून म्हणाला.

महाराज तिंबाजीकडे वळून म्हणाले, " काय रे ! तुमच्या बोलण्यावरून तर तुम्ही फार भले माणूस दिसतां ! आणि तुम्हीं हा मारेकऱ्याचा धंदा पत्करला हें बरें काय ? "

" महाराज ! आम्ही धंदेवाले मारेकरी नाहीं." तिंबाजी म्हणाला.

" मारेकरी नाहीं ! म्हणे आम्ही मारेकरी नाहीं ! " श्रीपतराव रागानें दांत विचकून म्हणाला, " तूं म्हणतोस हें वेळीं खरें आहे असें धरून चाललें आणि बाजिरावाचा ह्या कटाशीं कांहीं संबंध नसला, तरी तुम्ही जे महाराजांच्या जिवावर उठला, ते बक्षिसाच्या आशेनेंच ना ? थूः तुमच्या दानतांवर ! आणि वर म्हणे मी शाहीर ! तोंडानें नीतीच्या व धर्माच्या अशा बाता मारतोस व हातानें हरामखोरीची करणी करतोस ! तुला काय म्हणावयाचें ? "

" हां! श्रीनिवास! जरा तोंड आटोपून बोल ! " तिंबाजी संतापातिशयाच्या भरांत मुठी आंवळीत व दांतओंठ खात म्हणाला. तो एकाएकीं असा एकेरीवर आलेला पाहून सर्वांनाच कमालीचा अचंबा वाटला. तसेंच श्रीनिवास* हें श्रीपतरावाचें मूळचें

* श्रीपतराव प्रतिनिधीला प्रथम त्याचे चुलते माधवराव त्र्यंबक यांनीं दत्तक घेतलें होतें. पण पुढें शाहूमहाराजांनीं तें दत्तविधान रद्द ठरवून श्रीपतरावाला आपला प्रतिनिधि नेमलें. श्रीपतरावालाच श्रीनिवासराव असें दुसरें नांव होतें. अर्थात् तें टोपणनांव असेल किंवा दत्तविधानाच्या वेळचेंही नांव असेल.

घरगुती नांव, त्या नांवानें तिंबाजीनें हांक मारलेली ऐकून शाहूमहाराजांना वाटलें कीं, श्रीपतरावाला अगदीं लहानपणापासून ओळखणारा हा तिंबाजी कोण? हा कोणी सामान्य मारेकरी खास नसावा असें वाटून त्यांनीं त्याला विचारलें, "तिंबाजी! तूं खरें सांग, तूं कोण आहेस? तूं कांहीं साधा माणूस दिसत नाहींस."

तिंबाजी दोन्ही हात जोडून म्हणाला, "महाराज! आपणाकडून मला अभय असेल तर मी आपणाला खरें काय तें सांगतों."

"तुला अभय आहे. सांग आतां काय तें." महाराज म्हणाले.

तिंबाजी श्रीपतरावाकडे पाहून पुन्हा पूर्ववत् दांतओंठ खात व मुठी आंवळीत म्हणाला, "महाराज! माझ्या एकंदर कृतीवरून मी आपल्या व जगाच्या दृष्टीनें हरामखोर ठरलों आहें हें जरी खरें, तरी पण-" तिंबाजी श्रीपतरावाकडे अंगुलीनिर्देश करून म्हणाला, "याच्यापेक्षां मी शतपटीनें बरा." लगेच त्यानें श्रीपतरावाकडे पाहून विचारलें, "श्रीनिवास! तूं मला ओळखलेंस?"

श्रीपतराव नुसता निर्जीव दगडी पुतळ्यासारखा समोर उभा होता. तो कांहींच बोलत नाहीं असें पाहून तिंबाजी म्हणाला, "महाराज! मी याचा धाकटा भाऊ.* त्रिंबक माझें खरें नांव. मी वयानें सारा दहा वर्षांचा असतांना माझ्या वडील भावांच्या कुटिल वृत्तीला कंटाळून डोकींत राख घालून जो घराबाहेर पडलों, तो खऱ्या स्वरूपांत आज येथें प्रकट होत आहें. तेव्हांपासून आजपर्यंत माझ्या जन्माचे काय काय धिंडवडे झाले हें सांगत बसण्यांत अर्थ नाहीं. मला आपल्या मनाला एवढेंच पटवून द्यावयाचें आहे कीं, मी गोंधळीही नाहीं व मारेकरीही नाहीं. अर्थात् मग मी आपणांवर शस्त्र उचलण्याला कां तयार झालों असें आपण विचाराल तर सांगतों; आपली बादशहाच्या कैदेंतून सुटका होऊन आपण दक्षिणेंत आलां, तेव्हां मी काशी-रामेश्वर करून दक्षिणेंत आलों होतों. माझें डोकें तेव्हां बरेंच ठिकाणावर आलें होतें व तेव्हां प्रगट होऊन शक्य तर संसारी बनून माझे वडील व माझे भाऊ यांच्याप्रमाणेंच राज्यकारभारांत लक्ष्य घालून भाग्योदय करून घेण्याचा माझा विचार होता, पण प्रथम-

---

* 'प्रतिनिधि घराण्याचा इतिहास-ग्रंथांक ?' यांत प्रतिनिधींची जी वंशावळ व वंशाची माहिती दिली आहे, तिच्यावरून पहातां श्रीपतरावाला त्रिंबक नांवाचा एक पाठचा भाऊ होता असें दिसतें. याच्या नुसत्या जन्म-नामनिर्देशापलीकडे कोणताच इतिहास आजला उपलब्ध नाहीं.

च आपला व माझ्या वडिलांचा बेबनाव होऊन त्यांना आपण कैदेंत घातलें, तेथें माझ्या साऱ्या आशा खुंटल्या. मी पुन्हा निराश होऊन तीर्थयात्रेला निघून गेलों. पण पुढें कांहीं वर्षांनीं आपण माझ्या वडिलांच्या छातीवर तक्ता ठेवून त्यावर जेठी बसवून त्यांना ठार मारण्याची शिक्षा ठोठावलेली माझ्या ह्या तिघां सोबत्यांकडून माझ्या कानीं आली, तेव्हां मात्र मला अनावर संताप आला." तिंबाजी आपल्या तिघां साथीदारांकडे अंगुलिनिर्देश करून म्हणाला, "आम्ही चौघे मिळून तेव्हां आपला सूड घेण्याची प्रतिज्ञा करून नुक्ते सुमारें एका वर्षापूर्वी दक्षिणेंत आलों."

"पण हे तुझे तिघे साथीदार कोण व त्यांची आणि तुझी गांठ कुठें पडली ?" महाराजांनीं विचारलें.

तिंबाजी म्हणाला, "यांची व माझी गांठ प्रथम दिल्लींत⁑ श्रीमंत बाळाजीपंत पेशवे स्वराज्याच्या सनदा आणण्यासाठीं त्या प्रांतीं गेले होते तेव्हां तेथें पडली. *शंभुसिंग जाधव, अप्पाजी थोरात व शहाजी निंबाळकर अशीं यांचीं नांवें आहेत."

"काय ! शंभुसिंग जाधव ! चंद्रसेन जाधवाचा धाकटा भाऊ आहे तो कीं काय !" महाराजांनीं विचारलें, "तो कुठें आहे ?"

"हा मी इथें आहें महाराज !" शंभुसिंग लाजेनें खालीं मान घालून उत्तरला.

"अस्सें ! आणि हे दोघे कोण ?" महाराजांनीं विचारलें.

"ते माझे साथीदार. जाधव जेव्हां बाळाजीपंतनानांशीं हरणाबाबतचा तंटा* करून मोगलांना जाऊन मिळाले, तेव्हां त्यांच्याबरोबर आम्ही तिघेही तिकडे गेलों" शंभुसिंग म्हणाला.

पिराजी तेव्हां तेथें उभा होता, तो विस्मित झाला. कारण हरणाच्या तंट्याचें मूळ त्याच्यापाशींच होतें.

"अर्थात् आमच्याविरुद्ध आजवर जाधव, ताराबाई आईसाहेब वगैरे मंडळींनीं

---

⁑ याच प्रसंगावर 'पेशवाईचा ध्रुव ढळला !' या कादंबरीची उभारणी मुख्यतः करण्यांत आली आहे.

* चंद्रसेन जाधव बाळाजी विश्वनाथाशीं भांडून मोगलांकडे निघून गेला, तो वृत्तांत 'पेशवाईचें ध्रुवदर्शन' या कादंबरींत आला आहे. 'चंद्रसेनाचा भाऊ शंभुसिंगही भावाबरोबर निघून गेला होता....बरींच वर्षें दोघे भाऊ एकविचारानें चालत होते. ( मराठी रियासत, मध्यविभाग-३ ).

जीं कारस्थानें* रचिलीं त्यांत तुम्ही तिघेही सामील असलां पाहिजे." महाराज त्या तिघांही गोंधळ्यांना म्हणाले.

महाराजांचे उद्गार ऐकून त्या तिघांनींही खालीं माना घातल्या. तिंबाजी त्यांच्या वतीनें म्हणाला, " महाराज ! हें असें चालावयाचेंच. विचारी माणसांच्या हातून देखील पक्षाभिनिवेशाच्या भरांत अशा गोष्टी अनेकदां घडतात."

" मग, त्याबद्दल त्यांना आम्ही दोष देत नाहीं; उलट त्यांच्या पक्षनिष्ठेचें आम्ही कौतुक करतों. बरें; तुझी हकिकत तशीच अपुरी राहिली." महाराज मुद्द्यावर येऊन शंभुसिंगाला म्हणाले.

तिंबाजी आपली हकिकत पुढें सांगूं लागला, " मग आम्ही तेथून जाधव कांहीं कारस्थानांच्या निमित्तानें दक्षिणेंत आले तेव्हां त्यांच्याबरोबर दक्षिणेंत आलों. आपणांला दगाफटका करावा असें जाधवांच्या मनांत होतेंच; त्या त्यांच्या विचाराला संभाजीराजांच्या विचाराची जोड मिळाली व त्या उभयतांनीं मिळून हें काम आम्हां चौघांवर सोंपविलें. पूर्वतयारी म्हणून आम्हीं गोंधळ्यांचा पेशा पत्करिला, व त्या पेशानें हिंडतां हिंडतां अखेर ह्या पायरीला येऊन पोंचलों. दरम्यान् आजकाल ज्या अनेक गोष्टी झाल्या त्या आम्हींच केल्या. सातार्‍यांत यमाजी व गमाजी यांना रात्रौ खरपूस मार मिळाला तो आम्हीं दिला. आपल्या गोटांत प्रवेश मिळावा म्हणून पिराजी व नाथाजी यांच्या ओळखी करून घेऊन त्यांना भांगेंतून गुंगीचें औषध आम्हीं चारलें. अवांतर गोष्टी आपणांला माहीत आहेतच, तेव्हां त्यांचा पाढा वाचण्याची आवश्यकता नाहीं."

" पण मग इतक्या प्रयासांनीं आम्हांला ठार करण्याचा योग साधला असतांना तुम्हीं ऐन् वेळीं तो कां दवडिला ! " महाराजांनीं विचारलें.

तिंबाजी उत्तरला, " तें मीं महाराजांना यापूर्वीच निवेदन केलें आहे. आतां आम्हांला तारणें किंवा मारणें सर्वस्वीं महाराजांच्या हातीं आहे. आम्हांला आमच्या अपराधाबद्दल कोणतेंही शासन होवो; पण आमच्यामुळें श्रीमंत बाजीरावसाहेबांवर मात्र वृथा ठपका येऊं नये."

---

* ताराबाई व चंद्रसेन जाधव यांच्या फितव्याबाबतचा पत्रव्यवहार इतिहासविश्रुतच आहे. ताराबाईकडून चंद्रसेनाला ता. २७।८।१७११ रोजीं गेलेल्या एका महत्त्वाच्या पत्रांत आप्पाजी व शहाजी या फितुरांचा स्पष्ट नामनिर्देश आहे. (प्रतिनिधि घराण्याचा इतिहास–ग्रंथांक १; पृ. २५३ ).

बाजीराव, चिटणीस, पुरंदरे वगैरे मंडळी श्रीपतरावाच्या मागोमाग साताऱ्याहून मसूरला यावयाला जी निघाली होती, ती नेमकी याच वेळीं तेथें येऊन पोंचली. सर्वांनीं महाराजांसमोर येऊन अत्यंत नम्रतापूर्वक मुजरा केला. त्या मंडळीला पाहतांच महाराजांना पराकाष्ठेचा आनंद झाला.

"महाराज! आपल्या आज्ञेप्रमाणें हा सेवक आपल्या चरणांपाशीं हजर आहे. आतां, कांहीं अत्यंत महत्त्वाच्या कामासाठीं मला सकाळींच साताऱ्याबाहेर जावें लागलें, त्यामुळें इकडे येण्याला थोडा वेळ लागला." बाजीराव जोडल्या हातांनीं म्हणाला.

चिटणीस, पुरंदरे, गोविंदा व हसन यांना यापूर्वीं तेथें घडलेल्या गोष्टी कांहींच माहीत नसल्यानें आतां काय प्रसंग ओढवतो व काय नाहीं अशी हुरहुर त्यांच्या जिवाला लागून राहिली होती. पण महाराजांच्या शब्दानें त्यांचा संशय फिटला व सर्वत्र आनंदी आनंद झाला. महाराज बाजीराव, चिटणीस व पुरंदरे ह्या तिघांनाही आपल्या जवळ बसावयाला लावून म्हणाले, "बाजीराव! तुम्ही आलां हें बरें झालें. तुमच्याविषयीं आमचा जो गैरसमज झाला होता तो आपोआप दूर झाला. त्यामुळें तुमच्या वडिलांच्या पश्चात् तुम्हांलाच पेशवाईचीं वस्त्रें देण्याचा आमचा जो निश्चय होता, तो कायम झाला आहे."

इकडे महाराज व बाजीराव, पुरंदरे, चिटणीस वगैरे मंडळींचें कुशलसंभाषण चाललें आहे, तोंच तेथें आनंदराव सुमंतही येऊन दाखल झाले. त्यांनीं श्रीपत-रावाला तांतडीनें बाजूला बोलावून घेतलें, व त्या दोघांचें थोडा वेळ कांहीं खलबत झालें. तें खलबत अगदीं एकान्तांत झालें असल्यानें तें कशाविषयीं झालें वगैरे कोणाला कांहींच कळण्याला मार्ग नव्हता. पण बाजीराव, पुरंदरे, चिटणीस वगैरे मंडळींचें तिकडे लक्ष्य असल्यानें त्यांनीं तर्कानें ओळखलें कीं, सकाळीं बाजिरावानें सुमंतांना गांठून जो मोठा फितुर पकडला, त्याबाबतचेंच तें खलबत असलें पाहिजे, आणि तें तसेंच महत्त्वाचेंही असलें पाहिजे. कारण, तेव्हां सुमंतांना येतांना व मग श्रीपतरावाशीं बोलतांना जर कोणीं पाहिलें असतें तर ते बरेच तोऱ्यांत दिसले असते. पण त्यांच्याशीं बोलतांना श्रीपतरावाचा चेहरा मात्र क्षणोक्षणीं इतका काळवंडून जात होता कीं, जणुं काय यांना कोणी वधस्तंभाकडेच ओढून नेत आहे!

वेळ तरी आली म्हणजे कशी जुळून येते पहा! बाजिरावाला पेशवाईचीं वस्त्रें देण्याचा महाराजांचा बेत पूर्वींपासूनच होता; तो मध्यंतरीं जरी उन्मळून पडण्याच्या

अगदीं बेतांत आला होता, तरी आतांच्या संशयनिवृत्तीमुळें सर्व गोष्टी पुन्हा पूर्वपदावर आल्या. त्यांनीं तेथल्या तेथें चिटणीस, पुरंदरे वगैरे मंडळी बसली होती त्यांना उद्देशून म्हटलें, "आतां उदयीक बाजिरावांना पेशवाईचीं वस्त्रें अर्पण करावयाचीं."

श्रीपतराव व सुमंत तेवढ्यांत बाहेरून तेथें आले. श्रीपतरावानें उतावेळपणानें महाराजांच्या इच्छेला संमति दर्शविली, "मीदेखील महाराजांना आतां तशीच विनंति करणार होतों."

श्रीपतरावाच्या तोंडून हे शब्द निघालेले ऐकून महाराजांखेरीज इतर सर्वांना वांझेला मूल व्हावें किंवा पाषाणाला फुलें फुलावीं त्याप्रमाणें आश्चर्य वाटलें. महाराजांना मात्र आश्चर्यापेक्षां आनंदच जास्त वाटला. त्यांना अंतरींची खूण काय माहीत! ते मनांत म्हणाले असतील कीं, इतका विजेचा कडकडाट झाल्यावर अखेर पर्जन्यवृष्टि झाली हें फार चांगलें झालें. त्यांनीं तसें भरसभेंत बोलूनही दाखविलें, व श्रीपतराव आणि बाजीराव यांचे उजवे हात आपल्या दोन हातांनीं धरून एकमेकांच्या हातीं देऊन ते म्हणाले, "आज पेशवे व प्रतिनिधि यांचा फिरून एकदिल झाला आतां उद्यां बाजीराव पेशवे झाल्यावर सर्वांनीं एकजुटीनें वागून मराठशाहीचा उत्कर्ष जेणेंकरून होईल असें वर्तावयाचें."

महाराजांचीच इच्छा पडली ती, तिला मान्यता कोण देणार नाहीं! बाजीराव व श्रीपतराव यांनीं तोंडदेखलें कां असेना पण एकमेकांकडे पाहून स्मितहास्य केलें. इतर सर्वांनीं मात्र मनापासून आनंद व्यक्त केला. तेवढ्या माणसांत ज्याला मनापासून आनंद झाला नाहीं असा एकच माणूस होता; ते सुमंत होत. ते तेथें सुतक्यासारखे खिन्नवदन होऊन बसले होते.

"आतां आम्हांला वाटतें, सर्व मंडळी दमून आली आहे, त्या अर्थीं त्यांनीं आतां आज विश्रांति घ्यावी." महाराज म्हणाले.

"मी आतां तेंच सुचविणार होतों." श्रीपतराव म्हणाला.

"पण महाराजांनीं आमचा न्याय केला नाहीं." तिंबाजी पुढें होऊन म्हणाला.

महाराज उठतां उठतां हंसून म्हणाले, "तुमचा न्याय झाला आहे, आतां निवाडा द्यावयाचा तेवढा राहिला आहे. रात्रौ आम्ही तुमचें पोवाडेगायन ऐकूं व मग तुम्हांला काय शिक्षा करावयाची ती करूं."

राणोजी, मल्हारी, पिराजी, नाथाजी, रहमान व नूरनिहार ही कैदी मंडळी बाजूला उभी होती. त्या मंडळीची अजून चौकशी व्हावयाची होती. गोंधळ्यांविषयीं बोलतांना

महाराज हंसले, त्यावरून गोंधळ्यांचें भाग्य उदयाला आलें एवढें सर्वांना कळून चुकलें. पण इतर मंडळींच्या जिवाला 'काय होईल कसें होईल' अशी जी टांगणी लागलेली होती, ती त्यामुळें कशी कमी होणार ! ती मंडळी बापुडवाण्या मुद्रेनें बाजिरावाकडे पाहूं लागलेली पहातांच बाजिरावाला त्यांची कींव आली. तो महाराजांना म्हणाला, " महाराज ! ह्या गरीब माणसांची एकदां चौकशी झालेली बरी. त्या बिचाऱ्यांच्या मनाला केवढी चिंता लागून राहिली असेल ! "

" हो ! खरेंच ! " असें म्हणून महाराज स्वतः उठून त्या मंडळीसमोर गेले. पहातात तों त्यांच्या आवडत्या लक्ष्मीबाईची आवडती दासी नूरनिहार कैदी म्हणून समोर उभी असलेली त्यांना प्रथम दिसली.

महाराजांनीं विचारलें, " नूर ! हें काय ? तूं इकडे कशी ? तूं काय अपराध केलास ? "

नूरनिहार हात जोडून उत्तरली, " महाराज ! मी माझ्या स्वतःच्या व पिलाजी आणि मल्हारी यांच्या बायकांच्या पातिव्रत्याचें किल्यावरील व किल्ल्याबाहेरील कांहीं गुंडांपासून संरक्षण करण्याला झटल्यें, हा गुन्हा मीं केला."

नूरनिहारच्या मार्मिक व खोंचिक उत्तराचें महाराजांना व इतर सर्वांना मोठें कौतुक वाटलें. महाराजांनीं तिची समग्र हकिकत तिच्या तोंडून ऐकून घेतली. त्यावरून तिच्या तेजस्वी सच्चारित्र्याविषयीं महाराजांची खात्री होऊन चुकली. इतकेंच काय; पण अशा अनुपमेय सदाचारी स्त्रीला आपण पूर्वी भलत्याच खोट्यानाट्या आरोपावरून भलतीच शिक्षा गैरसमजानें दिली हें फार वाईट कृत्य आपल्या हातून घडलें असें त्यांचें मन त्यांना खाऊं लागलें. ते म्हणाले, " नूर ! तुला आम्हीं निर्दोषी ठरवून आजन्म बंधमुक्त तर केलीच आहे; पण यावर तुला आणखी कांहीं मागणें मागावयाचें असलें तर माग."

" महाराजांच्या पायांपाशीं मला आणखी कांहींदेखील मागावयाचें नाहीं. मला यापुढें अब्रूनें व पतिव्रताधर्मानें आयुष्य कंठण्याचा मार्ग मोकळा झाला, यांतच मला अलम् दुनियेचें राज्य मिळाल्याइतका आनंद आहे."

बाजीराव विनोदानें मध्येंच म्हणाला, " नाहीं; महाराज ! आपण तिची पूर्वीचीच शिक्षा कायम करावी; फक्त तिनें आजन्म कैद भोगावयाची ती यापुढें हसन महाताच्या संसारांत भोगावी, अशी माझी इच्छा आहे."

"म्हणजे? हिचा दादला जिवंत आहे?" महाराजांनीं आश्चर्यानें हंसून विचारलें.

"हो!" बाजिरावानें तडक बाहेर जाऊन हसनला आंत बोलावून आणून महाराजांसमोर उभा करून म्हटलें, "हा पहा हसन!"

त्या वेळीं नूरनिहार व हसन यांना किती संतोष वाटला असेल, याचें वर्णन शब्दसृष्टींत सामावण्याजोगें नसल्यानें त्याचा आपण कल्पनेनेंच आस्वाद घेतला पाहिजे. त्यांत सांगण्यासारखी व सांगतां येण्याजोगी गोष्ट एवढीच कीं, महाराजांनीं त्या जोडप्याचें कुशलवृत्त पुसून त्या दोघांना यापुढें सुखानें संसार करतां यावा म्हणून वांई प्रांतीं एक खेडें इनाम दिलें.

जो आरोप नूरनिहारवर होता तोच रहमानवरही असल्यानें व राणोजी आणि मल्हारी यांच्यावरील आरोप तर अगदींच पुळपुळीत असल्यानें, शिवाय ह्या सर्व आरोपांचें आतांच साकल्येंकरून निराकरण झालें असल्यानें ती सर्व मंडळी महाराजांकडून निर्दोषी ठरली हें सांगावयाला नकोच. राहतां राहिले पिराजी व नाथाजी. त्यांचा मात्र अपराध होता खरा; पण तो अपराधही त्यांनीं हेतुपुरस्सर केला नसल्यानें व ते बाजिरावाचे अत्यंत विश्वासू नोकर होते हें महाराजांना माहीत असल्यानें त्यांनीं त्यांना देखील अपराधांची क्षमा केली.

वरवर पहातां ह्या गोष्टी अगदीं सहज वडून आल्या, व श्रीपतरावानें आपलें ह्या वेळेपर्यंतचें धोरण अकस्मात् बदलून तें परिस्थितीशीं जुळतें घेतलें म्हणून इतक्या लौकर ही तडजोड झाली हेंही खरें. पण श्रीपतरावानें तरी इतकें जुळतें कां घेतलें हा प्रश्न होताच. अर्थात् हा प्रश्न बाजीराव, पुरंदरे व चिटणीस यांव्यतिरिक्त इतर मंडळींना होता. बाजीराव, पुरंदरे व चिटणीस यांनीं मात्र पूर्णपणें ओळखलें होतें कीं, निजामाकडे गफलतीनें पाठविण्यांत आलेला खलिता जो बाजिरावाच्या हातीं मिळाला, त्यांत श्रीपतरावाच्या गळ्याला लागण्यासारख्या कांहीं गोष्टी असतील म्हणूनच स्वारी आज इतकी गरीब गोगलगाय बनली आहे.

त्या मंडळीच्या त्या तर्कांची प्रचीति येण्याला फार वेळ लागला नाहीं. शाहूमहाराज बैठकींतून उठून जातांच श्रीपतरावानें बाजीराव, चिटणीस व पुरंदरे यांना मोठ्या प्रेमानें व मिनतवारीनें दूर खाशा कारभाऱ्यांसाठीं उभारण्यांत आलेल्या शामियान्यांत नेलें व तेथें बाजिरावाचे पाय धरून पदर पसरून विनवणी केली, "बाजीरावसाहेब! मी आपणापाशीं एका गोष्टीची भीक मागणार आहें."

बाजीराव हा अत्यंत उमदा व दिल्दार गडी पडला. श्रीपतरावानें त्याचे पाय धरून पदर पसरतांच त्याचें अंःतकरण अगदीं विरघळून गेलें. आपण सुमंतांकडून हिसकावून घेतलेला मोहोरबंद लखोटा महाराजांपर्यंत पावता करूं नये हाच श्रीपतरावाच्या विनवणीचा अर्थ असावा असें त्यानें तेव्हांच ओळखून देखील मनांतल्या मनांत खऱ्या वीराला शोभेसा विचार केला, 'ज्याचीं कर्मे तो भोगील. पण शरण आलेल्याला मरण देणें ही खऱ्या वीराची दानत नव्हे.' त्यानें तावडतोब श्रीपतरावाला आपल्या हातांनीं वर उठविलें व अभय देऊन विचारलें, "श्रीपतराव! उठा. मी तुमच्यासाठीं काय करूं ? सांगा."

"आपण तेवढा लखोटा महाराजांपाशीं देऊं नका." श्रीपतराव गयावयां करीत म्हणाला.

"असें त्यांत आहे तरी काय ?" बाजिरावानें विचारलें.

"ती माझी घोडचूक आहे. माझ्या भोळसटपणाचा तो मूर्तिमंत पुरावा आहे." श्रीपतराव उद्गारला. वास्तविक तो त्याचा भोळसटपणा नसून नीचपणा—घरभेदेपणा होता. श्रीपतराव भोळसट नसून नीच, घरभेदा व स्वार्थसाधु आहे हें बाजीराव वगैरे मंडळीला पक्कें माहीत होतें. पण ह्या सापाचे दांत पाडून आपणांला त्याच्याशीं खेळतां येईल अशी त्यांची कल्पना होती. ही कल्पना कांहीं चूक नव्हती; पण ती कृतींत उतरवितांना मात्र चूक झाली. श्रीपतरावाच्या त्या पश्चात्तापदग्ध उद्गारांना भाळून बाजीराव म्हणाला, "तुमचा आग्रहच असेल तर मी तो लखोटा महाराजांच्या स्वाधीन करणार नाहीं. पण त्यांत असें काय आहे तें मात्र आम्हांला जरूर पाहिलें पाहिजे."

श्रीपतराव हायसा एक उसासा टाकून म्हणाला, "आपण ज्या अर्थी मला क्षमा केली आहे, त्या अर्थी तो लखोटा उघडून पाहण्याला आपणांला माझी मुळींच हरकत नाहीं."

यावर 'ठीक आहे' असें म्हणून बाजिरावानें आपल्या कमरपट्ट्यांतून तो लखोटा बाहेर काढला व चिटणिसाच्या हातीं देऊन म्हटलें, "बाबा! तुम्हीच उघडून पहा पाहूं!"

चिटणिसांनीं स्मितहास्य करीत तो लखोटा श्रीपतरावाच्या परवानगीनें उघडला. तों त्यांत दोन कागद असलेले त्यांना आढळून आले. त्यांनीं ते दोन्ही कागद वाचून पाहून बाजिरावाच्या हातीं दिले. बाजिरावानेंही ते वाचून पाहिले.

वाचतां वाचतां त्याच्या चेहऱ्यावर विस्मयाच्या छटा स्पष्ट उमटत होत्या. कोणाही विचारवंताला विस्मयचकित करण्यासारखेच ते दोन्ही कागद होते. त्यांपैकीं एक महाराजांनीं हैद्राबादप्रांत व आणखी कांहीं बादशाही प्रांतांतील चौथाई व सरदेशमुखीचा हक्क कांहीं द्रव्य व इंदापूर जवळचा कांहीं मुलूख यांच्या मोबदल्यांत निजामाच्या स्वाधीन केल्याबद्दलचा पक्का करारनामा होता. त्यावर खुद्द महाराजांची स्वाक्षरी व शिक्कामोर्तब होता. आणि दुसरा कागद प्रतिनिधीच्या खासगत सहीशिक्क्याचा असून त्यांत प्रतिनिधीनें पूर्वयोजनेनुसार ही कामगिरी पार पाडल्याबद्दल निजामानें देऊं केलेल्या वऱ्हाडच्या जहागिरीची निजामापाशीं खासगत मागणी करण्यांत आली होती.* ह्या करारनाम्यावर श्रीपतरावानें महाराजांची सही गफलतीनें कशी घेतली होती हें बाजिरावाला लक्ष्मीबाईमार्फत पूर्वरात्रींच कळलें होतें, व तें त्यानें चिटणीस व पुरंदरे यांच्या निदर्शनालाही आणून दिलें होतें. श्रीपतरावाला मात्र त्याची दाददेखील नव्हती. बाजीराव वगैरे मंडळींनींही एकवार श्रीपतरावाला ह्या अपराधाबद्दल क्षमा करावयाची एवढें ठरविल्यावर तो करारनामा खरा किंवा खोटा हा प्रश्न धसाला लावला नाहीं. सर्वजण काय ओळखावयाचें तें मनोमन ओळखून चुकले. श्रीपतरावानें पुन्हा एकवार त्या तिघांसमोर पदर पसरून क्षमा मागितली व ते दोन्ही कागद आतांच्या आतां नष्ट करण्याबाबत विनंति केली. बाजिरावानें तेव्हां चिटणीस व पुरंदरे यांच्याकडे पाहिलें व त्यांनीं त्याच्याकडे पाहिलें. त्यांच्या पाहण्याचा स्पष्ट अर्थ बाजिरावानें ते कागद निदान तेव्हां तरी नष्ट करूं नयेत असा होता. तो अर्थ बाजिरावाच्याही ध्यानांत आला; पण त्यानें तो मनावर घेतला नाहीं. तो आपल्या जन्मजात दिलदार उमद्या स्वभावावर गेला. त्यानें तेथल्या तेथें ते दोन्ही कागद फाडून दूर फेंकून देऊन श्रीपतरावाला म्हटलें, " श्रीपतराव ! ह्या वेळीं मी तुमचा बचाव करीत आहें. ह्या कारस्थानाचा एकूण एक धागादोरा

* श्रीपतराव प्रतिनिधि व आनंदराव सुमंत निजामाला उपरोक्त कारणासाठीं फितूर झाले व त्याबद्दल श्रीपतरावानें निजामाकडून लांचेदाखल वऱ्हाडांत ज़हागीर घेतली, ही गोष्ट एथें वस्तुतः भासमान असली तरी तत्त्वतः खरी आहे. कारण थेट हीच फितुरी व हाच लांचखाऊपणा त्यानें यानंतर पांचचार वर्षांनीं केला, याला इतिहासाची स्पष्ट साक्ष आहे. तो वृत्तांत पुढें येईलच.

मला सांपडला आहे. ह्या करारनाम्याचा खरेखोटेपणाही आम्हांला पूर्णपणें कळून चुकला आहे. पण एकवार तुम्हांला वांचवावयाचें असें ठरल्यावर त्या अनिष्ट गोष्टीचा ऊहापोह करण्यांत अर्थ नाहीं. आतां माझें तुम्हाला स्नेहभावानें एवढेंच सांगणें आहे कीं, झाल्यागोष्टी होऊन गेल्या. यापुढें 'गेलें तें उदक व राहिली ती गंगा' असें आपण सर्वांनीं मानूं व एकविचारानें मराठशाहीला वैभवाला चढवून एकतंत्री हिंदुपदपातशाहीचा झेंडा अटकेपार फडकवूं. तुम्हीआम्ही सारे एका गादीचे सेवक एकविचारें वर्तूं लागलों, तर ह्या हिंदुस्थानांतच काय पण साऱ्या दुनियेंत आपणांला हिंदुपदपातशाही स्थापन करतां येईल. सदिच्छा, पराक्रम व एकी यांचा त्रिवेणीसंगम झाल्यावर जगांत अशी कोणती अद्वितीय गोष्ट आहे, कीं, जी त्या संगमावर स्नान करून पावन झालेल्या पराक्रमी पुरुषांना साध्य व्हावयाची नाहीं ! ''

श्रीपतराव समाधानपूर्वक एक, दोन, तीन निश्वास सोडून म्हणाला, "बाजीरावसाहेब ! मी देखील तेंच म्हणतों. आपण सर्वांनीं मिळून झाल्यागेल्या गोष्टी विसरून जाऊन यापुढें एकमतानें कारभार करावयाचा."

बाजीराव आणि श्रीपतराव अर्थात् पेशवे आणि प्रतिनिधि ह्या प्रधानमंडळांतील दोघां प्रधान पुरुषांची अशी अकल्पित दिलजमाई झालेली पाहून चिटणीस व पुरंदरे ह्या दोघांनाही इतकें समाधान झालें कीं, थोडया वेळापूर्वीं बाजिरावाची प्रतिनिधींच्या पापाचा पुरावा नष्ट करण्यांत चूक झाली ही खूणगांठ जी त्यांनीं आपल्या अंतःकरणांत मारून ठेविली होती ती देखील त्या समाधानाच्या भरांत त्यांना नकळत आपोआप सुटून गेली. त्यांना संतोषपूर्वक वाटलें कीं, 'बाळाजी विश्वनाथांच्या हातून उभारली गेलेली पेशव्यांच्या पराक्रमाची ध्वजा बाळाजी विश्वनाथांच्या पश्चात् आज प्रतिनिधींच्या कुटिल कारस्थानामुळें उन्मळून पडण्याच्या ऐन् धोक्यांत होती पण परमेश्वरानें तो प्रसंग टाळला. मराठशाहीचें भाग्य थोर ! ती भट घराण्यांतील अतुल पराक्रमी पेशव्यांच्या पराक्रमांना वंचित व्हावयाची नव्हती म्हणूनच बाजिरावसाहेबांना पेशवाईचीं वस्त्रें मिळण्याच्या वाटेंत जशा पर्वतप्राय अडचणी अकस्मात् आल्या तशा त्या आपोआप दूर झाल्या व आज हें एक मराठशाहीवरील संकट दूर झालें.'

## प्रकरण एकविसावें

# 'पेशवाईचा पुनर्जन्म'

बाजीराव व श्रीपतराव यांची अशी—औपचारिक कां होईना; पण—दिलजमाई झाली तेव्हां सुमंत तेथें उभे होतेच. श्रीपतरावाच्या अपराधाची त्यांना खरी ओळख नसल्यानें श्रीपतरावानें बाजिरावासमोर मान वांकविण्यांत खुळेपणा केला असेंच त्यांना वाटलें, व यामुळें 'आपला बाजिरावानें सकाळीं जो अपमान केला, त्याबद्दल आपण श्रीपतरावामार्फत महाराजांपाशीं चुगली करून यथास्थित सूड घेऊं' असा जो त्यांचा मानस होता, त्याची माती झाली. श्रीपतरावानें इतकें भिण्याजोगें त्या दोन पत्रांत होतें तरी काय, तें पाहाण्यासाठीं त्या पत्रांचे फाडून फेंकून दिलेले तुकडे जमा करून जुळवून पाहाण्याचा सुमंतांचा विचार होता. पण बाजीराव, श्रीपतराव वगैरे मंडळी तेथून उठली तेव्हां श्रीपतरावानें ते सर्व तुकडे घाईघाईनें गोळा करून बरोबर घेतल्यामुळें त्याची तेथेंही निराशा झाली. तरीही श्रीपतरावाच्या मागोमाग जाऊन ते तुकडे तो कोठें फेंकतो तें चोरून पाहून तेथून ते हस्तगत करून जुळवून वाचण्याचा सुमंतांचा फेरविचार होता. पण श्रीपतराव कसला वस्ताद ! त्यानें ते तुकडे नेऊन प्रथम आपल्या हातांनीं अग्निसात् केले, व त्यामुळें तेथेंही सुमंताची आशा फोल ठरली !

श्रीपतराव ह्या जंजाळांतून एकदांचा मोकळा झाल्यावर त्याला तिंबाजीची चौकशी करण्याला फावलें. ज्या वेळीं तिंबाजीनें महाराजांसमोर आपण खरा कोण हें सांगितलें, तेव्हांच श्रीपतरावानें त्याची चौकशी करावयाची; पण त्यानें ती केली नाहीं. त्यावरून सर्वांना वाटलें असेल कीं हे पाठोपाठचे बंधु कीं हाडवैरी? पण वस्तुस्थिति तशी नव्हती. तिंबाजी तर मूळपासूनच घरादाराविषयीं व सग्यासोयऱ्यांविषयीं उदासीन होता; शिवाय श्रीपतरावाचे हे डावपेंच पाहून त्याचें मन आणखी विटलें होतें. पण श्रीपतरावाचें तसें नव्हतें. त्याला तिंबाजीची बरीवाईट माहिती जी काय कळली ती आज ! आज त्याला तिंबाजीबद्दल फारसा राग न येतां उलट आपलेपणाच वाटला. मात्र तो आपलेपणा व्यक्त करण्याला त्याला ह्या वेळपर्यंत फुसरत नव्हती तेथें त्याचा नाइलाज होता. तो जो बाजिरावाची समजूत करून उठला, तो

प्रथम तिंबाजीकडे गेला, व त्याची समजूत करून त्याला घरीं नेण्याचा प्रयत्न करूं लागला. पण फुकट ! तिंबाजी त्याच्याशीं नीट चार शब्द बोलावयालाही तयार नव्हता, तो घरीं कोठला जावयाला !

*　　　　*　　　　*

रात्रौ पूर्वीं ठरल्याप्रमाणें पोवाडेगायन झालें. तिंबाजीनें पूर्व रात्रीं साताऱ्यांतील किल्ल्यावर जे पोवाडे गाइले होते, तेच आजही गाऊन दाखविले. अखेर त्यानें पेशव्यांचा पोवाडाही गाइला. पोवाडयांना आज फारच रंग भरला होता. विशेषतः अखेरच्या पोवाडयाच्या वेळीं तर सर्व मंडळी मंत्रमुग्ध नागाप्रमाणें नुसती डोलत होती. त्या पोवाडयांतील तिसऱ्या चौकाचें व त्यांतही विशेषतः 'जाधवजी, घाटगे, पिंगळे, प्रतिनिधि, रिपु सारे' एथपासूनच्या पुढच्या चरणांचें गायन सुरू असतांना तर सर्व लोक डोलत डोलत श्रीपतरावाकडे टकमक पहात होते, व श्रीपतराव खालीं मान घालून मुकाटयानें तें सारें सहन करीत होता. तिंबाजीनें गेल्या रात्रीच्या अपमानाचा सूड घेण्यासाठीं म्हणून कीं काय, 'जाधवजी०' एथपासूनच्या पोवाडेगायनावर जास्त जोर दिला. पण त्याला कोणीं विरोध केला नाहीं कीं कोणी रागें भरलें नाहीं.

पोवाडेगायन पूर्ण झाल्यावर महाराजांनीं चार सोन्याचीं कडीं व पोशाक आणवून एकेक कडें व पोशाक त्या चौघां गोंधळ्यांपैकीं प्रत्येकाला—पण आतां आपण त्यांना गोंधळी कसें म्हणावयाचें ! त्या वीरांना देऊन त्यांचा गौरव केला, व चिटणिसांना सांगून संभाजीराजांना त्या चौघांच्या गौरवपर एक पत्र लिहवून उदयीक तें पत्र जासुदाहातीं त्या चौघांबरोबर कोल्हापुरीं रवाना करण्याची आज्ञा केली. शेवटीं ते त्या चौघांनाही उद्देशून म्हणाले, " कायरे ! तुमच्यासारख्या गुन्हेगारांना हीच शिक्षा योग्य नाहीं काय ? "

त्या चौघांनीं व तेथल्या इतर सर्वांनीं तेव्हां महाराजांच्या अंगचे गुणग्राहकता, सहिष्णुता व औदार्य हे गुण पाहून तोंडांत बोटें घातलीं. तिंबाजीशिवाय बाकीच्या तिघांनीं महाराजांकडून मिळालेल्या बक्षिसाचा सादर स्वीकार केला. पण तिंबाजीनें मात्र बक्षीस घेण्याचें नम्रतापूर्वक नाकारलें. श्रीपतरावानें तेव्हांही पुन्हा शाहूमहाराजांना सांगून तिंबाजीला पदरीं ठेवून घेण्याविषयीं शिकस्त केली. पण तिंबाजीच मुळीं राजी नव्हता, त्याला कोण काय करणार ! तो तसाच सर्वांचा निरोप

घेऊन व आपल्या इतर तिघां सोबत्यांना सोडून संन्यस्त वृत्तीनें भगवच्चिंतनांत आयुष्य कंठण्यासाठीं निघून गेला.

*   *   *

उदयीक बाजिरावाला पेशवाईचीं वस्त्रें द्यावयाचा महाराजांचा विचार पूर्वींच ठरला होता हें आपणांला माहीत आहेच. तो समारंभ मसूर मुक्कामींच दुसऱ्या दिवशीं मिति चैत्र वद्य सप्तमी शके १६४२ रोजीं मोठ्या थाटामाटानें पार पडला. पेशवे व प्रतिनिधि यांच्यांतील झगडा हें तेव्हां एक राष्ट्रीय दुखणेंच गणलें जात असल्यानें बाळाजी विश्वनाथांच्या पश्चात् बाजिरावाला पेशवाई कांहीं केल्या मिळूं द्यावयाची नाहीं असा श्रीपतरावानें चंग बांधलेला ज्यांना ज्यांना माहीत होता, त्या त्या सर्वांनीं जेव्हां त्याच श्रीपतरावाच्या हातून त्याच बाजिरावाला पेशवाईचीं वस्त्रें मिळालेलीं पाहिलीं तेव्हां त्यांच्या, व ज्यांनीं मागाहून ती आनंददायक वार्ता ऐकिली त्यांच्या—किंबहुना अलम् मराठी दुनियेच्या तोंडून तेव्हां सहजस्फूर्तीनें उद्गार निघाले, " आज पेशवाईचा पुनर्जन्म झाला ! "

*   *   *

पेशवे व प्रतिनिधि यांच्यामधील ह्या झगड्याच्या अनुषंगानें आपणांला निमित्त-मात्र परिचित झालेल्या इतर व्यक्ति व प्रसंग यांची औपचारिक बोळवण केल्याशिवाय ह्या कथानकाची पूर्तता व्हावयाची नाहीं, म्हणून अखेर जातां जातां त्यांचाही निर्देश येथें करणें अवश्य आहे. पिलाजी जाधव जो किल्ल्यावर आजारी होता, तो पुढें लौकरच बरा झाला, व बाजिरावानें—नव्हे, श्रीमंत बाजीराव पेशव्यांनीं त्याला आपला हितकर्ता समजून अधिक मान्यतेला चढविलें. आतां, पिलाजीची आवडती कमळा मृत्युमुखीं पडून सटवाजी पोरका झाला, त्याला कोणाचाच इलाज नव्हता. तरीपण पिलाजीनें पुन्हा स्वतःचा संसार साजरा करण्यासाठीं व सटवाजीला आई पाहिजे म्हणून लौकरच दुसरें लग्न केलें. पिलाजीप्रमाणेंच राणोजी शिंदे व मल्हारी होळकर यांनाही पेशव्यांनीं मोठ्या मानमान्यतेला चढविलें. मल्हारीची गौतमा जी त्या दिवशीं पेशव्यांच्या वाड्यांत आश्रयाला आली होती, तिला दुसऱ्याच दिवशीं पेशव्यांनीं तिच्या शौर्याबद्दल चोळी-पातळ देऊन गौरवानें भोजराजाबरोबर तिच्या घरीं पावती केली. लक्ष्मीबाईच्या निरतिशय प्रेमामुळें बाजिरावांना श्रीपतरावाचा कावा मुद्देमालासह ओळखतां आला, व त्या दृष्टीनें बाजीराव लक्ष्मीबाईचे ऋणी होते हे जरी खरें, तरी तें ऋण ज्या स्वरूपांत फेडून घ्यावयाची लक्ष्मीबाईची इच्छा

होती, त्या स्वरूपांत त्याची फेड करण्याला ते असमर्थ होते. ते मनांतून लक्ष्मीबाईला—ती महाराजांची एक प्रियतमा या नात्यानें—मातेसमान मानीत होते व पुन्हा योग्य संधि साधून लक्ष्मीबाईची तशी समजूत घालण्याचें त्यांनीं आपल्या मनाशीं ठरविलें होतें. नूरनिहार तर आतां नव्या उमेदीनें संसाराला लागून सुखी झालीच होती. किल्लेदाराशीं जुलियेचें लवंडावी वर्तन पूर्वीपासूनच सुरू होतें व तो तिचा जन्मस्वभावच असल्यानें त्यांत तिच्या किंवा किल्लेदाराच्या अन्तापर्यंत बदल होणें शक्य नव्हतें. कारण जुलिया ही बोलून चालून म्हाताऱ्या नवऱ्याची तरणी बायको व तशांत उनाड वृत्तीची होती. तिच्यापासून कोणाला झाली तरी ती वागत होती त्यापेक्षां निराळी अशी काय अपेक्षा करतां येणार! तिकडे महाराजांच्या अंतःपुरांत सकवारबाई, सगुणाबाई वगैरे राण्यांच्या मत्सरी स्वभावामुळें सवतीमत्सराचा इंधन सारखा पिचत होताच. त्या अग्निकुंडांत विरूबाई होरपळत पडली असल्याचें आपणांला या पूर्वीच विदित झालें आहे. महाराजांना ती व बसवंतराव कासुर्डे या दोघांच्या वर्तनाविषयीं संशय आला होता. पण ती परम-मपुण्यवान् साध्वी पडली व बसवंतरावही परमनीतिमान् स्वामिभक्त पडला, म्हणून त्यांच्यावर जसा तो आरोप * आला तसा तो दूर झाला, व विरूबाई पूर्ववत् महाराजांच्या मर्जींत जाऊन बसली. हें कारस्थान सकवारबाईच्या सवती-मत्सराचेंच कटुफळ होतें. पण सकवारबाईचा तो डाव हुकला. लक्ष्मीबाईच्या बाबतींत देखील सकवारबाईनें तसाच डाव रचण्याला प्रारंभ केला होता; पण त्या डावाचा पायंडाच जुलियेनें ढांसळून पाडला, तेव्हां तिथेंही सकवारबाईचा नाइलाज झाला. तरीही सकवारबाई किंवा सगुणाबाई ह्या स्वस्थ बसणाऱ्या स्त्रिया नव्हत्या-तसेंच श्रीपतराव व बाजीराव यांचा जरी तात्पुरता समेट झाला, तरी तो केवळ औपचारिक असल्यानें व बाजीराव पेशवे झाले तें विरूबाईच्या प्रतिपक्षी राण्यांना आवडलें नसल्यानें त्यांचें पुन्हा श्रीपतरावाशीं व पेशव्यांच्या इतर वैऱ्यांशीं सख्य होऊन त्या सख्यांतून अशा कलागती पुनःपुन्हा निर्माण होणार हें उघड होतें. यमाजी व यमाजी ही बापलेकांची जोडी श्रीपतरावाच्या प्रभावळींत पुढेंही पूर्ववत् चमकत राहिली, एवढें सांगितलें म्हणजे त्यांच्या आचारविचारांचे वारे पुढें कोणत्या दिशेनें वहात असतील हें निराळें सांगण्याची आवश्यकता नाहीं. रामदासपंत व हकीम महंमदअल्ली हे निजामाचे हेर जरी या खेपेपुरते अपयश पदरीं

* 'मराठी दफ्तर,—रुमाल पहिला' ( पृ. १२९।१२२ ) पहा.

घेऊन माघारे गेले, तरी ते म्हणजे स्वस्थ बसणारे माणूस होते असें थोडेंच आहे ! एकदां प्रयत्न फसला तर पुन्हा प्रयत्न करून पहावयाचा ह्या न्यायानें निजामाच्या तर्फेनें त्यांची धडपड पुढेंही चालणारच.आणि खतीब व त्याच्यामुळें मस्तानी हीं एकदां फंसावयाची वांचली तरी पुन्हा तीं फसणार नाहींत किंवा त्यांना कोणी फंसवणार नाहींत असें थोडेंच होतें. खतीब जरी महाराजांचा आश्रित होता, तरी त्याचा ओढा कां न कळे. पण निजामाकडे होता. तो ओढा पुढें मस्तानीला कसा नडला हें यथाकालीं आपण पाहूंच ! ह्या साऱ्या अवांतर गोष्टींत विशेषतः सांगण्यासारखी अशी एक गोष्ट मात्र घडली ती अशी कीं, नागोजीभटाचें भाग्य मात्र ह्या निमित्तानें अकल्पित रीत्या उदयाला आलें. 'आपल्या आक्काला हा योग्य वर शोभेल' अशा भावनेनें तो राधाबाईच्या मनांत भरला होताच; तोच विषय जेव्हां राधाबाईनें पुढें श्रीपतरावापाशीं काढला, तेव्हां श्रीपतरावालाही ती निवड बरी वाटली, व त्यानें बाजिरावाच्या विचारें लौकरच यथाकालीं एका सुमुहूर्तावर नागोजीभटाला आपली अक्का अर्पण करून त्याला तीन लाखांची जहागीर आंदण दिली. नागोजीभटाला ही जहागीर जरी श्रीपतरावाकडून मिळाली, तरी ती बाजीराव पेशव्यांच्या मध्य-स्थीनें मिळाली, व तेव्हांपासून नागोजीभट्ट आणि पुढें त्याचे वंशजही पेशव्यांना आपले अन्नदाते मानीत आले. चिटणीस व पुरंदरे हे प्रथमपासूनचे मराठशाहीचे व पेशव्यांचे कैवारी, ते आपल्या आयुष्याच्या अन्तापर्यंत आपल्या ब्रीदाला जागले.

ही अर्थातच अवांतर गोष्टींची निरवानिरव झाली; पण पेशवे व प्रतिनिधि यांच्यामधील वितुष्टाची निरवानिरव मात्र एथें करतां येणें शक्य नाहीं. तें वितुष्ट प्रतिनिधींनीं कायम ठेवलें, इतकेंच काय पण तें वाढविलें, व प्रतिनिधींच्या पुत्र-पौत्रांनींही पेशवाईच्या अंतापावेतों पेशव्यांशीं दावेदारीच केली ! ही दावेदारी पेशवाईला अर्थात् मराठशाहीला—नव्हे, हिंदुपदपातशाहीला पुढें दुहीच्या वडवा-नलांत जाळून भस्मसात् करणाऱ्या अनेक कारणांपैकीं एक प्रधान कारण होती. हें अर्थात फार लांब पल्ल्याचें निवेदन झालें. तरीही श्रीमंत बाजीराव पेशव्यांनीं अशा कोणत्याही वितुष्टाला न जुमानतां आपल्या अतुल पराक्रमाच्या व राजकारण-धुरंधरतेच्या जोरावर 'बापसे बेटा सवाई' अशी मर्दुमकी गाजवून हिंदुपदपात-शाहीच्या लोकोत्तर कार्याचा पाया आपल्या कारकीर्दींत कसा रचिला, हें शब्दचित्र **'पेशवाईचें पुनर्वैभव'** ह्या पुढील कादंबरींत वाचकांना पहावयाला सांपडेल.

**ॐतत्सत्**

'कादंबरीमय पेशवाई'मधील पहिली कादंबरी

# पेशवाईचें पुण्याहवाचन

शिवशाहीच्या अखेरीला जंजिऱ्याचा सिद्दी कासीम यानें आपल्या अंमलांत कोंकणप्रांतीं हिंदुधर्म, हिंदुरयत व हिंदुललना यांचा कसा अमानुष छळ मांडला होता, त्या छळांत इतर कितीएक सुखवस्तु हिंदुघराण्यांबरोबर श्रीवर्धनकर देशमुखांच्या घराण्यावर कशी आग पाखडली गेली, सिद्दीनें पेशवाईचे संस्थापक बाळाजी विश्वनाथ यांचे वडील बंधु जानोजी विश्वनाथ यांना गोण-पाटांत बांधून समुद्रांत बुडवून अमानुषपणें कसें ठार मारलें, त्या जुलमाला त्रासून बाळाजी विश्वनाथांना आपल्या घरादारावर पाणी सोडून बायकोमुलांसह रात्रींबेरात्रीं वणवण हिंडून कसा देशत्याग करावा लागला, व त्यांच्या देश-त्यागांत बाळाजीपंतांचे गुरु ब्रह्मीभूत ब्रह्मेंद्रस्वामी धावडशीकर यांच्या शुभाशीर्वादा-नें देवाच्या दरबारीं बाळाजी विश्वनाथांच्या नांवें पेशवाईचें पुण्याह-वाचन कसें ठेविलें गेलें, वगैरे मनोरम व स्फूर्तिदायक प्रसंगांनीं नटविलेली ही कादंबरी अवश्य वाचा; म्हणजे स्वधर्म, स्वदेश व स्वललना याविषयींच्या अभिमानाची ज्योति तुमच्या व तुमच्या मुलांबाळांच्या अंतःकरणांत तेवूं लागेल.

**सचित्र. विक्रीस तयार** **किंमत १।८**

---

'कादंबरीमय पेशवाई'मधील दुसरी कादंबरी

# पेशवाईची प्राणप्रतिष्ठा

ह्या कादंबरींत शाहूमहाराजांची मोगल बादशहाच्या कैदेंतून सुटका, ताराबाई-ची अघोर राज्यतृष्णा, त्यापायीं मराठशाहीवर गादीच्या अधिकाराबाबत ओढवलेलीं अपरिमित संकटें, त्या संकटांतून बाळाजी विश्वनाथांनीं आपल्या राजकारणपटुत्वानें मराठशाहीचें बुडतें तारूं किनाऱ्याला लावून शाहूमहा-राजांना राजपद कसें प्राप्त करून दिलें व आपल्या अलोट स्वामिभक्तीच्या जोरावर महाराजांची कृपा कशी संपादन केली, वगैरे चित्तवृत्ति थरारून सोडणारे विविध प्रसंग आहेत.

**सचित्र. विक्रीस तयार** **किंमत १।८**

---

'कादंबरीमय पेशवाई'मधील तिसरी कादंबरी

# पेशवाईचें ध्रुवदर्शन

शाहूमहाराज व ताराबाई यांच्यातील दुफळीमुळें सातारची गादी नामशेष होण्याच्या पंथाला लागली असतां बाळाजी विश्वनाथांनीं शाहूमहाराजांची बाजू अनेक अडचणींना न जुमानतां सांवरून धरली, व महाराजांच्या शत्रूंचे दांत त्यांच्याच घशांत युक्तीनें घातले, आणि त्या त्यांच्या कामगिरीवर खूष होऊन महाराजांनीं त्यांना त्यांची कर्तबगारी ओळखून पेशवाईचीं वस्त्रें दिलीं, एथवरचा रमणीय कथाभाग ह्या कादंबरींत आला आहे.

**सचित्र. विक्रीस तयार** **किंमत १॥८**

---

'कादंबरीमय पेशवाई'मधील चौथी कादंबरी

# पेशवाईचा ध्रुव ढळला ?

· बाळाजी विश्वनाथ पेशव्यांच्या पेशवाई कारकीर्दींतील अत्यंत महत्त्वाची कामगिरी त्यांनीं दिल्लीच्या बादशहापासून शाहूमहाराजांच्या नांवानें स्वराज्य-चौथाई सरदेशमुखीच्या सनदा आणल्या ही होय. ह्या प्रसंगावरच ह्या कादंबरींतील कथानकाची उभारणी करण्यांत आली आहे. बादशहानें शाहूमहाराजांच्या राणीच्या अब्रूवर घाला घालण्याचा बेत केल्यामुळें राणीनें आत्महत्या करून अब्रू कशी बचावली, सगुणाबाई व सकवारबाई ह्या महाराजांच्या दुसऱ्या दोन राण्यांच्या सवतीमत्सरग्रस्त वर्तनानें महाराज व पेशवे यांच्या राजकारणांत अनंत बखेडे कसे उत्पन्न झाले, पण त्या बखेड्यांना न जुमानतां पेशव्यांनीं आपल्या लोकसंग्रहकारी राजकारणपटुत्वाच्या जोरावर बादशहाला मातीला मिळवून दिल्लीहून स्वराज्याच्या सनदा हस्तगत करून बादशहाच्या कैदेंतील राजमाता येसूबाई व इतर राजमंडळी यांची कशी मुक्तता केली, हें ह्या कादंबरींत पहावयाला सांपडेल.

**सचित्र. विक्रीस तयार** **किंमत १॥८**

---

